# अनुक्रमणिका

—*—


१ दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

२ विद्वानांचे अभिप्राय

## भाग पहिला—प्रमाणविचार

| प्रकरण | नांव | पृष्ठें |
|---|---|---|
| १ | नव्या हिंदुधर्माची आवश्यकता | १–५ |
| २ | धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा | ६–१३ |
| ३ | धर्मनिर्णयाची जुनी मीमांसापद्धति | १४–२४ |
| ४ | धर्म हा अपूर्व व अदृष्ट आहे काय ? | २४–३९ |
| ५ | धर्म आणि पुरुषबुद्धि | ३९–५८ |
| ६ | नव्या हिंदुधर्माचें अधिष्ठान | ५८–७० |
| ७ | हिंदु कोणास म्हणावें ? नि हिंदुस्थान कोणाचा ? | ७०–८० |
| ८ | देशकालविचार | ८०–९३ |

## भाग दुसरा—व्यवहारविचार

| | | |
|---|---|---|
| ९ | 'नायमात्मा बलहीनेन लभ्यः' | ९४–१०२ |
| १० | उत्थानयोग | १०२–११४ |
| ११ | वर्णव्यवस्था | ११४–१३७ |
| १२ | जातिसंस्था | १३७–१५९ |
| १३ | जात्युत्कर्ष | १५९–१६९ |
| १४ | व्यवसाय | १६९–१८३ |
| १५ | शिवाशीव नि विटाळ | १८३–१९८ |
| १६ | आहार | १९९–२१५ |

## भाग तिसरा—विवाहविचार

| | | |
|---|---|---|
| १७ | चार आश्रम व सर्वश्रेष्ठ गृहस्थाश्रम | २१६–२३६ |
| १८ | विवाहसंस्था, स्त्रीगौरव व विवाहसंस्कार | २३६–२५७ |
| १९ | कांहीं विवाहसंबद्ध विषय | २५७–२७६ |

२० गोत्रप्रवरविचार २७६–२९१
२१ विधवाविवाह २९२–३०३
२२ घटस्फोट ३०४–३१२
२३ एकपत्नीत्व व स्त्रियांचे अधिकार ३१३–३२२


## भाग चौथा–समष्टिविचार


२४ संस्कार व वेदाधिकार ३२३–३३२
२५ शुद्धि व व्रात्यस्तोम संस्कार ३३३–३४५
२६ अंत्यसंस्कार, अशौच व श्राद्ध ३४६–३५५
२७ दिनचर्या ३५६–३६०
२८ सण व शिष्टाचार ३६०–३७६
२९ व्रतें व नेमधर्म ३७७–३९०
३० दानें ३९०–४०५
३१ पापपुण्य, स्वर्गनरक व प्रायश्चित्त ४०५–४१३


## भाग पांचवा–तत्त्वविचार


३२ नीतिधर्माची सापेक्षता ४१४–४२५
३३ नव्या हिंदुधर्माचें तत्त्वज्ञान ४२५–४३६
३४ ईश्वराचें स्वरूप ४३६–४४३
३५ सगुण ईश्वर व अवतारवाद ४४४–४५५
३६ भक्तिमार्गाचें नवें स्वरूप ४५५–४७८
३७ हिंदुधर्माचें उज्ज्वल स्वरूप ४७८–५१०
३८ नवहिंदुधर्मसूत्रावली ५११–५१५
३९ संघटनेचा संदेश ५१५–५३३
४० उपसंहार ५३३–५३७
४१ विषयसूचि ५३९–५५०

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना



परमेश्वराच्या कृपेनें नवा हिंदुधर्म या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रसिद्धीचा योग आज येत आहे, याबद्दल आनंद व अभिमान वाटतो. प्रथमावृत्ति १९४२ सालीं प्रसिद्ध केली. त्याच वर्षीं महागाई चौपटीनें वाढली, वस्तूंचे भाव कडाडले, तरी आम्ही ग्रंथाचें मूल्य अगदीं माफक म्हणजे ३ रुपयेच ठेवलें. त्यामुळें पहिली आवृत्ति सत्वर खपण्यास साह्य झालें. हिंदुसमाजांत झालेल्या जागृतीमुळें हिंदु समाजानेंही या मार्गदर्शक पुस्तकाचा सत्कार केला. अभिमानास्पद गोष्ट म्हणजे आमच्या अनेक ठिकाणच्या चाहात्यांनीं या ग्रंथाचा प्रसार उत्तम तऱ्हेनें केला.

विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे ग्वालेर संस्थानचे अधिपति हिज हायनेस श्रीमन्महाराज मे. ज. सर जिवाजीराव शिंदे सरकार अलीजा बहादूर G. C. S. I., G. C. I. E. यांनीं प्रथमावृत्तीच्या ४०० प्रतींना उदार आश्रय दिला. श्रीमन्महाराजांनीं संस्थानांतील प्रत्येक शाळेंत एकेक प्रत देऊन हिंदुत्वाच्या जागृतीस साह्य केलें. याबद्दल श्रीमन्महाराज सरकारांचे आम्ही कृतज्ञतापूर्वक अभिनंदन करितो. फलटण दरबारनेंही ११ प्रती घेऊन १५० रु. दक्षणा पाठविली. त्याबद्दल फलटणचे राजेसाहेब श्रीमंत मालोजीराव नानासाहेब नाईक निंबाळकर व त्यांचे सुविद्य दिवाण-साहेब रावबहादूर के. व्ही. गोडबोले या उभयतांचे आम्ही आभार मानतों. माफक मूल्य, हिंदुसमाजांतील जागृति आणि महाराजांचा आश्रय यामुळें या ग्रंथाची पहिली दीड हजारांची आवृत्ति अवघ्या दोन वर्षांतच संपली.

हिंदुसमाजाचें निरीक्षण, अवलोकन, धर्मशास्त्रग्रंथांचें वाचन आणि समाजशास्त्रीय सिद्धांतांचें चिंतन आम्हीं यथाशक्ति गेलीं अडीच तपें चालविलें आहे. विशेषतः या ग्रंथाच्या प्रथमावृत्तिपूर्वीं आम्ही धार्मिक, सामाजिक, सांस्कृतिकदृष्ट्या अखिल हिंदुसमाजाचें निरीक्षण करावें म्हणून तीस

प्रश्नांचें एक परिपत्रक प्रसिद्ध केलें, आणि त्या दृष्टीनें महाराष्ट्राबाहेर मलबार, मद्रास, सिंध, राजपुताना, बंगाल, वगैरे प्रांतांत प्रवासही केला. अनेक विद्वानांशीं चर्चा, संभाषणें, गांठीभेटी झाल्यावर हा ग्रंथ लिहिलेला आहे.

**वैचारिक साह्यः**—गेल्या आगस्टमध्यें केसरी पत्रांत **नवा हिंदुधर्म** ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीची आम्हीं सूचना दिली आणि विचारवंतांना वैचारिक साह्य देण्याची विनंति केली. आमचे जुने थोर मनाचे मित्र श्री. **यशवंतरावजी गुण्ये**, बी. ए. एल्‌एल्. बी. यांनीं हा ग्रंथ अथपासून इतिपर्यंत वाचून फार महत्त्वाच्या सूचना पाठविल्या. त्या सर्व वाचून, पचवून, त्यांच्याशीं समक्ष चर्चा करून त्यांतील बहुतेक आम्हीं द्वितीय आवृत्तीमध्यें घेतल्या आहेत. दुसरे गृहस्थ पुणे ट्रेनिंग कॉलेजचे भूतपूर्व-प्राचार्य श्री. **रामभाऊ जोशी** हे होत. त्यांच्याही सूचनांचा उपयोग ग्रंथांत केलेला आहे. बडोद्याचे श्री. गो. चिं. रास्ते यांनींही सबंध ग्रंथ वाचून महत्त्वाच्या सूचना केल्या. त्यांचाही अंतर्भाव, या ग्रंथांत केलेला आहे. विद्याव्यासंगी, सज्जन आणि सत्प्रवृत्त गृहस्थ श्री. वासुदेवराव चिपळूणकर पुणें, यांचीही वैचारिक बहुमोल मदत या ग्रंथास लाभलेली आहे. याशिवाय पहिल्या आवृत्तीवर अभिप्राय प्रसिद्ध करतांना ज्या विद्वानांनीं ज्या ज्या सूचना केल्या होत्या, त्यांचाही विचार करून ग्रंथ परिपूर्ण करण्याचा यत्न केला आहे. मुख्य भाग पांच असून ४० प्रकरणांमध्यें ते विभागले आहेत. आज उपस्थित झालेल्या सर्व धार्मिक प्रश्नांचा त्यांत स्पष्ट व साधार विचार केलेला आहे.

**ग्रंथगर्भींचा चांगावाः**—हा ग्रंथ द्वितीय मुद्रण असला तरी ६० पानें मजकूर अधिक घातलेला आहे. ठिकठिकाणीं विवेचनांत नवी माहिती व भर घालून नवी मांडणी केली आहे, हें वाचकांच्या ध्यानीं येईल. ग्रंथाची उपेक्षा करणें हा त्या ग्रंथावर मोठा अन्याय होय. प्रत्येक साक्षर हिंदूनें हा ग्रंथ अवश्य वाचावा. निदान या ग्रंथाचीं शेवटचीं चार प्रकरणें तरी वाचावींतच. हीं चार प्रकरणें म्हणजे ग्रंथगर्भींचा चांगावा आहे. प्रकरण सदतीस हें अथपासून इतिपर्यंत सर्व बदलून, त्यांत हिंदुधर्माचें उज्ज्वल स्वरूप विस्तारानें दाखविलें आहे. हिंदुधर्मांतील हीं उज्ज्वल तत्त्वें प्रत्येक सुशिक्षित हिंदूनें पुनः-

पुन्हां मनन करून दृढ केलीं पाहिजेत. हिंदुत्व म्हणजे काय? हिंदु म्हणून राहाण्यांत व मरण्यांत असें विशेष काय आहे? असल्या कुशंका ज्या न्यूनगंडांना येतात, त्यांना हें प्रकरण फारच उद्‌बोधक व मार्गदर्शक होणार आहे. महामहोपाध्याय पं. काणे यांच्या सूचनेप्रमाणें प्रकरण ३८ मधील नव–हिंदुधर्म सूत्रावली ही प्रत्येक हिंदूनें आचरणांत आणण्याचा दीर्घ प्रयत्न केला पाहिजे. प्रकरण ३९ मधील संघटनेचा संदेश म्हणजे हिंदु-समाजाच्या जीवनाचा पाया होय. हिंदुसंघटन या षडक्षरी मंत्रांत जी दिव्य शक्ति आहे, तिची जाणीव या प्रकरणानें होणार आहे. प्रकरण ४० मध्यें ग्रंथाचें सर्व स्वरूप थोडक्यांत सांगितलें आहे.

**पूर्वेतिहासः**—या ग्रंथाच्या निर्मितीचा थोडा पूर्वेतिहास येथें सांगणें क्रमप्राप्त आहे. तो प्रथमावृत्तीच्या प्रस्तावनेंतून येथें उध्दृत करितों.

" खिस्ताब्द १९२० या वर्षी सिंहस्थीं श्रीक्षेत्र नाशीक येथें महाराष्ट्र हिंदुधर्म परिषदेचें संस्मरणीय अधिवेशन भरलें. त्यांत आम्हीं मांडलेल्या योजनेप्रमाणें हिंदुधर्म, हिंदुसमाज नि हिंदुसंस्कृति या क्षेत्रांत गेलीं अडीच तपें प्रवचनें व पुस्तकें यांचे द्वारें आणि अन्य साधनांनीं जागृतीचें कार्य करीत आहों. श्री. गुरुवर्य प. प. केवलानंदस्वामी महाराज ( पं. नारायण-शास्त्री मराठे ) यांचें हार्दिक साह्य आणि पाठिंबा आमच्या या कार्यास प्रथमपासूनच आहे. आम्ही प्राज्ञपाठशाळेचे प्रचारक या नात्यानें संस्थेच्या वतीनें १९१६ ते १९२६ दहा वर्षे प्रवचनें व व्याख्यानें देऊन समाजांत जागृति केली. अस्पृश्योद्धार, शुद्धिकरण, क्षत्रियवैश्यांचें अस्तित्व इत्यादि विषयांवर केसरींतून लेख लिहिले आणि त्यांचीं चार पुस्तकेंही प्रसिद्ध केलीं.

हुतात्मा स्वामी श्रद्धानंदांच्या हत्येपासून आम्ही सर्वस्वीं हिंदुधर्म आणि सुधारणा आणि हिंदुसमाज संघटना यांविषयीं एकनिष्ठपणें स्वातंत्र्यानें जागृति करूं लागलों. ' हिंदुसमाज समर्थ कसा होईल ' हें पुस्तक १९२७ सालीं प्रसिद्ध केलें. पुढें तीन वर्षांनीं त्याचीच दुसरी आवृत्ति काढली. ' आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष–पूर्वार्ध ' हा ग्रंथ १९२९ सालीं प्रसिद्ध केला. ब्राह्मणांतील पोट-जातींच्या एकीकरणाविषयीं जागृति करून त्यावरही दोन पुस्तकें लिहिलीं आणि अकोल्यास मोठी ब्राह्मण परिषद् भरवून पोटजाति मोडाव्यात असें ठरविलें.

श्री. गांधीजींनीं येरवडा तुरुंगांत अस्पृश्यतानिवारणार्थ आणि मंदिरप्रवेशार्थ जेव्हां प्राणांतिक उपोषण आरंभिलें, तेव्हां सनातनीवर्ग 'धर्म अपरिवर्तनीय आहे, ईश्वरहीं त्यांत बदल करूं शकत नाहीं' असा प्रचार करूं लागला. आचारधर्म परिस्थितिसापेक्ष कसा बदलत आलेला आहे, हें साधार दाखविण्याकरितां आम्ही **धर्मशास्त्रांचें मंथन** करून तें १९३३ सालीं लोकांपुढें मांडलें. प्रस्तुतचा 'नवा हिंदुधर्म' हा ग्रंथ आमच्या तीस वर्षांच्या धर्म आणि समाज यांच्या अभ्यासाचें, निरीक्षणाचें आणि आजवर लिहिलेल्या विचारांचें परिणत फळ होय. महाराष्ट्रांत अस्पृश्यतानिवारण, शुद्धिकार्य, पोटजाति मोडणें इत्यादि आंदोलनें जोरांत चालू झाल्यामुळें सनातनी पंडित जागे झाले, सोनगीर येथील पंडित परिषदेमध्यें १९२४ सालीं परिवर्तनवादी व अपरिवर्तनवादी असे दोन पक्ष अगदीं उघड झाले. परिवर्तनवादी पक्षाचें अध्वर्युत्व श्री. पं. नारायणशास्त्री मराठे (केवलानंदस्वामी महाराज) यांचेकडे गेलें आणि अपरिवर्तनवादी पंडितांचें पुढारीपण काशीकर पंडितांचे अध्वर्यु पं. कै.वा. लक्ष्मणशास्त्री द्रवीडप्रभृतींकडे गेलें. या दोन पक्षांत एकवाक्यता होणें अशक्य आहे, असें दिसल्यानंतर परिवर्तनवादी पंडितांनीं 'धर्मनिर्णयमंडळ' या नांवाची संस्था स्थापन केली. तिच्या आद्य प्रस्थापकांमध्यें आणि घटकांमध्यें प्रस्तुत ग्रंथकार आहे. धर्मनिर्णयमंडळाच्या चर्चाविभागाचे निरंतरचे अध्यक्ष **श्री. प. प. केवलानंद स्वामी महाराज** यांचें आम्हास आजवर जसें वैचारिक साह्य झालें आहे, त्याचप्रमाणें याही ग्रंथास त्यांची प्रेरणा, त्यांची स्फूर्ति उपयोगी झाली आहे. धर्मनिर्णयमंडळाशीं संबद्ध असलेल्या महामहोपाध्याय पं. पां. वा. काणे, विद्वद्रत्न डॉक्टर दप्तरी, श्री. नानासाहेब चापेकर, तर्कतीर्थ पं. लक्ष्मणशास्त्री जोशी, तर्कतीर्थ पं. र.गो. कोकजे, महामहोपाध्याय पं. श्रीधरशास्त्री पाठक, श्रौताचार्य धुंडिराज दीक्षित बापट प्रभृति विद्वानांच्या विचारांचें, चर्चेचें व त्यांनीं लिहिलेल्या ग्रंथांचें साह्य प्रस्तुत ग्रंथास अतीव झालेलें आहे, हें ठिकठिकाणीं पायटिपेंत उध्दृत केलेल्या ग्रंथोल्लेखांवरून ध्यानांत येईलच.

धर्मनिर्णयमंडळानें वेळोवेळीं परिषदेमध्यें जे एकमतानें निर्णय दिले त्या निर्णयांचें स्पष्टीकरण करणारा, नव्या कालाला आवश्यक असा

हा 'नवा हिंदुधर्म' ग्रंथ आहे. हा ग्रंथ धर्मनिर्णयमंडळाचा म्हणून पुढें आलेला नसला, तथापि धर्मनिर्णयमंडळाची भूमिका व निर्णय हीं ध्यानांत घेऊन प्रस्तुत ग्रंथ लिहिलेला आहे. धर्मनिर्णयमंडळाशीं संबद्ध नसलेले पण विचारानें मंडळाच्या भूमिकेवर असलेले प्रा. श्री. म. माटे, प्रा. के. ना. वाटवे, डॉ. सहस्रबुद्धे, प्रा. दं. के. केळकर, श्री. का. न केळकर, श्री. स्वा. वीर तात्याराव व कै. बा. बाबाराव सावरकर प्रभृति विद्वानांच्या विचारांचें प्रतिबिंबही प्रस्तुत ग्रंथांत पहावयास सांपडेल.

या अशा उपयुक्त ग्रंथास जोंवर श्रीशंकराचार्यांची नि जुन्या पंडितांची संमति नाहीं आणि सरकार मान्यता देत नाहीं तोंवर याचा काय उपयोग? असा प्रश्न पुष्कळ लोक करतात. त्याचें उत्तर असें कीं पीठस्थ शंकराचार्य हे आजच्या कालापासून फारच मागें आहेत. आजच्या परिस्थितीचें ग्रहण त्यांना होत नसावें किंवा होत असले तरी जुन्याचेंच समर्थन करणें त्यांना इष्ट वाटत असावें. श्रीक्षेत्र काशी येथें उपस्थित असलेल्या तीनशें सनातनी पंडितांच्या साह्यानें हिंदुस्थानांतील चारी दिशांच्या प्रमुख पीठस्थ शंकराचार्यांनीं श्रीविश्वेश्वराच्या साक्षित्वाखालीं जे निर्णय सुमारें बीस वर्षांपूर्वी दिले ते पाहिले म्हणजे शंकराचार्य हे आजच्या परिस्थितीला अनुरूप कांहीं सांगतील अशी आशा करणें खपुष्पवत् आहे, हें स्पष्ट होतें.

**पुण्याची विद्वत् परिषद्:**—सरकारनें नेमलेल्या रावसमितीच्या द्वारा उपस्थित झालेल्या हिंदुधर्माच्या प्रश्नांच्या विचाराकरितां पुणें येथें गत वर्षी जूनमध्यें एक विद्वत् परिषद् भरली होती. या परिषदेस काशी, कलकत्ता, नागपूर आणि महाराष्ट्रांतून सुमारें ७५ पंडित उपस्थित होते. श्रीशंकराचार्य, श्रीगोकुलनाथजी महाराज, न्यायमूर्ति लोकूर, न्यायमूर्ति दिवाटिया, श्री. नरसिंह चिंतामण केळकर व भोरचे राजेसाहेब असे बडेबडे विद्वान् उपस्थित होते. या परिषदेमध्यें विचाराकरितां ३९ प्रश्न पुढें ठेविले होते. परंतु चार पांच दिवसांच्या अटीतटीच्या चर्चेनें तीन चार प्रश्नांचाही निर्णय लागला नाहीं. न्याय व्याकरण वेदांत मीमांसादि शास्त्रांतील पूर्वोत्तर पक्ष झडले, संस्कृतमध्यें वक्तृत्वाची हौस पुरी झाली. धर्मनिर्णयमंडळाच्या प्रतिनिधींनीं वादपद्धति सदोष म्हणून परिषदेंत भागच घेतला

नाहीं. श्री. केळकर, न्यायमूर्ति लोकूर यांनीं परिषदेपुढें आजच्या प्रश्नांचें स्वरूप मांडून अपेक्षाही सांगितली. परंतु तें सर्व अरण्यरुदन ठरून एकही निर्णय कालानुरूप दिला गेला नाहीं. धर्माचा हेतु काय? वेद पौरुषेय कां अपौरुषेय असल्या विषयावर चार दिवस काथ्याकूट करण्यांत आला आणि शेवटीं शास्त्र विरुद्ध रूढि असली तरी तिला मान्यता द्या, असें सांगण्यांत आलें. तात्पर्य, हे शब्दशरण आणि रूढिशरण पंडित नि श्री. शंकराचार्य हे आजची परिस्थिति आकलन करूं शकत नाहींत, हें गतवर्षी भरलेल्या पुणे येथील विद्वत् परिषदेनें पुनः एकवार सिध्द केलें आहे.

महत्त्वाची बाब अशी कीं धर्माधर्मनिर्णयामध्यें शंकराचार्य पीठाचें स्थान सोळाव्या शतकापासूनच सुदृढ झालें! आपापल्या सांप्रदायिक मतांचा प्रचार करणें हेंच शंकराचार्यांचें काम होतें आणि धार्मिक क्षेत्रांत निग्रहानुग्रहाचें कार्य हें तत्कालीन शिष्टांचें अर्थात् विद्वानांचें होतें. विद्वानांचा नि शिष्टांचा हा अधिकार शंकराचार्यांनीं बळकावलेला होता, तो सांप्रतच्या परिस्थितींत आतां स्वाभाविकच लोकशाहीच्या तत्त्वानुसार ज्यांचा त्यांचेकडे येत आहे, ही गोष्ट अभिनंदनीयच आहे. धार्मिक नि सामाजिक क्षेत्रांतील निग्रहानुग्रहाचें कार्य पूर्वी विद्वानांच्या परिषदा करीत असत, क्षेत्रस्थ विद्वान् तें काम करीत, हें कऱ्हाड येथील गिजरे घराण्याचे जे कागदपत्र प्रसिद्ध झाले आहेत, त्यांवरून उघड होतें. पूर्वीची तीच परंपरा धर्मनिर्णयमंडळांतील पंडितांनीं आज चालविलेली आहे. धर्मनिर्णयमंडळाचें हें कार्य लोकमतपरिवर्तनार्थ आहे. लोकमत प्रबळ झालें कीं सरकार मान्यता देतें असा आजवरचा अनुभव आहे. तात्पर्य, सर्व दृष्टीनें विचार केल्यास प्रस्तुतसारख्या ग्रंथांची उपयुक्तता व आवश्यकता लोकमतपरिवर्तनार्थ निःसंदेह आहे.

ज्यांना हिंदुधर्म, हिंदुसमाज, हिंदुसंस्कृति व हिंदुराष्ट्र यांची चाड आहे, ज्यांना हिंदुत्व अभिमानास्पद वाटतें, ज्यांना हिंदुराष्ट्राच्या प्राचीन परंपरेचा अभिमान आहे, त्यांचेकरितां हा ग्रंथ आहे. ज्या शिक्षितांना धर्मासंबंधीं कांहींच कळत नसतांना कळतें असें वाटतें, त्या सर्व शिक्षितांकरितां हा ग्रंथ आहे. तसेंच जे हिंदु अज्ञान व अनिष्ट रूढि यांमुळें,

पोळलेले व मागासलेले आहेत, ज्यांना पुढें येण्यास व कर्तृत्व दाखविण्यास वाव मिळाला नाहीं, ज्यांच्यावर आजपर्यंत अन्याय झालेला आहे, अशा सर्व हिंदु घटकांच्या उत्कर्षाकरितां हा ग्रंथ लिहिलेला आहे. हिंदूंतील बालांना, वृध्दांना, स्त्रियांना, पुरुषांना, साक्षरांना व सुशिक्षितांना, अर्थात् अखिल हिंदूंना खरें धर्मतत्त्व व रहस्य कळावें, याकरितां हा यत्न आहे. तो कितपत यशस्वी झाला हें वाचकांनींच ठरवावयाचें आहे.

**अस्मानी व सुलतानी:**—१९४२ या वर्षी अवर्षणामुळें मिरजेस पाण्याचाही भयंकर दुष्काळ पडला. सकाळीं पाणी, दुपारीं अन्न व रात्रीं राकेल अशा चिंतेच्या प्रवाहांत दिवस काढावे लागले. ४२ सालापासून महर्घतेचे चटके चांगलेच बसूं लागले आणि जीवनोपयोगी वस्तु मिळवून 'जगणें' हा मध्यम वर्गीयांचा एक पुरुषार्थ होऊन बसला. अशा या आपत्तींत 'आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष (उत्तरार्ध)' या ग्रंथाविषयीं केलेल्या अपीलाचा निकाल विरुद्ध झाल्यामुळें दोन हजार रुपये खर्चाचा पेंच उत्पन्न झाला. आम्हीं स्वतः त्या कामीं ८०० रुपये खर्चले. आमचे मुंबईचे मित्र श्री. काशीनाथपंत खानवीलकर यांच्या खटपटीनें ९५० रुपयांचा निधि जमा झाला. त्यांतील २०० रु. केसरी संस्थेनें दिले व शेवटीं कमी पडलेले जवळ जवळ २५० रु. धर्मवीर हिंदुराष्ट्रभक्त **दे. भ. आण्णासाहेब भोपटकर** यांनीं राष्ट्रिय निधीच्या ट्रस्टमधून देऊन आमची काळजी दूर केली, हें येथें साभार नमूद केलें पाहिजे.

**अन्यायाचा प्रतिकार:**—'आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष' या ग्रंथांत अक्षर न् अक्षर सत्य, साधार लिहिलें असतांना सत्यावर अन्याय झाला हें असह्य झालें. महामहोपाध्याय आण्णासाहेब काणे यांनीं शंभर ग्रंथ वाचून जे आधार मिळविले त्या सर्वांचा उपयोग करून 'न्यू लाईट ऑन इस्लाम,' हें इंग्रजी पुस्तक व त्याचाच गुजराथी अनुवाद 'इस्लामपर नवो प्रकाश,' अशीं दोन पुस्तकें आम्हीं १९४३ च्या डिसेंबरांत प्रसिद्ध केलीं. या ग्रंथांत अनेक प्रमाणग्रंथकारांच्या ग्रंथांतील सगळे उतारेच देऊन हिंदुमुसलमानांचा प्रश्न कसा सोडवावा याचेंही दिग्दर्शन केलें होतें. इंग्रजी प्रतींचा प्रसार हिंदुस्थानभर आणि गुजराथी प्रतींचा प्रसार सर्व गुजराथभर करण्याचा

यत्न करून अन्यायाच्या प्रतिकाराचें थोडें समाधान मानावें म्हणतों तोंच १९४४ च्या एप्रिलमध्यें मुंबई सरकारनें हीं दोन्ही पुस्तकें जप्त केलीं. या सुलतानी आपत्तीमुळें आणखी आर्थिक हानी झाली. आतां कॉंग्रेस सरकार या दोन्ही पुस्तकांवरील बंदी केव्हां उठवितें हें पहात बसणें भाग आहे.

**कोल्हापूर दरबारची कृपा:**—हिंदुसमाजावर होणाऱ्या आक्रमणांचा प्रतिकार करावा असें सांगण्याकरितां लिहिलेलीं तीन पुस्तकें जप्त झालीं, तेव्हां आतां हिंदु समाजाला संघटित होण्याचा मार्ग दाखवावा म्हणून प्रस्तुतच्या दुसऱ्या आवृत्तीच्या आणि हिंदुसंस्कृतिप्रदीप या नव्या ग्रंथाच्या प्रकाशनाचे विचार मनांत येऊं लागले. पण जेथें तेथें कंट्रोल व परवानग्या! यापुढें 'रस्ता बंद' अशा पाट्या दिसूं लागल्या. कागदाची दुर्मिळता, महर्गता, आणि तो मिळविण्याचें खर्चाचें तंत्र हें सगळें पाहून आणि एकंदर खर्च जवळ जवळ आठ हजारांच्या घरांत जाणार हें पाहून काळजीच वाटूं लागली. आम्ही जप्त पुस्तकाचे लेखक म्हणून मुंबई सरकार पत्रोत्तरेंही देईना; कलकत्त्याहून कागदाची परवानगी मिळेना, अशा विरुद्ध परिस्थितींत श्री. सहस्रबुद्धे, श्रीज्ञानेश्वर प्रेस, कोल्हापूर यांच्या मार्गदर्शनामुळें कोल्हापूर दरबारकडे नवा हिंदुधर्म या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीची व हिंदुसंस्कृतिप्रदीप यांच्या छपाईची परवानगी मागितली. दरबारचे या खात्याचे मंत्री **ना. गुलाबराव देशमुख** यांनीं या ग्रंथांच्या छपाईस लोकशिक्षणास हे उत्तम ग्रंथ आहेत म्हणून मोठ्या तत्परतेनें परवानगी दिली. नामदार देशमुखसाहेबांना अनेक आढेवेढे घेऊन नकार देतां आला असता. परंतु एकंदर परिस्थिति व कार्याचें महत्त्व जाणून नामदार देशमुखसाहेबांनीं अनुज्ञा देण्याचें सौजन्य दाखविलें त्याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत.

कोल्हापूर दरबारच्या कृपेनें परवानगी मिळाली, कागदही कसाबसा १२० रिमें संपादन करण्याची व्यवस्था केली. पण कागद, छपाई, बाइंडिंग, पत्रव्यवहार, टपाल, प्रवासादि खर्चाकरितां दोन्ही ग्रंथांस मिळून लागणारी ८००० रक्कम कशी जमवावी हा प्रश्न भेडसावूं लागला. पुस्तकें व प्रवचनें या एकच व्यवसायावर प्रपंच भागण्याची जेथें पंचाईत तेथें आठ हजारांच्या गोष्टी बोलणार कशा? मिरजेसारख्या ठिकाणीं दूध, तूप, भाजीपाला, जोंधळा, तांदूळ, साखर, गूळ, सर्पण इ. सर्व वस्तु आज अक्षरशः

चौपटीनें महाग झाल्या आहेत. त्यामुळें जेथें साठ–पाऊणशे रुपये पुरत तेथें रुपये तीनशें लागतात ! आणि ते तर मिळत नाहींत. अशा स्थितींत कांहीं चाहत्याकडे आर्थिक साह्य मागितलें व त्याकरितां एक योजनाही पुढें मांडली.

हिंदुसमाजोद्धारक–वाङ्मय–मालेच्या ग्रंथप्रकाशनाकरितां १९२६ सालीं आम्ही प्रथम एकदम २५ रु. देणारे शाश्वत ग्राहक, १०० रु. देणारे हितचिंतक, व ३०० अगर त्यापेक्षां अधिक देणारे आश्रयदाते असे वर्ग केले. वेळोवेळीं अशांच्या द्रव्यसाह्यानेंच गेल्या वीस वर्षांत मालेचे दहा ग्रंथ प्रसिध्द झाले आहेत. (ते सर्व आज प्रती संपल्यामुळें दुर्मिळ आहेत) महायुध्दामुळें सर्वच किंमती चौपटीनें वाढल्या म्हणून एकदम १०० रु. देणारे शाश्वत ग्राहक, ३०० रु. देणारे हितचिंतक व ५०० ते ५००० पर्यंत देणारे ते आश्रयदाते असे वर्ग ठरवून द्रव्य जमविण्याचा यत्न केला. हिं. स. वा. मालेतर्फे आजवर प्रसिध्द झालेलीं व यापुढें प्रसिद्ध होणारीं जुनीं व नवीं पुस्तकें या सर्व वर्गांच्या गृहस्थांना विनामूल्य, रजिस्टर बुकपोस्टनें घरपोंच पाठविण्याचें बंधन, मालेचे संपादक या नात्यानें आम्हीं पतकरलेलें आहे. ही योजना ज्या सद्‌गृहस्थांना पसंत पडली त्यांनीं केवळ या ग्रंथ-प्रकाशनासच मदत केली, असें नसून आम्हीं आजवर केलेलें, व करीत असलेलें कार्य ध्यानीं घेऊन विशेषतः हिंदुसमाजावर आक्रमण करणाऱ्या आक्रमकांचा प्रतिकार करण्याची वृत्ति उत्पन्न व्हावी म्हणून जें जागृतीचें कार्य आम्हीं निर्भयपणानें प्रवचनद्वारां करीत आहों आणि एकामागून एक तीन पुस्तकें जप्त झालीं तरी हिरीरीनें आणि ईर्ष्येनें जी जागृति आम्हीं करीत आहों, ती सर्व ध्यानीं घेऊन, त्याग, कष्ट व कळकळ यांचाही विचार करून मदत केलेली आहे. ही मदत उच्च भावनेनें देणगी (दान) या स्वरूपाची असली तरी त्याचा मोबदला ग्रंथाशिवाय सतत कार्याच्या रूपानें देणें, हें आमचें कर्तव्य आहे.

**हितचिंतकः**–बार्शी येथील सुलाखे हायस्कूलचे सत्प्रवृत्त हेडमास्तर व कवी श्री. ज. गं. करंदीकर यांनीं गीताजयंतीच्या निमित्तानें प्रवचनास बोलाविलें. त्या निमित्तानें **श्रीमंत काकासाहेब सुलाखे**, मॅनेजिंग एजंट्स,

लोकमान्य मिल्स बार्शी, यांच्या सहवासाचा अधिक योग आला. श्रीमंत काकासाहेब आम्हांला गेलीं तीन तपें ओळखीत आहेत. त्यांनीं या कार्यास हितचिंतक म्हणून ३०० रुपये दिले. तसेंच श्रीमंत जंबुआण्णा आरवाडे व शेट झुंबरलाल कुंदनमल, मॅनेजिंग एजंट्स, बार्शी स्पिनिंग अँड वीव्हिंग मिल्स, हेही ३०० रुपये देऊन मालेचे हितचिंतक झाले.

**शाश्वत ग्राहकः**–गेल्या गणेशोत्सवानंतर गुजराथ काठेवाडांत आम्ही हिंदुत्वाची जागृति केली. सांप्रत अहमदाबादेस असलेले मिरजेचे नागरिक टेक्स्टाईल तज्ज्ञ श्री. **यशवंतराव मराठे** यांनीं स्वतःसह प्रत्येकीं १०० रु. देणारे पांच शाश्वत ग्राहक मिळवून दिले. याबद्दल श्री. मराठे हे अभिनंदनास पात्र आहेत. ते पांच शाश्वत ग्राहक श्रीमंत व्ही. आर. मनोहर, श्रीमंत रा. गो. कवठेकर, श्रीमंत य. मो. मराठे, श्रीमंत ग. वा. देवघर व श्री. प्रसिद्धिविन्मुख हे होत. गेलीं कित्येक वर्षें जे आमचें अल्प स्वल्प कार्य अगत्यानें पहातात असे आमचे चहाते डॉ. एच्.व्ही. टिळक, मुंबई, बॅ. आबासाहेब नाईक, हैद्राबाद, श्री. स. गो. पाध्ये, मॅनेजर ओगले ग्लास वर्क्स, श्री. शंकरराव व श्री. आत्मारामपंत ओगले हे ओगले बंधु यांना पत्रद्वारें विनंति करतांच त्यांनीं प्रत्येकीं रु. १०० प्रमाणें साह्य पाठविलें. श्रीमंत कृ. ह. तथा **आण्णासाहेब गोरेगांवकर, सॉलिसिटर**—मुंबई हे हिंदुत्वनिष्ठ, सत्प्रवृत्त, धर्माभिमानी व थोर गृहस्थ आहेत. त्यांनीं आमचीं पुस्तकें वाचलीं व तीं त्यांना फार आवडलीं. त्यांनीं आपल्या बंगल्यांत मुद्दाम मित्रमंडळी जमवून एक प्रवचन करविलें. तें त्यांना पसंत पडल्यामुळें गेल्या जानेवारींत त्यांनीं मुंबईस ब्राह्मणसभेंत श्री. हेळेकर, अॅडव्होकेटसाहेब यांच्या सहकार्यानें एक प्रवचन सप्ताह करविला आणि हिंदुत्वाची जागृति केली. श्री. आण्णासाहेब यांना छपाईच्या खर्चाची अडचण कळवितांच त्यांनीं आपल्या मित्रांना पत्रद्वारें विनंति केली. त्यांच्या विनंतीस मान देऊन प्रत्येकीं १०० रु. देऊन जे मुंबईचे गृहस्थ मालेचे शाश्वत ग्राहक झाले ते श्रीमान शेठ वालचंद हिराचंद, श्रीमान शेठ एम्. एल्, डहाणूकर, श्रीमान शेठ दत्तात्रय नरहर खांडके, श्री. गजाननराव गोरेगांवकर, श्री. गो. गं. दांडेकरसाहेब भिवंडी हे होत. श्रीमंत आण्णासाहेब यांनींही स्वतःचे

नांव शाश्वत ग्राहकांत नोंदवून हस्तें परहस्तें जें साह्य केलें त्याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत.

याशिवाय डॉ. ग. रा. तळवलकर, श्रीमंत शांताबाई दाभोळकर, श्री. शंकर अमृत देशपांडे या मुंबईच्या गृहस्थांनीं या कार्यास अनुक्रमें ५०।५०।२५ अशा देणग्या दिल्या. श्रीमंत सुलाखे व श्री. शुक्ल यांच्या यत्नामुळें बार्शीतील कांहीं व्यापाऱ्यांनीं ५।१०।१५ प्रमाणें देणगी सुमारें ८५ रुपये दिली. अशाप्रकारें हा ग्रंथ प्रसिद्ध होण्यास वरील अनेक गृहस्थांनीं आर्थिक साह्य केलें, त्याबद्दल आम्ही त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों. विशेषतः या कामीं पुढाकार घेणारे **श्री. यशवंतराव मराठे, श्री. आण्णासाहेब गोरेगांवकर सॉलिसिटर** आणि **श्रीमंत काकासाहेब सुलाखे** अशा त्रिवर्गांचें आम्ही कृतज्ञतापूर्वक अभिनंदन करितों.

**श्री. एम्. आर. जोशी यांचें अभिनंदनः**—श्री. एम्. आर. जोशी कागदाचे व्यापारी, पुणें यांनीं या पुस्तकास लागलेल्या कागदापैकीं ४० रिमें कंट्रोल भावानें पुरवून या कार्यास रु. २५ ची देणगीही दिली, ही गोष्ट विशेष अभिनंदनीय आहे.

'नवा हिंदुधर्म' यासारखा ग्रंथ गुजराथीमध्यें नाहीं. तो त्या भाषेमध्यें प्रसिद्ध व्हावा, असें गुजराथमध्यें प्रवास करितांना आम्हांस आढळलें. म्हणून 'नवा हिंदुधर्म' ग्रंथाचा गुजराथी अनुवाद सिद्ध केला. गुजराथी अनुवादाकरितां पुरस्कार, प्रवास, टपाल मिळून सुमारें ५०० रुपये खर्च आला; तो घाटकूपरचे उदार गृहस्थ **श्रीमान् शेठ द्वारकादास वखारिया** यांनीं अनुवाद पाहून व संतोषही व्यक्त करून दिला. या देणगीबद्दल शेठ द्वारकादास तथा काकूशेठ यांचे आभार नमूद करतों. गुजराथी धनिकांचे आश्रयावरच या गुजराथी अनुवादाचें प्रकाशन अवलंबून आहे. ईश्वरकृपया तोही योग येईल अशी आशा आहे.

कोल्हापूर येथील श्रीज्ञानेश्वर प्रेसचे मालक श्री. सहस्रबुद्धे यांनीं अनेक अडचणी असतांही पुस्तक उत्तम छापून दिलें, त्याबद्दल त्यांचेही आभार मानतों.

**श्री. यशवंतराव गुण्ये यांचे आभारः**—हें द्वितीय मुद्रण असलें तरी जागजागीं पुष्कळ नवा मजकूर घातला. एक सबंध प्रकरण नवें

घातलें हें सर्व काम साक्षेपानें गतवर्षी ४ महिने खपून सिद्ध करून पाठविलें. परंतु छापखान्यांची स्थिति पूर्वीप्रमाणें आतां हुकुमी काम करून देण्याची राहिली नाहीं. आम्हास तर प्रचारार्थ वेळोवेळीं बाहेर जाणें, भाग पडे. अशा परिस्थितींत श्री. यशवंतराव गुण्ये बी. ए. एल्एल्. बी., ग्वाल्हेर दरबारचे वकील, पुणें यांनीं नवे शोध जेथल्या तेथें बरोबर घातले आहेत कीं नाहींत हें पाहण्याचें आणि बहुतेक मुद्रितांवर नजर टाकण्याचें काम मोठ्या अगत्यानें केलें, म्हणूनच हा ग्रंथ यावेळीं प्रसिद्ध झाला; नाहींतर किती दिवस लागले असते हें ईश्वर जाणे ! श्री. गुण्येसाहेब हे व्यवस्थित, दक्ष, टापटिपीचे गृहस्थ असल्यामुळें ग्रंथशुद्धीचें व मजकूर जुळणीचें काम आमच्यापेक्षांही उत्तम झालें आहे. या त्यांच्या बहुमोल साह्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यास आमचेजवळ शब्द नाहींत. तात्पर्य कोल्हापूर दरबार, कागदाचे व्यापारी, निधि देणारे, मुद्रक आणि श्री. गुण्येसाहेब अशा पांचामुखीं परमेश्वराच्या साह्यानें हा ग्रंथ प्रसिद्धीस आला.

शेवटीं ज्या जगन्नियामक शक्तीच्या कृपेनें अनेकांचें साह्य मिळून हें अल्पकार्य पार पडलें व ज्याच्या कृपेमुळेंच गेलीं तीस वर्षें हिंदुधर्म व हिंदुसमाजसुधारणेचें कार्य आमचेकडून अव्याहत चालू आहे, त्या ईशशक्तीचें अनन्यभावानें स्मरण करून आणि यापुढचें संकल्पित कार्य तोच दयानिधि सिद्धीस नेवो, अशी त्याची प्रार्थना करून हें प्रास्ताविक निवेदन पुरें करतों.

मिरज
श्रीव्यास पूर्णिमा
शके १८६८
१४।७।४६

हिंदुसमाजसेवक
महादेवशास्त्री दिवेकर.

# पहिल्या आवृत्तीवर आलेल्या
# विद्वानांच्या अभिप्रायाचें सार

श्रीमत् स्वामी केवलानंदमहाराज, वांई :–" नव्या हिंदुधर्माचा आढावा ग्रंथरूपानें हिंदुसमाजापुढें मांडण्याचें स्तुत्य कार्य आपण केलें आहे. "

श्रीमत् क्षात्रजगद्गुरु, कोल्हापूरः–" नवा हिंदुधर्म हा बहुमोल ग्रंथ लिहून धर्माच्या खऱ्या कार्यास आपण चालना दिलेली आहे."

रावबहादूर इतिहासकार सरदेसाई, कामशेटः–" या योग्यतेचा धर्मविषयक ग्रंथ माझे पाहण्यांत नाहीं."

महामहोपाध्याय पं. काणे, मुंबई–" हें पुस्तक प्रत्येक हिंदूनें अवश्य वाचावें. प्रकरण ३८ मधील 'नवहिंदुधर्म सूत्रावली' अत्यंत बोधप्रद व विचारणीय आहे."

श्री. जगन्नाथ रघुनाथ घारपुरे, मुंबई– " फार परिश्रम घेऊन चिकित्साबुद्धिपूर्वक हा ग्रंथ लिहिला आहे. यामुळें हिंदुसमाजाला बरीच चालना मिळणार आहे. "

श्रीमंत राजेसाहेब, औंध– " नव्या वर्धिष्णु व जयिष्णु धर्माचें केलेलें अत्यंत उद्बोधक विवेचन आम्हास सर्वस्वी पसंत आहे."

श्री. ज. स. करंदीकर, संपादक 'केसरी'– " बुद्धिप्राधान्य, तर्कशास्त्र, व इतिहासपद्धति हीं धर्मविचाराचीं मुख्य साधनें आहेत. त्यामुळें आपला ग्रंथ विचारप्रवर्तक व मार्गदर्शक झाला आहे. "

प्राध्यापक श्री. म. माटे, पुणें–" हा ग्रंथ म्हणजे सुशिक्षित समाजाच्या धर्मासंबंधींच्या वैचारिक खळबळीचा एक टप्पा आहे. "

ज्ञानप्रकाश–" नवयुगप्रवर्तक अभिनव हिंदुधर्माची रूपरेषा यांत उत्तम मांडली आहे. "

सकाळः–" ग्रंथकाराच्या तीन तपाचें फळ म्हणजे हा ग्रंथ आहे. ग्रंथ मार्गदर्शक आहे."

श्री. दा. न. शिखरे, पुणें:–" ग्रंथांतील सिद्धांत शिशाच्या गोळीप्रमाणें ठाशीव व भक्कम आहेत. त्यामुळें हा ग्रंथ बहुमोल आहे. "

# नवा हिंदुधर्म



## भाग पहिला
## प्रमाणविचार



### प्रकरण पहिलें

### नव्या हिंदुधर्माची आवश्यकता

(१) **हिंदुधर्माचें जगावर ऋणः**—हिंदुधर्म हा सर्व जगांतील विद्यमान धर्मांत अत्यंत प्राचीन असा धर्म आहे. हिंदुस्थानांत उत्पन्न झालेले हिंदुधर्म, जैनधर्म, बौद्धधर्म, शीखधर्म असे चार धर्म आहेत. चीन-जपानमध्यें कॉन्फ्यूशिअनधर्म, टाओधर्म, शिंटोधर्म हे धर्म असून, पॅलेस्टाइन, इराण व अरबस्तानामध्यें यहुदीधर्म, पारशीधर्म, मुसलमानधर्म व ख्रिस्तीधर्म असे चार धर्म आहेत. या सर्व धर्मांना हिंदुधर्मानें ऋण दिलेलें आहे. हिंदुधर्माचे संस्कार जैन व बौद्ध धर्मांवर झालेले आहेत. बौद्धधर्माची छाप ख्रिस्तीधर्मावर, ख्रिस्तीधर्माची छाप मुसलमानधर्मावर पडलेली असून साक्षात् वा परंपरेनें हिंदुधर्माचीं तत्त्वें इतर धर्मांनीं स्वीकारलीं आहेत.

(२) **ग्रंथोद्देशः**—एक काल असा दिसतो कीं हिंदुधर्म, हिंदु-राष्ट्र, हिंदु संस्कृति हीं परमोच्च पदावर होतीं! सर्व जग या राष्ट्राकडे आदरानें पहात होतें! नाना देशाचे विद्वान या राष्ट्राकडे येऊन येथील विद्या ग्रहण करीत असत! पण तो काल आतां उलटला आहे! धार्मिक,

सामाजिक, राजकीय अशा विविध कारणांनीं हिंदुसमाजाची व हिंदुराष्ट्राची अवनति झालेली आहे. हिंदुसमाजाची आणि हिंदुराष्ट्राची उन्नति करण्याकरितां अनेकद्वारांनीं निरनिराळे यत्न चाललेले आहेत. हिंदुसमाजाच्या आणि हिंदुराष्ट्राच्या अवनतीला धार्मिक नि सामाजिक दृष्ट्या जीं वैगुण्यें कारणीभूत झालेलीं आहेत, तीं समूळ नष्ट करण्याची दिशा दाखविण्याचा प्रस्तुत ग्रंथाचा उद्देश आहे. कोणतीहि गोष्ट आकांक्षेशिवाय पुढें येत नाहीं. नव्या हिंदुधर्माची आकांक्षा आणि आवश्यकता कां उत्पन्न झालेली आहे हें आतां सांगतों.

( ३ ) **नवाकाल, नवाधर्मः**–' नवी विटी, नवें राज्य,' या म्हणी-प्रमाणें आजच्या नव्या कालाकरितां नवा हिंदुधर्म अवश्य आहे. मनुष्य-प्राण्यामध्यें पूर्वीपेक्षां कांहीं बदल झालेला नाहीं. त्याचीं ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें-म्हणजे मन, बुद्धि, आत्मा, शरीर हीं सर्व जशींच्या तशींच आहेत. तथापि माणसांच्या कल्पना, भावना, विचार, ध्येयें, गरजा, पद्धति, शिष्टाचार इत्यादिमध्यें अतिशय परिवर्तन झालेलें आहे. प्राचीनकालचा मंत्रकाल, मध्यकालचा तंत्रकाल हे मागें पडून या यंत्रकालांत आपलें सर्व जीवन आतां यंत्रारूढ झालेलें आहे. भौतिक शास्त्रें व शोध यांनीं जगांत क्रांति केल्यामुळें सर्व जग पूर्वीपेक्षां अगदीं जवळ जवळ आलें आहे.

( ४ ) **परिवर्तनाची व्याप्तिः**–भौतिकशास्त्राच्या प्रगतीमुळें वेगवान् वाहनें अस्तित्वांत आलीं. त्यांनीं दळणवळण वाढविलें, ज्ञानाची देवघेव सुलभतेनें होऊं लागली, निरक्षरता झपाट्यानें कमी होऊं लागली, एकत्र-कुटुंबपद्धति गेली, व्यवसायामध्यें संकर झाला, त्यामुळें अन्नव्यवहारादि निर्बंधांना शैथिल्य आलें. छापखाने, कारखाने, विमाकंपन्या, वृत्तपत्रें इत्यादि जीवनाला अवश्य अशीं नवीं साधनें निघालीं; त्यांनींहि हिंदु-समाजामध्यें उलथापालथ करून टाकली! पारतंत्र्यामुळें हिंदुस्थानांत नवेनवे कायदे होऊं लागले आणि एकंदरींत परिस्थितीमध्यें फारच परिवर्तन झालें.

पुरुषांच्या पोषाखामध्यें, स्त्रियांच्या वेशभूषेमध्यें, केशरचनेमध्यें विलक्षण अंतर पडलें. जुन्या धर्मशास्त्राच्या मर्यादा ओलांडून आहार, व्यवसाय, शिवाशिवीच्या कल्पना, घरांची बांधणी, कुटुंबाची राहाणी

यांतहि क्रांति झालेली आहे. देवघरें, तीर्थें, क्षेत्रें, मठ, मंदिरें अशा सर्व ठिकाणीं नव्या युगांतील विचार वेगानें घुसत आहेत. परिस्थिती अशी झाली आहे कीं हिंदुधर्माचा पाया कायम ठेवून बुद्धिपूर्वक अवश्य ते फेरफार न केले तर प्रवाहपतित होऊन नकोत त्या गोष्टी हिंदुसमाजांत शिरतील. हिंदुधर्माचें वैशिष्ट्य राहावें म्हणून ज्या अनिष्ट चालीरीती आणि समजुती आज हिंदुसमाजांत घुसल्या आहेत व घुसूं पहात आहेत त्यांस आळा घालण्यासाठीं आणि क्रांतीच्या स्वरूपाचें परिवर्तन टाळण्यासाठीं बुद्धिपूर्वक कांहीं योजना आंखली पाहिजे. कारण नव्या युगांतील विचारानें व सुधारणेनें अस्पृष्ट असें एकहि क्षेत्र राहिलेलें नाहीं. अशा वेळीं नव्या युगाला अनुसरून 'नवा हिंदुधर्म' सांगण्याची अत्यंत आवश्यकता आहे.

**(५) बुद्धोत्तरकालीन धर्म म्हणजेच जुना हिंदुधर्मः—** प्राचीनकाळीं या भरतखंडांत यज्ञप्रधान वैदिकधर्म होता. पुढें वर्णाश्रमयुक्त स्मार्तधर्म अस्तित्वांत आला. तो प्रामुख्यानें त्रैवर्णिकांतच होता. बुद्धोत्तर कालांत पुराणोक्त धर्म अस्तित्वांत येऊन तो अखिल हिंदुसमाजामध्यें वावरूं-लागला. आज हिंदुसमाजांत रूढ असलेला हिंदुधर्म म्हणजे बुद्धोत्तरकालीन तत्त्वांनीं व कल्पनांनीं मिश्रित असा बुद्धाळलेला धर्म होय! यालाच जुना हिंदुधर्म असें आम्ही म्हणतों. बुद्धपूर्वकालीन वैदिकधर्मांत आणि आर्यधर्मांत जे उच्च, तेजस्वी, जयस्वी व आजच्या समाजधारणेला उपयुक्त असे विचार आहेत, त्यांचें पुनरुज्जीवन करणें म्हणजेच नव्या हिंदुधर्माचें प्रतिपादन होय.

**(६) अखिल हिंदूंकरितां नवा हिंदुधर्मः—**समाज ज्या केंद्रां-भोंवतीं भ्रमण करीत असतो, तीं म्हटलीं म्हणजे सत्ता, संपदा व संस्कृति हीं होत. या केंद्रांची मिरासदारी या युगानें नष्ट केलेली आहे. सत्ता ही केवळ क्षत्रियाकडे, संपदा ही वैश्याकडे आणि संस्कृतीचा मक्ता केवळ ब्राह्मणाकडे अशी विभागणी या नव्या कालाला असह्य आहे. प्रत्येक मनुष्याला सत्ता, संपदा व संस्कृति हीं अवश्य आहेत. शिक्षणामुळें या आकांक्षा आतां प्रत्येकाच्या ठिकाणीं उत्पन्न झालेल्या आहेत. अमक्या गटानें अमुकच करावें व तमक्यानें अमुक करूंच नये असले निर्बंध

घालण्याचे दिवस आतां गेले. या नव्या युगामध्यें सर्वांना समता हवी आहे; म्हणून प्रत्येक मनुष्याला आपल्या उन्नतीकरितां समानसंधी मिळणें अवश्य आहे. मनुष्यत्वाचा नि मानव्याचा विकास हें आजच्या युगाचें ध्येय असल्यामुळें तें गांठण्याचा मार्ग सुलभ व्हावा म्हणून अखिल हिंदूकरितां सर्वांना सुलभ असा नवा धर्म सांगण्याची आवश्यकता आज उत्पन्न झालेली आहे.

**( ७ ) शेवटचा निर्णय कोणाचा ?** :–नव्या कालाला अनुरूप असा–नवा हिंदुधर्म बुद्धपूर्वकालीन वैदिक आर्यांच्या तत्त्वज्ञानावर अधिष्ठित–धर्म सांगण्याचा अधिकार एका व्यक्तीपेक्षां संस्थेलाच आहे. आम्ही ज्या धर्मनिर्णयमंडळाचे प्रस्थापक व घटक आहों, त्या मंडळाचेंच हें कार्य आहे. मंडळाच्या कार्याला हा वैय्यक्तिक यत्न बराच साह्यभूत होणार आहे. ज्या ज्या व्यक्तींनीं हिंदुधर्म व समाज यांचा अभ्यास व निरीक्षण निदान एकदोन तपें केलें आहे, त्या सर्वांना हिंदुसमाजाच्या अभ्युदयार्थ आपापले विचार सांगण्याचा जसा अधिकार आहे, तसाच तो प्रस्तुत लेखकालाहि आहे. पण शेवटच्या निर्णयाचा अधिकार धर्मनिर्णयमंडळाचा आहे.

**( ८ ) नवा हिंदुधर्म कसा असावा ?**:–आज रूढ असलेल्या हिंदुधर्मांत बुद्धपूर्वकालीन व बुद्धोत्तरकालीन असे दोन विचारप्रवाह आहेत. बुद्धपूर्वकालीन तेजस्वी वैदिक आर्यधर्मामध्यें बुद्धोत्तरकालांत अनेक दोष शिरले. जगत् दुःखमय आहे, तें क्षणभंगुर आहे, संसार असार आहे, व्यवहार मिथ्या आहे हें बुद्धोत्तरकालीन तत्त्वज्ञान घालविणारा आणि जगत् सत्य आहे, तें अनादि आहे, पुरुषार्थाकरितां जन्म आहे असें सांगणारा धर्म आज हवा आहे. जुना हिंदुधर्म वर्णसंस्था आणि जन्मजात उच्चता, नीचता व अस्पृश्यता या त्रिदोषांनीं युक्त अशा जातिसंस्थेंतच गुरफटलेला आहे. वर्णसंस्था आज नाहीं, जातिसंस्थेंचें काम संपलें, यापुढें अखंड एकजिनसी हिंदुजाति हें हिंदुसमाजाचें ध्येय असें सांगून त्याचा मार्ग दाखविणारा धर्म आज हवा आहे. निवृत्तिपर वेदांताचें आणि चतुर्थाश्रमाचें बंड कमी करणारा, कर्तृत्ववान् गृहस्थाश्रमी माणसाचें महत्त्व पटविणारा, व स्त्रियांविषयींची अनुदारता नष्ट करणारा नवा धर्म आज हवा आहे. कलियुगाची तर्कदुष्ट

कल्पना घालविणारा, दैववादाचा तिरस्कार करणारा, उद्योगवादाचें मंडण करणारा, अवताराच्या वेडांतून, जिज्ञासा मारणाऱ्या वेदांतांतून प्रज्ञाहत करणाऱ्या कल्पनांतून हिंदु समाजाला बाहेर काढणारा असा नवा धर्म आज हवा आहे. जुन्या हिंदुधर्माची भिस्त वचनप्रामाण्यावर व अपौरुषेयत्वावर आहे. त्यामुळेंच आजचे प्रश्न सुटूं शकत नाहींत; म्हणून बुद्धिप्रामाण्यावर अधिष्ठित असा नवा हिंदुधर्म हवा आहे. सारासार विचारास प्रवृत्त करणारा, स्त्रीवर्गाची कुचंबणा थांबविणारा, विवाहसंस्थेंतील दोष नष्ट करणारा, स्त्रीपुरुष–संबंध अधिक पवित्र व सुखावह होण्याचा मार्ग दाखविणारा, अस्पृश्यतेचें समूळ उच्चाटण करणारा, हिंदुसमाजांतील अस्वाभाविक वैषम्य आणि वैलक्षण्य नाहींसें करणारा असा नवा हिंदुधर्म हवा आहे. अनेक प्रकारचे तर्कदुष्ट निर्बंध, शिवाशीव, विटाळ, जन्मजात उच्चनीचता इत्यादि बुद्धोत्तरकालांत शिरलेले दोष नष्ट करणारा आणि अखिल हिंदूंचा एक संस्कार, एक ग्रंथ, एक मंत्र, एक सामुदायिक प्रार्थना, एक समष्टिधर्म असें सांगणारा हिन्दुराष्ट्रोत्कर्षक नि हिंदुसमाजबलवर्धक असा नवा हिंदुधर्म आतां हवा आहे.

बुद्धोत्तरकालीन जुन्या हिंदुधर्मानें आजवर हिंदुत्व राखलें, हिंदुत्वाचा नंदादीप तेवत ठेवला, हिंदुसमाजाचे मानबिंदु रक्षिले, याबद्दल जुन्या हिंदुधर्माच्या प्रणेत्यांना विनम्र भावानें व आदरानें शतशः प्रणामच केले पाहिजेत. तसे प्रणाम करून आम्ही सांगतों कीं जुना हिंदुधर्म हा आतां टाचका, तोकडा व आजच्या हिंदुसमाजाच्या गरजा भागविण्यास अपुरा असा झालेला आहे. हिंदुसमाजाच्या आजच्या आकांक्षा जुना हिंदुधर्म पुऱ्या करूं शकत नाहीं. जुनीं घरें, जुना पोषाख, जुनीं औषधें हीं जशीं आज अपुरीं पडतात, तसा जुना हिंदुधर्म नव्या हिंदुसमाजाच्या आकांक्षेला, अभ्युदयाला, उत्कर्षाला व पूर्णतेला अपुरा पडत आहे. म्हणून हिंदुसमाजाला पूर्णता आणण्याकरितां नव्या हिंदुधर्माची आवश्यकता आहे.

—✻—

# प्रकरण दुसरें

## । धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा ।

**(९) दोन आक्षेपः**—पहिल्या प्रकरणांत नव्या हिंदुधर्माची आवश्यकता सांगितली. प्रस्तुत प्रकरणांत धर्मावर येणाऱ्या दोन आक्षेपांचा परामर्श घेऊन धर्म हा अखिल विश्वाचा कसा आधार आहे, जगाच्या अंतापर्यंत तो कसा टिकणारा आहे, याचें विवेचन करावयाचें आहे.

**(१०) पहिल्या आक्षेपाचें स्वरूपः**—धर्म हवा आहे, पण त्याचें क्षेत्र सुतक, सोयेर, संस्कार, सण, उत्सव, समारंभ, दानें, व्रतें, श्राद्ध, उत्तरक्रिया, उपासपारणें, भोजनदिशा, भोजनपात्र, ग्राससंख्या, परान्नसेवन, रजस्वलाशब्दश्रवण, चातुर्मास्यांतील नेमधर्म, पूजाअर्चा, मुहूर्तपत्रिका, विधवावपन व विवाह एवढ्या विषयापुरतेंच आहे, असें समजणारा एक पक्ष आहे. हा पक्ष असेंहि म्हणतो कीं वैद्यशास्त्र, आरोग्यशास्त्र, व्यवसायशास्त्र, अर्थशास्त्र हीं सर्व दंडनीतिशास्त्रांत अन्तर्भूत होऊं लागलेलीं आहेत. स्पर्शबंदी, व्यवसायबंदी, खानपानबंदी या सर्व गोष्टी आतां धर्माच्या कक्षेपलीकडे गेलेल्या आहेत; म्हणून धर्माचें क्षेत्र फारच संकुचित झालेलें आहे.

**( ११ ) आक्षेपाला उत्तरः**—धर्मसिंधु व निर्णयसिंधुप्रणीत जो धर्माचार आणि हेमाद्रि व अन्य निबंधकारप्रणीत दानें, व्रतें व प्रायश्चित्तें एवढाच काय तो धर्म आहे, असा अलीकडील काळांत कांहीं लोकांचा समज आहे; पण तो बरोबर नाहीं. स्मृतिग्रंथांत आचार, व्यवहार व प्रायश्चित्त अशीं धर्माचीं तीन अंगें प्रामुख्यानें सांगितलीं असलीं तरी धर्माचें क्षेत्र त्याहीपलीकडे फार व्यापक आहे. जातिधर्म, कुटुंबधर्म, राजाप्रजाधर्म, पतिपत्निधर्म, मनुष्यधर्म, गुरुशिष्यधर्म, पितापुत्रधर्म अशा अनेक प्रयोगांवरून धर्माच्या व्यापकतेचा बोध होतो. न्यायदान, विद्यादान, औषधीदान, अर्थोत्पादन, विवाहसंस्था, वारसा, दायविभाग इत्यादि मानवी जीवनाशीं संबद्ध असलेल्या सर्व विषयांचे नियम म्हणजे धर्म होय. यालाच हल्लीं

कायदा किंवा निर्बंध असें म्हणतात. समाजधारणेकरितां, राष्ट्रोत्कर्षाकरितां अवश्य असलेले सर्व नियम व निर्बंध म्हणजे धर्म होय.

आज भौतिकशास्त्राच्या वाढीमुळें आरोग्यशास्त्र, वैद्यशास्त्र, व्यवहार, दंडशास्त्र, नीतिशास्त्र, अर्थशास्त्र यांची व्यापकता वाढत चालली आहे. या शास्त्रांच्या वाढीचा उपयोग हिंदुराष्ट्रानें कसा करून घ्यावा, या जागतिक कलहांत हिंदुसमाजानें हिंदुराष्ट्र म्हणून जगण्यास कोणकोणतीं शास्त्रें कशीं आत्मसात केलीं पाहिजेत, या सर्व शास्त्रांचें मूळ प्रयोजन, उद्देश व पर्यवसान सांगण्याचें काम धर्माचेंच आहे.

धर्मशास्त्रज्ञ जर एकादशीच्या फराळाच्या पदार्थांत, भोजनासंबंधींच्या मंत्रचळेपणांत, शिवाशिवींत, विटाळांत, सुतकांत व सोयेरांत आणि विधवांच्या केशवपनांतच गढून बसले तर हें सर्व मानवी जीवन कशाकरितां आहे, तें कोणीकडें चाललें आहे, विविध शास्त्रांच्या प्रगतीच्या द्वारां काय काय उलाढाली होत आहेत, हें सर्व अभ्यासपूर्वक व निरीक्षणपूर्वक पाहून त्यांतील इष्ट भागाकडे प्रवृत्त करण्याचें काम कोणी करावयाचें ? धर्मशास्त्रविशारदांनीं हें कार्य न केलें तर मराठेशाहींतील सवत्या सुभ्यामुळें झालेल्या हानीचाच प्रसंग यावयाचा ! आहारशास्त्र स्वतंत्र झालें कीं तें म्हणणार "माणसानें अमूक व इतकें खावें;" दंडनीतिशास्त्र स्वतंत्र झालें कीं तें म्हणणार "अशा गोष्टी घडल्या कीं, दंड करावा;" आरोग्यशास्त्र स्वतंत्र झालें कीं तें म्हणणार "माणसांनीं आरोग्याचे अमुक नियम पाळले पाहिजेत;" पण हीं सर्व शास्त्रें परस्पर पोषक आहेत, तीं मानव्याच्या उन्नतीकरितां आहेत, त्यांचा उपयोग हिंदुराष्ट्राच्या अभ्युदयाच्या दृष्टीनें करून घेतला पाहिजे. कोणत्याहि शास्त्रामुळें हिंदुराष्ट्राची आणि हिंदुसमाजाची अवनति जर होत असेल तर हें शास्त्र नसून तें मारक शस्त्र आहे; असें सांगणें हेंहि धर्माच्या क्षेत्रांत येतें. पारतंत्र्य, सत्तेचा व संघटनेचा अभाव यांमुळें धर्माचें क्षेत्र फार अल्पसें अवशिष्ट असलें तरी मूळचें त्याचें व्यापकत्व किती आहे, हें विसरतां कामा नये.

**(१२) हिंदुधर्माचें ध्येयः**—कठोर कर्मठपणा, कठोर जातिबंधनें आणि शिवाशीव म्हणजे हिंदुधर्म ही कल्पना बुद्धोत्तरकालीन आहे. हिंदु-

धर्म ही एक उच्च संस्कृति आहे. ती समुद्रासारखी गंभीर व आकाशासारखी व्यापक आहे. हिंदुधर्म हा विश्वधर्म होण्यास पात्र आहे. हिंदुधर्माची तत्त्वप्रणाली फार उज्ज्वल आहे. जगांत शांतता, समता व बंधुत्व उत्पन्न करण्याचें आणि भौतिक उन्नतीबरोबर अध्यात्मिक शांतीचा लाभ जगाला देण्याचें कार्य दैवी संपत्तीच्या प्रसारानें हिंदुधर्मालाच करावयाचें आहे. मनूचें मानवधर्मशास्त्र हें याच अर्थानें एका काळीं रूढ होतें. असंस्कृतांना सुसंस्कृत करणें, संकुचित विचारांच्या लोकांची बुद्धि विकसित करणें, धर्महीनांना धर्मवान् करणें, मनुष्यांना माणुसकी शिकविणें थोडक्यांत म्हणजे संपूर्ण मानवजातीचें उच्चतम कल्याण करणें, हें हिंदुधर्माचें ध्येय व साध्य असल्यामुळें धर्माचें क्षेत्र फार संकुचित आहे, असें म्हणणाऱ्या पक्षाचा वरील आक्षेप आपोआपच खंडित होतो.

**( १३ ) धर्मच नको म्हणणारा पक्षः**—धर्मावर आक्षेप घेणारा दुसरा एक बुद्धिनिष्ठ पक्ष आहे. धर्म आणि ईश्वर हे शब्द उच्चारले कीं त्याच्याभोंवतीं जें गूढ, अलौकिक, अपूर्व, अदृष्ट असें कल्पनाजंजाल उत्पन्न होतें, त्यास हा पक्ष एक प्रकारची गुंगी अर्थात् कैफ समजतो. समाजाची पिळवणूक करण्याचें धर्मरूपी कैफ हें एक चांगलें साधन आहे म्हणून हा धर्मच नष्ट झाला पाहिजे, त्याशिवाय समाजाची बुद्धिहत्त्या थांबणार नाहीं असें या पक्षाचें मत आहे.

परंतु हिंदुधर्म हा बुद्धिनिष्ठ, अभ्युदयप्रधान व कार्यकारणसंबद्ध असा असल्यामुळें त्यावर, या मार्क्सवादाचा, वरील आक्षेप येऊंच शकत नाहीं. धर्म ही अफूची गोळी आहे हें कार्ल मार्क्सचें प्रसिद्ध वाक्य असलें तरी त्यावरून तो व त्याचे अनुयायी धर्माचे शत्रू होते असें म्हणतां येत नाहीं. मार्क्सच्यापुढें भांडवलवाले व राज्यकर्ते यांनीं केलेलें धर्माचें विकृत स्वरूप स्पष्ट होतें. ते धर्माचे धिंडवडे पाहून त्यानें वरील वाक्य उच्चारलें. हिंदुधर्माचें स्वरूप समजावून घेऊन मार्क्सनें हें वाक्य उच्चारलेलें नाहीं. रशियांतील समाजसत्तावादांतसुद्धां धर्माला स्थान आहे. खऱ्या धार्मिक लोकांना आपल्या पक्षांत अवश्य घ्यावें, असें लेनिनचें स्पष्ट मत होतें. क्रांतिकालांत समाजवाद्यांनीं धर्मसंस्थांचा नाश केला, याचें कारण त्या संस्था, विरोधी-

पक्षाचे बालेकिल्ले बनल्या होत्या. समाजसत्तावादांत धार्मिक आचारांना फारसें महत्त्व नसलें तरी त्यावरून तो पक्ष बुद्धिनिष्ठ धर्माचा द्वेष्टा व नास्तिक असें मात्र नव्हे. ख्रिस्ताचा धर्म बुद्धिनिष्ठ नव्हता, तर तो केवळ चमत्कारावर अधिष्ठित होता! विचारी जनतेला तो पटत नसे. मनुष्य हा समाज करून राहाणारा म्हणजे इतरांशीं सहकार्य करून राहाणारा प्राणी आहे, उच्च अशा अध्यात्मिक सुखाकरितां मनुष्य आपल्या शारीर व इतर सुखांवर लाथ मारतो, म्हणूनच समाजांत सार्वजनिक व परोपकाराचीं अशीं अनेक कामें होतात. त्यागी, परोपकारी, सर्वजनहितैषी अशी व्यक्ति मोठमोठ्या संकटकालीं धर्मतत्त्वावरच तग धरूं शकते; म्हणून समाजवाद्यांना धर्म ही कल्पना समाजधारणेकरितां ग्राह्यच आहे.

**(१४) हिंदुधर्म हा पंथ नव्हेः**–हिंदुधर्म हा एकव्यक्तिनिष्ठ नि एकपुस्तकनिष्ठ पारमार्थिक संप्रदाय वा पंथ वा मत नाहीं. एकच साधु, एकच ग्रंथ मानलाच पाहिजे, त्यांत जें आहे तें सर्व परिपूर्ण आहे, त्याविरुद्ध प्रत्यक्ष प्रयोगानें सिद्ध होत असलें तरी कांहीं मानावयाचें नाहीं, असे जे आग्रही हिंदुधर्माबाहेरचे संप्रदाय आहेत, त्यांच्यावरच या पक्षाचे आक्षेप बरोबर लागू होतात. हिंदुधर्म त्यापलीकडचा आहे.

धर्माच्या नांवाखालीं होत असणारी बुद्धिहत्या व पिळवणूक नष्ट करण्यास हिंदुधर्म सदैव सिद्ध आहे. पारलौकिक अदृष्ट व अपूर्व कल्पनांमुळें समाजांत जर दौर्बल्य आणि अनाचार माजत असेल तर तो नाहींसा करण्यास हिंदुधर्माची पूर्ण संमति आहे.

**(१५) विचारप्रधान धर्मः**–हिंदुधर्म हा बुद्धिप्रधान आहे. हा ज्ञानवान्, विचारवान् व कर्तृत्ववान् पुरुषांनीं हिंदुसमाजाच्या धारणेकरितां, प्रभवाकरितां सांगितलेला तत्त्वसमुच्चय आहे. म्हणून कार्यकारणभाव पाहाणें व त्याप्रमाणें वागणें हें या धर्माचें वैशिष्ट्य आहे. आज हव्या असलेल्या सर्व सामाजिक सुधारणांना श्रुतींचा आधार मिळणें दुरापास्त आहे. स्मृतींविषयीं बोलावयाचें तर सर्व स्मृतींमध्यें त्या त्या कालांतील नियम आलेले आहेत. अर्थात् आजच्या कालाला हवे असलेले नियम कार्यकारणभाव पाहून ठरविण्याचें बुद्धिस्वातंत्र्य हिंदुधर्मात आहे. हिंदुधर्म हा बुद्धीला

स्वातंत्र्य देणारा, बुद्धीला न पटणाऱ्या तर्कदुष्ट विचारांचा त्याग करण्यास सांगणारा असा आहे. धर्म म्हणजे आज्ञा, धर्म म्हणजे विधि असें म्हटलें कीं तेथें कां, असें विचारतां येत नाहीं. धर्म म्हणजे पंथ, रिलिजन, फेथ, ईश्वरप्राप्तीचा मार्ग, पारलौकिक कल्याणाचा मार्ग, रूढी, आचार हे संकुचित अर्थ हिंदुधर्माला मुळींच लागू होत नाहींत. व्यक्तीचा विकास व समाजस्वास्थ्य याकरितां मनुष्यानें स्वतःवर लादून घेतलेलें बंधन किंवा बंधनसमुच्चय म्हणजे धर्म होय! मनुष्य प्रथम आपल्या बायकोकरितां व नंतर मुलाकरितां त्याग करतो. हें शिक्षण धर्मप्रणीत विवाहसंस्थेमुळें मिळतें. वैवाहिक बंधनामुळें व्यक्तिविकास व समाजस्वास्थ्य हीं दोन्हीं साधतात. सभा, संस्था, मंडळ्या, पेढ्या, इत्यादि जशा नियमबद्धतेनें चालतात, त्याप्रमाणेंच मानवी जीवन हें नैतिक, धार्मिक आणि सामाजिक नियमांनीं सुव्यवस्थित चालतें.

( १६ ) **तो अभ्युदयसंबद्ध आहेः**—हिंदुधर्म हा केवळ परमार्थ-प्रवण व परलोकसंबद्ध संप्रदाय नाहीं. हिंदुधर्मांत ज्ञान व विज्ञान, प्रपंच व परमार्थ, अभ्युदय आणि निःश्रेयस, प्रवृत्ति आणि निवृत्ति, भौतिक प्रगति व अध्यात्मिक शांति यांचा तर्कशुद्ध समन्वय आहे. मनुष्याच्या अन्तःशक्तीचा, ज्ञानशक्तीचा, कर्तृत्वशक्तीचा विकास व्हावा, त्यानिमित्त बाह्य परिस्थिति अनुकूल करून घ्यावी, हें सर्व हिंदुधर्माला अभिप्रेत आहे. ऐहिक अभ्युदयाला हिंदुधर्मांत पूर्ण स्थान आहे. ऐहिक अभ्युदयार्थ आणि कल्याणार्थ जें जें देशकालसापेक्ष करावें लागेल तें तें करण्यास हिंदु-धर्माची पूर्ण अनुज्ञा आहे. हिंदुसमाजाच्या जीवनाला, अभ्युदयाला व कल्याणाला उपयुक्त असे विचार जुन्या ठेव्यांत मिळाले तर ते अवश्य घ्यावेत, पण ते न मिळाले तर नव्या कालांतील विचार आत्मसात करून समाजधारणा करावी. ऐहिक उत्कर्षाच्या आड जर धर्मांतील कांहीं चाली नि रूढी येत असतील तर त्या नष्ट कराव्या व नव्या अभ्युदयसाधक रूढी पाडाव्या. ऐहिक उन्नतीकरितां समाजरचना बदलावीशी वाटली, तत्त्व-प्रणालिका नवीन निर्माण करावीशी वाटली तर तिलाहि हिंदुधर्माची संमति आहे. तात्पर्य, हिंदुधर्म हा अभ्युदयाला पूर्ण पोषक असल्यामुळें बुद्धिनिष्ठ पक्षाचा आक्षेप लागू पडत नाहीं.

(१७) **नवा सामाजिक वेदांतः**—सर्व जगतांतील घडामोडी अर्थमूलक, काममूलकच चाललेल्या आहेत, अर्थ व काम हेच काय ते पुरुषार्थ आहेत, इतर सर्व झूट आहे अशी जी एक विचारसरणी आहे, तिचा थोडा विचार अवश्य केला पाहिजे. आज जगांत भांडवलशाहीमुळें आणि यंत्रामुळें आर्थिक विषमता उत्पन्न झालेली आहे, यांत शंका नाहीं. त्याकरितां मोठमोठाले कारखाने राष्ट्राच्या मालकीचे करावेत असें म्हणण्यांत येतें व तसे प्रयोग चालू आहेत. हिंदुस्थान देश अद्याप बराचसा कृषि-प्रधान आहे. मजूर नि मालक असे दोनच वर्ग हिंदुस्थानांत नाहींत. रयतवारी पद्धति आणि मध्यमवर्ग यांचें अस्तित्व हिंदुस्थानांत आहे. हें लक्षांत घेतलें म्हणजे मार्क्स—वादाचे सर्व सिद्धांत येथें तंतोतंत अंमलांत येणें कठीण दिसतें. शक्तीप्रमाणें करावें व गरजेप्रमाणें घ्यावें आणि सर्व कांहीं सरकारनेंच करावें, ही विचारसरणी ऐदखाऊ लोकांच्या पथ्यावर आज तरी पडण्याजोगी आहे. जुन्या निवृत्तिपर वेदांतानें जशी समाजाला मरगळ आणली-तशीच मरगळ हा नवा सामाजिक वेदांत आणील कीं काय अशी भीति वाटते.

(१८) **ततः किम्**—मनुष्याला मुख्य भाकरी पाहिजे, पैसा पाहिजे व तेंच खरें सुखाचें साधन, इतर सर्व थोतांड आहे असें जें म्हणतात, तें मनुष्यस्वभावाविरुद्ध आहे. केवळ जगण्यांत माणसाला आनंद वाटत नाहीं, म्हणून तो हरतऱ्हेची धडपड करतो. सत्ता मिळविणें, उपभोग घेणें, कीर्ति संपादन करणें, चार माणसांकडून भले म्हणवून घेणें हें सर्व मानवी प्रवृत्तींतच येतें. यालाच हिंदुधर्म चार पुरुषार्थ असें म्हणतो. या जगांत मुख्य आनंद म्हणजे मानुष आनंद होय! तो कशानें होतो, हें तैत्तिरीय उपनिषदांत सांगितलें आहे.

**युवा स्यात्साधुयुवाध्यायकः ॥ आशिष्ठो द्रढिष्ठो बलिष्ठः ॥**
**तस्येयं पृथिवी सर्वा वित्तस्य पूर्णा स्यात् ॥ स एको मानुष आनन्दः ॥**

—तै. उ. अ. ८.

तरणा जवान आहे, तो भोक्ता, सुदृढ व सुविद्य आहे, त्याला ही पृथ्वी संपूर्ण वित्तानें युक्त अशी राज्य करावयास मिळाली तर जो आनंद

होतो, तो मानुष आनंद होय. जगांत यापेक्षां अर्थकामयुक्त आनंद हिंदुस्थानांतील साडेसहाशें संस्थानीक या मानुष आनंदाच्या भूमिकेवर उ पण ते सुखी आहेत काय? कल्पनेनें कां होईना पण अनंतकोटीब्रह्म एकेक मनुष्य पाठवून तेथील राजा केला तर तो सुखी होईल काय? माणसें सुखी असतात असें नाहीं. भाकरी, अर्थ, सत्ता, उपभोग याप कांहीं एक अध्यात्मिक जीवन आहे. मनुष्य केवळ वासनांचा गोळा अध्यात्माचें ज्ञान म्हणजे निर्विषय आनंद ही एक इंद्रियातीत बाब तिजकडे जाण्याची प्रवृत्तीहि मनुष्यस्वभावांतच आहे. अर्थात् तिचा प धर्माच्या तत्त्वज्ञानानेंच होतो. भाकरी मिळाली, पैसा मिळाला, राज्य मि तरी 'ततः किं' हा प्रश्न येतोच. विविध विषयसुख हेंच ध्येय असे तें परिपूर्ण होतांच मनुष्यें पटापटा आत्महत्त्या करतील पण त्यांच्याहि 'ततः किं' हा प्रश्न असतो व त्याचें उत्तर धर्मांतील अध्यात्मा मिळत नाहीं.

( १९ ) **अध्यात्माचें महत्त्वः**–हिंदुधर्मांतील आत्मा, पुनर्जन्म, कर्मफलप्रक्रिया इत्यादि सिद्धांत विवाद्य असले तथापि त अधिक तर्कशुद्ध तत्त्वज्ञान जोंवर पुढें येत नाहीं आणि या सिद्धां जोंवर जीवनाला उत्तेजन मिळत आहे, तोंवर वरील सिद्धांत उ अभ्युदय व आत्मोन्नतिसाधक आहेत म्हणून ग्राह्यच समजले पा मनुष्याला शारीरसुखाप्रमाणें बौद्धिक व अध्यात्मिक सुख हवें ; शारीरसुखापेक्षां मनःसमाधानाची मातब्बरी अधिक आहे. मीं चोरी नाहीं, मी अमुक एक निग्रह पाळला, माझ्या हातून व्यभिचार नाहीं, या कल्पनांमुळें मनुष्याच्या मनाला जें समाधान असतें व जी प्र असते, त्याचें वर्णन करावें तेवढें थोडें आहे. स्वार्थ सोडून परार्थ कां क अनेक कष्ट सोसून देशाचें व समाजाचें कल्याण करण्यांत सुख कां म सर्वस्वाचा त्याग कां करावा, याचें सुसंबद्ध प्रतिपादन हिंदुधर्मच चोरी केली, खून केला तर शिक्षा होते म्हणून तें करूं नये, हें र सांगतो; पण तूं चांगलें कर, भलेपणानें वाग, तुझा व अन्यांचा : एकच आहे, त्यांचें सुखांत तुझें सुख आहे, स्वराष्ट्राच्या कल्याणार्थ समर्पण जरी केला तरी त्यामुळें आत्म्याची उन्नतीच होते इत्यादि

अध्यात्मानेंच कळतात. वस्तूंच्या भोगांत सुख नसून त्यागांत सुख आहे, समाजरचना कशीहि असली तरी सर्व व्यक्तींना सारखेंच सुख मिळेल असें नाहीं, खरें सुख वस्तूंचा संग्रह व उपभोग यांत नसून तें त्यागांत आहे; '**त्यागात् शांतिरनंतरम्**' भग. १२ १२ हें सांगण्याचें काम धर्मच करतो. या सर्व दृष्टीनें विचार केल्यास धर्म हा अखिल विश्वाला आधारभूत आहे, हें दहा हजार वर्षांपूर्वीं मंत्रद्रष्टया दूरदर्शी ऋषींनीं उच्चारलेलें या प्रकरणाच्या शीर्षकावरील वाक्य किती सखोल, किती सार्थ व किती सत्य आहे याची कल्पना येते.

**(२०) अर्थकामप्रवणता व धर्मः**—जगांतील सर्व घडामोडी अर्थ व काममूलक चाललेल्या आहेत, हें अंशतः सत्य आहे.

**यद्यद्धि कुरुते किंचित्तत्तत्कामस्य चेष्टितम्** ॥४॥ मनु. अ. २

मानवी जीवनामध्यें अर्थाला महत्त्व आज फारच आलेलें आहे. कारण गरजाच अतिशय वाढलेल्या आहेत. अर्थ व काम यांना जर धर्माचें बंधन नसेल तर जगांत शांतता नांदणार नाहीं. हिंदुधर्मानें याकरितांच धर्म, अर्थ, काम व मोक्ष असे चार पुरुषार्थ मानवी प्रवृत्तीचा अभ्यास करून सांगितलेले आहेत. अर्थ व काम यांना मोकाट सोडलें तर तो पशुधर्म होईल. पण एका बाजूनें धर्माचें बंधन व दुसऱ्या बाजूनें मोक्षाचें ध्येय अशा दोहोंच्या कैचींत हे पुरुषार्थ बसविले म्हणजे व्यक्तीला तर सुख होतेंच, पण मानव्याचाहि विकास होतो. 'धर्मात् अर्थश्च कामश्च' हें व्यासवचन या दृष्टीनें फार महत्त्वाचें आहे. अर्थकाम–प्रवणता बळावली तर कामक्रोधादि विकार वाढतील. त्यांना चांगल्या कामांत गुंतवून योग्य वळण लावून संयमानें स्वाधीन ठेवणें, हें कार्य धर्माशिवाय साध्य होत नाहीं. मनुष्याला सुख तर पाहिजेच, सुखाकरितां सर्व धडपड आहे. पण तें सुख धर्मपरायणतेनें, संयमानें, इंद्रियनिग्रहपूर्वक अर्थकाम पुरुषार्थ साध्य करून मिळतें, हें सांगण्याकरितां धर्माची आवश्यकता आहे.

विरुद्ध परिस्थितीशीं जमतें घेणें, निराशेंत आशेचा किरण दाखविणें, संकटसमयीं धैर्य देणें, जीवनांत आनंद शोधणें, नैतिक वर्तनाचाचा पुरस्कार करणें, मनुष्याच्या पाशवी वृत्तीला आळा घालून त्याला संयमशील बनविणें, सत्य, शील, सौंदर्य व कला यांची अभिरुचि उत्पन्न करणें हीं कार्यें धर्मप्रवृत्तिविना होत नाहींत. या सर्व वृत्तींच्या विकासाकरितां धर्म आवश्यक आहे.

# प्रकरण तिसरें

## धर्मनिर्णयाची जुनी मीमांसापद्धति

गेल्या प्रकरणांत धर्म मुळींच नको असें म्हणणाऱ्या पक्षाला आणि धर्म हवा पण तो फार संकुचित क्षेत्रापुरता हवा, असें म्हणणाऱ्या पक्षाला उत्तरें दिलीं. आतां नव्या हिंदुधर्माचें अधिष्ठान आणि विचारपद्धति यांची चर्चा करावयाची आहे. पण त्यापूर्वी आजपर्यंत जुन्या हिंदुधर्माची धर्मनिर्णय करण्याची जी मीमांसापद्धति आहे, ती कशी अपुरी आहे; हें समजावें म्हणून मीमांसापरिपाटीचे सिद्धांत प्रथम क्रमशः देतों. नंतर त्यांचें खंडन करून इतिहासपद्धतीचीं मूलतत्त्वें वाचकापुढें ठेवतों.

**( २१ ) मीमांसाशास्त्राचा उपयोगः**—मीमांसाशास्त्र हें न्याय-व्याकरणादि शास्त्रांप्रमाणें वाक्यार्थ करण्याचें कामीं उपयुक्त आहे. वाक्यार्थ करण्यास कोशाचें, तर्काचें, व्याकरणाचें जसें साह्य होतें, तसेंच उपक्रम, उपसंहार, अभ्यास, अपूर्वता, फल, अर्थवाद, उपपत्ति इत्यादि जे मीमांसा-शास्त्राचे नियम आहेत, त्यांचेंहि होतें. मीमांसाशास्त्राची वाक्यार्थ—पद्धति स्वीकारली म्हणजे त्या शास्त्राचे इतर सर्व सिद्धांत ग्रहण केले पाहिजेत असें नाहीं. एखाद्या विषयावर विविध ग्रंथांमध्यें जीं अनेक वाक्यें आलेलीं असतात, त्या सर्वांचा समन्वय म्हणजे गोळाबेरीज करून काढलेला अर्थहि एकच असला पाहिजे, असा मीमांसापक्षाचा आग्रह आहे.

**(२२) मीमांसा व धर्मः**—पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा अशीं दोन शास्त्रें आहेत. प्रस्तुत उत्तरमीमांसेचा म्हणजे वेदांतशास्त्राचा विचार कर्तव्य नाहीं. तर केवळ पूर्वमीमांसाशास्त्रांतील सिद्धांतापुरताच विचार करावयाचा आहे. मीमांसाशास्त्राचे प्रणेते श्रीजैमिनीआचार्य हे होत. पूर्व-मीमांसासूत्रांचे बारा अध्याय असून या सूत्रांवर शबराचार्यांचें भाष्य आहे. जैमिनीपूर्वींहि या शास्त्रावर इतर आचार्यांचीं सूत्रें असावींत असें दिसतें. उपवर्ष, बौधायन, प्रभाकरभट्ट, कुमारिलभट्ट, शालिकनाथ, पार्थ-सारथिमिश्र अशा अनेक शास्त्रज्ञांचे यावर ग्रंथ आहेत. पूर्वमीमांसा

म्हणजे यज्ञासंबंधींचें शास्त्र अशी जुन्यांचीहि समजूत आहे. सनातनधर्म-प्रदीपकारांनीं पृष्ठ १३३ वर असेंच म्हटलें आहे:—

'तत्र च निर्णये मीमांसा नातीवोपकुर्यात् । तस्या ब्राह्मणादि वाक्यार्थ-निर्धारणमात्रोद्देशेन प्रवृत्तत्वात् । **सा याज्ञिकसंकेतविज्ञानाय दृढमुपकरोतीति** सत्यम् ।' —स. ध. प्रदीप.

**( २३ ) मीमांसकांचे मुख्य सात सिद्धांतः**–(१) मीमांसकमतें वेद हे नित्य आहेत व ते अपौरुषेय आहेत. वेद हे नित्य कां आहेत तर शब्द—वर्ण—हे नित्य आहेत म्हणून. वेद हे नष्ट होत नाहींत, कारण ते नित्य आहेत. वेदांचा कर्ता प्रसिद्ध नाहीं, याचें कारण वेद नित्य आहेत हेंच होय. वेद अपौरुषेय आहेत असें म्हणण्याचें कारण त्याचा कर्ता उपलब्ध नाहीं व ते पुरुषबुद्धींतून बाहेर येण्याजोगे नाहींत. वेद हे अनादि आहेत. ते मनुष्यानें किंवा ईश्वरानेंहि केलेले नाहींत. ते स्वतःप्रमाण आहेत. वेद हे सर्वज्ञानमय आहेत. (सर्वज्ञानमयोहि सः, वेदोऽखिलं धर्ममूलम् ) वेदामध्यें सर्व ज्ञानें आहेत, तद्बोधक वाक्यें कुठें आहेत असें विचारल्यास तीं वेदांतच होतीं, पण उच्छिन्न झालीं आणि आहेत, पण सांपडत नाहींत, असा मीमांसकांचा कोटिक्रम आहे.

(२) मीमांसकांची धर्माची व्याख्या 'चोदनालक्षणोऽर्थो धर्मः' म्हणजे क्रियेला प्रवृत्त करणारें वचन अशी आहे. हें वचन दुसरें कोठचें नसून वेदवचनच होय! वेदानें केलेल्या आज्ञा म्हणजेच धर्म होय! 'आम्नायस्य क्रियार्थत्वात्' ।

**धर्मस्य शब्दमूलत्वात् अशब्दमनपेक्षं स्यात्** (जै. सू. १-३-१) धर्म हा शब्दमूलक म्हणजे वेदमूलक आहे. म्हणूनच

**'वेदप्रतिपाद्यप्रयोजनवान् यागादिरेव धर्मः'**

**'वेदबोधितेष्टसाधनताको धर्मः'** ।

**'दृष्टोऽहि तस्य अर्थः कर्मावबोधनम्** ।'

वेदानें सांगितलेला यज्ञ हाच धर्म होय. ज्याला स्वर्गाची इच्छा असेल, त्यानें यज्ञ करावा. कारण वेद हे यथार्थ आहेत. यज्ञार्थ व क्रियार्थ जीं वाक्यें आहेत तीं निरर्थक नाहींत. यज्ञानें स्वर्ग मिळतो याला प्रमाण काय?

असें विचारल्यास मीमांसक म्हणतात कीं स्वर्ग प्रत्यक्ष नाहीं, तो वेदवाक्यावरूनच जाणावयाचा आहे. वेदानें सांगितलें म्हणूनच कोणतेंहि कार्य करावें. कारण मनुष्य हा वेदाज्ञा पाळण्याकरितांच जन्मास आलेला आहे. परोपकार व लौकिक पुरुषार्थ हा धर्म नव्हे. तर केवळ वेदप्रतिपाद्य जें जें तो धर्म होय!

(३) वेद हे अपौरुषेय असल्यामुळें वेदप्रतिपादित धर्मामध्यें पुरुषबुद्धीचा प्रवेश नाहीं. कर्माकर्मांचे व धर्माधर्मांचे दूरवर पोंचणारे परिणाम म्हणजे अदृष्ट व अपूर्व होय. हे पुण्यपापात्मक परिणाम पुरुषबुद्धीस अगम्य आहेत. पुरुषबुद्धि ही प्रत्यक्ष, अनुमान व उपमान अशा ठिकाणीं चालते. पण सर्व प्रमाणें प्रत्यक्षावर उभारलेलीं असल्यामुळें तीं वेदार्थ करण्यास निरुपयोगीं होत. प्रत्यक्ष व अनुमान यांना जें कळूं शकत नाहीं तें वेदांत प्रतिपादलें आहे. तर्क हा अप्रातिष्ठित आहे. श्रुतीचा अर्थ तर्कानें कळूं शकत नाहीं. तर्काला महत्त्व आहे. पण तो तर्क श्रुतिनिष्ठ असला पाहिजे आणि तो अन्तःप्रमाणांनींच केला पाहिजे. श्रुतीच्या अर्थाविषयीं संदेह उत्पन्न झाल्यास महाजनपरिग्रहानें तो समजून घ्यावा; वेद जसा नित्य आहे, तसा वेदार्थहि नित्य आहे. धर्मनिर्णयाचें साधन बुद्धि अगर तर्क नसून श्रुतिस्मृति व पुराणें हींच आहेत. श्रुति अपौरुषेय आहेत.

(४) स्मृति व पुराणें हीं श्रुतिमूलकच आहेत. म्हणून या सर्वांमध्यें एकच अर्थ आहे.

**वैदिकैः स्मर्यमाणत्वात्तत्परिग्रहदार्ढ्यतः ।**
**संभाव्यवेदमूलत्वात् स्मृतीनां वेदमूलता ॥**

शास्त्रदीपिका १–३–१

**भावार्थः**—वैदिक परंपरेचे अभिमानी स्मृतिप्रणेते असून ते स्मृतींचा आदरानें स्वीकार करतात. वेदवचनें पाहून स्मृति लिहिल्या असण्याचा अधिक संभव आहे. म्हणून स्मृति वेदमूलक असल्या पाहिजेत.

कोणी असें विचारील कीं जर स्मृति या श्रुतिमूलक आहेत तर त्या श्रुति उपलब्ध कां नाहींत? त्यावर उत्तर असें कीं—

शाखानां विप्रकर्णत्वात्पुरुषाणां प्रमादतः ।
नानाप्रकरणस्थत्वात्स्मृतेर्मूलं न दृश्यते ॥ तन्त्रवा. १-३-१

**भावार्थः**-वेदांच्या अनेक शाखा आहेत. वेदाध्ययन करणारे पुरुष चुकीला पात्र आहेत. अनेक प्रकरणांमध्यें वाक्यें विखुरलेलीं असल्यामुळें स्मृतींना मूलभूत असलेल्या श्रुति उपलब्ध होऊं शकत नाहींत. श्रुति होत्या पण त्या नष्ट झाल्या म्हणजे उच्छिन्न झाल्या. याला मीमांसक उच्छिन्नवाद म्हणतात; आणि आहेत पण प्रच्छन्न असल्यामुळें त्या सांपडत नाहींत, अशा कोटिक्रमाला मीमांसक प्रच्छन्नवाद म्हणतात.

( ५ ) शिष्ट लोकांत आज ज्या रूढी आहेत व ठिकठिकाणीं जे देशाचार आहेत ते अनादि व अपौरुषेय समजावे.

( ६ ) श्रुति, स्मृति व पुराणें यांविरुद्ध असणारा कोणताहि आचार अधर्म्य समजावा.

( ७ ) कर्मफलदाता ईश्वर नसून कर्मांमुळेंच अपूर्व उत्पन्न होतें; तेंच फल देतें.

वरीलप्रमाणें जुन्या हिंदुधर्मांची धर्मनिर्णयाची रूढ मीमांसापद्धति कुमारिलभट्टाच्या काळापासून गेलीं हजार वर्षे चालत आलेली आहे. आतांपर्यंत धर्मनिर्णयाचें कार्य या पद्धतीस अनुसरून झालें. परंतु आजच्या बदललेल्या काळांत व चिकित्सायुक्त जगांत ही विचारपद्धति व तिचे सिद्धांत सर्वथैव अपुरे पडतात; म्हणून या पद्धतीपेक्षां बुद्धिनिष्ठ अशा इतिहास-पद्धतीनेंच धर्मनिर्णयाचें कार्य यापुढें केलें पाहिजे.

**( २४ ) क्रमशः खंडनः**-( १ ) मीमांसकांचे वरील सिद्धांत तर्क-शुद्ध नाहींत. शब्द नित्य आहेत, वर्ण नित्य आहेत म्हणून वेदही नित्य आहेत असें जर म्हणावयाचें असेल तर जगांतील कोणताहि ग्रंथ नित्य ठरेल. कारण कोणत्याहि ग्रंथांतील शब्द नि वर्ण नित्यच आहेत. वेद उत्पन्न होत नाहींत व नष्ट होत नाहींत याहि म्हणण्यांत तथ्यांश नाहीं. कारण पूर्वी वेद अनंत होते, ( अनन्ता वै वेदाः ) व त्यांतील पुष्कळ नष्ट झाले. कारण पठणपाठणपरंपरा लुप्त झाली. वेदांचा कर्ता प्रसिद्ध नाहीं, एवढ्यावरून ते ग्रंथ अपौरुषेय ठरत नाहींत. आज असे अनेक ग्रंथ

आहेत कीं जे माणसांनीं केले असून त्यांचे कर्ते कोण हें सांगतां येत नाहीं. हे सर्व ग्रंथ जर अपौरुषेय ठरूं लागले तर केवळ कर्त्याची उपलब्धि नाहीं, म्हणूनच झोंपाळ्यावरच्या मुलींच्या ओव्या, तसेंच हदग्याचीं गाणीं, जानपदगीतें वगैरे सर्व अपौरुषेयच ठरतील ! वेद हे पुरुषबुद्धींतून उत्पन्न होण्याजोगे नाहींत, हेंहि म्हणणें तितकेंसें ग्राह्य नाहीं. कारण वेद वाचल्यानंतर मंत्रद्रष्ट्या ऋषींनीं तत्कालीन समजुतीप्रमाणें अग्नि, वरुण, वायु, उषा इत्यादींची स्तुति केली आहे असें दिसतें. वेदांत जगांतील सर्व ज्ञानें आहेत, भौतिक शास्त्रेंहि अथर्ववेदांत आहेत असें समजणें भ्रमात्मक आहे. प्रच्छन्नवाद व उच्छिन्नवाद स्वीकारूनहि हें म्हणणें टिकत नाहीं.

वेद अपौरुषेय, स्मृति अपौरुषेय, पुराणें आणि इतर ग्रंथहि अपौरुषेय, अर्थात् ईश्वरानें केलेले किंवा ईश्वरी प्रसादानें झालेले अशी समजूत झाली म्हणजे ते ग्रंथ पूज्य म्हणून सोंवळ्याच्या बासनांत बांधून ठेवावेत, त्यांची आरती करावी, त्यांना नमस्कार करावा अशी बुद्धि होते. कारण ईश्वरकृत ग्रंथ हे माणसांना समजणार कसे ? मनुष्यपामरांचा तो विषय नाहीं. फार तर ते ग्रंथ ऋषींनीं, साधूंनीं, प्रेषितांनीं पहावेत, वाचावेत व सांगावेत म्हणजे झालें. ग्रंथ मनुष्यकृत म्हटला कीं तो वाचण्याची व त्यावर चर्चा करण्याची बुद्धि होते. पण त्याला ईश्वरी कृतींत ढकललें म्हणजे विषय संपतो ! रागद्वेषशून्य, विद्वान्, त्यागी, निस्वार्थी अशा ऋषींनीं, थोर मनुष्यांनीं ग्रंथ लिहिले असें म्हटलें तर त्याबद्दलची श्रद्धा कमी होते असें नाहीं. ऋषींनीं वेद रचले, पाणिनीनें व्याकरणशास्त्र निर्माण केलें, मन्वादि स्मृतिकारांनीं धर्मशास्त्र लिहिलें, आर्यभट्टानें बीजगणिताचे सिद्धांत शोधून काढले, गॅलिलिओनें विजेचा शोध लावला, न्यूटननें गुरुत्वाकर्षणाचा नियम लोकांपुढें मांडला, खिस्त व पैगंबर यांनीं आपापले सांप्रदायिक ग्रंथ उत्पन्न केले, हीं सर्व, त्या त्या कालांत फार मोठीं माणसें होतीं, असें म्हटल्यानें मुळींच अश्रद्धा उत्पन्न होत नाहीं. उलट या मनुष्यकृति नव्हेत, त्या ग्रंथांची भाषाही देवभाषा होती, असें म्हटल्यानें माणसांची विचारशक्ति मात्र नष्ट होते.

( २ ) मीमांसकांनीं धर्माची केलेली व्याख्या अपुरी आहे. एका कालीं यज्ञप्रधान धर्म होता. त्यानें समाजोत्कर्षाला पुष्कळच साह्य केलें,

पण आज ती संस्था अपूर्णतेमुळेंच मागें पडलेली आहे. अभ्युदय व निःश्रेयस हीं धर्माचीं दोन फलें. पण अभ्युदय म्हणजे स्वर्ग आणि निःश्रेयस म्हणजे मोक्ष असा अर्थ सर्व दार्शनिकांनीं करून धर्माची व इहलोकाची जी फारकत केली ती ग्राह्य नाहीं. परलोकाकरितां धर्माचरण करावें, स्वर्गाकरितां यज्ञ करावेत हें म्हणणें निर्मूल आहे. यज्ञांचा अपुरेपणा हा उपनिषदत्कालींहि दिसूं लागलेला होता. यज्ञ व तत्सदृश कर्मे हीं छिद्रें पडलेल्या नांवांप्रमाणें संसारसागर तरून जाण्यास उपयोगीं नाहींत असें म्हटलें आहे ( प्लवाह्येते अदृढा यज्ञरूपाः—मुंडकोपनिषत् १-२-७ ). भगवद्गीतेंतहि अध्याय दोन व नऊमध्यें (' यामिमां पुष्पितां वाचं,' ' ते तं भुक्त्वा ') यज्ञाची निंदा केली असून द्रव्ययज्ञ, योगयज्ञ, तपयज्ञ असे अनेक यज्ञ गीतेनें सुचविले आहेत. यज्ञाचें फल जें स्वर्ग तो प्रत्यक्ष नसल्यामुळें त्याची निंदा पुष्कळ आढळते. म्हणून स्वर्ग, यज्ञ आणि वेद यांचा परलोकाशीं संबंध जोडून इहलोक—उदासीन असा धर्म आतां हिंदुराष्ट्राला नको आहे. राष्ट्र, समाज, धर्म, संस्कृति यांचा पुरुषार्थानें व पराक्रमानें प्रपंच करावयास सांगणारा, या जगांत मानवांचें परमोच्च कल्याण करण्यास शिकविणारा असा प्रत्यक्ष धर्म आज हवा आहे. कारण ऐहिक उत्कर्ष, ऐहिक अभ्युदय, ऐहिक कल्याण साधण्याकरितां जीं साधनें हस्तगत करावीं लागतात तींच पारलौकिक कल्याणाच्या कामीं उपयोगीं पडतात.

( ३ ) धर्मनिर्णयाचें साधन जी धर्मज्ञांची बुद्धि तिला वेदानें सांगितलेल्या धर्मामध्यें प्रवेश नाहीं हें म्हणणें सदोष आहे, किंवा हा ' वदतो व्याघातः ' दोष आहे. वेदाला स्वतःप्रामाण्य हें पुरुषबुद्धीनेंच दिलें. वेद नित्य व अपौरुषेय आहेत हें पुरुषबुद्धीनेंच ठरविलें. धर्मात पुरुषबुद्धीचा प्रवेश नाहीं असें पुरुषबुद्धीच म्हणते. वेदवाक्यांचे विधि, प्रतिषेध, अर्थवाद, मंत्र आणि नामधेय हे पांच भेद पुरुषबुद्धीनेंच केले. वेदांतील अमुक वाक्य विधिपर आहे आणि अमुक प्रतिषेधपर आहे, हें ठरविण्यास पुरुषबुद्धीवांचून कोणतें साधन होतें ? वेदवाक्यांतील अपूर्वविधीचीं, उत्पत्तिविधीचीं आणि विनियोगविधीचीं वाक्यें निरनिराळीं करण्याचें काम पुरुषबुद्धीनेंच केलें ना ? असा सर्वत्र पुरुषबुद्धीचा प्रभाव

असतांना धर्मांत तिचा प्रवेश नाहीं असें म्हणणें हें निराधार आहे. यास्तव तर्काला आणि धर्मज्ञांच्या बुद्धीला धर्मांत मान दिला पाहिजे.

(४) स्मृति व पुराणें हीं श्रुतिमूलक नाहींत. श्रुति, स्मृति व पुराणें हीं भिन्न भिन्न कालीं झालीं आहेत. पुष्कळ स्मृति ( विरोधेत्वनपेक्षं स्यात् ) श्रुतिविरुद्धही आहेत. निरनिराळ्या कालीं व निरनिराळ्या स्थळीं अपेक्षे-प्रमाणें स्मृतिग्रंथ उत्पन्न झाले. पुष्कळ स्मृतींत प्रक्षेप व पाठांतरें आहेत. सर्व स्मृति श्रुतिमूलक आहेत असें म्हणणें हा केवळ आग्रह आहे. त्या आग्रहामुळें चोर, दरोडेखोर, नास्तिक हे सुद्धां आपलें तत्त्व श्रुतिमूलक आहे असें म्हणूं शकतील. श्रुतिस्मृतिपुराणांचा समन्वय करणें आणि प्रत्येक वचन अदृष्टाकरितां आहे असें म्हणणें अयुक्त आहे. मीमांसा-शास्त्राचा वेदार्थ लावण्याचे कामीं उपयोग आहे. पण भिन्न स्थलीं व भिन्न कालीं रचल्या गेलेल्या स्मृतींचा समन्वय मीमांसाशास्त्रानें करणें असमंजस होय! वेदांतशास्त्रांत एकवाक्यतेकरितां समन्वयपद्धति रूढ आहे. पण धर्मशास्त्रांत ती स्वीकार्य नाहीं. अलीकडील धर्मनिबंधकारांनीं समन्वय करण्याची म्हणजे वाक्यांची ओढाताण करून एकवाक्यता ( गोळा-बेरीज ) करण्याची जी पद्धति स्वीकारली ती सदोष आहे. भिन्न भिन्न स्थलीं व भिन्न भिन्न कालीं परिस्थितीप्रमाणें धर्मग्रंथ उत्पन्न झाले. त्या दृष्टीनें श्रुतिस्मृतिपुराणांतील समाजाच्या अभ्युदयाला, उत्कर्षाला जें जें पोषक असेल तें तें सर्व ग्राह्य होय.

श्रुति, स्मृति व पुराणें यांचे विषय भिन्नभिन्न आहेत. स्मृति व पुराणें हा केवळ श्रुतीचाच अनुवाद आहे असें म्हणतां येणार नाहीं. न्याय-भाष्यकार वात्स्यायनांनीं वेद, इतिहास आणि पुराणें आणि धर्मशास्त्र यांचे विषय भिन्नभिन्न आहेत, असें स्पष्टपणें म्हटलेलें पुढील उताऱ्यावरून दिसून येईल.

' विषयव्यवस्थापनाच्च यथाविषयं प्रामाण्यम् । अन्यो मन्त्रब्राह्मणस्य विषयोऽन्यश्चेतिहासपुराणधर्मशास्त्राणामिति । यज्ञो मन्त्रब्राह्मणस्य लोकवृत्तमितिहासपुराणस्य लोकव्यवहारव्यवस्था-पनं धर्मशास्त्रस्य [ स्मृतेः ] विषयः । '— न्या. भा. ४, १, ६२.

वरील उताऱ्यांत वेद, इतिहास व पुराणें यांचे विषय दाखवून लोकव्यवहारव्यवस्थापना म्हणजे समाजांतील अनेक व्यवहारांची परिस्थितिसापेक्ष घडी बसवून देणें, सर्व व्यवहार सुरळीत चालतील असें करणें, हें कार्य धर्मशास्त्राचें आहे असें सांगितलें आहे.

मीमांसकांची यज्ञप्रधान, कर्मचोदक व अदृष्टमूलक अशी धर्माची व्याख्या मान्य करवत नाहीं. ज्यामुळें समाजाची धारणा होते, उत्कर्ष होतो व शेवटीं परमोच्च कल्याण होतें तोच धर्म होय. धर्म हा केवल अपूर्वाकरितां आहे, अदृष्टाकरितां आहे असें म्हटलें कीं तो समजण्यासहि दुर्गम होतो.

अणीयान् क्षुरधारायाः गरीयानपि पर्वतात् ।
गंधर्वनगराकारः प्रथमं संप्रदृश्यते ॥
अन्वीक्ष्यमाणः कविभिः पुनर्गच्छत्यदर्शनम् ॥

असें एका ठिकाणीं अदृष्ट धर्माचें वर्णन आढळतें. पण आतां प्रत्यक्ष धर्म हवा आहे.

( ५ ) कोणतीहि रूढि अनादि व अपौरुषेय नाहीं. समाजाच्या गरजेप्रमाणें परिस्थित्यनुरूप रूढी पडत असतात. त्या वरचेवर बदलतां येतात व चालूहि करतां येतात. तत्कालीन शिष्ट ज्या रूढी पाळतील तो धर्म व ज्या रूढी सोडतील तो अधर्म होय. हीच गोष्ट देशाचाराची आहे.

यद्यदाचर्यते येन धर्म्यं वाऽधर्म्यमेव च ।
देशस्याचरणं नित्यं चरितं तद्धि कीर्तितम् ॥

श्रुति, स्मृति व पुराणें हे जुन्या ज्ञानाचे खजिने आहेत. आजच्या आपल्या जीवनाला उपयुक्त असे अनुभव जर त्यांतून मिळाले तर ते ग्राह्य होत. समाजहितास व राष्ट्रहितास जें जें अनुकूल असेल तें तें श्रुति–स्मृतींत असेल तर इष्ट व नसेल तर तें बाहेरूनसुद्धां आतां घेण्याची वेळ आलेली आहे. आजचें विज्ञानशास्त्र फार वाढलेलें आहे. समाजाच्या धारणेचीं व रचनेचीं तत्त्वेंहि फार बदललेलीं आहेत. अशा वेळीं श्रुति–स्मृति पुराणांमध्यें न सांगितलेला असा धर्महि आचरावा लागेल. या नव्या कालांत समाजाला श्रुति–स्मृति–पुराणांच्या कोंडीमध्येंच कोंडून ठेवणें अशक्य आहे. भविष्यकालांत शब्दावर विसंबून न राहातां बुद्धिनिष्ठ शास्त्रीय सिद्धांतांचे आधारेंच

विचार केला पाहिजे. श्रुतिस्मृतिपुराणें यांविषयीं प्रामाण्यबुद्धि म्हणजे आदरबुद्धि एवढाच अर्थ आहे. श्रुति–स्मृति–पुराणें हीं जुन्या संस्कृतीचीं संग्रहालयें आहेत, ते ज्ञानकोश आहेत या दृष्टीनें त्यांतील ग्राह्य भाग केव्हांहि स्वीकार्य आहे.

(६) वेदांमध्यें जें अतींद्रिय असेल व जें आधुनिक शास्त्रांच्या कसोटीला उतरेल, ज्याचा प्रसार अनुभव, अनुमान व प्रयोग यांच्या योगानें करतां येईल तें सर्व नव्या हिंदुधर्माला ग्राह्य आहे.

(७) मीमांसकांचे तत्त्वज्ञानविषयक सिद्धांत मान्य करण्याजोगे नाहींत. मीमांसकमतें सृष्टीचा कर्ता ईश्वर नाहीं. कर्मांचें फल ईश्वर अगर यज्ञदेवता देऊं शकत नाहींत. वेदांत्यांनीं कर्मफलदातृत्व ईश्वराकडे दिलें आहे, तर मीमांसकांनीं तें अपूर्वाकडे दिलें आहे. मीमांसाशास्त्र हें एका दृष्टीनें नास्तिकशास्त्र आहे. " त्याला आस्तिक करतों," असें कुमारिलभट्टासारख्यांनींहि म्हटलें आहे.

मीमांसक ' शब्दप्रमाणका वयं ' ' वचनैकशरणावयं ' ' वचनात् प्रवृत्तिः वचनात् निवृत्तिः ' ' नास्ति वचनस्य अतिभारः ' ' किमिव हि वचनं न कुर्यात् ' ' न हि वचनस्य किंचिदलभ्यं नाम ' ( मी. सू. भा. २, २, २७) (शाबरभाष्य ६, १, ४४ ) असें म्हणतात. हा सिद्धांत अगदीं खोड्याप्रमाणें आहे. त्यामुळें कोणतीहि सुधारणा शक्य नाहीं. या पद्धतीचा पुरस्कार गेलीं हजार वर्षें अनेक निबंधकारांनीं इतिहासाकडे व परिस्थितीकडे दुर्लक्ष करून केलेला आहे. त्यामुळें विचारवंतांमध्यें सुद्धां एक प्रकारची बौद्धिक गुलामगिरी उत्पन्न होऊन हिंदुराष्ट्राची मोठी हानि झालेली आहे.

अहिंदु लोकांचा देव ' हें धर्मपुस्तक मी तुम्हांला दिलें आहे, ' असें म्हणतो, तसा हिंदूंचा देव म्हणत नाहीं. हिंदु हे अहिंदूप्रमाणें व अनार्यांप्रमाणें शब्दप्रामाण्यवादी नाहींत किंवा एकग्रंथी समाज नाहींत. हिंदूंचें धर्मशास्त्र हें समाजशास्त्र आहे, त्याला कार्यकारणभाव आहे, त्याला वाढ आहे व इतिहासहि आहे. हिंदुधर्मांत स्मृतींची जी वाढ झाली, त्याचें कारण हिंदुसमाजानें अनेक समाज व संस्कृति यांचें एकीकरण व सात्मीकरण केलें हें होय! देव, पितर, असुर, राक्षस, गंधर्व,

यक्ष, किन्नर, नागादींचें एकीकरण हिंदुसमाजानें केलें. त्याचे अवशेष अद्याप हिंदुसमाजांतील चालीरीतींमध्यें आढळतात. अनेक समाजांच्या एकीकरणानंतर अनेक स्मृति झालेल्या आहेत. स्मृतिग्रंथांना समन्वय-पद्धति लावणें चुकीचें आहे. अहिंदुधर्मांतील व अनार्यांतील शब्दप्रामाण्याच्या कल्पना घेऊन धर्मनिर्णय करणें चुकीचें आहे. श्रुतिवाक्यें यज्ञपर असतात. त्यांच्या निर्णयाला जे नियम लावावयाचे ते स्मृतींना लावणें योग्य नाहीं; कारण श्रुतींचा विषय निराळा असून स्मृतींचा विषय वर्ण, व्यवहार, आचार असा आहे.

(२५) **इतिहासपद्धतीचीं मूलभूत तत्त्वें**:—आजच्या परिस्थितींत उत्पन्न झालेले अनेक धार्मिक व सामाजिक प्रश्न सोडविण्यास मीमांसापद्धति ही कशी अपुरी आहे, हें वर जें क्रमशः खंडन केलें आहे, त्यावरून ध्यानांत येईल. * इतिहासाकडे व परिस्थितीकडे लक्ष्य देणारी अशी नवी धर्म-निर्णयाची इतिहासपद्धति स्वीकारली पाहिजे. तिचीं तत्त्वें अशीं—

( १ ) अनुभव व तर्क मिळून मनुष्याची बुद्धि होते. ही बुद्धीच धर्माचें प्रमाण आहे. धर्मनिर्णय हा श्रुतिस्मृति, शिष्टांचा आचार व विचार आणि परिस्थिति यांच्या साह्यानें **धर्मज्ञांनीं** करावा.

( २ ) समाजाची धारणा व उत्कर्ष व्हावा एतदर्थ श्रुतिस्मृति व शिष्टाचार यांच्या साह्यानें आजवर धर्मामध्यें वेळोवेळीं परिवर्तन झालेलें आहे.

( ३ ) पूर्वकालीन शिष्टांनीं परिस्थितीप्रमाणें वेळोवेळीं जसें धर्मामध्यें परिवर्तन केलें, तसें आजहि आजच्या शिष्टांना आजच्या परिस्थितीला अनुसरून धर्मामध्यें परिवर्तन करण्याचा अधिकार आहे.

( ४ ) ऐतिहासिक पद्धति म्हणजे मागील अनुभव ध्यानांत घेऊन कालानुरूप परिवर्तन करण्याचा मार्ग.

( ५ ) उच्चतम कल्याण हें मानव्याचें ध्येय होय. त्या ध्येयाचें जें साधन तो धर्म होय. उच्चतम कल्याणामध्यें ऐहिक कल्याणाचा अन्तर्भाव

* **टीप**—या विषयावर पं. तर्कतीर्थ कोकजेशास्त्री यांचा ‘ धर्मस्वरूप-निर्णय ’ हा ग्रंथ वाचकांनीं वाचावा.

होतो. म्हणून ऐहिक कल्याणाच्या साधनांमध्यें पारलौकिक कल्याणाच्या साधनांचा अन्तर्भाव होतो.

या पद्धतीस अनुसरून नव्या हिंदुधर्माची मांडणी प्रस्तुत ग्रंथांत करावयाची आहे. त्यास प्रारंभ करण्यापूर्वी धर्म हा अपूर्वाकरितां आहे, तो अदृष्ट आहे, तो पुरुषबुद्धीला गम्य नाहीं आणि धर्मांत ईश्वर-सुद्धां परिवर्तन करूं शकत नाहीं, अशा तऱ्हेची जी विचारसरणी जनमनावर आरूढ झालेली आहे, तिचें निरसन पुढील दोन प्रकरणांत करितों.

—*—

# प्रकरण चौथें

## धर्म हा अपूर्व व अदृष्ट आहे काय ?

(२६) **पुण्यक्षय व ऐहिक आपत्तिः**—धर्म हा अपूर्वाकरितां म्हणजे केवळ पुण्याईकरितां आहे, तें पुण्य परलोकसंबद्ध आहे, धर्माचरणाचें फल अदृष्ट आहे, स्नानसंध्या, जपतप, श्राद्धपक्ष, संस्कार, व्रतें, दानें, नेमधर्म या सर्वांचें आचरण पुण्यप्राप्तीकरितांच करावयाचें असतें, धर्माचरणाचा लौकिक व्यवहाराशीं कांहीं संबंध नाहीं, आचारधर्मामुळें जो पुण्यसंचय होतो तोच आपला ऐहिक व पारलौकिक अभ्युदय साध्य करण्यास समर्थ असतो; इ. समजुतींच्या जोरावर धर्माभिमानी लोक असेंहि म्हणतात कीं आपण स्वधर्म सोडला म्हणूनच प्रथम मुसलमानांचें आक्रमण झालें आणि नंतर इंग्रजांनीं आपलें स्वातंत्र्य हिरावून घेतलें. ही विचारसरणी कशी सदोष आहे हें पाहूं.

(२७) **या समजुतीचें निराकरणः**—सोंवळेंओंवळें, श्राद्धपक्ष, हजामत, स्नानसंध्या, जपतप, तीर्थयात्रा, व्रतेंदानें यांतच जर सर्व प्रकारची

पुण्याई आहे तर इंग्रज लोक सोंवळें नेशीत नसतांना, हजामतीचे नियम पाळीत नसतांना, इंग्रजांतील वृद्ध स्त्रिया बेल व विष्णुवातींचे लक्ष लावीत नसतांना, ती पुण्याई त्यांना कशी प्राप्त झाली ? हिंदूंच्या मुंजी वेदमंत्रानें होतात, पण इंग्रजांच्या आणि मुसलमानांच्या ना मुंजी, ना वेदमंत्र, ना संकल्पपूर्वक स्नानें, ना भस्मधारण, ना शेंडीला गांठ, अशा स्थितींत त्यांनीं कोणत्या उपायांनीं आपली पुण्याई वाढविली ? हिंदु स्त्रिया रोज अंग धुतात, धूत वस्त्रें परिधान करितात, गळ्यांत मंगळसूत्रें धारण करतात व कपाळावर घवघवीत कुंकू लावतात. पण इंग्रजांच्या मडमा आणि मुसलमानांच्या बिब्या यांतील कांहीं न करतां आपल्या पतींना समर्थ करण्यास कोणच्या तऱ्हेचा पुण्यसंचय करतात ? संकष्टी, एकादशी, जन्माष्टमी, रामनवमी, सोमवार–गुरुवारचे उपास करणारीं माणसें हिंदु समाजांत कांहीं थोडींथोडकीं नाहींत. पण इंग्रजांना आणि मुसलमानांना ना संकष्टी ना एकादशी, ना शनिवार, ना सोमवार ! असें असतांना म्हणजे हिंदूंच्या समजुतीप्रमाणें जवळ जवळ धर्मभ्रष्टपणा या दोन्ही लोकांत असतांना त्यांचीं आक्रमणें कोणत्या पुण्याईमुळें यशस्वी झालीं याचा विचार निराळ्या दृष्टीनेंच केला पाहिजे. आचारधर्मांचा, उपासतापासांचा, नियमधर्मांचा, श्राद्धपक्षांचा आणि तज्जन्य पुण्याईचा पारतंत्र्याशीं कांहीं संबंध नाहीं. आचारधर्म हा समाजामध्यें एक तऱ्हेचें वळण, एक तऱ्हेची शिस्त व एक तऱ्हेची एकरूपता आणण्याकरितां असतो. त्यांत वेळोवेळीं परिवर्तन होतें. तें झालें कीं लगेच पुण्याईचा क्षय झाला असें समजणें भाबडेपणाचें आहे.

कांहीं माणसें भाबडेपणानें इंग्रज व मुसलमान हे हिंदुधर्माप्रमाणें वागत नसले तरी आपापल्या धर्माप्रमाणें वागतात, त्यांनीं आपला धर्म सोडलेला नाहीं; म्हणूनच त्यांची पुण्याई अधिक आहे, अर्थात् ते विजेते आहेत असेंहि प्रतिपादन करतात; पण त्यांच्या ध्यानांत हें येत नाहीं कीं, मुसलमान व इंग्रजांमध्येंहि कुराण व बायबलप्रणीत आचारधर्म राहिलेला नाहीं. त्यामध्येंहि परिस्थितीनें पुष्कळच परिवर्तन केलेलें आहे. बायबलप्रणीत वा कुराणप्रणीत प्रेअर करून वा नमाज पढून हे लोक विजयी झाले असें समजणें चुकीचें आहे. आक्रमकांची संघटना, त्यांचें हत्यार आणि त्यांचें शास्त्र हीच ती पुण्याई होय ! आलेलें आक्रमण नष्ट

करावयाचें असेल तर तशी संघटना, तसें हत्यार व तसें शास्त्र संपादन करणें हाच खरा पुण्याईचा मार्ग आहे.

श्रीछत्रपती शिवाजीमहाराजांनीं यवनांचें आक्रमण नष्ट करण्या करितां यवनांपेक्षां श्रेष्ठ संघटना, लढाईचा गनीमी कावा, आवेश आणि सशस्त्रता हीं तत्कालीन मराठ्यांमध्यें आणलीं. प्रतिपक्षाचें सामर्थ्य ज्यांत होतें तीं साधनें हस्तगत करून त्यांपेक्षां बलिष्ठ होऊन यवनांवर त्यांनीं विक्रम मिळविला. पुढें पेशव्यांनींसुद्धां इंग्रजाशीं बरोबरीनें सामने दिले, फार काय, पण तळेगांवच्या लढाईत इंग्रजांचा पराभवहि केला; याचेंहि कारण उपास, जपतप, नेमधर्म, व्रतें इत्यादिजनित पुण्याई नसून प्रतिपक्षाला पुरून उरण्याजोगें सामर्थ्य अंगीं आणणें हेंच होय. भौतिक शास्त्र-संपन्नतेचा आणि धार्मिक आचाराचा संबंध जोडणें सर्वस्वीं चुकीचें आहे. भौतिकशास्त्रसंपन्नतेनें व्यावहारिक उन्नति होते व धर्माचरणानें मनःशांति लाभते. असो.

(२८) **धर्म हा अदृष्ट नाहीं**:—धर्म हा अदृष्टमूलक आहे. शास्त्राची प्रत्येक आज्ञा अदृष्टाकरितां आहे अशी आज समजूत दिसते. विज्ञानाकडे दुर्लक्ष करून भौतिक विचारापासून दूर असा जर आचारधर्म सांगितला तर समाजाची प्रगति थांबते. अध्यात्मिक आणि आधिभौतिक शक्ति सामाजिक जीवनास उपयुक्त होतील असा दृष्ट आचार धर्मांत असला पाहिजे. अदृष्ट कर्मविपाकावर आधारलेल्या स्मृत्युक्त कायद्यापेक्षां, कौटिल्याच्या अर्थशास्त्रांतील दृष्टमूलक कार्यकारणभावावर आधारलेला कायदा उच्च होय! या दृष्टीनें धर्माचा विचार झाला पाहिजे. प्रत्येक विधि हा अदृष्ट व अपूर्वाकरितां आहे, धर्मामध्यें पुरुषबुद्धीचा प्रवेश होऊं शकत नाहीं, ही समजूत तर्कदुष्ट आहे. तिचा फोलपणा दाखविण्याकरितां नित्यकर्मांतील कांहीं उदाहरणें घेऊन त्यांची चर्चा करतों.

(२९) **शौच**:—शौच, मुखमार्जन, स्नान, स्मश्रु, भोजन, वगैरे विषय लौकिक आहेत. हे सर्व केवळ शरीरधारणेकरितां आहेत. त्यांत अदृष्ट व अपूर्व असें कांहीं नाहीं. असें असतांना शौचासंबंधानें निरनिराळ्या स्मृतींत जीं वचनें आहेत व त्यांवर निबंधकारांची जी अदृष्टमूलक टीका आहे ती विचार करण्यासारखी आहे:—

एका लिङ्गे करे तिस्र उभाभ्यां द्वे तु मृत्तिके ।
पञ्चापाने दशैकस्मिन्नुभयोः सप्त मृत्तिकाः ॥ १६ ॥
एतच्छौचं गृहस्थस्य द्विगुणं ब्रह्मचारिणः ।
वानप्रस्थस्य त्रिगुणं यतीनां च चतुर्गुणम् ॥१७॥ वसिष्ठ अ. ६
एका लिङ्गे गुदे तिस्रस्तथैकत्र करे दश ।
उभयोः सप्त दातव्या मृदः शुद्धिमभीप्सता ॥१३६॥
एतच्छौचं गृहस्थानां द्विगुणं ब्रह्मचारिणाम् ।
त्रिगुणं स्याद्वनस्थानां यतीनां तु चतुर्गुणम् ॥१३७॥ मनु अ. ५

दक्षानें वरील श्लोकांचाच अनुवाद केला असून तो पुढें म्हणतो—

न्यूनाधिकं न कर्तव्यं शौचं शुद्धिमभीप्सता ।
प्रायश्चित्तेन युज्येत विहितातिक्रमे कृते ॥१३॥ दक्ष. अ. ५
गन्धलेपक्षयकरं शौचं कुर्यादतंद्रितः ॥१७॥ याज्ञवल्क्य अ. १

वरील श्लोकांत शौचास बसण्यापूर्वी माती मळून ठिकठिकाणीं तिचे गोळे कोणी कसे लावावे वगैरे विवेचन आहे. हा शौचविधि वसिष्ठ, विष्णु, मनु, याज्ञवल्क्य, अत्रि, आश्वलायन, दक्ष इत्यादि स्मृतिकारांनीं सांगितलेला आहे. हा सर्व विधि अदृष्टाकरितां व अपूर्वाकरितां आहे असें मीमांसापक्षपाती पंडित म्हणतात. मिताक्षराकार 'मृत्संख्यानियमस्त्वदृष्टार्थः' असें म्हणतो. माधवाचार्य सांगितल्यापेक्षां कमी माती लावून जरी दुर्गंधी नष्ट झाली तरी ठराविक संख्या अदृष्टाकरितां तरी पूर्ण करावीच; 'सत्यपि गन्धक्षये शास्त्रोक्तसंख्या पूरणीया' असें म्हणून वरील "न्यूनाधिकं" हें दक्षवचन उद्धृत करतो. वीरमित्रोदयकारांनीं शास्त्रांत सांगितलेली संख्या पूर्ण करूनहि गंधलेप नष्ट न झाल्यास काय करावें, असा प्रश्न उपस्थित केला आहे व त्याचें उत्तर पुन्हां तितक्याच संख्येची आवृत्ति करावी, मध्यें सोडूं नये असें दिलें आहे.

'विहित संख्यानुष्ठाने कृतेऽपि गन्धलेपानुवृत्तौ अविहितमधिकं न कार्यं...किन्तु विहिता सैव संख्या पूरणीया विहितत्वाविशेषात्' कुल्लुकभट्टांनींहि

' यदा तूक्तसंख्याया अल्पेनापि गन्धलेपक्षयो भवति तदा संख्यावाक्यारंभसामर्थ्यात्संख्या पूरयितव्यैव । '
असें म्हणून त्याच मताचा अनुवाद केला आहे.

वरील स्मृतिवचनें व त्यांवरील पांडित्य पाहिलें म्हणजे असें विचारावेंसें वाटतें कीं या मातीच्या गोळ्यांचा आणि शौचाचा संबंध काय ? हे मातीचे गोळे लावल्यानें शौचाला साफ होतें कीं काय ? हा शौचविधि एकंदरींत अदृष्ट व अपूर्वाकरितां म्हणजे पुण्याईकरितां आहे हें कशावरून ? शौचविधि हा शरीरधारणेकरितांच आहे. त्यांत अदृष्ट नि पारलौकिक असें कांहीं नाहीं.

म्हणून त्यासंबंधाचें वरील विवेचन मान्य करतां येत नाहीं. कारण देवलासारखा स्मृतिकारच म्हणतो कीं,

यावत्स्वशुद्धिं मन्येत तावच्छौचं समाचरेत् ।
प्रमाणं शौचसंख्याया न शिष्टैरुपदर्शितम् ॥ —देवल

जोंवर स्वच्छता झाली नाहीं असें वाटेल तोंवर ढुंगण धुवावें. शौचाचें आणि मातीच्या गोळ्यांचें प्रमाण कांहीं शिष्टसंमत नाहीं. म्हणून शौचविधीचा व अदृष्टाचा कांहीं संबंध नाहीं.

( ३० ) **मुखमार्जनः**—शौचाप्रमाणें मुखमार्जन व दंतधावन हेंहि शरीरधारणेकरितां आहे. पण त्याचासुद्धां अदृष्टाशीं व अपूर्वाशीं, तिथीशीं, वाराशीं संबंध जोडलेला आहे. चतुर्दशी, अष्टमी, पूर्णिमा, संक्रांत, जन्मदिन, श्राद्धदिन, नवमी, रविवार अशा दिवशीं जर दंतधावन केलें ( दांत घांसले ) तर तो दंताचा व काष्ठाचा संयोग आपल्या सप्त कुळांना जाळण्यास समर्थ होतो. ' **दंतानां काष्ठसंयोगो दहत्यासप्तमं कुलम्**- ( पैठीनसि ) असें लिहिलेलें आहे. दांत घासावयाला जें काष्ठ घ्यावयाचें त्याची लांबी प्रत्येक वर्णाला निरनिराळी सांगितलेली आहे. स्त्रियांनीं चार बोटें लांबीचें काष्ठ, शूद्रांनीं सात, वैश्यांनीं आठ, क्षत्रियांनीं नऊ व ब्राह्मणांनीं दहा अंगुलें लांबीचें काष्ठ दंतधावनास घ्यावें. तसें न केल्यास अधर्म घडतो असेंहि म्हटलेलें आहे. दांत घांसण्याला कोणतीं काष्ठें घ्यावींत याचेंहि विवेचन फलश्रुतियुक्त आहे—

**खदिरस्य करंजस्य कदंबस्य तथैव च ।**
**अर्कस्य करवीरस्य कुटजस्य विशेषतः ॥** —नारद.
**सर्वे कंटकिनः पुण्याः क्षीरिणश्च यशस्विनः ।** —वृद्धमनु.

कांटेरी वृक्षांचीं काष्ठें पुण्यकारक, ज्यांतून चीक निघतो अशा वृक्षांचीं काष्ठें यशदायक. खैर, करंज, कदंब, रुई, कुडा वगैरेचीं काष्ठें दंतधावनास फार चांगलीं. या काष्ठांनीं दांत घासले म्हणजे ते स्वच्छ होतात, बळकट होतात, किडत नाहींत व त्यामुळें दंतरोग होत नाहींत असें कोठेंच सांगितलेलें नाहीं. तर त्यामुळें पुण्य प्राप्त होतें किंवा इतर फळें मिळतात असें अर्थवादयुक्त पण रोचक म्हटलें आहे.

वटकाष्ठानें दांत घासल्यास कीर्ति, करंजकाष्ठामुळें रणांत विजय, बोराच्या काडीनें मधुरस्वरता, बेलाच्या काष्ठानें विपुल धन, उंबराच्या काष्ठानें वाक्सिद्धि, आघाड्याच्या काडीनें धैर्य, प्रज्ञा, शक्ति, आयुष्य, शील वगैरे सर्व प्राप्त होतें. हें अर्थवादात्मक वर्णन ध्यानीं घेऊन दांत घासणें हास्यास्पदच आहे. ज्या योगानें दांत बळकट होतील, स्वच्छ होतील, न किडतील, अशा कोणत्याहि काष्ठानें दंतधावन करावें. हें इष्ट व दृष्ट फल सोडून अदृष्ट कल्पनेनें व अपूर्व कल्पनेनें दांत घासणें चुकीचें नाहीं काय ? कारण "दृष्टफलसंभवे अदृष्ट कल्पना अन्याय्या" असा न्याय आहे.

गुजराथेंत व उत्तरेकडे काष्ठानें दांत घासतात. अलीकडे ब्रश व पावडर यांचा प्रचार पुष्कळ झाला आहे. महाराष्ट्रांत रानशेणीची वा साध्या शेणीची राखुंडी करून तींत कापुर, तुरटी घालून बोटानें दांत घासण्याचा प्रचार आहे. पण तसें करणें हें पातक आहे, असें एक स्मृति म्हणते—

**दन्तधावनमंगुल्या...... ।**
**......तुल्यं गोमांसभक्षणैः ॥ ७३ ॥** —लघुशातातप.

शरीरधारणेच्या धर्माचा अदृष्टाशीं वा अपूर्वाशीं जोडलेला हा संबंध निरर्थक नाहीं काय ?

( ३१ ) स्मश्रुः—हजामत हेंही शरीरधारणेचें कर्म आहे. पूर्वी हजामतीलासुद्धां मुहूर्त लागे. चतुर्थी ही भावाला वाईट, पंचमी

बहिणीला वाईट, सोमवार मुलांना वाईट, व्यतिपात, वैधृति, कष्टतिथि अशा दिवशीं हजामत करूं नये, त्यांत कांहीं पापपुण्य आहे अशी समजूत होती. त्यामुळें महिन्यांतून एखादाच दिवस हजामतीस मिळे. आज अहिन्दु लोक व्यतिपात असो, वैधृति असो, मृत्युयोग असो, अमावास्या असो, स्वहस्तें वा परहस्तें दाढी करून, नीटनेटके कपडे घालून रुबाबदारपणानें वागतात. त्यांचें कोठें अडत नाहीं व त्यांना पंचांग लागत नाहीं. सांप्रत त्यांचें अनुकरण हिन्दु लोक करीत असून हजामत हा स्वच्छतेचा व शोभेचा विषय झालेला आहे. हजामत करण्यांत वा न करण्यांत कांहीं पापपुण्य नाहीं, हजामत हा शरीरधारणेचा धर्म असून त्यांत अदृष्ट व अपूर्व असें कांहीं नाहीं.

( ३२ ) **स्नानः**–हेंहि शरीरधारणेकरितां आहे. स्नानामुळें शरीर स्वच्छ राहातें, उत्साह वाटतो, उद्योग होतो. स्नानाचें फलही दृश्य आहे. स्नान करणाऱ्याचे ठिकाणीं ' गुणादश स्नानशीलं भजन्ते ' आरोग्य, उत्साह, स्वच्छता, स्वरशुद्धि इत्यादि दहा गुण उत्पन्न होत असतात, असें महाभारतांत म्हटलेलें आहे. म्हणून हें स्नानहि अदृष्ट व अपूर्व यांतून बाहेर काढलें पाहिजे. स्नानाच्या पूर्वीं शेंडीची गांठ सोडावी, उपवस्त्र अंगावर घेऊन बुडी मारावी, ओलें वस्त्र सोडल्यानंतर तें ओलांडूं नये, वस्त्र धुण्यापूर्वींच पितृतर्पण करावें, असे अनेक नियम यासंबंधानें सांगितलेले आहेत.

**निराशास्ते निवर्तन्ते वस्त्रनिष्पीडने कृते ।**
**तस्मान्न पीडयेद्वस्त्रमकृत्वा पितृतर्पणम् ॥१३॥** पराशर अ. १२
**अतर्पितेषु पितृषु वस्त्रं निष्पीडयेच्च यः ।**
**निराशाः पितरस्तस्य भवन्ति सुरमानुषैः ॥२४॥** व्यास अ. ३

**भावार्थः**–तर्पणापूर्वीं वस्त्र धुतलें तर पितर निराश होऊन परत जातात म्हणून तर्पण आधीं करून मग वस्त्र धुवावें.

येथें पितरांचा निराश होण्याचा व वस्त्र धुण्याचा काय संबंध आहे? स्नानानंतर मनुष्य सहजच वस्त्र धुतो व मग संध्या व तर्पण करतो. त्यांत पितरांचा संबंध काय? फार तर स्नानानंतर पितृतर्पण करावें, एवढें सांगणें योग्य होतें. परंतु ' तसें न केल्यास पितर निराश होतात ' हें म्हणणें

पटत नाहीं. कर्मवाद व पुनर्जन्म याप्रमाणें पितरांना त्यांच्या कर्माप्रमाणें गती मिळालेलीच असते. दुसरा जन्म घेऊन निराळ्या कर्मांत गुंतलेले पितर हे रोजच्या रोज येतात व निराशेनें परततात हें म्हणणेंच मुळीं तर्काला पटत नाहीं. म्हणून हाही विषय अदृष्टांतून काढला पाहिजे. तात्पर्य शौच, मुखमार्जन, स्नानादि विषयांचा अदृष्टाशीं संबंध जोडणें हें हास्यास्पद आहे. हीं कृत्यें शरीरधारणेकरतां आहेत. आतां कांहीं अन्य उदाहरणें देतों.

( ३३ ) एकपत्नित्वः-ब्रह्मचर्य पाळावें नि एकपत्निव्रतानें वागावें असें सांगणें हें योग्य आहे, परंतु त्यासंबंधीं कांहींतरीच सांगणें हें हास्यास्पद आहे—

ऋतुस्नाता तु या नारी भर्तारं नोपसर्पति ।
सा मृता नरकं याति विधवा च पुनःपुनः ।।१४।।
ऋतुस्नातां तु यो भार्यां सन्निधौ नोपगच्छति ।
घोरायां भ्रूणहत्यायां युज्यते नात्र संशयः ।।१६।। पराशर अ. ६
ऋतुमतीं तु यो भार्यांसन्निधौ नोपगच्छति ।
तस्या रजसि तं मासं पितरस्तस्य शेरते ।।९९।। संवर्त

भावार्थः—जी ऋतुस्नात स्त्री पतीकडे जात नाहीं ती मेल्यावर नरकाला जाते व जन्मोजन्मीं विधवा होते. तसेंच ऋतुकालीं जो स्वस्त्रीगमन करीत नाहीं, त्याला घोर अशा भ्रूणहत्येचें पातक लागतें. ऋतुकालीं स्वस्त्रीगमन न करणाऱ्याचे पितर त्या स्त्रीच्या रजामध्यें लोळतात.

हेंहि सर्व विवेचन तर्कदुष्ट असेंच आहे. 'ऋतौ भार्यामुपेयात्' ऋतुकाळीं स्वस्त्रीगमन करावें हा ब्रह्मचर्य, एकपत्निव्रत व संयम या दृष्टीनें परिसंख्याविधि आहे. तो नियमविधि नाहीं. कारण ऋतुकालीं पति परगांवीं असला, कामानिमित्त दूर गेलेला असला, लढाईवर असला कीं त्यामुळें पितरांवर सुनेच्या रजांत लोळण्याचा प्रसंग यावा हें उचित नाहीं. हें असलें अदृष्ट व अपूर्वार्थक सांगणें यापुढें बदललें पाहिजे. या असल्या चमत्कारिक सांगण्यानें धर्म ही अफूची गोळी आहे, ती एक गुंगी आहे, असा आरोप धर्मावर येतो.

( ३४ ) **कुत्र्याचें विषः**—अनेक स्मृतींमध्यें चंडालस्पर्शाप्रमाणें कुत्र्याच्या स्पर्शाचाहि विटाळ सांगितलेला आहे. कुत्र्याचा स्पर्श झाला तर स्नान एवढेंच प्रायश्चित्त सांगितलें नसून, कुत्रें चावलें, मग तें पिसाळलेलें असलें तरी त्याचा अन्य दृष्टीनें प्रतिकार न करतां अन्य गोष्टी कराव्यात असें सांगितलेलें आहे—

**शुना दष्टस्तु यो विप्रो नदीं गत्वा समुद्रगाम् ।**
**प्राणायामशतं कृत्वा घृतं प्राश्य विशुध्यति ॥१४६॥**
**सुवर्णरजताभ्यां वा गवां शृङ्गोदकेन वा ।**
**नवैश्च कलशैः स्नात्वा सद्य एव शुचिर्भवेत ॥१४७॥**

—बौधायन ६ प्र. ५. अ. ५

**श्वशृगालादिभिर्दष्टः ... ...**
**स्रवंतीमासाद्य षोडशप्राणायामान् कुर्यात्** ॥ विष्णु. अ. ५४ ॥
**गवां शृंगोदकस्नानान्महानद्यास्तु संगमे ।**
**समुद्रदर्शनाद्वापि शुना दष्टः शुचिर्भवेत् ॥२॥**
**वेदविद्याव्रतस्नातः शुना दष्टो द्विजो यदि ।**
**स हिरण्योदके स्नात्वा घृतं प्राश्य विशुध्यति ॥३॥**

—पाराशर अ. ५

**भावार्थः**—ज्याला कुत्रा चावला आहे अशा ब्राह्मणानें समुद्रगामिनी नदींत जाऊन स्नान करावें व प्राणायाम करून तूप प्यावें. किंवा सोनें, चांदी यांच्या नव्या भांड्यांतून पाणी घेऊन स्नान करावें म्हणजे तो शुद्ध होतो. कुत्रें, कोल्हा इत्यादि चावलें म्हणजे नदींत जाऊन स्नान करावें, प्राणायाम करावा. कुत्रा चावलेला मनुष्य महानदीच्या संगमामध्यें स्नान केल्यानें किंवा समुद्रदर्शनानें शुद्ध होतो. विद्वान् ब्राह्मणालासुद्धां कुत्रा चावला तर त्यानेंहि वरील प्रकारानेंच शुचित्व संपादावें.

कुत्र्याच्या विषावर वरील विधि हा उतारा आहे असें म्हणणें जरी अदृष्ट व अपूर्व या दृष्टीनें योग्य असलें, तथापि तें तर्कदुष्ट व अव्यवहार्य आहे.

कुत्रें चावलें कीं तें पिसाळलेलें आहे का चांगलें आहे याचा प्रथम शोध करून त्याप्रमाणें उपचार करण्याच्या मार्गास लागलें पाहिजे. तसें न

करतां वरील प्रायश्चित्तें करणाऱ्या माणसावर धर्माच्या अफूनें तो गुंगला आहे, असा कोणी आरोप केल्यास तो अनुचित आहे असें म्हणतां येणार नाहीं. व्यवहार, तारतम्य आणि प्रत्यक्ष प्रमाण हीं सर्व गुंडाळून ठेवून अदृष्टाच्या कल्पनेवर कांहीं तरी करीत राहाणें यांतच धर्माचा ऱ्हास आहे.

**( ३५ ) धर्म व दृष्टार्थ यांची ताटातूट**:–धर्मांतील दृष्टार्थता काढून टाकली आणि मेल्यानंतर मिळणाऱ्या पारलौकिक फळाशीं प्रत्येक धर्मकर्माचा संबंध जोडण्यास प्रारंभ झाला कीं धार्मिक अवनतीस प्रारंभ होतो. ' धर्मात् अर्थश्चकामश्च ' धर्मापासून अर्थ व काम हे पुरुषार्थ प्राप्त होत असतांना तिकडे दुर्लक्ष्य करून अदृष्टाच्या गुंगाऱ्यांत समाज कसा जातो हें पुढील वचनांवरून दिसून येईल—

**वरं स्वमातृगमनं वरं गोमांसभक्षणम् ।**
**ब्रह्महत्या सुरापानमेकादश्यां न भोजनम् ॥** कालतरंगिणी
**न करोति नरो मूढ एकादश्यामुपोषणम् ।**
**रौरवं नरकं याति यावदिन्द्राश्चतुर्दश ॥** सनत्कुमार

**भावार्थः**–ब्रह्महत्या व गोमांसभक्षणादि पातकें पुरवलीं, पण एकादशीस भोजन करणें हें त्याहिपेक्षां मोठें पाप आहे. जो मूर्ख मनुष्य एकादशीला उपोषण करीत नाहीं तो रौरव नरकाला जातो.

**कृष्णाष्टम्यां महादेवं तथा कृष्णचतुर्दश्याम् ।**
**सम्पूज्य ब्राह्मणमुखैः सर्वपापैः प्रमुच्यते ॥१०७॥**

—उशनस अ. ९

**गवां कंडूयनं चैव सर्वकल्मषनाशनम् ।**
**गवां ग्रासप्रदानेन स्वर्गलोके महीयते ॥६०॥** विष्णु. अ. २३

**भावार्थः**–वद्य पक्षांतील अष्टमीस व चतुर्दशीस महादेवाची पूजा केली म्हणजे सर्व पातकें नष्ट होतात. गायीला खाजविलें व कुरवाळलें म्हणजे सर्व पातकें नष्ट होतात, गायीला गोग्रास दिला म्हणजे स्वर्गलोक मिळतो.

**चौरो वा यदि चांडालः शत्रुर्वा पितृघातकः ।**
**वैश्वदेवे तु संप्राप्ते सोऽतिथिः स्वर्गसंक्रमः ॥ ६२ ॥**

—पराशर अ. १

**भावार्थः**—चोर, चांडाल, आपला शत्रु आणि प्रत्यक्ष पितृघातक ( संस्कृतिघातक ) असा जर वैश्वदेवाचे वेळीं अतिथी म्हणून आला तर तो स्वर्गाला जाण्याचा पूल आहे असें समजावें.

पहिल्या दोन श्लोकांत एकादशीचें, दुसऱ्या दोन श्लोकांत महादेव-पूजेचें व गोसेवेचें आणि तिसऱ्यांत अतिथीचें अदृष्टाच्या दृष्टीनें भरमसाट वर्णन केलेलें आहे. सामान्य माणसांवर याचा विलक्षण परिणाम होतो व एकदां लोक असल्या कल्पनांमध्यें अडकले म्हणजे आप्तवाक्य म्हणून आणि संस्कृतांत लिहिलें आहे तें खोटें कसें, असें म्हणून त्या पकडीच्या बाहेर येतच नाहींत. धर्माची दृष्टार्थाशीं फारकत झाली म्हणजे तो धर्म आचरटपणाच्या सदरांत जातो ! असो.

(३६) **वेदाधारः**—धर्म हा इहलोकसंबद्ध नाहीं, तो केवळ पार-लौकिक आहे, प्रत्येक धर्माचार अदृष्टमूलक आहे, त्याचें दृष्ट फल कांहीं नाहीं, इत्यादि समजुती चुकीच्या आहेत. धर्माचरणाचा इहलोकाशीं म्हणजे साक्षात् ऐहिक अभ्युदयाशीं संबंध दाखविणारे कांहीं वैदिक उतारे येथें देतों—

**स्वाध्यायः—अथातः स्वाध्यायप्रशंसा । प्रिये स्वाध्याय-प्रवचने भवतो युक्तमना भवत्यपराधीनः; अहरहरर्थान्साधयते, सुखं स्वपिति । परमचिकित्सक आत्मनो भवति, इंद्रियसंयमश्चै-कात्मता च प्रज्ञावृद्धिर्यशो लोकपक्तिः तस्मात्स्वाध्यायोऽध्येतव्यः ।**

—शत. ब्रा. ११—५—७—९

स्वाध्याय म्हणजे अध्ययन याचें विस्तृत फळ येथें सांगितलें आहे. त्याचा संबंध इहलोकाशींच आहे. सदैव अध्ययन केल्यानें अध्ययन व प्रवचन यांबद्दल आवड उत्पन्न होते, मनःसंयम वाढतो, स्वावलंबनानें वागून रोज नवें द्रव्य मिळवितां येतें, सुखानें झोंप येते, असा मनुष्य अन्तर्मुख दृष्टीनें आपली परीक्षा करतो, एकतानतेनें बुद्धि वाढते आणि यश मिळून लौकिक उत्कर्षहि होतो; म्हणून प्रत्येकानें रोज अध्ययन करावें म्हणजे नवें नवें वाचावें. यांत वर सांगितलेलें कोणतें फळ पारलौकिक आहे ? सर्व फलें इहलोकसंबद्ध नाहींत काय ?

'दानं यज्ञानां वरूथम्। दक्षिणा लोके दातारं सर्व भूतान्युपजीवन्ति। दानेनारातीरपानुदन्त। दानेन द्विषन्तो मित्रा भवन्ति। दाने सर्वं प्रतिष्ठितम्। तस्माद्दानं परमं वदन्ति।' –नारा. उ. ७९

**भावार्थः**–दान हें यज्ञांमध्यें श्रेष्ठ आहे. समाजांत दक्षिणा देणाऱ्यांवरच पुष्कळ प्राण्यांची उपजीविका चालू असते. दानानें शत्रूंचा नाश होतो, शत्रूंचे मित्र होतात, दानावर सर्व अवलंबून आहे, म्हणून दान करावें. येथेंहि दानाची स्तुति इहलोकसंबद्धच आहे.

**सत्यः**––'यः सत्यं वदति यथाऽग्निं समिद्धं तं घृतेनाभिषिञ्चेत् एवं हैनं स उद्दीपयति। यस्य भूयो भूय एव तेजो भवति। श्वः श्वः श्रेयान् भवत्यथ योऽनृतं वदति यथाऽग्निं समिद्धं तमुदकेनाभिषिञ्चेदेवं स नाशयति। तस्य कनीयः कनीय एव तेजो भवति। श्वः श्वः पापीयान् भवति। तस्माद् सत्यमेव वदेत्।'

–शत. ब्रा. २–२–२–१९

**भावार्थः**–जो खरें बोलतो तो तूप शिंपडलेल्या अग्नीसारखा तेजस्वी होतो. त्याचें तेज व महत्त्व उत्तरोत्तर वाढतें. पण जो खोटें बोलतो त्याचें तेज पाणी टाकलेल्या अग्नीप्रमाणें कमी होतें व दिवसेंदिवस तो लोकांच्या मनांतून उतरतो व तो वाईट प्रवृत्तीचा होतो.

येथेंहि सत्य भाषणाचें महत्त्व या जगांत व व्यवहारांत काय आहे हेंच सांगितलेलें आहे. याप्रमाणें सदाचरणाचें फल आयुष्य, आरोग्य, सुप्रजा यांची प्राप्ति असें मनु अ. ४ श्लो. १५६ मध्यें सांगितलेलें आहे.

**संध्याः**–संध्येचें फलहि मनु. अ. ४ श्लो. ९४ मध्यें प्रज्ञा, यश, कीर्ति, ब्रह्मवर्चस्व इत्यादि सांगितलेलें आहे. रोजच्या संध्येच्या शेवटीं जो संकल्प आहे, त्यांतहि––

'आयुः पृथिव्यां द्रविणं ब्रह्मवर्चसं मह्यं दत्वा प्रयातु ब्रह्मलोकम्' आयुष्य, द्रव्य, ब्रह्मतेज यांचीच मागणी केलेली आहे. या तऱ्हेच्या अनेक उताऱ्यांवरून धर्म हा इहलोकसंबद्ध कसा आहे आणि ऐहिक कल्याणामध्येंच पारलौकिक कल्याणाचा अन्तर्भाव कसा होतो यांची कल्पना येईल.

(३७) अर्थवाद व दानें:—धर्म सांगणाऱ्या स्मृतिकारांनीं ठिकठिकाणीं अर्थवादाचा आधार घेतलेला आहे. अर्थवाद म्हणजे विहित-( करावयास सांगितलेल्या ) कर्मांची भरमसाट स्तुति करणें, अथवा निषिद्ध ( जें करूं नये असें सांगितलें असतें ) कर्मांची भरमसाट निंदा करणें. त्यामुळें समाजाला तर्कशुद्ध पद्धतीचा धर्म समजत नाहीं व विचारहि करतां येत नाहीं. दानें, व्रतें, नियम, उपासना यांसंबंधीं अशींच भरमसाट अर्थवादात्मक वर्णनें आहेत, त्यांतील उपलक्षण म्हणून एक दानाचें उदाहरण येथें देतों—

**अथ फाल्गुनी स्यात् तस्यां ब्राह्मणाय स्वास्तीर्णं शयनं निवेद्य भार्यां मनोज्ञां रूपवतीं द्रविणवतीं प्राप्नोति नार्यपि भर्तारं। चैत्री चेत् स्यात् तस्याम् चित्रवस्त्रप्रदानेन सौभाग्यं प्राप्नोति। ज्येष्ठी ज्येष्ठायुता चेत् तस्याम् छत्रोपानहप्रदानेन गवाधिपत्यं प्राप्नोति। गोप्रदानेन स्वर्गलोकमाप्नोति।** विष्णु. अ. ९२

इंधनानि च यो दद्याद्विप्रेभ्यः शिशिरागमे।
नित्यं जयति संग्रामे श्रियायुक्तस्तु दीप्यते ॥६०॥ -संवर्त

**भावार्थ:**—फाल्गुनी पूर्णिमेला ब्राह्मणाला स्वतः हांतरलेली शय्या दान करावी. म्हणजे मनोहर, सुंदर व श्रीमंत बायको प्राप्त होते. कुमारिकेनें असें शय्यादान ब्राह्मणांना केलें म्हणजे तिला मनोहर, सुस्वरूप व श्रीमंत नवरा मिळतो. चैत्री पूर्णिमेला स्त्रीनें चित्रविचित्र वस्त्राचें दान केलें तर तिला सौभाग्यप्राप्ति होते. ज्येष्ठी पूर्णिमेचे दिवशीं छत्री व जोडे यांचें दान दिल्यानें गवाधिपत्य मिळतें व गोप्रदान केल्यानें स्वर्ग मिळतो. हिवाळ्याच्या प्रारंभीं ब्राह्मणाला जो कोणी सर्पणाचें दान देतो, त्याला लढाईंत नित्य विजय मिळतो व त्याची भरभराट होते.

येथें दानासंबंधीं अर्थवादात्मक विधानें केलेलीं आहेत. मनुष्याला कर्म करावयास सांगितलें कीं तो लगेच त्याचें फल काय मिळेल असें विचारतो. कर्म करणें ही मनुष्याच्या हातांतील गोष्ट आहे; कर्म व त्याचें फल यासंबंधानें कर्मपरिपाक व निसर्गशक्तीप्रमाणें कांहीं नियम ठरलेले आहेत. सामान्य माणसाला तेवढा धीर नसतो अर्थात् तो फलाविषयीं

फार आतुर झालेला असतो. अशाकरितां या भडक जाहिरातीसारख्या अर्थवादात्मक फलश्रुति सांगितलेल्या आहेत. पण त्यांमुळें मनुष्य हतप्रज्ञ होतो. कुमारिकेला सुस्वरूप, संपन्न व मनोहर पति पाहिजे असेल तर तो शय्यादानानें मिळणार कसा ? यदाकदाचित् हें आप्तवाक्य आहे असें समजून विश्वासानें तिनें दान केलें व त्याप्रमाणें फल न मिळालें तर त्याला जुने वचनपक्षपाती पंडित सांगतील कीं, "हें पहा, या वर्षी नाहीं चांगलें स्थळ मिळालें तर पुढच्या वर्षी मिळेल; कदाचित् पुढच्या वर्षी न मिळालें तर पुढच्या जन्मीं मिळेल !" ब्राह्मणाला भरपूर सर्पण देऊन जर लढाईमध्यें जय मिळत असेल तर मग ही विजयाची किल्ली हिटलर, मुसोलिनी, चर्चिल यांना नेऊन दिली पाहिजे ! इंधनदानानें जर लढाईत जय न मिळाला तर वचनपक्षपाती पंडित पुढच्या जन्माचा हवाला देतील. पुढच्या जन्मावर दृष्टि ठेवून या जन्मीं आणि इहलोकीं कांहींतरी करीत राहाणें यासारखी हानी नाहीं. वेदापासून चालत आलेली दृष्टार्थाची परंपरा लुप्त होऊन मध्यकालांत अदृष्टावर भर दिला, तेव्हांपासून हे दोष शिरलेले आहेत.

(३८) **कर्मविपाक व अर्थवादः**—धर्माला इहलोकांतून परलोकांत नेलें, त्याचा व दृष्टार्थाचा संबंध तोडून त्याला अदृष्टांत नेऊन ठेवलें, म्हणजे धर्माची आणि या जगांतील फलाची संगत तुटली. जें जें कांहीं करावयाचें तें सर्व परलोकाकरितां अशी समजूत झाली म्हणजे या अर्थवादाचें व फलश्रुतीचें बंड माजतें. त्याबरोबर वचनांत सांगितल्याप्रमाणें न केल्यास भीतिवादाचा राक्षस पुढें उभा केला जातो.

सोनें चोरूं नये, चोरी करूं नये, दारू पिऊं नये, असें करणें एकंदर वाईट असें न सांगतां पुष्कळ ठिकाणीं भीतीच घातलेली आहे. सोनें चोरलें कीं नखें काळीं होतात, ब्रह्महत्त्येनें क्षयरोग होतो, चहाडी केल्यानें तोंडांतून पू गळतो, धान्य चोरणारा हीनांग होतो, ब्राह्मणाचें सुवर्ण चोरणारा ब्रह्मराक्षस होतो, निमंत्रणाशिवाय जेवावयास जाणारा कावळा होतो, व्याजबट्टा करणारा कासव होतो, फळें चोरणाऱ्याला गालगुंडें होतात, देवालयांत लघवी करणाऱ्यास गुदरोग, दूध चोरणाऱ्यास बहुमूत्ररोग, गूळ चोरणाऱ्यास गुल्म वगैरे रोग जडतात, पितृघाती आंधळा होतो, बंधु-

घाती मुका होतो, भगिनीघातीला बधिरत्व येतें, बालघाती वांझ होतो, काकघाती कर्णहीन होतो, अश्वघाती वक्रतुंड होतो, हें जें गणिताच्या उत्तराप्रमाणें अगदीं दोन नि तीन पांच सारखें सांगितलें आहे, हें खरें आहे काय? कर्मविपाकाप्रमाणें हें शक्य दिसत नाहीं. कारण पुढेंच या अपराध्यांनीं विशिष्ट दानें दिल्यास त्या पापांचा दोष लागत नाहीं असेंहि म्हटलेलें आहे. त्यावरून तर फारच संशय येतो. अमुक अमुक गोष्टी कां कराव्यात व अमुक अमुक कां करूं नयेत, हें सप्रमाण, सयुक्तिक व तर्कशुद्ध सांगण्याचें सोडून जेथें तेथें जो अर्थवादानें भीतीचा बाऊ उभा केला आहे, त्यावरून हा कसला धर्म, यांत कांहीं अर्थ नाहीं, हें एक थोतांड आहे, अशी समजूत झाल्यास त्याचा दोष धर्माचा अदृष्टाशीं संबंध जोडणाऱ्यावरच येतो.

डाव्या पायावर हात ठेवून जेवूं नये, पलंगावर बसून जेवूं नये, जेवल्यानंतर ओल्या हातांनीं असूं नये, डाव्या हातानें पाणी पिऊं नये, ओंजळीनें पाणी पिऊं नये, निळ्या रंगाचें वस्त्र नेसूं नये, दक्षिणेकडे तोंड करून जेवूं नये, डोकें बांधून जेवूं नये, भुरके मारीत खीर खाऊं नये, हातानें नाक घुसळूं नये, असले जे निषेध धर्मशास्त्रांत आहेत, ते कां पाळावे असें विचारल्यास त्याचें सयुक्तिक उत्तर हेंच कीं एका काळीं हे शिष्टाचार होते. पण ते आज न पाळले तर त्याबद्दल जी अदृष्टमूलक भीति घातली आहे ती खोटी आहे. डाव्या पायावर हात ठेवून जेवलें कीं लक्ष्मी, बल व तेज हीं नष्ट होतात; कशावरून? भोजनोत्तर हात पुसण्याचें चुकून राहिलें तर त्यामुळें लक्ष्मीला रुसण्याचें कारण काय? पलंगावर बसून जेवलें असतां नरकाची भीति कशाला? मनुष्य डाव्या हातानें पाणी प्याला तर त्याला कुत्र्याचे योनींत जाण्याचें कारण काय? भुरके मारीत मारीत खीर खाल्ली म्हणून त्यांत बिघडलें कोठें? फार तर भुरके हळू मारावेत असें सांगावें. निळ्या वस्त्राबद्दलचा कटाक्ष हा त्या काळीं रंगाचा धंदा फार घाणेरडा होता म्हणूनच दिसतो. त्याकरितां घातलेली नरकाची भीति व्यर्थ नाहीं काय?

अर्थवाद नि भीतिवाद टाळून, अदृष्ट आणि अपूर्व यांच्या कचाटींतून धर्माला बाहेर काढून सुबुद्ध व समंजस माणसाला समजेल अशा तर्क-

शुद्ध रीतीनेंच आतां धर्म सांगितला गेला पाहिजे. धर्म हा दृष्टार्थक, इहलोकसंबद्ध कसा आहे व हिंदुधर्मामध्यें बुद्धीला स्वातंत्र्य कसें ठेवलेलें आहे, याचा विचार पुढील प्रकरणांत करूं.

—*—

## प्रकरण पांचवें

## धर्म आणि पुरुषबुद्धि

धर्म हा विषय पुरुषबुद्धीला गोचर नाहीं, धर्मामध्यें पुरुषबुद्धीचा प्रवेश नाहीं, धर्म हा केवळ अदृष्ट, अपूर्व व अलौकिक आहे, तो चोदनालक्षण आहे, तो शब्दनिष्ठ आहे, धर्माचा व्यवहाराशीं, अभ्युदयाशीं, इहलोकाशीं व लोकयात्रेशीं मुळींच संबंध नाहीं, तो अपरिवर्तनीय आहे, अशी समाजामध्यें एक भ्रामक समजूत आहे. तिचें निराकरण प्रस्तुत प्रकरणांत करावयाचें आहे.

( ३९ ) **कोणताहि धर्म ईश्वरप्रणीत नाहीं:**—धर्म हा पोथी व पुस्तकनिष्ठ आहे, तें पुस्तक ईश्वरानें एकदां दिलें आहे, त्या पुस्तकांतील अर्थ केवळ ईश्वराला किंवा त्याच्या प्रेषिताला समजावयाचा, इतरांना धर्मपुस्तक अगम्य असतें, अशा कल्पनेनें वरील समज रूढ झालेला आहे. कोणताहि धर्म ईश्वरप्रणीत नाहीं आणि कोणतेंहि धर्मपुस्तक ईश्वरानें केलेलें नाहीं. त्या त्या कालांतील बुद्धिमंतांकडून त्या त्या परिस्थितीला योग्य अशीं धर्मपुस्तकें उत्पन्न झालीं. धर्मपुस्तकांचे कर्ते बुद्धिवान्, प्रतिभावान, दूरदर्शी अशीं माणसेंच होतीं. वेद, कुराण, बायबल, त्रिपिटक, अवेस्ता इत्यादि धर्मपुस्तकें माणसांनींच केलेलीं आहेत; म्हणून तीं पुस्तकें वाचण्याचा, त्यांचा अर्थ लावण्याचा, त्या अर्थानें आज जर समाजधारणा होत नसेल

तर त्या ठिकाणीं विकल्पानें निराळा अर्थ सांगण्याचा अधिकार आजच्या विद्वानांना पोंचतो.

( ४० ) **ऐहिक सुखमूलक धर्मप्रवृत्तिः**–धर्म हा पुरुषबुद्धीला सर्वांशानें गोचर होत नसला तरी धर्मांतील पुष्कळसा भाग मनुष्यबुद्धीला समजतो. म्हणूनच तो धर्माचरणास प्रवृत्त होत असतो.

जगांत प्रत्येक माणसाची जी धडपड चालली आहे ती सुखाकरितां आहे. जीवनहेतू केवळ सुख आहे.

**सुखार्थाः सर्वभूतानां मताः सर्वाः प्रवृत्तयः**
**सुखं तु न विना धर्मात् तस्माद्धर्मपरो भवेत् ॥**
**सुखं वाञ्छन्ति सर्वे हि तच्च धर्मसमुद्भवम् ।**
**तस्माद्धर्मः सदा कार्यः सर्ववर्णैः प्रयत्नतः ॥**–दक्ष. ३–२५

सुखाकरितां सर्व भूतांच्या प्रवृत्ति आहेत. तें सुख धर्मानें म्हणजे समाज व राष्ट्रधारणा यांच्या प्रभवानें मिळतें. यास्तव सर्व माणसांनीं समाज व राष्ट्रप्रभव अशा धर्माचें आचरण करावें. मनुष्याला * सुख हवें असतें. दुःख असावें, तें प्राप्त व्हावें असें कुणालाहि वाटत नाहीं. धर्माचें दृश्य फल जर मुळींच नसेल आणि तें समजत नसेल तर धर्माचरणाला कोणीहि प्रवृत्त होणार नाहीं. मी अमुक धर्माचरण करतों, हा प्रशस्त धर्माचार आहे, त्यामुळें मला सुख मिळेल, मनाला समाधान होईल, लोक बरें म्हणतील, असें जेव्हां माणसाला वाटतें, त्यावेळेसच मनुष्य धर्माचरणास प्रवृत्त होतो.

**‘ बुद्धिपूर्वकारिणो हि पुरुषा यावत्प्रशस्तोऽयमिति नावबुध्यन्ते तावन्न प्रवर्तन्ते ।** –तन्त्रवा. १–२–१.

मनुष्यप्राणि बुद्धिमान् आहे. तो कोणत्याहि कर्माकडे हेतुपूर्वकच प्रवृत्त होतो. त्या कर्माचा प्रशस्तपणा त्याला अगोदर कळला पाहिजे.

---

* **टीप**–अर्थशास्त्रकर्ता चाणक्य ‘ सुखस्य मूलं धर्मः ’ व ‘ धर्मस्य मूलं अर्थः ’ असें म्हणतो.

मनुष्याला जेव्हां अमुक धर्माचरणापासून आपल्याला सुख होतें असें वाटतें, त्याच वेळेला तो स्नान, संध्या, ईश्वरोपासना, जपतप, व्रतें, उत्सव, यात्रा वगैरे करण्याच्या मार्गास लागतो.

**'यदा वै सुखं लभतेऽथ करोति, नासुखं लब्ध्वा करोति, सुखमेव लब्ध्वा करोति।** —छां. उ. ७–२२–१.

सुख होत आहे, तें होईल, खास होईल अशा भावनेनेंच मनुष्य धर्माचरणास प्रवृत्त होतो.

**(४१) अदृष्ट व अपूर्वाविषयीं संशयः**—कोणत्याहि कर्माचीं दृष्ट व अदृष्ट अशीं फलें असूं शकतात. धर्मशास्त्रकारांनीं हीं फलें कुठें अर्थवादात्मक, कुठें प्रत्यक्ष, कुठें अनुमानाला पटणारीं अशीं सांगितलेलीं आहेत. एखाद्या कर्माचें दृष्ट फल प्रसंगीं लहान असेल, पण अदृष्ट फल मोठें असण्याचा संभव आहे. सतत, नियमित, व्यवस्थित व्यायाम करण्यानें मिळणारें दीर्घायुष्य हें फल दीर्घकालीन आहे. तें आतां दिसत नसतें. पण माणसाची प्रवृत्ति सद्यःफलाकडे जास्त असते. त्यावरून तो भूत व भविष्य फलाची कल्पना आपल्या मनानें करीत असतो.

**सर्वलोकस्य भूतभविष्यदनादरेण वर्तमानोपकारानुरागात्।**
तंत्रवा. १–२–३

**न भूते भाविनि वा तादृशी प्रवृत्तिर्यादृशी वर्तमाने।**

मनुष्याची जशी वर्तमानकालीन फलाविषयीं तीव्र इच्छा असते, तशी भूतभविष्यकालीन फलाविषयीं नसते. हें तत्त्व कुमारिलभट्टासारख्या शब्दप्रामाण्यवादी मीमांसकानें मान्य केलेलें आहे.

धर्माचें फल जर आतां कांहींच मिळत नसेल तर मनुष्याला अदृष्ट व अपूर्व यांवर विसंबून रहावें लागेल. अदृष्ट, अपूर्व व परलोक यांवर त्यानें कितीहि निष्ठेनें विश्वास ठेवला तरी त्याच्या मनांत केव्हांतरी संशय उत्पन्न होण्याचा संभव आहे.

**को हि तद्वेद यद्यमुष्मिंल्लोकेऽस्ति वा न वा।**
तै. सं. ७–२–२

परलोक आहे कीं नाहीं, परलोकांत आत्मा असतो कां नाहीं अशी शंका येथें प्रत्यक्ष श्रुतीनेंच प्रदर्शित केलेली आहे. त्यावरून श्रुति प्रत्यक्ष फलावर जोर देते हें सिद्ध आहे. महाभारतांतर्गत शांतिपर्वांतहि एका प्रसंगीं वरील श्रुतीचाच अनुवाद केलेला आहे—

**तत्र न व्यवधातव्यं परोक्षा धर्मयापना।**
**अधर्मोधर्म इत्येतद्यथा वृकपदं तथा ॥ २ ॥**
**धर्माधर्मफले जातु ददर्श ह न कश्चन।**
**बुभूषेद्बलमेवैतत्सर्वं बलवतोवशे ॥ ३ ॥**

—म. भा. शां. प. अ. १३४

**भावार्थः**—परोक्ष धर्माची चिकित्सा फारशी करीत बसूं नये. धर्म व अधर्म यांच्या फलाचा शोध म्हणजे अरण्यांतील लांडग्याच्या पावलाच्या शोधासारखें आहे. धर्म व अधर्म यांचीं परलोकसंबंधीं फलें कुणी पाहिलीं आहेत ? म्हणून ज्या योगानें स्वतःचें, समाजाचें व राष्ट्राचें बल वाढेल तोच धर्म समजून त्याप्रमाणें वागावें. कारण बलवानांला जग वश असतें.

येथेंही अदृष्ट व परलोक यांपेक्षां सद्यःफलालाच अधिक महत्त्व दिलेलें आहे. तात्पर्य धर्म हा पुरुषबुद्धीला गोचर आहे व धर्माचें फल इहलोकसंबद्ध आहे. धर्म हा केवळ परलोकसंबद्ध आहे असें समजणें म्हणजे जमिनीवरून चालत असतांना दृष्टि केवळ आकाशाकडे लावण्यासारखें आहे. हिंदुसमाजानें असलें अनिष्ट वर्तन केलें म्हणूनच तो आपत्तीच्या गर्तेत पडला !

**(४२) देशकालसापेक्ष धर्मः**-कोणत्याहि धर्मकर्माचा प्रारंभ करतांना देशकालाचा उच्चार करावा लागतो. देश व कालसापेक्ष म्हणजे परिस्थितिसापेक्ष धार्मिक क्षेत्रांतसुध्दां मनुष्याला वागावें लागतें. अमुक एक धर्माचार पूर्वकाळीं होता व त्याला शास्त्रमान्यता होती म्हणून जर आज एखादा मनुष्य त्याप्रमाणें वागूं लागेल तर तें योग्य ठरणार नाहीं. धर्माचार हा जर **लोकविद्विष्ट** असेल तर तो करूं नये असें मनु सांगतो, व मधुपर्कादि प्रसंगींचा गोवध, नियोगानें पुत्रोत्पत्ति यांचीं उदाहरणें देतो.

लौकिक व्यवहारांत संशय उत्पन्न झाला असतां जसें सारासारविचारानेंच वागावें लागतें, तद्वतच वैदिक कर्मांमध्येंसुद्धां विचारानेंच चालावें लागतें, हें पुढील उताऱ्यांवरून सहज ध्यानांत येईल—

'लोके तावद्विचारेण संदेहनिवृत्तिः प्रसिद्धा। वेदेऽपि तत्र तत्र तत्त्वविचारपूर्वकं संदेहापनयनमुपलभामहे ॥'

—तै. सं. भा. १–१–१

धर्मांमध्यें पुरुषबुद्धीचें काम असतें, देशकाल पाहून धर्माचार करावा व सांगावा लागतो, अशा संबंधाचीं निरनिराळ्या स्मृतींतील कांहीं वचनें उध्दृत करतों—

शरीरं बलमायुश्च वयः कालं च कर्म च।
समीक्ष्य धर्मवित् बुद्धया प्रायश्चित्तानि निर्दिशेत् ॥१६॥
कालं देशं तथात्मानं द्रव्यं द्रव्यं प्रयोजनम्।
उपपत्तिमवस्थां च विज्ञाय शौचं...समाचरेत् ॥५॥ बौधायन
देशं कालं वयः शक्तिं पापं चावेक्ष्य यत्नतः।
प्रायश्चित्तं प्रकल्प्यं स्यात् यस्य चोक्ता न निष्कृतिः ॥—अत्रि
देशं कालं वयः शक्तिं पापं चावेक्ष्य यत्नतः।
प्रायश्चित्तं प्रदातव्यं धर्मविद्भिर्मनीषिभिः ॥२९७॥

—वृद्धहारीत अ. १

दुर्बलेऽनुग्रहः कार्यस्तथा वै बालवृद्धयोः ॥
अतोऽन्यथा भवेत् दोषः तस्मान्नानुग्रहः स्मृतः ॥

--पराशर अ. ६

प्रायश्चित्तं यथोद्दिष्टमशक्यं दुर्बलादिभिः।
कार्यो ह्यनुग्रहस्तेषां लोकसंग्रहकारणात् ॥—देवल
येन केन च धर्मेण मृदुना दारुणेन वा।
उद्धरेद्दीनमात्मानं समर्थो धर्ममाचरेत् ॥४२॥ पराशर—अ. ७
सर्वत्र जीवनं रक्षेज्जीवन्पापमपोहति।
व्रतैः कृच्छ्रैश्च दानैश्च इत्याह भगवान्यमः ॥६४॥

**शरीरं धर्मसर्वस्वं रक्षणीयं प्रयत्नतः ।**
**शरीरात् स्रवते धर्मः पर्वतात्सलिलं यथा ॥६५॥**

शंख—अ. १७

**भावार्थः**—शरीरबल, आयुष्य, वय वगैरेचा विचार करून धर्मवेत्त्यांनीं प्रायश्चित्तें सांगावीं. देशकाल, स्वतःची अवस्था आणि इतर साहित्य यांचा विचार करून वागावें. धर्मवेत्त्या विद्वानांनीं देशकाल जाणून आणि माणसांची शक्ति ओळखून प्रायश्चित्त द्यावें. दुर्बल, बाल व वृद्ध अशांवर अनुग्रह करावा. दुर्बलादिकांवर लोकसंग्रहार्थ अनुग्रह अवश्य केला पाहिजे. आपत्प्रसंगीं मृदु अगर दारुण मार्गानें प्रथम स्वतःचें रक्षण करावें, आणि सामर्थ्य आल्यावर निःशंकपणें धर्माचरण करावें. शरीर हें धर्माचें मुख्य साधन आहे. त्यामुळेंच धर्माचा प्रसार होतो. काय पाहिजे तें करून आपत्कालीं शरीर जगवावें.

यावरून पुरुषबुद्धीचा व धर्माचाराचा संबंध स्पष्ट होतो.

**(४३) संध्याः**—संध्या करावी हा धर्म असला तरी त्यांतहि तारतम्य आहे.

**राष्ट्रक्षोभे नृपक्षोभे रोगार्तौ भय आगते ।**
**देवाग्निद्विजभूपानां कार्ये महति संस्थिते ॥**
**सन्ध्याहानौ न दोषोऽस्ति यतस्तत्पुण्यसाधनम् ॥**

—आचारभूषणे जमदग्निः

राष्ट्रक्षोभ झाला, राजाचा कोप झाला, भयंकर सांथ उत्पन्न झाली, आकस्मिक आपत्ति आली, देव, अग्नि, राजा इत्यादिसंबंधाच्या म्हणजे राष्ट्राच्या कार्यांत गुंतलेले असतांना संध्या टळली तरी चालते, असें हें तारतम्यानें पुरुषबुद्धीनें ठरविलेलें आहे.

**(४४) शौचाचारः**—आतां शौचाचारामध्यें पुरुषबुद्धीचा संचार अनिरुद्धपणें कसा चालतो याचीं कांहीं उदाहरणें देतों:—

**‘ शकुन्युच्छिष्टं फलमनिन्द्यम् ’**
**‘ आतुरे बाले पचनालये च शौचं न विचारणीयम् ’**
**‘ योषिदास्यं कारुहस्तः प्रसारितं पण्यं च सर्वदा शुद्धम् ’**

—वैखानस ध. प्र. ४।६.

भावार्थः—पक्ष्यांनीं चोंच मारलेलें फल शुद्ध समजावें. बाल, रोगी, स्वयंपाकघर या ठिकाणीं शौचाचाराची जास्त चिकित्सा करूं नये. स्त्रीमुख, शिल्पकाराचा हस्त, बाजारांत विक्रीकरितां मांडलेले पदार्थ सर्वदा शुद्ध समजावेत.

छायायां मूत्रपुरीषयोः कर्म वर्जयेत् ॥१६॥ —आपस्तंब
सति विभवे न जीर्णमलवद्वासाः स्यात् ॥४॥ —गौतम
न जीर्णमलवद्वासा भवेच्च विभवे सति ॥३४॥ —मनु. अ. ३
रजसा शुध्यते नारी नदी वेगेन शुध्यति ॥५४॥ —वसिष्ठ
सर्वेषामेव शौचानामर्थशौचं परं स्मृतम् ।
योऽर्थे शुचिः स तु शुचिर्न मृद्वारिशुचिः शुचिः ॥१०६॥—मनु.अ.४
तूलिकाद्युपधानानि रक्तवस्त्रादिकानि च ।
शोषयित्वार्कतापेन प्रोक्षणाच्छुद्धतामियुः ॥३२॥ —पराशर अ. ६
सर्वं शुध्यति तोयेन तत् तोयं केन शुध्यति ।
सूर्यरश्मिनिपातेन मारुतस्पर्शनेन च ॥ ७ ॥ —आपस्तंब अ. २
शौचे यत्नः सदा कार्यः शौचमूलो द्विजः स्मृतः ।
शौचाचारविहीनस्य समस्ता निष्फलाः क्रियाः ॥ २ ॥ दक्ष अ. ६

भावार्थः—झाडाखालीं येणारीं जाणारीं माणसें बसण्याचा संभव असतो म्हणून झाडाखालीं शौचास व लघवीस बसूं नये. अनुकूलता असतांना जुनीं, मळकीं वस्त्रें घालून हिंडूं नये. मासिक विटाळानें स्त्री व प्रवाहाच्या वेगानें नदी शुद्ध होत असते. अर्थशौच म्हणजे परधनाविषयीं इच्छा न ठेवणें हें सर्वांत श्रेष्ठ होय. सुताच्या वस्त्राची शुद्धि धुवून होतें, पण गाद्या गिरद्या, चित्रविचित्र वस्त्रें, पडदे, गालिचे इत्यादिकांची शुद्धि उन्हांत टाकून व त्यांवर शुद्धोदक शिंपडून होते. सर्वांची शुद्धि जल करतें आणि जलाची शुद्धि सूर्यकिरणें व वायु यांमुळें होते. प्रत्येक मनुष्यानें स्वच्छता, पावित्र्य व शुचित्व पाळण्याचा यत्न करावा. आचारहीनाच्या सर्व क्रिया निष्फळ होतात.

वर जें शौचाचाराचें स्पष्टीकरण केलें आहे त्यावरून पुरुषबुद्धीला गोचर, दृष्ट फलार्थक, तारतम्यानें पाळण्याजोगाच शौचधर्म आहे, हें वाचकांच्या ध्यानीं येईल.

(४५) दानः—आतां दान व पात्रापात्रविवेक या संबंधांत पुरुषबुद्धी कशी वावरते हें पाहूं—

शूद्रमभ्यागतं कर्मणि नियुञ्ज्यात्। अथास्मै दद्यात् ॥१९॥
—आपस्तंब

तत्र गुणान्समीक्ष्य यथाशक्ति देयम् ॥ २ ॥
आपस्तंब २—५—१०

प्रतिश्रुत्याप्यधर्मसंयुक्ताय न दद्यात् ॥२१॥ —गौतम अ. ५
शूद्रश्चेदागतस्तं कर्मणि नियुञ्ज्यात् ॥१७॥ —बौधायन अ. ५
यस्य चैव गृहे मूर्खो दूरे चैव बहुश्रुतः।
बहुश्रुताय दातव्यं नास्ति मूर्खे व्यतिक्रमः ॥१०॥ वसिष्ठ—अ. ३
न वार्यपि प्रयच्छेत्तु बैडालव्रतिके द्विजे।
न बकव्रतिके विप्रे नावेदविदि धर्मवित् ॥१९२॥ —मनु. अ. ४
सकृत्प्रदीयते कन्या हरंस्तां चौरदण्डभाक्।
दत्तामपि हरेत्पूर्वाच्छ्रेयांश्चेद्वर आव्रजेत् ॥६५॥ —याज्ञवल्क्य अ. १
कुटुंबिने दरिद्राय श्रोत्रियाय विशेषतः।
यद्दानं दीयते तस्मै तद्दानं शुभकारकम् ॥४८॥
—पराशर—अ. १२

भावार्थः—केवळ मजुरकामास योग्य असा भिक्षेकरी आल्यास त्याजकडून काम करून घ्यावें व द्यावें. अनेक लोक मागावयास आले असतां गुणांचा विचार करून यथाशक्ति द्यावें. एखाद्याला कांहीं देतों असें वचन दिलें, विवाहार्थ मुलगी देण्याचेंहि ठरलें आणि मागून जर तो लबाड आहे असें कळलें तर वचन पाळण्याचे भरीस मुळींच पडूं नये, ठरलेलें बोलणें फिरवावें. आपल्या घरीं अगर गांवीं एक मूर्ख आहे आणि परगांवीं अथवा दूर बहुश्रुत आणि विद्वान मनुष्य आहे, अशा वेळीं दान देतांना तें विद्वानालाच द्यावें, केवळ जवळचा म्हणून मूर्खाला दान देऊं नये. ढोंगी बोकोबाच्या व बगळ्याच्या वृत्तीचे जे असतील त्यांना पाणी-सुद्धां देऊं नये. मुलगी ही एकदांच द्यावयाची असते. लग्न ठरल्यानंतर जर चांगला वर मिळत असेल तर पूर्वीचें ठरलेलें स्थळ मोडावें. विद्वान, कुटुंब-वत्सल, दरिद्री असा श्रोत्रिय दानास पात्र होय. देश, काल व पात्र यांचा

विचार करून दान द्यावें असा सर्वसामान्य नियम आहे. पात्रापात्रविचार करणें हें पुरुषबुद्धीचें काम आहे. त्यास अनुसरूनच वरील विवेचन विविध स्मृतिकारांनीं केलेलें आहे.

(४६) **सुतकः**—सुतक पाळणें हा एक धर्माचार आहे. त्याहि संबंधांत शास्त्रकार पुरुषबुद्धीला आणि तारतम्याला कसा मान देतात हें पाहाण्याजोगें आहे.

**क्रियाहीनस्य मूर्खस्य महारोगिण एव च ।**
**य एषां मरणस्याहुर्मरणान्तमशौचकम् ॥९॥**
**नामधारकविप्रस्तु दशाहेन विशुध्यति ॥२॥** शंख. अ. १५
**विवाहोत्सवयज्ञेषु अन्तरा मृतसूतके ।**
**पूर्वसंकल्पितार्थस्य न दोषश्चात्रिरब्रवीत् ॥९८॥**
**व्याधितस्य कदर्यस्य ऋणग्रस्तस्य सर्वदा ।**
**क्रियाहीनस्य मूर्खस्य स्त्रीजितस्य विशेषतः ॥१०२॥**
**व्यसनासक्तचित्तस्य पराधीनस्य नित्यशः ।**
**स्वाध्यायव्रतहीनस्य सततं सूतकं भवेत् ॥१०३॥** अत्रि

शेवटचे दोन श्लोक दक्षस्मृतींतहि आहेत. शेवटचा चरण तेवढा निराळा आहे.

**श्रद्धात्यागविहीनस्य भस्मान्तं सूतकं भवेत् ॥१०॥**
**यज्ञकाले विवाहे च देवयागे तथैव च ।**
**हूयमाने तथा चाग्नौ नाशौचं नैव सूतकम् ॥१४॥**
**स्वस्थकाले तथा सर्वं सूतकं परिकीर्तितम् ।**
**आपद्ग्रस्तस्य सर्वस्य सूतकेऽपि न सूतकम् ॥१५॥**दक्ष अ.६

**भावार्थः**—क्रियाहीन, मूर्ख, महारोगी हे जिवंत असले तरी मरेपर्यंत त्यांचे सुतक पाळावें. विवाह, यज्ञ चालू असतां मध्यें सुतक आलें तर त्याचा दोष नाहीं. व्याधित, कद्रु, कर्जबाजारी, क्रियाहीन, मूर्ख, स्त्रैण, व्यसनी, विद्याहीन असा जो मनुष्य असेल त्याचें सतत सुतक पाळावें (म्हणजे अशाचा समाजाशीं संबंध जितका कमी येईल तितकें इष्ट असतें.) स्वस्थकालाकरितां सुतकाचे नियम आहेत, आपत्तींत सुतक नाहीं.

मृताशौचासंबंधाचा वरील शास्त्रार्थ हा व्यवहार, लोकसंग्रह आणि पुरुषबुद्धि यांना धरूनच नाहीं काय ?

(४७) **अस्पृश्यता**:—शास्त्रांत अस्पृश्यता सांगितलेली आहे; पण तीहि तारतम्यानें व पुरुषबुद्धीचा उपयोग करून पाळावी असें शास्त्रकारच सांगतात. त्या धोरणानेंच आजचे परिवर्तनवादी पंडित अस्पृश्यता आजच्या काळीं समूळ नष्ट करावी असें म्हणत असतात. त्या संबंधाचीं कांहीं वचनें पहा.

**प्राकाररोधे विषमप्रदेशे सेनानिवेशे भवनस्य दाहे ।**
**आरब्धयज्ञेषु महोत्सवेषु तथैव दोषा न विकल्पनीयाः ।।२३२।।**
—अत्रि

**देवयात्रा विवाहेषु यज्ञप्रकरणेषु च**
**उत्सवेषु च सर्वेषु स्पृष्टास्पृष्टिर्न विद्यते ।।२४५।।** —अत्रि
**कुण्डे मञ्चे शिलापृष्ठे नौकायां गजवृषयोः ।**
**संग्रामे संकटे चैव स्पर्शदोषो न विद्यते ।।** —आचारपल्लवे
**तीर्थे विवाहे यात्रायां संग्रामे देशविप्लवे ।**
**नगरग्रामदाहे च स्पृष्टास्पृष्टिर्न दुष्यति ।।** —बृहस्पति
**दीर्घकाष्ठे शिलापृष्ठे नौकायां जान्हवीतटे ।**
**महातीर्थे तु संप्राप्ते स्पर्शदोषो न विद्यते ।।** —स्मृति
**संग्रामे हट्टमार्गे च यात्रादेवगृहेषु च ।**
**अग्न्युत्पाते महापत्सु स्पृष्टास्पृष्टिर्न दुष्यति ।।** —स्मृत्यर्थसारे

**भावार्थ**:—किल्ल्याला वेढा पडला, विषम प्रदेशांत वास्तव्य असलें, सैन्याचा तळ पडला असला, आग लागलेली असली, तर अशा प्रसंगीं आणि यज्ञ व महोत्सव या प्रसंगीं स्पर्शदोष मानूं नये. यात्रा, विवाह, यज्ञ आणि सर्व प्रकारचे उत्सव यांमध्यें स्पर्शास्पर्शविचार पाळूं नये. पवित्र जल, कुंडें, उच्चासनें, नौका, बैल, हत्ती यांवर बसलें असतांना, युध्दकालीं व संकट-कालीं स्पर्शदोष मानूं नये. विवाह, तीर्थें, यात्रा, युध्द, आपत्ति या प्रसंगीं नगर व ग्राम यांना आग लागणें, जलपर्यटन, नदीकांठीं, मोठी शिळा व लांकूड यांवर बसलें असतां, महातीर्थ, बाजार, देवळें, उत्पात अशा स्थळीं व प्रसंगीं स्पर्शास्पर्शविचार पाळूं नये.

(४८) **रजस्वलादोषः**–सुतकांत, जसें तारतम्य आहे, तसेंच तें अस्पृश्यतेंतही आहे. मनुष्यानें सारासार विचारानेंच हीं पाळलीं पाहिजेत; हें वरील विवेचनावरून स्पष्ट होतें. विटाळशीच्या विटाळासंबंधानेंही तारतम्य आहे. स्त्रियांना मासिकस्राव नैसर्गिक आहे. परंतु रोगामुळें तो जर स्राव सारखा चालू राहील तर त्यावेळीं स्त्रीला अशुध्द न समजतां तो विकारच समजला पाहिजे. निरोगी स्त्रियांनीं मासिक विटाळ पाळणें हें आरोग्य व इतर दृष्टींनीं अवश्य आहे.

**रोगेण यद्रजः स्त्रीणामत्यर्थं हि प्रवर्तते ।**
**अशुद्धास्तास्तु नैवेह तासां वैकारिको मदः ॥२॥** प्रजापति अ.३७
**ज्वराभिभूता या नारी रजसा च परिप्लुता ।**
**कथं तस्या भवेत् शौचं शुद्धिः स्यात् केन कर्मणा ॥**
**चतुर्थेऽहनि संप्राप्ते स्पृशेदन्या तु तां स्त्रियम् ।**
**सा सचैलावगाह्यापः स्नात्वा स्नात्वा पुनः स्पृशेत् ॥**
**दश–द्वादशकृत्वो वा आचमेच्च पुनः पुनः ।**
**अन्ते च वाससां त्यागः ततः शुद्धा भवेच्च सा ॥** –उशनस्

**भावार्थः**–ज्वरानें पीडलेल्या रजस्वला स्त्रीस चौथ्या दिवशीं स्नान न घालतां दुसऱ्या एका चांगल्या स्त्रीनें तिला दहा बारा वेळां स्पर्श करावा, व स्वतः तितक्याच वेळां स्नान करावें व आचमन करावें. स्नानानंतर तिनें वस्त्रांतर करावें आणि आजारी असलेल्या विटाळशीला धूतवस्त्रें नेसवावीं. असें केल्यानें विटाळशीची शुद्धि होते.

(४९) **श्राद्धः**–या विषयांतही कसें तारतम्य योजावें लागतें तें पहा.

**द्वौ दैवे पितृकार्ये त्रीनेकैकमुभयत्र वा**
**भोजयेत्सुसमृद्धोऽपि न प्रसज्येत विस्तरे ॥२९॥**
–बौधायन प्र. २ अ. ३

**सत्क्रियां देशकालौ च शौचं ब्राह्मणसंपदम् ।**
**पञ्चैतान्विस्तरो हन्ति तस्मात्तं परिवर्जयेत् ॥३०॥**
( हाच श्लोक वसिष्ठस्मृतींत आहे. ) –बौधायन प्र. १ अ. ८
**अपि वा भोजयेदेकं ब्राह्मणं वेदपारगम् ।**

**श्रुतशीलोपसंपन्नं सर्वालक्षणवर्जितम् ॥२६॥** वसिष्ठ अ. ११
**न श्राद्धे भोजयेन्मित्रं धनैः कार्योऽस्यसंग्रहः ॥**
—उशनस् अ. ५

**सुवासिनीः कुमारीश्च रोगिणो गर्भिणीः स्त्रियः ।**
**अतिथिभ्योऽग्र एवैतान् भोजयेदविचारयन् ॥११४॥**
मनु. अ. ३

**भावार्थः**—देवस्थानीं दोन, पितृस्थानीं तीन किंवा दोन्ही स्थानीं एकेक ( याप्रमाणें कितीही अनुकूलता असली तरी ) ब्राह्मण भोजनास बसवावे. विस्तार शक्य तितका टाळावा. कोणत्याहि धर्मकार्याचा पसारा झाला कीं त्यांतील पावित्र्य व भावना नष्ट होते. प्रसंगीं सर्वलक्षणसंपन्न विद्वान्, वेदज्ञ एक ब्राह्मण बोलावून त्यास भोजन देऊन श्राद्ध करावें. श्राद्धाचा क्षण मित्र, नातलग, स्नेही अशांना देऊन लोकसंग्रहाचें कार्य करूं नये. त्यांचा संग्रह द्रव्यादिकांनीं करावा. श्राद्धाचे ब्राह्मण जेवण्यापूर्वीं किंवा अतिथिभोजनापूर्वीं मुली, गरोदर स्त्रिया, मुलें, सुवासिनी, आजारी माणसें यांना जेवावयास बसवावें. त्यांत अतिथीचा अवमान नाहीं वा धर्महानि नाहीं.

(५०) **अन्नशुद्धिः**—अन्नशुद्धीसंबंधानेंही धर्मशास्त्रवेत्त्यांनीं अत्यंत मार्मिकपणानें तारतम्य सांगितलेलें आहे. समजा, एखादा वाटसरू चालला आहे, जातां जातां नदी अगर ओढ्यांत त्यानें स्नान केलें आणि वाळवंटांत रानशेळीची थाळी पेटवून त्यावर भाताची तपेली उतरली; इतक्यांत त्याची नजर चुकवून एक कुत्रें गेलें व त्यानें त्या तपेलींत तोंड खुपसलें; अशा वेळीं अल्प अन्न आहे म्हणून तो सर्व भात टाकून द्यावा हें कोणांलाहि समजेल. पण समजा, शेंकडों लोकांच्या भोजनाकरितां पाकसिद्धि झालेली आहे, अशा वेळीं कावळा, कुत्रें, गाढव असें कांहीं तेथें आलें व त्या स्वैपाकाला तें शिवलें तर त्या ठिकाणीं काय करावयाचें, याबद्दल धर्मशास्त्रवेत्ते सांगतात—

**देवद्रोण्यां विवाहेषु यज्ञेषु प्रकृतेषु च ।**
**काकैः श्वभिश्च संस्पृष्टमन्नं तन्न विसर्जयेत् ॥२२॥**



तस्मादन्नमपोध्दृत्य शेषं संस्कारमर्हति ॥　—वसिष्ठ अ. १४
काकश्वानावलीढं तु गवाघ्रातं खरेण वा ।
स्वल्पमन्नं त्यजेद्विप्रः शुद्धिर्द्रोणाढके भवेत् ॥७१॥
अन्नस्योध्दृत्य तन्मात्रं यच्च लालाहतं भवेत् ।
सुवर्णोदकमभ्युक्ष्य हुताशेनैव तापयेत् ॥७२॥ पराशर अ. ६

**भावार्थः**—विवाह, यज्ञ अशा प्रसंगीं आणि उत्सवप्रसंगीं जर सिद्ध झालेल्या अन्नाला कावळा, कुत्रें, गाढव इ. शिवलें तर जेथें त्याची चोंच अगर तोंड लागलें असेल तेवढें अन्न टाकून द्यावें व बाकीच्या अन्नावर प्रोक्षण करून तें उपयोगांत आणावें. कावळा, कुत्रें, गाढव इत्यादींच्या तोंडांतील लाळ जेवढ्या अन्नाला लागली असेल, तेवढें अन्न टाकून द्यावें व राहिलेलें अन्न पुनः एकदां अग्नीवर ऊन करावें आणि तीर्थ शिंपडून तें उपयोगांत आणावें.

याही ठिकाणीं शास्त्रकारांनीं व्यवहार, लोकसंग्रह, तारतम्य इकडेच लक्ष्य दिलेलें आहे. तसें जर न केलें तर शेंपन्नास माणसांच्या खटपटीनें आणि अनेक लोकांच्या द्रव्यानें तयार झालेलें अन्न उकिरड्यावर टाकण्याचा प्रसंग यावयाचा, आणि हिरमुसल्या तोंडानें आलेल्या लोकांना परत जावें लागावयाचें ! ! शीख सेनापती हरसिंग ललवा यानें हें अन्नशुद्धीचें तत्त्व लक्षांत घेऊनच शत्रूंनीं गोमांस टाकलेल्या अन्नांत डुकराचें हाड घालून तें ढवळून शुध्द केलें, व सैनिकांना खावयास दिलें ! तात्पर्य धर्म हा केवळ धर्माकरितां नसून तो समाजधारणा, लोकसंग्रह, व्यवहार यांकरितां असल्यामुळें बुद्धिपूर्वक असें तारतम्य ठेवावेंच लागतें.

( ५१ ) **अहिंसाः**- हिंसा व अहिंसा यासंबंधानेंही शास्त्रकारांचें धोरण विचार करण्यासारखेंच आहे. अहिंसा हें धर्मतत्त्व असलें तरी अहिंसेकरितां अहिंसा नसून ती समाजधारणेकरितां आहे, हें ध्यानांत ठेवावेंच लागतें. केवळ अहिंसेनें कोणी जगत नाहीं, संन्याशीही जगूं शकत नाहीं. दुर्बळांवर प्रबळ जगतात असें व्यास म्हणतात.

न हि पश्यामि जीवन्तं लोके कंचिदहिंसया ।
सत्वैः सत्वा हि जीवन्ति दुर्बलैर्बलवत्तराः ॥
　　　　महाभारत १२–१५–२०

अन्यत्रराजन्हिंसाया वृत्तिर्नेहास्ति कस्यचित् ।
अप्यरण्यसमुत्थस्य एकस्य चरतो मुनेः ॥
महाभारत शां. प. अ. १३० श्लो. २८

( ५२ ) सत्यः—अहिंसेप्रमाणेंच सत्यभाषण हेंहि एक धर्मतत्त्व आहे; पण तें सत्याकरितां सत्य नसून समाजधारणेकरितांच आहे. म्हणून सत्यभाषणहि तारतम्यानेंच बुद्धीचा उपयोग करून करावें लागतें.

विवाहमैथुननर्मार्तसंयोगेष्वदोषमेकेऽनृतम् ॥२९॥
—गौतम अ. ६ प्र. २

यद्भूतहितमत्यन्तं तत्सत्यमिति धारणा ॥
महाभारत व. प. २०८—४

**भावार्थः**—विवाह, स्वदाररति, आर्तावस्था, प्राण जाण्याचा प्रसंग, सर्वस्व अपहाराची वेळ, विनोद, अशा प्रसंगीं खोटें बोलण्याचा दोष नाहीं. ज्यामुळें समाजहित, स्वराष्ट्रहित आणि भूतहित साधेल तेंच सत्य होय.

(५३) स्त्रीपावित्र्यः—स्त्रीपावित्र्यासंबंधींही शास्त्रकारांनीं ठिक ठिकाणीं तारतम्यानें विचार केला आहे. आज समाजामध्यें स्त्रियांसंबंधाच्या ज्या कल्पना आहेत, त्या दृष्टीनें शास्त्रकारांच्या या कल्पना कदाचित् चमत्कारिकही वाटतील. परंतु त्यांतही सारासारविवेक कसा ठेवावा लागतो, हें ध्यानांत घेतलेंच पाहिजे.

स्त्रियः पवित्रमतुलं नैता दुष्यन्ति कर्हिचित् ।
मासि मासि रजो ह्यासां दुरितान्यपकर्षति ॥६३॥
—गौतम अ. ९

बलात्कारोपभुक्ता वा चौरहस्तगताऽपि वा ॥ २ ॥
न त्याज्या दूषिता नारी नास्यास्त्यागो विधीयते ।
पुष्पकालमुपासीत ऋतुकालेन शुध्यति ॥३॥ —वसिष्ठ अ.१७

**भावार्थः**—स्त्रियांचें पावित्र्य हें अतुल आहे, तें दूषित होत नाहीं; कारण मासिक रजःस्राव स्त्रियांचीं सर्व पातकें नष्ट करतो. स्त्री ही बलात्कारानें भोगली गेली, चोरांच्या तावडींतून सुटून आलेली असली तरी तिचा त्याग

न करावा. कारण ती विटाळशी होतांच शुद्ध होते. (स्वखुषीनें प्रसंग ओढवून घेणारी स्त्री अर्थात् भ्रष्टच समजावी.)

याही क्षेत्रांत आपद्धर्म म्हणून असें तारतम्य न पाळल्यास अनवस्था उत्पन्न होण्याचा प्रसंग येईल, आणि दुष्टांचें आयतेंच फावेल.

(५४) **शिष्टाचार:**–सामान्य शिष्टाचारामध्येंसुध्दां व्यवहार व तारतम्य कसें ठेवावें लागतें यासंबंधाचीं उदाहरणें पाहा—

**पन्था देयो ब्राह्मणाय गवे राज्ञे ह्यचक्षुषे ।**
**वृद्धाय भारतप्ताय गर्भिण्यै दुर्बलाय च ॥५७॥**–बौधायन अ. ३
**न बालकान् निर्भर्त्सयेत् । नैकोमिष्टं (अश्नीयात्) ।**
विष्णु. अ. ६८
**न कंचनावमन्येत । नाश्लीलं कीर्तयेत् ।** –विष्णु अ. ७१

**भावार्थ:**–वाटेनें जातांना विद्वान, गाय, राजा, आंधळा, वृद्ध, गरोदर स्त्री, ओझेवाला, दुर्बळ अशांना आधीं वाट द्यावी. लहान मुलांची निर्भर्त्सना करूं नये. मुलांना सोडून एकट्यानेंच गोडधोड खाऊं नये. कोणाचा अपमान करूं नये. अभद्र बोलूं नये. इ.

हे व अशा तऱ्हेचे अनेक शिष्टाचार कोणत्याहि जाणत्या मनुष्याला सहज समजतील. केवळ स्मृतिग्रंथांत ते आले म्हणजे त्या ठिकाणीं अपूर्वत्व येतें असें मुळींच नाहीं.

येथवर केलेल्या विवेचनावरून सुबुद्ध व समंजस वाचकाला समजून येईल कीं धर्म हा पुरुषबुद्धिगम्य आहे. म्हणूनच धर्माचें आचरण बुद्धीचा उपयोग करून परिस्थितिसापेक्ष करावें लागतें. प्रत्येक युगाला धर्म बदलतोच. म्हणून युगानुरूप वागावें लागतें.

(५५) **धर्मपरिवर्तनाचीं उदाहरणें:**–आतां धर्म हा परिवर्तनशील नाहीं, प्रत्यक्ष ईश्वरसुद्धां त्यामध्यें परिवर्तन करूं शकत नाहीं, अशी जी समजूत आहे, तिचें निराकरण करून हें प्रकरण संपवितों.

(१) पूर्वी एका कालीं विवाहसंस्था नव्हती. श्वेतकेतूनें ही विवाह-मर्यादा घातली. त्या कालीं स्त्रिया इच्छेस येईल त्या पुरुषाबरोबर राहात असत. एकदां श्वेतकेतू बापासह बसला असतांना त्याच्या आईवर तो प्रसंग

आला. तें पाहून श्वेतकेतूस क्रोध आला. त्यावेळीं त्याचा बाप म्हणाला, " अरे, रागावूं नकोस. ही जुनी वहिवाट आहे. "

क्रुद्धं तं तु पिता दृष्ट्वा श्वेतकेतुमुवाच ह ।
मा तात कोप कार्षीस्त्वमेष धर्मः सनातनः ॥

—महाभारत आदि. प. १२२

हा सनातन धर्म श्वेतकेतूला आवडला नाहीं. त्यानें ही जुनी वहिवाट मोडली व नवा निर्बंध असा घातला कीं कोणत्याहि स्त्रीनें पतीचें आक्रमण करूं नये. कारण त्यामुळें अपत्यसंगोपन, कुटुंबस्वास्थ्य यांची हानी होते.

व्युच्चरन्त्याः पतिं नार्या अद्यप्रभृति पातकम् ।
भ्रूणहत्यासमं घोरं भविष्यत्यसुखावहम् ॥

—महाभारत आदि. प. १२२

(२) पूर्वीं समाजामध्यें आठ प्रकारचे विवाह ( ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, गांधर्व, राक्षस, आसुर, पैशाच्य ) होते. आतां मनुष्यसमाजाला सुसंस्कृतपणामुळें ते विवाहप्रकार रानटी वाटतात व कायद्यानेंहि त्यांना प्रतिबंध केलेला आहे, म्हणून ब्राह्म व गांधर्व हे दोनच विवाह आज समाजाला मान्य झालेले आहेत.

(३) पूर्वीं एका कालीं समाजांत पितृसावर्ण्य रूढ होतें म्हणजे बाप ज्या वर्णाचा त्या वर्णांतच संततीला स्थान मिळे. आई कोणत्याहि वर्णाची असली तरी चाले. परंतु पुढें तत्कालीन श्रेष्ठांना ही पद्धत सदोष वाटली, म्हणून त्यांनीं मातृसावर्ण्य सुरू केलें. मन्वादिकांनीं असवर्णविवाह सशास्त्र ठरविला, परंतु याज्ञवल्क्यानें पुढें तो अमान्य केला.

(४) पूर्वीं समाजांत नियोग रूढ होता. नियोग म्हणजे विधवेनें वडिलांचे आज्ञेनें वडील दिराशीं, सगोत्राशीं, सपिंड पुरुषाशीं पुत्रेच्छेनें संभोग करणें. ही चाल तत्कालीन शिष्टांना अनिष्ट वाटली, म्हणून पुढें त्यांनीं ती बंद केली. नारद व पराशर या स्मृतिकारांनीं विधवापुनर्विवाह मान्य केला, पण इतर स्मृतिकारांनीं तो अमान्य ठरविला.

(५) पूर्वी मद्यप्राशन शिष्टमान्य होतें. पण शुक्राचार्यांनीं ती चाल मोडली व मद्यप्यास पातक्यांत घातलें.

(६) पूर्वी बारा प्रकारच्या पुत्रांना समाजांत मान्यता होती. औरस, क्षेत्रज, दत्तक, कृत्रिम, गूढोत्पन्न, अपविद्ध, कानीन, सुहोढ, पौनर्भव पुत्रिकापुत्र, स्वयंदत्त व क्रीत हे ते होत. यापैकीं औरस व दत्तक एवढे दोनच आजच्या समाजानें मान्य केले असून इतर दहांना अधर्म्य संततीमध्यें लोटलेलें आहे.

(७) यज्ञांमध्यें पशुहत्या वेदविहित असतांना 'न च प्राणिवधः स्वर्ग्यः' असें म्हणून पिष्टपशूची चाल रूढ केली.

(८) पतीच्या मरणानंतर पुष्कळ स्त्रिया पतीशीं सहगमन करीत. पण ती सतीची धर्म्य चाल इंग्रजी राज्यांत बंद केली गेली.

(९) एका कालीं समाजांत मांसाहार सर्वत्र व शिष्टमान्य होता. तो पुढें तिरस्कारार्ह वाटला व मांसाच्या स्थानीं माष येऊन त्या प्रतिनिधीच्या साह्यानें श्राद्ध होऊं लागलें.

(१०) पूर्वी चातुर्वर्णिकांनीं वर्णविशिष्ट असेच व्यवसाय करावेत, असा दंडक होता. परंतु त्यावर निर्वाह होईना म्हणून "युगधर्माप्रमाणें," अनेक व्यवसाय करून जगावें, असें प्रजापति स्मृतिकारानें सांगितलें.

(११) एका कालीं त्रैवर्णिक समाज हाच मुख्य समाज होता. 'आर्यस्त्रैवर्णिकः अनार्यः शूद्रः' अशी परिभाषा ग्रंथांत आढळते. हा शूद्र एके काळीं स्मशानतुल्य होता. तो पुढें गांवांत आला, त्याला द्विजांनीं सेवा करण्यास अनुज्ञा दिली, त्याचा प्रवेश स्वैपाकघरांतहि झाला. पुढें शूद्राशीं आर्यांचे विवाहहि होऊं लागले व या तऱ्हेनें त्याला चातुर्वर्ण्यांत स्थान मिळालें.

(१२) पूर्वी नंदाच्या घरीं वैदिक इंद्रयाग होत असे. तो बंद करून "गोवर्धनाची पूजा करा व इंद्रयागाकरितां जमविलेली सामुग्री गोवर्धनाच्या पूजेसाठीं उपयोगास आणा" असें श्रीकृष्णांनीं सांगितल्यावरून गोवर्धनाच्या पूजेचा प्रघात चालू झाला, हें भागवत पुराण स्कंद १० पूर्वार्ध अध्याय २४ वरून दिसतें.

(१३) आदित्यपुराणांतील कलिवर्ज्य प्रकरण म्हणजे पूर्वापार आचारांत बंड करून परिवर्तन केल्याचें मोठें उदाहरण होय! 'यावज्जीवं अग्निहोत्रं जुहुयात्' असा श्रुतीचा विधि आहे. ब्राह्मण हा वेदवेदीसमन्वित असा असावा, असा दंडक असतां कलिवर्ज्य प्रकरणानें अग्निहोत्राचा निषेध करून वेदाचें मूळच उखडून टाकलें! 'पशूपाकरणक्रिया' श्रुति-विहीत असतांना ( गामनुबन्ध्यामालभेत ) कलींत तिचा निषेध केला गेला!

'अग्निहोत्रं गवालंभं संन्यासं पलपैतृकम् ।
देवराच्च सुतोत्पत्तिं कलौ पंच विवर्जयेत् ॥'

या निषेधामुळें पूर्वापार आचारांत महत्त्वाचें परिवर्तन झालें. यज्ञ-वेदीच्या जागीं देवदेवळें आलीं. आतां त्या ठिकाणीं राष्ट्रदेवता येतील आणि नवविध भक्तीच्या स्थानीं समाजसेवेचा प्रकार येईल. चार वर्ण हा शब्द रूढ असतांना 'कलावाद्यन्तयोः स्थितिः' असें शास्त्र आलें, त्यामुळें चातुर्वर्ण्याचें बीजच नष्ट झालें. यासारखीं जीं अनेक परिवर्तनें मूळ श्रुत्युक्त धर्मांत केलीं, तीं करण्याचा अधिकार या ऋषींना कोणी दिला होता? पण त्यांनीं हें परिवर्तन समाजधारणेकरितां नि लोकगुप्तीकरितां केलें. *

एतानि लोकगुप्त्यर्थं कलेरादौ महात्मभिः ।
निवर्तितानि कर्माणि व्यवस्थापूर्वकं बुधैः ॥ स्मृतिचंद्रिका

लोकरक्षणाकरितां, समाजधारणेकरितां जर त्यावेळच्या शिष्टांनीं हीं परिवर्तनें केलीं, व यापुढें कोणतेंहि परिवर्तन करूं नये असें जर त्यांनीं म्हटलेलें नाहीं, तर आजच्या कालाला उपयुक्त अशीं लोकगुप्त्यर्थ परिवर्तनें करण्याचा अधिकार आजच्या ज्ञात्यांना आहे. कारण 'आचारपरिवर्तनं युगस्वभावः,' हें तत्त्व अबाधित आहे.

---

* **टीपः**—श्री शंकराचार्य, भगवान् बुद्ध, जिनेश्वर, बसवेश्वर, श्री ज्ञानेश्वर, श्री एकनाथ, श्री समर्थ रामदास स्वामी, छत्रपति शिवाजी महाराज, कै. लोकमान्य टिळक, महर्षी दयानंद, महात्मा फुले इत्यादि थोर व कर्तृत्ववान् पुरुषांनीं लोकगुप्तीकरितां अर्थात् समाजधारणेकरितां आपापल्या-कालांत जुन्या रूढींविरुद्ध बंडखोर वृत्तीनें वागून धार्मिक समजुती व आचार यांमध्यें परिवर्तन केल्याचें सर्वश्रुत आहे.

**(५६) आजचे शिष्ट व धर्मपरिवर्तनः**—वरील उदाहरणांवरून धर्मपरिवर्तन हें वेळोवेळीं अवश्य आहे, व तें तत्कालीन शिष्टांनीं केलेलें आहे, हें वाचकांच्या ध्यानीं येईल. यावर कोणी म्हणतील कीं 'पूर्वींचीं परिवर्तनें हीं मोठमोठ्या ऋषींनीं केलीं, तसे ऋषि सांप्रत नाहींत आणि ते जोंवर दिसत नाहींत तोंवर परिवर्तनें करण्याचा अधिकार कोणासहि नाहीं.' यावर उत्तर असें कीं शिष्ट व ऋषि यांचीं जीं लक्षणें आहेत तीं आजहि पुष्कळ व्यक्तींमध्यें दृष्टोत्पत्तीस येतात. 'शिष्टाः खलु विगतमत्सराः कुंभीधान्याः अलोलुपाः धर्मशास्त्रतत्त्वज्ञाः' इत्यादि जीं शिष्टलक्षणें शास्त्रांत ठिकठिकाणीं सांगितलेलीं आहेत, त्यांचा अत्यंत अभाव झालेला आहे असें म्हणतां येणार नाहीं. पूर्वकालाला अनुरूप जसे पूर्वींचे शिष्ट होते, त्याप्रमाणें आजच्या कालाला अनुरूप असे आजचेहि शिष्ट आहेत. आजहि समाजांतील श्रेष्ठ व्यक्तींमध्यें त्याग, शुद्धाचरण, निस्वार्थबुद्धि व समाजोत्कर्षाची तळमळ हे गुण दिसून येतात. म्हणून त्यांची निंदा करणें हें पराशरऋषीचे मतें अयोग्य होय.

**युगे युगे च ये धर्मास्तत्र तत्र च ये द्विजाः ।**
**तेषां निंदा न कर्तव्या युगरूपा हि ते द्विजाः ॥ ३२ ॥**

—पराशर. अ. १

युगानुरूप शिष्ट. जसें युग तसा धर्म. अर्थात् त्या त्या कालीं धर्मपरिवर्तन करणारे योग्य द्विज पुढें येत असतात. पूर्वींचे शिष्ट अरण्यांत राहात, तर आजच्या शिष्टांना अरण्यवास अशक्य आहे. पूर्वींचे शिष्ट पायीं चालत असतील, तर आजच्या शिष्टांना पायीं प्रवास शक्य नाहीं. पूर्वींच्या शिष्टांना इंग्रजी शिक्षण आणि विज्ञानशास्त्रें यांची माहिती नसेल, परंतु आजच्या शिष्टांना त्याची माहिती असणें अवश्य आहे. युगप्रयुक्त जी अधर्मप्रवृत्ति आहे ती अपरिहार्य आहे, म्हणूनच वरील पराशरवचनावर टीका करतांना माधवाचार्य लिहितो कीं अधर्मप्रवृत्ति ही दोन प्रकारची असते. एक युगप्रयुक्त अधर्मप्रवृत्ति व दुसरी प्रमाद—आलस्यादि कारणांमुळें उत्पन्न झालेली अधर्मप्रवृत्ति. पैकीं दुसरी प्रवृत्ति दोषार्ह आहे पण पहिली मात्र दोषार्ह नाहीं. 'युगप्रयुक्तां सर्वैरपि अवर्जनीयां अधर्मप्रवृत्तिं अदोषत्वेन अभ्युपगम्य । तेषां निंदा न कर्तव्या'

हें लक्षांत घेतलें म्हणजे आजही युगानुरूप शिष्ट आहेत आणि त्यांना देशकालपरिस्थिति लक्षांत घेऊन धर्मांत परिवर्तन करण्याचा अधिकार आहे, असें सिद्ध होतें.

धर्मामध्यें पुरुषबुद्धीचा प्रवेश आहे व तो परिवर्तनीय आहे हें येथवर केलेल्या विवेचनावरून ध्यानीं येईल. आतां नव्या हिंदुधर्माला जें कांहीं सांगावयाचें आहे, त्याचें अधिष्ठान कोणतें आहे, त्याचा विचार पुढील प्रकरणांत करितों.

—※—

# प्रकरण सहावें

## नव्या हिंदुधर्माचें अधिष्ठान

(५७) हिंदुधर्माचें अनादित्वः—हिंदुधर्माला सनातनधर्म, वैदिकधर्म, आर्यधर्म अशीं निरनिराळीं नांवें आहेत. या नांवांवरून त्या धर्माचा इतिहास कळतो. हा धर्म एका व्यक्तीनें, एका महापुरुषानें, प्रेषितानें किंवा अवतारानें उत्पन्न केला असें नसून हा अनादि आहे. अनादि म्हणजे मनुष्यजातीच्या उत्पत्तीपासूनच हा धर्म आहे. याचा उल्लेख भगवद्गीतेच्या तिसऱ्या अध्यायामध्यें आढळतो.

सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।
अनेन प्रसविष्यध्वमेषवोऽस्त्विष्टकामधुक् ॥१०॥

—गीता अ. ३

ब्रह्मदेवानें कल्पारंभीं मानवी सृष्टि उत्पन्न केली व या धर्माच्या योगानें आपले मनोरथ पूर्ण करून घ्या असें मनुष्यांना सांगितलें. माणसांचे मनोरथ पूर्ण होण्यास समाजामध्यें धारणा व प्रभवशक्ति असावी लागते.

मनुष्य प्राणि जेव्हां समाज करून राहूं लागतो, तेव्हां त्याला समाजाची धारणा व प्रभव याकरितां धर्माची गरज लागते. अर्थात् मानवी समाजाच्या गरजेप्रमाणें धर्म उत्पन्न होतो. आधीं समाज व नंतर धर्म असा हा संबंध आहे.

( ५८ ) **धर्माचीं सनातन तत्त्वें**:—मनुष्यप्राणि समाज करून राहावयाला लागला म्हणजे प्रथम एकमेकाची गरज प्रत्येकाला लागते. त्या गरजेंतून एकमेकांच्या उपयोगीं पडावें हा समाजधर्म उत्पन्न होतो; म्हणून अन्योन्य–उपकारकता हें सनातनधर्माचें पहिलें तत्त्व आहे. एकमेकांना उपयोगीं पडण्याच्या वृत्तींतूनच बंधुभावाचा उदय होतो.

**कृते च प्रतिकुर्वीत एष धर्मः सनातनः ।** —वा. रामायण.

तसेंच एकमेकांशीं वागतांना सत्य बोलावें, कारण एकमेकांला फसवून समाजधारणा होणार नाहीं, असें वाटूं लागल्यावर—

**‘ सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयात्......’**
**प्रियं च नानृतं ब्रूयात् एष धर्मः सनातनः ॥**

—मनु अ. ४ श्लो. १३८

असें दुसरें सनातन तत्त्व उत्पन्न होतें. समाजांत उपकारकता, सत्यप्रियता हीं जशीं हवींत, तसेंच अस्तेयही अवश्य लागतें. दुसऱ्याच्या द्रव्याचा अपहार न करणें म्हणजे चोरी न करणें, हेंहि तिसरें सनातन धर्मतत्त्व समाजाच्या वाढीबरोबर समाजाच्या गरजेंतून उत्पन्न होतें.

**न हर्त्तव्यं परधनं एष धर्मः सनातनः ॥**

—महाभारत, शां. प. अ. २६० श्लो. १२

समाज करून राहिल्यानंतर विवाहसंस्था उत्पन्न होते. विवाहसंस्था उत्पन्न झाल्यानंतर स्त्रीवर्गाविषयींचा शिष्टाचार आणि एकपत्निव्रताची कल्पना स्वाभाविकच वाढते. विशेषतः विवाहसंस्थेमुळें दुसऱ्याच्या स्त्रीचा अभिलाष धरणें कसें अयोग्य आहे याची कल्पना येते.

**योऽन्यस्य स्यादुपपतिःस कं किं वक्तुमर्हति ।**

—महाभारत, शां. प. अ. २६० श्लो. २१

जो दुसऱ्याच्या स्त्रीचा उपपति आहे, त्याला जर कळलें कीं आपल्याहि स्त्रीचा असा कोणी उपपति आहे तर त्याला इतरांना कसा

दोष देतां येईल ? आपल्या स्त्रीचा कोणी उपपति नसावा अशी जर इच्छा असेल तर स्वतः प्रत्येक माणसानें एकपत्निव्रत पाळलें पाहिजे, असें सहजच प्राप्त होतें. याप्रमाणें दुसऱ्याच्या स्त्रीचा अभिलाष न करणें, हें चौथें सनातन धर्मतत्त्व उत्पन्न होतें. चोरी करूं नये, खोटें बोलूं नये, परस्त्रीगमन करूं नये हीं जशीं सनातनधर्मतत्त्वें समाजाच्या गरजेंतून उत्पन्न होतात, तसेंच बंधुभाव हें पांचवें सनातनधर्मतत्त्व सिद्ध होतें. त्याचा उगम आपल्यासारखाच इतरांनाहि आपला जीव प्रिय आहे, आपल्यासारखेंच इतरांनाहि जगावयाचें आहे, या भावनेंतून होतो.

**जीवितुं यः स्वयं चेच्छेत् कथं सोऽन्यं प्रघातयेत् ।**
**यद्यदात्मनि चेच्छेत तत्परस्यापि चिंतयेत् ॥**

—म. भा. शां. प. २६०—२२

जो स्वत: जगण्याची इच्छा करतो तो इतरांना ठार करण्याची इच्छा कशी करील ? जें स्वतःला हवें असतें तेंच इतरांनाही मिळावें असें वाटतें हें ध्यानीं घ्यावें.

वरील विवेचनावरून धर्म हा कोणी लादलेला नसून तो समाजाच्या गरजेंतून कसा उत्पन्न होतो आणि त्याला सनातनत्व कसें येतें याची कल्पना येईल. त्रिकालाबाधित म्हणजे तीन्ही कालीं टिकणारा असा हा सनातन धर्म आहे. अलीकडे कांहीं जुने लोक म्हणतात कीं सनातन धर्म बुडाला. पण त्यांच्या ध्यानांत येत नाहीं कीं जो धर्म बुडतो तो सनातन कसा ? आणि जो सनातन आहे तो बुडेल कसा ?

**(५९) हिंदुसमाजनिर्मित हिंदुधर्मः**—हिंदुधर्म आधीं कोणीतरी ईश्वरानें उत्पन्न केला आणि तो मागाहून हिंदुसमाजावर लादला, अर्थात् त्याप्रमाणें हिंदूंनीं वागलें पाहिजे, असें नसून हिंदुसमाजानेंच आपल्या गरजेप्रमाणें प्रथम सनातनधर्म उत्पन्न केला. आपल्या गरजेप्रमाणें हिंदु-समाजानें वेद उत्पन्न करून त्यांतून समाजधारणेचीं तत्त्वें ग्रहण केलीं; म्हणून हिंदुसमाज वेदप्रणीत धर्म किंवा वैदिकधर्म असें म्हणूं लागला. हा धर्म प्राचीनकाळीं त्रैवर्णिकांमध्यें, अर्थात् आर्यांमध्यें, रूढ झाला म्हणून त्याला आर्यधर्म असेंही नांव आलें. बुद्धोत्तर कालांत हा धर्म आर्यांबाहेर

अनेक जातींत व उपजातींत गेल्यामुळें याला हिंदुधर्म असें नांव हिंदुसमाजानें दिलें.

हिंदुसमाजानें ऋषी उत्पन्न केले, त्या मंत्रद्रष्ट्या ऋषींनीं वेद पाहिले व ते समाजाला दिले. हिंदुसमाजानें त्यांतून वैदिक धर्माचा गरजेप्रमाणें स्वीकार केला. हिंदुसमाजानें स्मृतिकार उत्पन्न केले, स्मृतिकारांनीं धर्मशास्त्र सांगितलें, त्यांतून हिंदुसमाजानें व्यवहारव्यवस्थापनेचीं तत्त्वें ग्रहण केलीं. हिंदुसमाजानें शास्त्रकार, सूत्रकार, महावीर, गौतमबुद्ध, जिनवर, बसवेश्वर, चक्रधर, चैतन्य, ज्ञानेश्वरादि निर्माण केले, आणि या सर्वांपासून समाजधारणेला जें जें आवश्यक तें तें ग्रहण केलें. हिंदुसमाजानें ज्यांना मागून अवतार ही संज्ञा प्राप्त झाली, असे वीर व थोर पुरुष निर्माण केले, धर्मसंस्थापक निर्माण केले, मुत्सद्दी उत्पन्न केले; त्यांनींहि हिंदुसमाजाच्या धारणेला साह्य केलेलें आहे. हिंदुसमाजाची उत्पादनशक्ति कांहीं नष्ट झालेली नाहीं. हिंदुसमाज हा आपल्या गरजेप्रमाणें जसा आजवर मोठीं माणसें व समाजधारणेला पोषक असे धर्मग्रंथ निर्माण करीत आलेला आहे, तसाच तो आतांही तें करण्याला समर्थ आहे.

**( ६० ) समाजाकरितां धर्मः**—धर्माकरितां समाज आहे कां समाजाकरितां धर्म आहे ? या प्रश्नाचें उत्तर शरीराकरितां वस्त्र आहे कां वस्त्राकरितां शरीर आहे, या प्रश्नाच्या उत्तरांतच आहे. धर्म हा माणसाकरितां आहे. मनुष्यसमाजाची सर्वांगीण उन्नति व्हावी, समाजांत स्वास्थ्य नांदावें, राष्ट्राचा उत्कर्ष व्हावा आणि एकंदरीनें मनुष्यजातीचें कल्याण व्हावें याकरितांच धर्म आहे. उच्चतम कल्याण हें मानव्याचें ध्येय आहे. त्या ध्येयाचें जें साधन तो धर्म होय. धर्माकरितां समाज नसून समाजाकरितां धर्म आहे, हें तत्त्व हिंदुधर्मानें सिद्ध केलेलें आहे.

**( ६१ ) बुद्धि हेंच अधिष्ठानः**—कांहीं धर्म केवळ व्यक्तिप्रधान आहेत. त्या त्या व्यक्तींच्या पूर्वी तो तो धर्म अस्तित्वांत नव्हताच. एक व्यक्ति, एक ग्रंथ, एक साधु असलें हिंदुधर्माचें सांप्रदायिक स्वरूप नाहीं. तर अनेक संप्रदायांना, पंथांना बुद्धिप्रामाण्याच्या जोरावर एका केंद्रांत आणणारा हा धर्म आहे. एक ग्रंथ, एक साधु यामुळें धर्माला जें सांठलेल्या

डबक्याचें स्वरूप येतें तसें हिंदुधर्माचें कधींच होत नाहीं. आजचा हिंदुधर्माचा संकल्प "श्रुतिस्मृतिपुराणोक्त" असा आहे. म्हणजे एका काळीं श्रुतीनें समाजधारणा होत असे. पुढें त्या अपुऱ्या पडून स्मृति उत्पन्न झाल्या. त्याहि अपुऱ्या पडून पुढें पुराणांची आवश्यकता आली. यापुढेंही समाजधारणेस योग्य असे धर्मग्रंथ होण्यास हिंदुधर्माची अनुज्ञा आहे. तें काम संपलें असें नाहीं; यावरून हा धर्म एकग्रंथाधिष्ठित नाहीं, व्यक्तिप्रधान नाहीं हें उघड होतें. हिंदुधर्माचें अधिष्ठान एक ग्रंथ, एक साधु इत्यादि नसून **धर्मज्ञांची बुद्धि हेंच आहे.**

**(६२) दोन प्रबळ आधारः**—आपस्तंबानें आपल्या धर्मसूत्रांत

**' धर्मज्ञसमयः प्रमाणं वेदाश्च '**

म्हणजे धर्मज्ञांचे निर्णय आणि वेद हीं धर्माचीं प्रमाणें आहेत, असें म्हटलेलें आहे. अन्यत्रहि धर्माचें प्रमाण **धर्मज्ञांची बुद्धि हेंच** कसें आहे, याविषयींचीं कांहीं वचनें देतों.

आदित्य पुराणामध्यें कलिवर्ज्य म्हणून जें प्रकरण आहे, त्यामध्यें अनेक आचारांची यादी दिलेली आहे. तो ग्रंथकार शेवटीं म्हणतो कीं लोकगुप्ति म्हणजे समाजाचें रक्षण करण्याकरितां अमुक अमुक गोष्टी कलियुगामध्यें वर्ज्य केलेल्या आहेत. त्या प्रकरणाच्या शेवटीं पुढील महत्त्वाचीं वचनें आहेत—

**एतानि लोकगुप्त्यर्थं कलेरादौ महात्मभिः ।**
**निवर्तितानि कर्माणि व्यवस्थापूर्वकं बुधैः ॥**
**समयश्चापि साधूनां प्रमाणं वेदवद्भवेत् ।** स्मृतिचं. पृ. १२

समाजधारणेकरितां बुद्धिवंतांना आणि विचारवंतांना जशा जुन्या रूढि व जुने आचार बंद करतां येतात, तशाच नवीनहि चालू करतां येतात. हें काम धर्मवेत्त्यांच्या बुद्धीचें आहे. धर्मज्ञ अशा साधू लोकांनीं दिलेले निर्णय वेदाप्रमाणें प्रमाण असतात असें स्पष्ट विधान येथें आहे. धर्मज्ञ अशा श्रेष्ठ पुरुषांच्या विचाराला वेदाइतकें प्रामाण्य आहे आणि तें प्राचीन परंपरासंमत आहे. सारासारविचार हेंच कोणत्याहि क्षेत्रांत खरें प्रमाण होय. मध्यंतरीं अनेक कारणांमुळें लुप्त झालेली ही परंपरा हिंदुसमाजांत आज पुनरुज्जीवित करावयाची आहे.

(६१) **स्मृति व महाभारतांतील आधारः**–आतां महाभारत व मनुयाज्ञवल्क्यस्मृति यांमध्यें बुद्धिप्रामाण्याचा पुरस्कार करणारीं जीं वचनें आहेत तीं देतों.

श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः ।
सम्यक्संकल्पजः कामो धर्ममूलमिदं स्मृतम् ॥

—याज्ञवल्क्य १–७

वेदः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः ।
एतच्चतुर्विधं प्राहुः साक्षाद्धर्मस्य लक्षणम् ॥ मनु अ. २–१२
धर्मजिज्ञासमानानां प्रमाणं प्रथमं श्रुतिः ।
द्वितीयं धर्मशास्त्रं तु तृतीयं लोकसंग्रहः ॥ —म. भा.
अनाम्नातेषु धर्मेषु कथं स्यादिति चेद्भवेत् ।
यं शिष्टा ब्राह्मणा ब्रूयुः स धर्मः स्यादशंकितः ॥

मनु अ. १२–१०८

धर्माचा विचार करतांना श्रुतिस्मृतींचा आधार घ्यावा. त्या अपुऱ्या पडल्या, तेवढ्यानें न भागलें तर शिष्टांच्या आचाराचा व रूढीचाही आधार घ्यावा. शिष्टाचार आणि रूढी जर भिन्न भिन्न असतील तर मग आपल्या मनाच्या पसंतीप्रमाणें वागावें. जेथें श्रुति, स्मृति, सदाचार व त्यांतील भिन्नता यांचा प्रश्नच उद्भवत नाहीं, तेथें उदात्त बुद्धीनें, नि शुद्ध मनानें विचार करीत करीत सत्संकल्पानें उत्पन्न होणारी जी मनाची प्रेरणा किंवा अन्तःस्फूर्ति तीच प्रमाण समजून चालावें. याज्ञवल्क्यानें शेवटीं बुद्धीचाच कौल घ्यावा असें सांगितलें आहे. मनूनें श्रुति, स्मृति, सदाचार, स्वतःच्या आत्म्याला जें प्रिय व शेवटीं आत्मतुष्टि हीं धर्मप्रमाणें होत असें म्हटलें आहे. येवढें अघळपघळ व बुद्धिस्वातंत्र्ययुक्त लक्षण अन्यत्र दुर्मिळ आहे. महाभारतांत श्रुतिस्मृतीवरून जसा धर्म समजतो तसाच तो व्यवहार, लोकसंग्रह यांच्या साह्यानेंही समजून घ्यावा, कारण हें एक धर्मप्रमाणच होय असें म्हटलेलें आहे. ज्या प्रश्नाविषयीं श्रुतिस्मृति मुग्ध आहेत, शिष्टाचार प्रमाण म्हणून घेतां येण्याजोगे नाहींत, अशा ठिकाणीं धर्मवेत्ते (ब्राह्मण) जें सांगतील तो निःसंशय धर्म समजावा, असें म्हणून धर्मज्ञांच्या बुद्धीलाच मनूनें प्राधान्य दिलें आहे.

धर्मज्ञ, समयज्ञ, देशकालज्ञ त्या त्या कालीं जो जो सामयिक धर्म सांगतील तो तो धर्म होय ! सामयिक धर्माला याज्ञवल्क्य ( अ. २ श्लो. १२६ ) मध्यें आणि स्मृत्यर्थसारादि ग्रंथांत चांगलेंच प्रामाण्य दिलेलें आहे.

धर्माधर्म विनिश्चयामध्यें ग्रंथापेक्षां धर्मज्ञांच्या बुध्दीलाच अधिक प्रामाण्य आहे.—

**तस्मात्कौन्तेय विदुषा धर्माधर्मविनिश्चये ॥**
**बुद्धिमास्थाय लोकेऽस्मिन् वर्तितव्यं कृतात्मना ॥**

—शां. प. अ. १४१ श्लो. १०२

**यस्य नास्ति निजा प्रज्ञा केवलं तु बहुश्रुतः**
**न स जानाति शास्त्रार्थं दर्वी सूपरसानिव ॥**

—सभापर्व ५५–१

**केवलं शास्त्रमाश्रित्य न कर्तव्यो विनिर्णयः ।**
**युक्तिहीने विचारे तु धर्महानिः प्रजायते ॥** —बृहस्पति

**भावार्थ**—हे धर्मा, विद्वानानें धर्म आणि अधर्म यांचा विचार करतांना आपल्या बुद्धीचा उपयोग करूनच वागावें. जो नुसता विद्वान् आहे, पण स्वतंत्रपणें विचार करण्याची ज्याला संवय नाहीं त्याला खरा शास्त्रार्थ समजत नाहीं. केवळ शब्द व ग्रंथ पाहून धर्मनिर्णय होत नाहीं. युक्ति, तर्क, परिस्थिति यांचा विचार न केल्यास धर्महानि होते.

(६४) **नव्या हिंदुधर्माची व्याख्याः**—जुन्या हिंदुधर्माचें अधिष्ठान श्रुति, स्मृति व पुराणें हें आहे, तर नव्या हिंदुधर्माचें अधिष्ठान धर्मज्ञ व देशकालज्ञ विद्वानांची बुद्धि हें आहे. या बुद्धिप्रामाण्याचे साह्यानें हिंदु-धर्माची व्याख्या अशी होते कीं हिंदुसमाज, हिंदुसंस्कृति व हिंदुराष्ट्र यांच्या अभ्युदयाकरितां, उत्कर्षाकरितां, उन्नतिकरितां, परमोच्च कल्याणाकरितां व आत्मपुष्ट्यर्थ जो जो योग्य, उचित व अवश्य आचार व विचार तो तो धर्म होय; आणि ज्यामुळें हिंदुसमाज, हिंदुराष्ट्र आणि हिंदुसंस्कृति यांच्या अभ्युदयास, उत्कर्षास, उन्नतीस, परमोच्च कल्याणास व आत्मतुष्टीस थोडें तरी वैगुण्य येईल वा थोडीतरी हानि पोंचेल असा जो जो आचार व विचार तो तो अधर्म होय. धर्म आणि अधर्म यांची ही कसोटी आहे.

(६५) **संदेहस्थलीं बुद्धीच प्रमाणः**– कोणी म्हणतील कीं उन्नति, उत्कर्ष, अभ्युदय म्हणजे काय तें कसें ठरवावयाचें ? त्याचें उत्तर त्या त्या कालीं जे धर्मज्ञ असे विद्वान् असतात ते जगाकडे पाहून उन्नति, उत्कर्ष अभ्युदय यांच्या व्याख्या सापेक्षतया ठरवीत असतात; त्या दृष्टीनें योग्य, उचित आणि अवश्य असें काय केलें पाहिजे, याचेंही प्रतिपादन ते करतात, हें होय- कदाचित् अशा विद्वानांमध्येंहि योग्य, उचित आणि आवश्यक यासंबंधीं मतभेद आढळल्यास प्रत्येक माणसानें आपल्या बुद्धीचा उपयोग करावा आणि त्याप्रमाणें वागावें. शेवटीं सारासारविचार, तर्क आणि बुद्धि यांचा उपयोग करून वागावें असाच सिद्धांत निघतो.

(६६) **व्यासकथित धर्म व अधर्मः**–नव्या हिंदुधर्माची वरील व्याख्या केवळ इहलोकसंबद्ध आहे, तींत परलोकाचा कांहींच संबंध येत नाहीं, असा यावर आक्षेप येण्याचा संभव आहे. परंतु इहलोकींच्या उन्नतीच्या साधनांत पारलौकिक उन्नतीच्या साधनांचा अन्तर्भाव होतो असें त्याचें उत्तर आहे. धर्म हा लोकधारणेकरितां नि लोकयात्रेकरितां आहे. धर्मामुळें समाजाचा अभ्युदय होतो, संघटना वाढते, ऐक्य नि प्रेम हीं वृद्धिंगत होतात, आरोग्यसंपन्नता येते आणि हृष्टि, पुष्टि व तुष्टि यांचा लाभ होतो. निष्काम कर्म, अहेतुक भक्ति, उदात्त तत्त्वज्ञानादि साधनांनीं पारमार्थिक उन्नतिहि होते. ज्यामुळें समाजाच्या अभ्युदयाचा बिघाड होईल, ऐक्य व प्रेम यांचा ऱ्हास होईल, आरोग्याला बाधा येईल, संघटनेला वैगुण्य येईल आणि आत्मतुष्टीचा लोप होईल, तो धर्मच नव्हे, तर तो साक्षात् अधर्म होय ! भगवान व्यासांच्या व्याख्येवरूनच धर्म व अधर्म यांचीं हीं लक्षणें सिद्ध होतात. भगवान् वेदव्यासांनीं महाभारतांत ठिकठिकाणीं जें धर्मप्रवचन केलें आहे, त्याचें सार पुढील श्लोकांत आहे—

**धारणाद्धर्ममित्याहुर्धर्मेण विधृताः प्रजाः ।**
**यः स्याद्धारणसंयुक्तः स धर्म इति निश्चयः ॥११॥** –शां. प. अ. १०९
**प्रभवार्थाय भूतानां धर्मप्रवचनं कृतं ।**
**यः स्यात्प्रभवसंयुक्तः स धर्म इति निश्चयः ॥१०॥**

–शां. प. अ. १०९

**लोकयात्रार्थमेवेह धर्मस्य नियमः कृतः ॥४॥**

—शां. प. अ. २६०

**प्रभवार्थं हि भूतानां धर्मः सृष्टः स्वयंभुवा ।**
**तस्मात् प्रवर्तयेत् धर्मं प्रजानुग्रहकारणात् ॥१८॥**

—शां. प. अ. ९१

**भावार्थः**—समाजाची धारणा होते म्हणूनच त्याला धर्म म्हणतात. धर्मच प्रजांचें धारण करतो. म्हणून जो धारणसंयुक्त आहे, जो समाजाचा प्रभव म्हणजे उत्कर्ष करण्यास समर्थ आहे, तोच धर्म होय. हा धर्म लोकयात्रेकरितां म्हणजे समाजाकरितां सांगितला आहे. हा धर्म स्वकल्याणाकरितां आचरणांत आणावा.

वरील श्लोकांमध्यें लोकयात्रा, प्रजानुग्रह इत्यादि शब्द फार महत्त्वाचे आहेत. त्यांवरून हिंदु धर्म हा इहलोकसंबद्ध आहे, त्याच्या योगानें ऐहिक नि पारलौकिक कल्याण साध्य करून घ्यावें, असें सिद्ध होतें.

( ६७ ) **धर्म व परिस्थितिः**—धर्माचें अधिष्ठान बुद्धि हें आहे. कोणताहि धर्माचार केवळ आजवर चालत आला आहे व पुष्कळ लोक त्याप्रमाणें आजवर वागत आले म्हणून तो पाळावा असें नव्हे. तर—

**कारणाद्धर्ममन्विच्छेत् न लोकचरितं चरेत् ॥५३॥**

—म. भा. शां. प. अ. २६०

कार्यकारणसंबंध ध्यानीं घेऊन वागावें, उगाच गतानुगतिक होऊं नये.

धर्म हा केवळ पठण—पाठणानें समजतो असें नाहीं. कारण आगगाडीच्या किंवा शाळेच्या वेळापत्रकाप्रमाणें धर्माचें वेळापत्रक लावलेलें नसतें.

**अन्यो धर्मः समस्थस्य विषमस्थस्यचापरः ।**
**आपदस्तु कथं शक्याः परिपाठेन वेदितुम् ॥४॥**

—शां. प. अ. २६१

**न धर्मः परिपाठेन शक्यो भारत वेदितुं ॥३॥**

—शां. प. अ. २६१

परिस्थितिसापेक्ष धर्म बदलतो. व्यक्तिनिष्ठ परिस्थिति जशी असेल त्याहि विचार करावा लागतो. कारण ज्याचें सर्व यथास्थित आहे त्याचा

धर्म निराळा व जो अडचणींत आहे त्याचा धर्म निराळा. सर्वांची आपत्ति एक असूं शकत नाहीं आणि त्याची यादी पाठ करूनहि प्रसंगीं अचुक वागतां येईल असें नाहीं.

भवत्यधर्मो धर्मो हि धर्माधर्मावुभावपि ।
कारणाद्देशकालस्य देशः कालः स तादृशः ॥३२॥

—शां. प. अ. ७८

परिस्थितीप्रमाणें एका प्रसंगीं जें कृत्य धर्म्य ठरेल तेंच कदाचित् दुसऱ्या प्रसंगीं अधर्म्य ठरतें. म्हणून देशकालानुरोधानें आपली बुद्धि चालवूनच वागावें लागतें. हिंदु संस्कृति, हिंदुराष्ट्र, हिंदुसमाज व आत्मतुष्टि यांच्या उत्कर्षाच्या बाबतींत योग्य कोणतें, अयोग्य कोणतें, धर्म्य कोणतें, अधर्म्य कोणतें, हें सर्व देशकालसापेक्ष विचार करून ठरविलें पाहिजे. प्रत्येक धर्मकृत्याचे प्रारंभीं "देशकालौ संकीर्त्य" हा संकल्प असतो. तो परिस्थितिबोधकच आहे.

**(६८) भौगोलिक परिस्थिति व धर्मः**—समाजावर जसे भौतिक आणि भौगोलिक परिस्थितीचे परिणाम होतात तसेच ते धार्मिक आचार व रूढि यांवरहि होतात. धर्म जसा देशकालसापेक्ष आहे, तसा तो भौतिक व भौगोलिक परिस्थितीशींहि संबद्ध आहे.

महाराष्ट्रांतील भोजनपद्धति, विधिनिषेध व शुभाशुभ यांपेक्षां बंगाल, मलबार, गुजराथ प्रांतांतील या सर्व गोष्टी अगदीं निराळ्या आहेत. महाराष्ट्रांत पहिल्या वरणभाताशीं पापड खातात तर गुजराथेंत व मारवाडांत अगदीं जेवणाच्या शेवटीं पापड यावयाचा. पापड परसला कीं जेवण संपलें! महाराष्ट्रीय भोजनांत तेलाची फोडणी आणि चिंचगूळ हे पदार्थ रुचीकरितां वापरतात. तर सिंधमध्यें भोजनांत चिंच मुळींच नसते. चिंचगुळाशिवाय भोजनाचे पदार्थ होतात. पंजाबांत 'गूड खाय घोडा आणि तेल खाय जोडा' अशी म्हण आहे. पंजाबांत आजारी माणसाकरितां भात असतो, तर मलबारांत आणि दक्षिणेंत जाड्या उकड्या तांदळाचा भात हेंच मुख्य अन्न आहे. जाड्या तांदळावर रसम्, कोळम्, घालून त्याचे पिंड बनवून ते खातात, तर महाराष्ट्रांत एखादें पोर चुकून जेवतांना

भाताचा गोळा करूं लागलें तर ' पिंड पाडण्यास अद्याप अवकाश आहे, हें अशुभ कृत्य आतांच करूं नकोस ' बाप अद्याप जिवंत आहे असें सांगतात. मलबारांत केळीचें पान आडवें डावीकडे शेंडा करून ठेवतात व तें शुभ समजतात. स्त्रियांनाच फक्त उभें पान ठेवतात. महाराष्ट्रांत गटाराकडेस बहुतेक जेवणावळी होत नाहींत, तर सुरतसारख्या शहरांत रस्त्यावर गटाराकडेस खालीं पत्रावळी घेऊन वर पितांबरी सोंवळ्यानें बसून जेवणावळी होतात. महाराष्ट्रांत भोजनांत तिखट, मीठ, चिंच बेतानें असते. तेलंगणांत आंबट पदार्थांना फार महत्त्व. दक्षिणेकडे तिखट व आंबट पदार्थ लोकांना फार आवडतात. उत्तरेकडे मिरची नाहींच. क्वचित् मिऱ्याची पूड घालतात व अतिशयोक्तीनेंच सांगावयाचें म्हणजे ज्यांना पदार्थांत तिखट हवें असेल ते एक मिरची टांगून तिजकडे पहात पहात म्हणे जेवतात!

(६९) **विविध चालीः**—महाराष्ट्रांत मुकटा, धाबळी, धूतवस्त्र नेसल्यास सोंवळें समजतात व तो जोड्यास शिवला कीं ओवळा होतो. गुजराथी व मारवाडी ब्राह्मण खालीं पायांत जोडे अगर बूट घालून आणि वर चांगला मुकटा नेसून देवपूजेला जातात व भोजनासहि जातात! महाराष्ट्रांत बोडका ब्राह्मण अशुभ समजतात तर दक्षिणेकडे डोक्यास घालावयाची चालच नाहीं. सर्व लोक बोडक्यानेंच हिंडतात. ढुंगणाला फक्त एक फडकें, अंगावर कांहीं नाहीं, आणि डोक्यावरहि नाहीं, असा ब्राह्मण कडकडीत सोंवळा समजतात! ' मलबार खंड, अन्नस्य पिंडं, शीर्षस्य मुंडं, वस्त्रस्य तुंडं ' असा तिकडे वाक्प्रचार आहे. वपन केलेल्या विधवाही तिकडे डोकें उघडें टाकून हिंडतात. महाराष्ट्रांत शौचशुद्धीस जलपात्रें घेऊन जातात, तर मलबारांत तें पात्र भ्रष्ट होतें म्हणून पाणीच घेऊन जात नाहींत. न्हाणीघरांत येऊन हस्तपाद व गुदप्रक्षालन करतात. दक्षिणेकडील पुरुषांना मोठमोठ्या शेंड्या असतात, महाराष्ट्रांत मध्यम असतात; मारवाडांत कांहीं पुरुष पुढें दोन मागें एक, किंवा टाळूवर दोन मागें एक अशा शेंड्या ठेवतात. मद्रासी लोकांप्रमाणें बंगालीहि बोडक्यानेंच हिंडतात. पण त्यांना शेंड्या लहान असतात. महाराष्ट्रीय ब्राह्मण कपडे न घालतां शक्य तर उघड्यानें किंवा अंगावर धाबळी, शाल, पंचा घेऊन संध्या करतो, तर हरीद्वाराकडील ब्राह्मण ओव्हरकोट, पायांत पायजमे, डोक्याला

चांगला फेटा बांधून हातहि गार होऊं नयेत म्हणून अर्घ्यपात्रानेंच संध्या करतात. तसें न केल्यास अती थंडीनें मृत्यूचा प्रसंग यावयाचा ! म्हणून मिताक्षराकार म्हणतो–

**' हिमवद्गिरिनिकटवर्तिनामुदकवासो नोपदिश्यते अतिशीताकुलिते वा शिशिरादिकाले तदा प्राणवियोगो भवेदिति '**

( याज्ञवल्क्य स्मृ. प्रा. प्र. श्लो. २९३ )

(७०) **भोजनांतील विधिनिषेधः**–महाराष्ट्रांतील सनातनी कांदा-लसूण, वांगें निषिद्ध समजतात, तर बंगाली ब्राह्मण स्वतः मासे खातात आणि कांदे खाणाऱ्यांना अधार्मिक समजतात. मलबारांत वांग्याला मध्व-गोल असें नांव आहे. कारण तें मध्वाचार्यांना फार आवडे. त्यामुळें त्याचें निषिद्धत्व गेलें. महाराष्ट्रांत आषाढी द्वादशीस वाघांट्या खाल्ल्या म्हणजे ' गोविंद गोविंद ' ध्वनि पोटांत उमटतो असें समजतात, तर सिंधमध्यें शिवरात्रीचे दिवशीं पल्ला मासा खाल्ल्यास पुण्य लागतें अशी समजूत आहे. महाराष्ट्रांत उंट, गाढव, डुक्कर अशुभ समजतात तर सिंधमध्यें गाढव व उंट हे दोन पशू अत्यंत उपयुक्त आहेत म्हणून त्यांचें अशुभत्व गेलेलें आहे. मांसाहारी लोक डुकराच्या मांसाची फार भलावणी करतात, आणि शीख संप्रदायांत तर वराहाला फारच पवित्र मानण्यांत येतें.

(७१) **स्त्रियांच्या वेशभूषाः**-स्त्रियांच्या वेशभूषेमध्येंहि असाच प्रकार आहे. महाराष्ट्रीय स्त्रिया बहुधा सकच्छ नेसतात तर गुजराथी स्त्रिया गोल नेसतात. नेमाड, मारवाड व उत्तरेकडे खालीं लहंगा व वर ओढणी असते. सिंध, पंजाबांतील स्त्रिया पुरुषांप्रमाणें पायजमे घालून खांद्यावर डोकें झाकण्यापुरेसें एक फडकें घेतात. स्त्रियांची नथा घालण्याची पद्धतही परस्परविरुद्ध आढळते. नाकेंहि उजवीकडे, डावीकडे किंबहुना मध्येंच टोंचलेलीं असतात. कुंकूंहि सर्वत्र एका रंगाचें नसतें. याचें कारण भौतिक व भौगोलिक परिस्थिति हेंच होय ! बंगालबहारांतील माणसें चिखल, दलदल व पाऊस यांशीं झगडत असतात. तर सिंधमधील मनुष्य धुळीशीं टक्कर देत असतो. तिकडे पावसाळा माहीतच नाहीं. हिंवाळा दहा पंधराच दिवस पण तो कडक असतो आणि उन्हाळा जवळ जवळ बारा महिने असतो. मलबारकडे बारा महिने पाऊस असतो परंतु चिखल नाहीं. या

सर्वांचा परिणाम धर्माचारावर होतो म्हणूनच धर्म हा देशकालसापेक्ष, बुद्धिगम्य, इहलोकसंबद्ध आहे, असें सिद्ध होतें.

गेल्या तीन चार प्रकरणांतील चर्चेवरून मीमांसापद्धति कशी अपुरी आहे, इतिहासपद्धति व बुद्धिप्रामाण्य यांचीच आज कशी आवश्यकता आहे याची वाचकांना कल्पना येईल. नवा हिंदुधर्म अखिल हिंदूकरितांच आहे. यास्तव आतां हिंदु, हिंदुत्व नि हिंदुस्थान यांच्या परस्परसंबंधाचें दिग्दर्शन पुढील प्रकरणीं करतों.

—*—

## प्रकरण सातवें

# हिंदु कोणास म्हणावें ? नि हिंदुस्थान कोणाचा ?

**(७२) हिंदु शब्दाच्या विविध व्याख्याः**–हिंदु शब्दाच्या आजवर अनेक विद्वानांनीं विविध व्याख्या केलेल्या आहेत. कांहीं व्याख्या वर्णनात्मक तर कांहीं व्यावर्तक अशा आहेत. जो हिंदु म्हणवून घेतो, जो हिंदु संस्कृतीला मानतो, जो हिंदु परंपरेचा अभिमानी आहे तो हिंदु, अशा व्याख्या कांहीं विद्वान करतात. रामकोशामध्यें आणि इतरत्र पुढील दोन व्याख्या दिलेल्या आहेत—

**हिन्दुर्दुष्टनृहः प्रोक्तोऽनार्याणांनीतिदूषकः ।**
**सद्धर्मपालको विद्वान् श्रौतधर्मपरायणः ॥**

दुष्टांना दंड करणारा, अनार्यांच्या नीतीचा विरोध करणारा, सद्धर्मप्रतिपालक व विद्वान तो हिंदु होय !

**हिनस्ति तपसा पापान् दैहिकान् दुष्टमानसान् ।**
**हेतिभिश्शत्रुवर्गांश्च स च हिंदुर्विधीयते ॥**

पापांचा नाश करणारा, अन्तर्बाह्य पवित्र, दैवी संस्कृतीचें रक्षण करणारा, प्रतिक्रियात्मक बुद्धीचा, तप, शस्त्र व शास्त्र यांचा उत्कट संगम ज्याच्या ठिकाणीं झाला आहे तो हिंदु. आततायीला दंड करणारा तो हिंदु.

मोठ्या नद्यांना व समुद्रालाही सिंधु म्हणतात. तीन्ही बाजूंनीं समुद्र आणि उत्तरेस सिंधु, गंगा, ब्रह्मपुत्रा अशा तीन नद्यांच्या जणुं तिपेडी केशकलापांनीं मर्यादित अशा देशांत जे राहातात ते सिंधु लोक होत. सिंधूचाच अपभ्रंश हिंदु हा आहे, असें कांहीं विद्वान म्हणतात.

(७३) **सर्वमान्य व्याख्याः**—हिंदु शब्दाची व्याख्या अतिव्याप्ति, अव्याप्ति हे दोष टाळून अहिंदूंना व्यावर्तक अशी दे. भ. बॅ. तात्याराव सावरकर यांनीं जी केली आहे तीच निर्दोष वाटते.

**आसिंधु सिंधुपर्यंता यस्य भारतभूमिका ।**
**पितृभूः पुण्यभूश्चैव स वै हिंदुरिति स्मृतः ॥**

तो हिंदु होय, कीं जो सिंधुनदीपासून तों समुद्रापर्यंत पसरलेल्या देशाला आपली ‘ पितृभू ’ मानतो; जी जाति सारखें आक्रमण करीत करीत व विस्तार पावत पावत, जें जें अंतर्भूत झालें तें तें पचवीत आणि जें जें पचविलें, त्याला त्याला महनीय स्वरूप देत, अखेर ‘ हिंदुजाति ’ म्हणून जगांत प्रसिद्ध झाली व ज्या जातीच्या उत्पत्तीचा धागा थेट वेदकालीन सप्तसिंधूशीं जाऊन पोंचतो, त्या जातीचें रक्त ज्याच्या अंगांत खेळत आहे; मुख्यतः संस्कृत भाषेंत जी आविष्कृत केली गेली व जी एक इतिहास, एक वाङ्मय, एक कला, एक शिल्पशास्त्र, एक कायदा, एक धर्मशास्त्र, एक आचार, एक संस्कार, एक तऱ्हेचीं क्रियाकर्में आणि विधिनियम, समान उत्सव आणि समान यात्रा, यांच्या समुच्चयानें जी बनली गेली आहे, अशी या ‘ हिंदुजाती’ची संस्कृति जो स्वतःची मानतो; आणि जो या सर्वांवर या भूमीला, या ‘ सिंधुस्थानाला ’ आपली ‘ पुण्यभू ’ समजतो; तिच्यांत आपले तत्त्ववेत्ते आणि ऋषी, अवतार आणि धर्मगुरु उत्पन्न झाले असें मानतो व हीच माझी पुण्यभूमि व तीर्थभूमि आहे अशी निष्ठा ठेवतो, तो ‘ हिंदु ’ होतो. समान राष्ट्र, समान जाति आणि समान संस्कृति हीं हिंदुत्वाचीं लक्षणें आहेत; आणि हीं सर्व लक्षणें मोजक्या शब्दांत सांगावयाचीं म्हणजे

अशीं कीं, ज्याला ' सिंधुस्थान ' हें केवळ ' पितृभू'च वाटतें असें नव्हे तर ' पुण्यभू'हि वाटतें तो हिंदु. हिंदुत्वाचीं पहिलीं दोन लक्षणें जीं ' राष्ट्र ' व ' जाति ' हीं ' पितृभू ' या शब्दानें व्यक्त होतात, आणि तिसरें अवश्य लक्षण जें ' संस्कृति ' हें ' पुण्यभू ' या शब्दानें विशेषेंकरून व्यक्त होतें.

**( ७४ ) हिंदुत्वाची व्याप्तिः**–आर्यसंस्कृतीच्या छत्राखालीं जो जो संप्रदाय आहे तो तो सर्व हिंदूच होय. जैन, लिंगायत, शैव, स्मार्त, वैष्णव, देवसमाजी, आर्यसमाजी, सत्यसमाजी, निरीश्वरवादी, सेश्वरवादी, आस्तिकवादी, नास्तिकवादी, ब्राह्मो, प्रार्थनासमाजी, शीख, गुरखे, इत्यादि सर्व हिंदूच होत. कारण या सर्वांची 'पितृभू' व 'पुण्यभू' हिंदुस्थानच आहे. वेदकालीन मंत्रद्रष्ट्या ऋषींपासून तों दयानंदापर्यंत, चार्वाकापासून तों आजच्या नास्तिकापर्यंत, जिनवरांपासून तों महावीरापर्यंत, कपिलसांख्यापासून तों आजच्या अणुवाद्या-पर्यंत, वीरबंदापासून तों बसवेश्वरापर्यंत, चक्रधरापासून तों चैतन्यापर्यंत, रामदासापासून तों राममोहनापर्यंत सर्व द्रष्टे आणि तत्त्ववेत्ते, आचार्य आणि साधु हे सर्व याच भूमींत जन्मास आले. म्हणून वरील सर्व संप्रदायांच्या अनुयायांना भारतभूंतील प्रत्येक धूलिकणाला वंदन करावेंसें वाटतें, कारण त्यांत पावित्र्य भरलें आहे. तात्पर्य जे जे या भूमीला पितृभू व पुण्यभू मानतात ते ते सर्व हिंदूच होत.

महार, मांग, चांभार, ढोर, भंगी, धेड इत्यादि सर्व पूर्वास्पृश्य हिंदूच आहेत. कारण त्यांची पितृभूमि व पुण्यभूमि हिंदुस्थानच आहे. हिंदुसमाजाशेजारीं जे रामोशी, भिल्ल, काठक, कोळी, बेरड, वडारी, कैकाडी, फासेपारधी, डोंबारी, कोल्हाटी, बेलदार, कातकरी, वारळी, मेणा, गोंड, वाघरी, भोई इत्यादि लोक आहेत तेहि सर्व संस्कृतीनें हिंदु असल्यामुळें हिंदूच होत. कारण त्यांचीही पितृभू व पुण्यभू हिंदुस्थानच आहे.

**(७५) जैन हे हिंदूचः**–दक्षिण महाराष्ट्रांत जैनांची वस्ती बरीच आहे. त्यांतील कांहीं आम्ही हिंदु नसून जैन आहों असें म्हणतात व हिंदुत्वाचा इनकार करतात. या त्यांच्या चुकीच्या समजुतीचें निराकरण करण्याकरितां हिंदूंच्या आचारविचाराशीं जैनांचें आचारविचारसादृश्य कसें आहे व हिंदुस्थान ही त्यांची पितृभू व पुण्यभू असल्यामुळें ते कसे हिंदूच आहेत, याचें थोडें दिग्दर्शन करतों.

जैनधर्म हा हिंदुस्थानांतच उत्पन्न झाला. अर्थात् त्यांची धर्मभूमि व पुण्यभूमि हिंदुस्थानच आहे. जैन धर्माचा संस्थापक जिनक व शेवटचा तीर्थंकर महावीर हे येथेंच जन्मले. महावीरापूर्वीचा तेवीसावा तीर्थंकर जो पार्श्वनाथ ( पारिसनाथ ) त्याचाहि जन्म येथेंच झाला. महावीरांचा जन्म उच्च क्षत्रिय कुलांत झाला. कोणी म्हणतात महावीर, पार्श्वनाथ हे दोघेहि इक्ष्वाकु कुलांतच जन्मले. इक्ष्वाकुकुलोत्पन्न रामचंद्रानें वालिवधाचे वेळीं ' चोरा, तूं कोण रे येथें आलास ? ' या वालीच्या प्रश्नास—

इक्ष्वाकूणां इयं भूमिः सशैलवनकानना ।
मृगपक्षिमनुष्याणां निग्रहानुग्रहेष्वपि ॥ —वा. रामायण

'अरे, ही पृथ्वी इक्ष्वाकूंची आहे' असें उत्तर दिलें. अर्थात् त्याच कुलांतील महावीर म्हणून ही भूमि त्यांची व त्यांचे सर्व अनुयायी निःसंशय हिंदूच होत. जैनांची पुण्यभूमि जशी हिंदुस्थान हीच आहे, तशीच त्यांचे वाडवडील येथें राहिले म्हणून हिंदुस्थान ही त्यांची पितृभू आहे. जैन हे रामकृष्णांना आपले तीर्थंकर समजतात. जैनधर्मावर हिंदूंच्या सूत-संस्कृतीचा पुष्कळ प्रभाव पडलेला आहे. इंद्रियसंयमनाचें महत्त्व सांगणारे जैन मुनी व यति आणि उपनिषदांतील ब्रह्मवेत्ते यांच्या यतिधर्मांत भिन्नत्व नाहीं. वेदांत व भागवतांत ज्याचा उल्लेख आला आहे असा ऋषभदेव हा हिंदूंना ऋषि म्हणून तर जैनांना तीर्थंकर म्हणून मान्य आहे. हिंसा व अहिंसा यांचा तारतम्यानें विचार हिंदु करतात. तें तारतम्य जैन धर्मांतहि आहे. जैन हे गृहस्थांचा अहिंसाधर्म निराळा, व यतींचा अहिंसाधर्म निराळा असें समजतात. हिंदुसमाजाशेजारीं जैन-समाज इतकीं शतकें आपल्या क्रियाकलापासह नांदत आहे. जैनांमध्यें श्वेतांबर, दिगंबर आणि ढुंडिया या नांवाचे पंथ आहेत. गुजराथ व काठे-वाडांतील जैन हे द्वारकाधीशाचे उपासक आहेत असें कोणी म्हणतात. जैनांचे चोवीस तीर्थंकर हिंदुस्थानांतच होऊन गेल्यामुळें त्यांच्या योगानें हिंदुस्थानला पुण्यभूत्व प्राप्त झालें आहे. ज्याप्रमाणें अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह अशीं पांच व्रतें भिक्षु व भिक्षुणींना त्याप्रमाणें दहा यतिधर्महि जैनधर्मामध्यें सांगितलेले आहेत. जैन गृहस्थाला बारा व्रतें पाळ-ण्याचा जो उपदेश आहे तो वैदिक गृहस्थाश्रमी मनुष्यालाहि लागू होणारा

आहे. जैनांमध्यें वैदिक हिंदूप्रमाणें जातिनिर्बंध कडक आहेत. अस्पृश्यांना ते आपल्या मंदिरामध्यें येऊं देत नाहींत. जात्युच्छेदाला जैन हे सनातनीप्रमाणेंच निष्ठुर विरोध करतात. जैन हे वेद मानीत नाहींत. तथापि त्यांचे सर्व विधि नि संस्कार पुढारलेल्या हिंदूंप्रमाणेंच आहेत. जैन लोक गंध लावतात, यज्ञोपवीत घालतात. हिंदूंसारखी विधवावपनाची रूढीहि जैनांमध्यें आहे. विवाहविधि ब्राह्मणाप्रमाणेंच होतो. पुष्कळ ठिकाणीं जैनांमध्यें ब्राह्मणच त्यांचीं लग्नें लावतो. मृतांचे संस्कार हिंदूंप्रमाणेंच आहेत. उत्तरक्रियेला पुष्कळ ठिकाणीं ब्राह्मण बोलावण्यांत येतो. अनंतचतुर्दशीसारखीं व्रतें हे लोक आचरतात. हिंदूंतील सोळा संस्कारांप्रमाणें जैनांमध्यें त्रेपन क्रिया आहेत. जैन धर्माचें तत्त्वज्ञान पुष्कळ बाबतींत हिंदु तत्त्वज्ञानाशींच मिळणारें आहे. पूर्वजन्म, कर्माप्रमाणें फल, कर्मबंधापासून मुक्त होण्याचा मार्ग वगैरे सिद्धांत हिंदु तत्त्वज्ञानाशींच जुळणारे आहेत. जीव, अजीव, पापपुण्य, बंध व मोक्ष हाच विषय जैनांच्या दर्शनांमध्यें आहे. आत्मा, कर्में व सृष्टि हीं नित्य आहेत असें जैनधर्म मानतो. पूर्णावस्थेला पोंचलेला आत्मा म्हणजे ईश्वर असें जैन तत्त्वज्ञान आहे. जैन ईश्वर मानीत नाहींत, ही समजूत चुकीची आहे. शास्त्रकार व विख्यात पंडित श्रीहरिभट सूरी यांनीं ईश्वर सर्वज्ञ, नित्य व मंगल असाच मानला आहे. ईश्वराकडे सृष्टीचें कर्तृत्व नाहीं, तो निर्माता, शास्ता व संहारकर्ता नाहीं, वगैरे जैन तत्त्वज्ञान हें सूक्ष्म दृष्टीनें विचार केल्यास वेदान्त तत्त्वज्ञानाशीं बऱ्याच प्रमाणांत मिळतें आहे. हिंदुस्थानांत ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकापासून तों सोळाव्या शतकापर्यंत जैन संप्रदायाचा अभ्यास करून प्रचार करणारे शेंकडों पंडित झाले. त्यांनीं संस्कृत, प्राकृत व हिंदी यांमध्यें आपलें ग्रंथभांडार उत्पन्न केलें तें सर्व पाहिलें असतां जैन हे सर्वस्वीं सनातन वैदिक हिंदूंशीं अत्यंत संबद्ध असे असून ते सर्व दृष्टींनीं हिंदूच आहेत असें म्हणतां येतें.

जैनांप्रमाणेंच लिंगायत, आर्यसमाजी, शीख हेहि सर्व हिंदूच आहेत. यांच्यासंबंधींही क्वचित् निराळी कल्पना उद्भवेल म्हणून हे सर्व कसे हिंदु आहेत याचें थोडक्यांत विवेचन करतों.

**(७६) लिंगायत तथा वीरशैव हेही हिंदूच:**—लिंगायत हेही हिंदूच आहेत. कारण त्यांची पितृभू व पुण्यभू हिंदुस्थान हीच आहे. वीरशैवाचे

पंच आचार्य रेवणसिद्ध, मरुळसिद्ध, एकोराम, पंडिताराध्य व विश्वाराध्य हे सर्व येथेंच जन्मले आणि त्यांनीं आपलें अवतारकृत्य येथेंच संपविलें. लिंगायत पंथाचे प्रचारक बसव व चन्नबसव, मडिवाल, प्रभुदेव, सिद्धराम, इत्यादि सर्व येथेंच जन्मले, व येथेंच कार्यकर्ते झाले. हिंदुस्थान हीच त्यांची कर्मभूमि, धर्मभूमि व पुण्यभूमि आहे. शैवशास्त्र हें वेदसंमत आहे. सामान्य शैव, मित्रशैव, मिश्रशैव, शुद्धशैव व वीरशैव अशा चारही पंथांमध्यें पंचयज्ञ आहेत, संस्कार आहेत, शिवपूजा आहे, लिंगधारण आहे. तात्पर्य सनातन वैदिक हिंदूप्रमाणें हाहि समाज पूर्ण हिंदु आहे.

(७७) **आर्यसमाजः**—आर्यसमाज हाहि कट्टा हिंदुसमाज आहे. आर्यसमाजाचे मोठमोठे वीर संस्कृतिरक्षणार्थ आत्मयज्ञ सारखे करीत आहेत. हिंदुस्थानांत आज मुसलमान व मिशनरी यांना तोडीस तोड देऊन हिंदुसमाजाचें रक्षण एकट्या आर्यसमाजानें केलें आहे. आर्यसमाज वेद-ग्रंथांना प्रमाण मानतो. वेद हे ईश्वरप्रणीत आहेत, किंबहुना हा एकच ग्रंथ ईश्वरप्रणीत आहे, अशी या पंथाची ठाम समजूत आहे. वेद व चातुर्वर्ण्य मानणारा, कर्म व पुनर्जन्म यांवर विश्वास ठेवणारा, पंचमहायज्ञाची आज्ञा करणारा, हिंदुस्थानाला पितृभू व पुण्यभू समजणारा हा समाज खास खास आर्य हिंदु होय.

(७८) **ब्राह्म व प्रार्थनासमाज हे हिंदूचः**—हिदुस्थानांत इंग्रजी राज्य सुरू होतांच युरोपियन संस्कृतीचा हिंदुधर्माशीं निकट संबंध येऊन नवयुगाला प्रारंभ झाला. त्या युगास साजेसा हिंदुधर्म व हिंदुसमाजामध्यें सुधारणा करण्याच्या दृष्टीनें जे एकेश्वरी संप्रदाय उत्पन्न झाले त्यांत बंगाल्यां-तील ब्राह्मसमाज आणि मुंबई इलाख्यांतील प्रार्थनासमाज हे प्रमुख होत. या दोन्ही समाजांचे संस्थापक, चालक व संवर्धक हे मूर्तिपूजा व जातीभेद यां विरुद्ध असले आणि वेद मानीत नसले तथापि ते उपनिषदें, वैष्णवभक्ति, संतांचा भक्तिमार्ग आणि ईश्वर मानतात. वेदांत शास्त्रांतील कर्मफलप्रक्रिया जवळ जवळ अक्षरशः मानतात म्हणून हे हिंदू होत. प्रारंभीं ब्राह्मसमाजांतील कांहीं आचार्यांचा, एकेश्वरी धर्माचे नांवाखालीं खिस्तीधर्माकडे ओढा होता, तथापि पुढें त्यांत पालट झाला. बंगालमध्यें ब्राह्म समाजाचा आणि मुंबई मद्रास प्रांतांत प्रार्थनासमाजाचा बराच विस्तार आहे. समाजसुधारणेचे

बाबतींत या दोन्ही समाजांनीं बरीच प्रगति घडवून आणलेली आहे. हे दोन्ही समाज हिंदूच आहेत. मूर्तिपूजा करणें व जातिभेद मानणें ही हिंदुत्वाची कसोटी नव्हे. या समाजांतील सर्व आचार्य व कार्यकर्ते येथेंच जन्मले म्हणून त्यांची पितृभू आणि पुण्यभू हिंदुस्थानच आहे.

( ७९ ) **शीखः**–शीख हेही हिंदूच आहेत. शीखांमध्यें सहजधारी, केशधारी, उदासी, निर्मल, गहनगंभीर आणि सिंधी असे जरी भेद असले, तथापि ते हिंदुस्थानालाच पितृभू व पुण्यभू मानतात. कारण वेदकालापासून त्यांचे पूर्वज याच भूमीवर राहिले व त्यांनीं भक्तिभावानें ईश्वराला आळविलें. शिखांच्या पूर्वजांची वस्ती तर पंजाबांत सरस्वती नदीचे कांठीं होती. त्या सरस्वतीला त्यांनीं सनातनी हिंदूंप्रमाणेंच मानलेलें आहे. वेद हे धर्मग्रंथ या दृष्टीनें जरी त्यांना प्रमाण नसले तथापि अत्यंत प्राचीन वाङ्मय, मानवजातीच्या इतिहासपूर्वकालीन अज्ञातदशेवर प्रकाश पाडणारें वाङ्मय या दृष्टीनें त्यांना ते वंद्य आहेत. शिखांची गुरुमुखी आणि पंजाबी या भाषांची उत्पत्ति संस्कृत भाषेपासूनच झाली म्हणून ती भाषाहि त्यांना वंद्य आहे. भारतरामायणांतील कथा, गंगायमुना या नद्या, तीर्थें, पवित्र स्थानें, हीं त्यांना मान्य आहेत म्हणूनच ही भारतभूमि त्यांना पुण्यभूमि वाटते. गुरु नानक, गुरु गोविंदसिंह, बंदा बैरागी व गुरु रामदास हे सर्व हिंदुस्थानांतच जन्मले, येथेंच वाढले, त्यांच्या प्रभावानें अमृतसर व मुक्तसर हीं पवित्र स्थानें झालीं आहेत.

(८०) **गुरखेः**–नेपाळांतील गुरखे लोक आणि नेपाळी लोक हे हिंदु नाहींत असें कोण म्हणेल ? मुसलमानांचे अनन्वित अत्याचार झाल्यावर ज्या पराभूत परंतु तेजस्वी रजपुतांनीं नेपाळांत जाऊन स्वतंत्र राज्यस्थापना केली, तेच हे गुरखे लोक. हे शिवभक्त आहेत, कडवे आहेत, गोरक्षा करणारे, अतएव गुरखे असें त्यांचें सार्थ नांव आहे. या लोकांनीं आर्यसंस्कृतीच्या रक्षणाकरितां कांहीं थोडें थोडकें रक्त सांडलेलें नाहीं. नेपाळचें राजघराणें गुरखा जातीचें आहे. शिवरात्रीचा उपास व उत्सव गुरखे करितात. पशुपतेश्वराचें स्थान बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक आहे. गुरख्यांच्या पुष्कळ चालीरीति रजपुतांप्रमाणें आहेत.

वरील विवेचनावरून ज्यांची पितृभू व पुण्यभू हिंदुस्थान आहे, ते सर्व हिंदूच कसे आहेत, याची यथार्थता पटेल. ज्यांची केवळ पितृभू व पुण्यभू हिंदुस्थान आहे तेच हिंदु आहेत असें नसून, ज्यांचा हिंदुसंस्कृतीविषयीं आदर आहे, ज्यांच्या ठिकाणीं हिंदुसंस्कृतीचे उच्च संस्कार आहेत, ज्यांच्या स्वभावांत हिंदुसंस्कृतीचे सहिष्णुता व उदारता हे गुण अन्यधर्मीयांशीं वागतांना दिसतात, ते सर्व हिंदूच होत. सुसंस्कृत, सज्जन, सहिष्णु, दैवी संपत्तीनें युक्त, मनानें उदार, धैर्यशील, पराक्रमी, शीलसंपन्न, कर्तृत्ववान अशी जी जी व्यक्ति असेल तिचा समावेश हिंदुसमाजांत करण्यास प्रत्यवाय नाहीं. स्वधर्मविषयींचा दुराग्रह सुटून वृत्तींत उदारता आली कीं हिंदुत्वच शिल्लक राहातें. कारण हिंदु हा उदार आहे.

येथवर हिंदु कोणास म्हणावें हें सांगितलें. आतां अखिल हिंदूंमध्यें सांस्कृतिक साम्य कसें आहे नि हिंदुस्थान हा हिंदूंचा कसा आहे याची कल्पना देऊन हें प्रकरण संपवितों.

**(८१) सांस्कृतिक साम्याचीं उदाहरणें:**—अखिल हिंदूंना संस्कृत भाषेविषयीं अत्यंत आदर आहे. कारण सर्व प्राकृत भाषांचा उगम संस्कृतापासून आहे. संस्कृतभाषासंभव संस्कृतीबद्दल भरतखंडाच्या चारी कोपऱ्यांत आदरभाव आहे. श्रुति, स्मृति, पुराणें, भारतरामायणादि ग्रंथ, शास्त्रें, सूत्रें हीं सर्व संस्कृतांत आहेत. जैनांचे धर्मग्रंथहि संस्कृतांत आहेत. आजहि संस्कृत भाषेमध्यें ग्रंथनिर्मिती होत आहे. खंडणमंडणें होतात, पूर्वोत्तर पक्ष होतात, तीं पाहिलीं म्हणजे संस्कृत ही मृत भाषा आहे, असें म्हणणाऱ्या वावदूकांना काय म्हणावें हें समजत नाहीं ! वेदांबद्दल आदर अखिल हिंदूंमध्यें आहे. ते समजोत वा न समजोत, त्यांचा अधिकार कांहींना असो वा नसो तथापि आदर सर्वत्र आढळतो.

अखिल हिंदूंचा इतिहास वेदकालापासून एकच आहे. श्रीरामचंद्राचें उज्ज्वल चारित्र्य, पांडवांचा इतिहास, हरिश्चंद्राचें सत्यव्रत, ध्रुवप्रल्हादांची तत्त्वनिष्ठा हीं सर्व हिंदूंमध्यें पसरलेलीं आहेत. अगदीं मागसलेल्यांमध्येंसुद्धां भारत व रामायण यांतील कविता, गाणीं, गोष्टी रूढ आहेत. अर्वाचीन इतिहास तर अखिल हिंदूंचाच आहे व तो हिंदूंनींच बनविलेला आहे.

अखिल हिंदूंचीं तीर्थें व पवित्र स्थानें एक आहेत. चार धाम, बारा ज्योतिर्लिंगें, सप्तपुऱ्या, गंगा, यमुना, गोदावरी, सरस्वती, नर्मदा, सिंधु, कावेरी, तुंगभद्रा अशा पवित्र नद्या, काशी, रामेश्वर, प्रयाग, गया, जगन्नाथ, द्वारका, अमृतसर हीं सर्व क्षेत्रें अखिल हिंदूंना पूज्य आहेत. कन्याकुमारीपासून बद्रि-केदारपर्यंत आणि द्वारकेपासून जगन्नाथपुरीपर्यंत जेवढीं म्हणून पवित्र स्थानें व तीर्थें आहेत तीं सर्व अखिल हिंदूंना पूज्य व वंदनीय आहेत. म्हणूनच जगन्नाथची रथयात्रा, अमृतसरची वैशाखी, कुंभ व अर्धकुंभ मेळे, श्रीशैल्यमल्लिकार्जुन यात्रा, श्रीक्षेत्र काशीची मकराची यात्रा, अर्धोदय व महोदयपर्वयात्रा अशा प्रसंगीं अखिल हिंदु लोटत असतात. या यात्रा म्हणजे महापरिषदाच होत. यांच्या योगानें जीवनाचा प्रवाह राष्ट्रामध्यें सतत वाहात ठेवला जात आहे.

अखिल हिंदूंचे सण, उत्सव वगैरे सर्व एक आहेत. दसरा, दिवाळी आणि होळी हे सण कोणच्या प्रांतांत नाहींत? दिवाळीचा सण असा आहे कीं त्या दिवशीं प्रत्येक झोपडींत कांहीं नाहीं तरी एखादी पणती पेटलेलीच दिसते. राखीबंधनाचा महोत्सवहि या ना त्या स्वरूपांत सर्वत्र आहे. सणांचे निमित्तानें अखिल हिंदूंमध्यें समष्टिधर्म वाढतो, दळणवळण वाढतें व सांस्कृतिक साम्य उत्पन्न होतें. अखिल हिंदूंचीं राम, कृष्ण, शिव, विष्णु, रुद्र, आदित्य, विठ्ठल, हनुमान, महाकाली, महासरस्वती इत्यादि दैवतें, ऋषि, मुनि, तीर्थंकर, शास्त्रकार, सूत्रकार, साधुसंत, धर्मसंस्थापक, संप्रदायप्रवर्तक वगैरे थोर पुरुष हे एकच असल्यामुळें त्याही द्वारानें हिंदु समाजांत एकरूपता आहे.

अखिल हिंदुजातींमध्यें आज एकाच तऱ्हेचें हिंदु-व्यवहारशास्त्र रूढ आहे. महाराष्ट्रांत विज्ञानेश्वर, कोंकणांत मयूखकार, बंगाल्यांत रघुनंदन भट्टाचार्य, जीमूतवाहन, दक्षिणप्रांतांत देवण्णभट्ट इत्यादि सुप्रसिद्ध पंडितांचे व टीकाकारांचेच ग्रंथ प्रमाण म्हणून मानण्यांत येतात. विवाह, दत्तक व दायविभाग या महत्त्वाच्या बाबतींत वरील पंडितांचीं मतें विचारांत घेऊनच आजचीं न्यायकोर्टें निवाडे देत असतात. या टीकाकारांत देशभेदामुळें क्वचित् मतभेद असले तथापि मुख्य विषयासंबंधानें त्यांची एकवाक्यता दिसते. व्यवहारांत जसे धर्मनिबंधकार प्रमाण मानतात तसेच आचारांत स्मृतिकार

आणि वेदांतांत द्वैतअद्वैतादि संप्रदायप्रवर्तक आचार्यांना प्रमाण मानतात.

अखिल हिंदूंचा हिंदुस्थान हा अखंड एक देश आहे. अखिल हिंदु ही अखंड एकजिनसी जाति आहे. तिच्यांत पुढारलेले व मागसलेले असे भेद असले तरी ते आतां नष्ट होण्याच्या मार्गांत आहेत. अखिल हिंदूंचा धर्म-अभ्युदयाचा धर्म–समाजधारणेचा धर्म–एक आहे. व्यावहारिक धर्म एक आहे. परमार्थिक मतभेद असले तरी ते अभ्युदयविघातक नाहींत. अखिल हिंदूंची संस्कृति एक असून देव, धर्म, भाषा, इतिहास, परंपरा यांमध्यें सादृश्य आहे हें वर दाखविलेंच आहे. यावरून हिंदुत्वाची आणि हिंदु-राष्ट्राची कल्पना पूर्णपणें येऊं शकेल.

(८२) **हिंदुत्वाची तेजस्विताः**–आज कांहीं हिंदु असे आढळतात कीं त्यांना हिंदु म्हणून घेण्याची लाज वाटते. हिंदुत्व, हिंदुपण हें कांहीं फुकाचें आलेलें नाहीं. त्याकरितां हिंदुराष्ट्राच्या इतिहासाचें पान नि पान हुतात्म्यांच्या रक्तानें भरलेलें आहे. वेदकालापासून या हिंदुत्वाकरितां या हिंदुराष्ट्रांत अनेक धर्मवीरांनीं, बुद्धिमंतांनीं व शौर्यवंतांनीं, शक्तिवानांनीं व युक्तिवानांनीं आपलें सर्वस्व वेंचलेलें आहे. अर्वाचीन काळांत रजपुतांनीं, शीखांनीं, मराठ्यांनीं या हिंदुत्वाकरितां आपल्या रक्ताचा सडा शिंपडला आहे. एक काल असा होता कीं हिंदु म्हणवून घेण्यानेंच शिरापासून धड वेगळें होत असे, नि अहिंदु म्हणवून घेतांच वाटेल तें ऐहिक ऐश्वर्य मिळत असे. परंतु पूर्वजांनीं तें ऐश्वर्य लाथाडून हिंदुत्व स्वीकारलें व तें लाखों प्राणांचें मोल देऊन टिकविलें. हिंदु म्हणवून घेण्याकरितां संभाजी महाराजांनीं मोठें दिव्य पत्करलें. त्यांच्या वधाचें भीषण दृश्य आज डोळ्यांपुढें उभें राहिलें कीं काळीज करपून जातें! गुरु तेजबहादर यांनीं आपल्या तीनशें शिष्यांसह करवतीच्या धारेखालीं हिंदुत्वाकरितां खसखसा चिरून घेतलें! बंदा बहा-दुराच्या दिव्याला तर जगांत तोड मिळणार नाहीं. बंदाच्या देखत त्याच्या पुत्राचा वध केला. त्याचीं आंतडीं बंदाचें मुखांत घातलीं. बंदाचे डोळे फोडले, पाय कापले, हात छाटले, तरी दुःखाचा श्वासहि न सोडतां, डोळ्यां-तून एक अश्रुबिंदूहि न ढाळतां, बंदानें स्थितप्रज्ञतेनें 'हिंदु हिंदु' अशी घोषणा करीत प्राणत्याग करून स्वर्गारोहण केलें !! राजपुतान्यांतील सतींनीं हिंदुत्वा-करितां आणि पातिव्रत्याकरितां स्वतःच्या हातानें धडाधड अग्नी पेटवून

त्याला वीरत्वानें आलिंगन दिलें. अशा तऱ्हेचीं कितीतरी उदाहर इतिहासांत घडलेलीं आहेत. अशा उग्र तपस्येनें मिळविलेलें हिंदुत्व सोडावयास तयार होणें हें अधमपणाचें नाहीं काय? हिंदुत्वाची राखरांगोळ करून मिळालेलें ऐश्वर्य वा स्वातंत्र्य, वा इंद्रपदसुद्धां नको आहे. उज्ज्व हिंदुत्वापुढें हीं सर्व तुच्छ आहेत. हिंदुत्व गमावून इंद्राचें ऐश्वर्य भोगण्या पेक्षां हिंदु म्हणून त्याचे रक्षणार्थ, मरण्यांत व मारण्यांत स्वर्गीय आनं आहे.

(८३) **हिंदूंचा हिंदुस्थानः**–हिंदुत्वाच्या विकासाचें स्थान आणि निवासाचें स्थान हिंदुस्थानच होय. हिंदुस्थान हें हिंदूंचें स्थान आहे, तसेंच राहिलें पाहिजे. अफगाणांचें अफगाणिस्थान, बलुच्यांचें बलुचिस्थान अरबांचें अरबस्थान, इंग्लिशांचें जें स्थान (लँड) तें इंग्लंड, तद्वत् हिंदूं जें स्थान तें हिंदुस्थानच होय. या हिंदुस्थानाकरितां हिंदूंनीं आजव आत्यंतिक त्याग केलेला आहे. ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकापासून आलेक डरायस, शिकंदर, ग्रीक, हूण, शक, श्वेतहूण, सिथियन इत्यादींचीं आक्र मणें हिंदूंनींच आपले प्राण पणाला लावून परतविलीं आहेत. तत्त्वज्ञान समाजधारणा, विज्ञान, शिल्प, राजकारण, धर्मस्थापना अशीं जगात थक्क करणारीं कार्यें या हिंदुस्थानांतच हिंदूंनीं केलेलीं असल्यामुळें हिंदुस्था हा हिंदूंचाच आहे व तो तसाच टिकला पाहिजे.



## प्रकरण आठवें

# देशकालविचार

मागील प्रकरणांत हिंदु, हिंदुत्व व हिंदुस्थान यांचें व्याख्येस विवेचन केलें. आतां नवा हिंदुधर्म हा कोणत्या देशांतील आणि कोणत कालांतील हिंदूंना उद्देशून आहे, याचा विचार 'देशकालौ संकीर्त्य' परिपाठीप्रमाणें करावयाचा आहे.

(८४) **स्मृतिकारांच्या देशमर्यादा:**– प्राचीन स्मृतिकारांनीं आपापल्या स्मृतींत आचार, व्यवहार, प्रायश्चित्ताचा विचार केलेला आहे. तो सामान्यत्वानें सर्व हिंदुसमाजाकरितां असला तरी विशेषत्वानें स्मृतिकार ज्या प्रदेशांत होते, तेथील लोकांना उद्देशूनच त्यांनीं सांगितलेला आहे. कारण भिन्न कालीं व भिन्न स्थळीं भिन्न भिन्न स्मृतिकार झाले आहेत. त्यांनीं आपापल्या दृष्टीनें देशमर्यादा ठरवून धर्म सांगितलेला आहे असें बौधायन, विष्णु या धर्मसूत्रांवरून आणि मनु व याज्ञवल्क्य या स्मृतींवरून दिसतें.

बौधायन म्हणतो,–पूर्वेस विनशन, पश्चिमेस कालकावन, उत्तरेस हिमालय व दक्षिणेस पारियात्र यांमध्यें जो देश आहे तो आर्यावर्त होय. बौधायनकालीं गंगा व यमुना यांचेमधील प्रदेशास आर्यावर्त समजणाराही एक वर्ग होता. भाल्लवी हे ब्रह्मवर्चस् या देशाची व्याख्या निराळीच करीत. अवंति, अंग, मगध, सौराष्ट्र, दक्षिणापथ हे देश त्या कालीं संकीर्ण लोकांचे होते. तेथें गेल्यास प्रायश्चित्त घेतलें पाहिजे, असें बौधायन म्हणतो.

(बौ. प्र. १ अ. १)

वसिष्ठानें आर्यावर्ताच्या पूर्व, पश्चिम व उत्तर सीमा बौधायनाच्याच सांगितल्या असून विंध्यपर्वत ही दक्षिण सीमा स्पष्ट केली आहे. वसिष्ठकालीं हिमालय व विंध्य यांमधील प्रदेशास आर्यावर्त समजूं लागले. (व. अ. १.७)

चातुर्वर्ण्यव्यवस्था जेथें आहे तो आर्यावर्त, व जेथें ती व्यवस्था नाहीं तो म्लेंच्छ देश, अशी विष्णुधर्मसूत्रांत देशमर्यादादर्शक व्याख्या दिलेली आहे. (वि. ध. सू. अ. १)

मनूनें आर्यावर्ताशिवाय ब्रह्मावर्त, ब्रह्मर्षिदेश, मध्यदेश यांच्या व्याख्या दिलेल्या आहेत. त्यावरून या सर्व प्रदेशांतील लोक हा मनूच्या धर्मप्रतिपादनाचा विषय असावा असें दिसतें. पूर्व व पश्चिम समुद्रांमधील आणि हिमालय व विंध्य पर्वतांमधील सर्व भागास मनु आर्यावर्त समजतो, असें दिसतें. या आर्यावर्तांत देवनिर्मित ब्रह्मावर्त देश, कुरुक्षेत्र, मत्स्य, पंचालशूरसेनादि देश मिळून बनलेला ब्रह्मर्षि देश; प्रयाग व विनशन आणि हिमालय व विंध्य या चतुःसीमेंतील मध्यदेश हे सर्व देश होते. द्विजांनीं याच देशाचा आश्रय करावा असें मनु अट्टाहासानें सांगतो.

(म. स्मृ. अ. २ श्लो. १७–२४)

उत्तरं यत्समुद्रस्य हिमाद्रेश्चैव दक्षिणम् ।
वर्षं तद्भारतं नाम भारती यत्र संततिः ॥ विष्णुपुराण २–३–१

अशा प्रकारें देशमर्यादा आखून घेऊन जेथें चातुर्वर्ण्य आहे, जेथें तीन वर्ण ब्राह्मणांच्या तंत्रानें वागत आहेत, ब्राह्मण जो धर्म सांगत आहे, तो राजा व्यवहारांत आणतो आहे, अशा परिस्थितींत कोणीं कसें धर्माचरण करावें याचा विचार जुन्या हिंदुधर्मामध्यें पुष्कळ केलेला आहे.

(८५) **नव्या हिंदुधर्माचें क्षेत्र**:—नव्या हिंदुधर्माला संबंध हिंदुस्थानांतील आणि सर्व जगांतील हिंदूंना सामान्यत्वानें धर्मोपदेश करावयाचा आहे. शिक्षण, वाहातुक, ज्ञानाचा प्रसार, आगगाड्या, आगबोटी, मोटारी, विमानें यांचें दळणवळण वाढल्यामुळें बदललेल्या काळांत आणि वाढलेल्या प्रदेशांत जे नवे प्रश्न उपस्थित झाले आहेत त्यांची व्यवस्था लावणें भाग असल्यामुळें जगांतील सर्व हिंदु हे नव्या हिंदुधर्माचे विषय होऊं शकतात. हिमालय ते सिंहलद्वीप व द्वारका ते सयाम या भागांतील यच्चयावत् हिंदूंना हिंदु म्हणून, हिंदु राष्ट्र म्हणून आणि हिंदु संस्कृतीचे घटक म्हणून कसें वागलें पाहिजे हें सांगावयाचें आहे. पंजाबी, मद्रासी, बंगाली, महाराष्ट्रीय हिंदु असें वर्गीकरण होऊं शकतें, त्याप्रमाणेंच जपानी हिंदु, अमेरिकन हिंदु, इंग्लंडांतील हिंदु असेंही तेथें राहणाऱ्या हिंदूंना म्हणतां येईल. कांहीं असलें तरी सर्व हिंदूंचे मनावर हिंदुधर्माचे संस्कार सारखेच आहेत आणि जाति, वर्ण, विवाह, व्यवसाय, विटाळ यांसंबंधाचें समष्टिधर्माचें निरूपण सर्व हिंदूंना सारखें लागू होणार आहे. विशेष रूढि, चालीरीती या जरी निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळ्या असल्या तथापि हिंदुधर्मातील मुख्य मध्यवर्ती कल्पना सर्वांना सारख्याच आहेत म्हणून हा ग्रंथ केवळ महाराष्ट्राकरितांच आहे असें नाहीं. याचा अनुवाद हिंदी, बंगाली, कानडी, गुजराथी* अशा सर्व भाषांमध्यें होणें अवश्य आहे.

(८६) **कलियुग का कृतियुग ?**:—याप्रमाणें नव्या हिंदुधर्माची सामान्यत्वानें आणि विशेषत्वानें देशमर्यादा सांगितल्यानंतर हा ग्रंथ कोणत्या

---

*या ग्रंथाचा गुजराथी अनुवाद आम्हीं केला असून तो लौकरच बडोदें सरकारचे आश्रयानें प्रसिद्धीस येईल अशी आशा आहे.

कालांतील हिंदूकरितां आहे हें सांगितलें पाहिजे. जुन्या हिंदुधर्मानें आजचा हा कलिकाल आहे, हें कलियुग आहे अशी कल्पना ग्रहण करून त्या भूमिकेवरून धर्म सांगितलेला आहे. नव्या हिंदुधर्माला **कलिकल्पना सर्वस्वीं अमान्य आहे.** जगांत ज्याप्रमाणें आजचें युग हें कृतियुग आहे ( म्हणजे करणाऱ्यांचें युग आहे ) तेंच नवा हिंदुधर्म ग्राह्य मानतो व जुन्या हिंदुधर्मांतील तर्कदुष्ट कलिकल्पना अग्राह्य समजतो. यास्तव कलिकल्पनेची अयथार्थता थोडी चिकित्सा करून पटविणें अवश्य वाटतें.

( ८७ ) **वेद व स्मृति यांतील चतुर्युगं**:-कृतादि शब्द ऐतरेय ब्राह्मणांत आले आहेत. पण तेथें त्यांचा अर्थ युगवाचक नाहीं. पुराणांतील युगकल्पना ब्राह्मणग्रंथांत नाहीं. तेथें निराळा अर्थ दिसतो. तैत्तिरीय संहितेंत ( ४, ३, ३ ) युगकल्पना आहे. परंतु त्या ठिकाणीं कृत, त्रेता व द्वापर हीं तीनच नांवें आढळतात. पुराणांत कृत, त्रेता, द्वापर व कलि असा युगक्रम आहे. परंतु ऐतरेय ब्राह्मणांत ( ७, १५ ) कलि, द्वापर, त्रेता व कृत असा अनुक्रम आहे. मूळ ब्राह्मण ग्रंथांतील कल्पना, तिचा स्मृतिकारांनीं केलेला अनुवाद व पुढें त्याला निराळें स्वरूप कसें आलें, हें पुढील वचनांवरून समजेल—

**कलिः शयानो भवति संजिहानस्तु द्वापरः ।**
**उत्तिष्ठंस्त्रेता भवति कृतं संपद्यते चरन् ॥**—ऐतरेय ब्राह्मण

याचाच अनुवाद मनुस्मृति अ. ९ मध्यें पुढीलप्रमाणें आहेः—

**कृतं त्रेतायुगं चैव द्वापरं कलिरेव च ।**
**राज्ञो वृत्तानि सर्वाणि राजा हि युगमुच्यते ॥३०१॥**
**कलिः प्रसुप्तो भवति स जाग्रद्द्वापरं युगम् ।**
**कर्मस्वभ्युद्यतंस्त्रेता विचरंस्तु कृतं युगम् ॥३०२॥**

महाभारतांत चतुर्युगाबद्दल पुढील विचार आहेत—

**राजा कृतयुगस्रष्टा त्रेताया द्वापरस्य च ।**
**युगस्य च चतुर्थस्य राजा भवति कारणम् ॥**१२।६९।९८
**राज्ञः प्रमाददोषेण दस्युभिः परिमुष्यताम् ।**
**अशरण्यः प्रजानां यः स राजा कलिरुच्यते ॥** १२।१२।२९

राजैव युगमुच्यते।१२।९१।६
दंडनीत्यां यदा राजा सम्यक्कात्स्न्येंन वर्तते।
तदा कृतयुगं नाम कालसृष्टं प्रवर्तते ॥१२।६९।८०
कालो वा कारणं राज्ञो राजा वा कालकारणम्।
इति ते संशयो मा भूत् राजा कालस्य कारणम् ॥
१२।६९।७९

भावार्थः—झोपीं गेलें कीं कलियुग लागतें, जाग आली कीं द्वापरास प्रारंभ होतो, उठून बसणें हें त्रेतायुगाचें लक्षण व उद्योगास लागणें म्हणजे कृतयुग होय.

कृत, त्रेता, द्वापर व कली हीं सर्व राजाच्या वागणुकीवर अवलंबून असतात, म्हणून राजा हाच युग होय. राजा निजला कीं कली, जागृत झाला कीं द्वापर, कर्तव्य करण्यास उद्युक्त झाला कीं त्रेता व साक्षात् तें करूं लागला कीं कृतयुग सुरू होतें.

कृत, त्रेता, द्वापरयुगाचा स्रष्टा व कलियुगनिर्माताही राजाच होय. राजा हाच सर्व युगांचें कारण आहे. राजाच्या चुकीमुळें चोरांकडून प्रजा लुटली जाते; प्रजांचें रक्षण करण्यास जो राजा असमर्थ असतो त्यास कली असें म्हणावें. राजा जेव्हां उत्तम प्रकारें दंडनीतीचें धारण करतो तेव्हां कृतयुग नांवाचें कालचक्र चालू होतें. काल हें राजाचें कारण, कां राजा हें कालाचें कारण असा संशय न आणतां 'राजा कालस्य कारणं' असेंच समजावें.

**(८८) युग शब्दाचा मूळ अर्थः**—युग शब्दाच्या अर्थाबद्दल आणि कालाबद्दलही विपर्यस्त कल्पना पुढें आलेल्या आढळतात. वेदांग—ज्योतिषा-मध्यें 'पंच—संवत्सरमयं युगं' मानलें असून त्या पांच वर्षांचीं नांवें संवत्सर, परिवत्सर, इदावत्सर, अनुवत्सर व इद्वत्सर अशीं सांगितलीं आहेत. वेदांगज्योतिषाचा काल खिस्तपूर्व ११८१ वर्षे हा आहे. बौधायन, गर्ग व वेदांगज्योतिषकार हे समकालीनच होत असें दिसतें. वेदांच्या सहा प्रसिद्ध अंगांपैकीं ज्योतिष हें एक अंग असून वेदांगज्योतिषग्रंथाला युगकल्पनेच्या संख्येच्या दृष्टीनें पुराणापेक्षां अधिक प्रामाण्य आहे. वेदांगज्योतिषाप्रमाणें इतरत्रहि असेच उल्लेख आहेत.

**युगस्य पंचवर्षस्य कालज्ञानं प्रचक्षते ।** —वेदांगज्योतिष
**युगमाहुः पंचाब्दं रविशशिनोः संहितांगकाराये-**
—ब्रह्मसिद्धांत अ. ११

**रविशशिनोः पंचयुगं वर्षाणि पितामहोपदिष्टानि**—वराहमिहिर

या सर्व आधारांवरून पंचसंवत्सरमय युग असें गणित त्या काळीं होतें असें दिसतें. पुराणनिरीक्षणकर्ते काळे असें म्हणतात कीं ही वैदिक कालगणनापद्धति नाभानेदिष्टानें सुरू केली असावी. व्यासांच्या वेळचें युगाचें कोष्टक असें होतें:—

४ वर्षें = १ युग, ७२ युगें = १ मन्वंतर = २८८ वर्षें, १४ मन्वंतरें = १ कल्प = ४०३२ वर्षें. या संख्येचा विचार केला म्हणजे चार लक्ष बत्तीस हजार वर्षांचें हें खूळ कसें आलें याबद्दल आश्चर्य वाटतें !

(८९) **महाभारतांतील आधारः**—चार चार वर्षांचींच चतुर्युगें होतीं, हें ठरविण्याला महाभारतांत एक प्रबळ पुरावा सांपडतो. पांडवांचा वनवास अवघा बारा वर्षांचा होता हें सर्वश्रुत आहे. पण त्यांत तीन ठिकाणीं युगसंधीचा विचार आला आहे.

**संधिरेष नरश्रेष्ठ त्रेताया द्वापरस्य च ।** —वनपर्व १२१—१९
**संधिर्द्वयोर्नरश्रेष्ठ त्रेताया द्वापरस्य च ।** —वनपर्व १२५—१४
**एतत्कलियुगं नाम अचिराद्यत्प्रवर्तते ।** —वनपर्व १४९—३७

वनपर्वांतील सर्व वाक्यांवरून बारा वर्षांच्या अवधींत एकदां त्रेताद्वापरांचा संधी होता आणि एकदां द्वापरकलींचा संधी होता असें दिसत आहे. अर्थात् हीं युगें चार वर्षांचीं मानल्यावांचून गत्यंतर नाहीं. गदापर्वांत ' प्राप्तं कलियुगं विद्धि ' असेंही वाक्य आहे. महाभारतांतील इतर पर्वांतही अशीं अनेक वाक्यें आहेत कीं त्यांची संगति कलि हा १०००।१२०० वर्षांचा होता, या कल्पनेनें मुळींच लागत नाहीं.

( ९० ) **पौराणिक युगकल्पनाः**—चार किंवा पांच वर्षांचें युग असतांना पौराणिकांनीं ती मर्यादा वाढवून कडेलोट केला. कलियुगाची वर्षसंख्या देवमानानें चार लक्ष बत्तीस हजार वर्षांची ठरविली. त्यांचा संधी व संध्यांशकाल देवमानानें दोनशें संवत्सरांचा गणला गेला. ( मत्स्य-

पुराण अ. १६४ ). धर्मसूत्रांपैकीं विष्णुधर्मसूत्रांत ही कल्पना प्रथम मांडलेली दिसते—

**यदुत्तरायणं तदहर्देवानाम् । दक्षिणायनं रात्रिः । संवत्सरोऽहोरात्रः ततूत्रिंशता मासः द्वादशमासा वर्षं । द्वादशवर्षशतानि दिव्यानि कलियुगम् । द्विगुणानि द्वापरम् । त्रिगुणानि त्रेता । चतुर्गुणानि कृतयुगम् ॥** –विष्णुधर्मसूत्र अ. २०

**भावार्थः**–उत्तरायण हा दिवस व दक्षिणायन ही रात्र. सबंध एक मानवी वर्ष म्हणजे देवांची अहोरात्र, असे तीस अहोरात्र म्हणजे एक महिना, अशा बारा महिन्यांचें एक वर्ष, आणि याप्रमाणें देवांच्या बाराशें वर्षांपर्यंत कलियुग असतें. या हिशेबानें कलीची वर्षसंख्या चार लक्ष बत्तीस हजार वर्षें ठरते. पंचांगाच्या मुखपृष्ठावर गतकली व शेषकली अशी संख्या दिलेली असते. ती पाहिली म्हणजे कलीचा हा प्रथम चरण चालला असून फक्त त्याचीं पांच हजारांपेक्षां कांहीं अधिक वर्षें संपलीं आहेत, असा बोध होतो. म्हणजे आज जी अवनति आहे ती कांहींच नाहीं, याहीपेक्षां फार वाईट दिवस यावयाचे आहेत, अशा कल्पनेनें हिंदुसमाज ग्रस्त झालेला आहे. ही युगाची वर्षसंख्या अत्यंत भ्रामक आहे हें वर वेदांगज्योतिष व महाभारत यांचे आधारें दाखविलें. त्यालाच पोषक अशीं आणखी दोन आधुनिक विद्वानांचीं मतें येथें नमूद करतों.

**(९१) विद्वानांचीं मतेंः**–(१) ‘कलियुगारंभ इ. स. पू. ३१०१ सालीं झाला असें आर्यभट्टादि ज्योतिषांनीं गणितानें ठरविलें; पण त्या वेळीं युगांची वर्षसंख्या ३६० नें गुणिल्यामुळें भलतीच वाढून बसली होती ! ऋग्वेदकालीं युगांचें कालमान अगदीं कमींत कमी चार वर्षांचें होतें. तैत्तिरीय संहितेंत तें पांच वर्षांचें झालेलें दिसतें. ही किमान मर्यादा झाली. पण युगांची कमाल मर्यादा कोठें शंभर तर कोठें १०००, तर कोठें १०,००० पर्यंतही जात असे; पण सामान्यतः एक हजार वर्षांचें युगचक्र ( चतुर्युग किंवा महायुग ) सर्वमान्य दिसतें. पुढें या युगकालाची रोजच्या दिवसाशीं साम्यता कल्पिल्यानें त्याला संधिकालाची जोड मिळून संधिकालासह बाराशें वर्षांचें युगचक्र ठरलें.’ ( श्री. ज. स. करंदीकर–चित्रमयजगत् जानेवारी १९२२ ).

(२) ' युग म्हणजे तीच गोष्ट पुनःपुनः होण्याचा काळ. अशीं अनेक युगें तेव्हां माहीत असावीं. वर्ष हें एक युगच आहे. कारण वर्षानें पुनः तोच ऋतु परतून येतो. चार वर्षें हेंही युगच आहे. कारण तेव्हांच्या कालगणनापद्धतीप्रमाणें चौथ्या वर्षीं विषुवान् येत असे. पांच वर्षें हेंही युगच आहे. कारण वेदांगज्योतिषांत पांच वर्षांचें युग मानलें असून तैत्तिरीय ब्राह्मणांत ( १, ४, १० ) पहिलीं चार वर्षें व त्यांचे स्वामी सांगितले आहेत...

सर्व पुराणांच्या मतें कलियुगाच्या दुप्पट द्वापर, तिप्पट त्रेता व चौपट कृत आहे. या शब्दांचे जे दुसरे अर्थ आहेत, त्यांवरून हेंच सिद्ध होतें. यावरून कलि १००, त्रेता २००, द्वापर ३०० व कृत ४००. चार युगांचीं मिळून १००० वर्षें होतात. हजार वर्षें हें एक महत्त्वाचें कालमान होतें व त्या कल्पाच्या शेवटीं द्वादशवार्षिक यज्ञ करीत; असा सिद्धान्त निघतो. ' ( श्री. कं. ल. दप्तरी—वैदिक कालगणनापद्धति )

**( ५२ ) कलिमाहात्म्याचा सारांशः**—कलीची वर्षसंख्या पुराणकालीं जशी उगाच फुगविलेली आहे, तसेंच कलीचें महात्म्यही भीतिदायक, भरमसाट, निष्क्रियतेला उत्तेजक अशा तऱ्हेचें वर्णिलेलें आहे. स्मृतिकारांपैकीं मनु, याज्ञवल्क्य सोडल्यास सर्व स्मृतिकार कलीची भीति बाळगून वर्णसंकरानें व्यामोहित होऊन प्रायश्चित्तधर्मच सांगतात असें दिसतें. आसन्नमरण रोग्याला जसा वैद्य मृत्युपत्रावर स्वाक्षरी करण्यापुरेशी धुगधुगी राहावी म्हणून मात्रेचे वळसे देतो, तीच गत स्मृतिकारांची झालेली आहे. पौराणिकांनीं आणि साधुसंतांनीं कलिप्रयुक्त परिस्थितीचें जें वर्णन केलें आहे तें वाचून छातींत धडकीच भरेल ! मनुष्य निराशेनें म्हणेल कीं, ' बा कले, तुला नमस्कार असो ! तुझा प्रताप मोठा. मी तुला शरण आलों आहें. म्हणून कलिप्रयुक्त दुराचार मी सहन करावयाला सिद्ध आहें !!! '

कलि आला रे आला कीं तो जगांत अधर्म माजवितो, नीति बुडवितो, सत्य, न्याय, दया, परोपकार यांचा नायनाट करतो; जगांतील चांगलें नष्ट करून जेवढें वाईट असेल त्याचा तो पुरस्कार करतो ! अध्यात्मरामायण, भागवत आणि इतरत्र जें कलिमाहात्म्य आहे, त्याचा सारांश थोडक्यांत आहे तो असाः—

'सर्व वर्ण शूद्रप्राय होतील. ब्राह्मण क्रियाभ्रष्ट होतील. गाई दूध देणार नाहींत. पतिव्रता कृत्या होतील. जानवें ही द्विजत्वाची खूण राहील. साधु ढोंगी होतील. पाऊस वेळेवर पडणार नाहीं. धर्म सांगणारे पाखंडी होतील. राजा प्रजेला पिळून काढील. पुत्र बापाचें ऐकणार नाहींत. पतिपत्नींचे कलह होतील. मुलगा आईला बायकोचीं लुगडीं धुवावयाला लावील. विषयसुखावर जन आसक्त होतील. अर्थ हाच एक पुरुषार्थ राहील. मोक्षाचा विचार कोणीच करणार नाहीं. भावाभावांत प्रेम राहणार नाहीं. भावाबहिणींचें जमणार नाहीं. जावा आणि नणंदा कलह करतील. अतिवृष्टि, अनावृष्टि व रोग यांनीं लोक त्रस्त होऊन जातील. अग्नि आणि वीज यांचे उत्पात होतील. संन्याशांना कोणी विचारणार नाहीं. देवब्राह्मणांची अवहेलना होईल. लोक पापाचरण निःशंकपणें करतील. पंडित उदरंभरी होतील. कुकर्माचरणाला महत्त्व येईल. सदाचारवानाचा अपमान होईल. त्रेतायुगांतील माणसें अत्यंत नीतिसंपन्न, सुशील, धिप्पाड अशीं होतीं. रामचंद्राची सीता सात ताडांइतकी उंच होती. तेव्हांपासून माणसें दुर्बल व खुरटीं होऊं लागलीं आहेत. दिवसानुदिवस माणसें अशींच खुरटीं होणार. तीं इतकीं कीं, केव्हांतरी यांना हरभऱ्याच्या झाडाला शिडी लावून घांटे तोडण्याचा प्रयत्न करावा लागणार! आणि इतकी दुर्बलता आल्यावर कलीचें पूर्ण राज्य होणार!!!'

हा सर्व अनर्थ कलियुगांत होणारच आहे व तो झालाच पाहिजे, अशी समजूत झाली कीं, मनुष्य अन्यायाचा प्रतिकार करण्यास कसा सिद्ध होईल? जगांत सर्व वाईट आहे आणि वाईटच व्हावयाचें असें म्हटल्यानंतर सद्गुण, सत्कार्य, सद्धर्म, सत्प्रवृत्ति यांचा स्वीकार करण्यास कोणीतरी तयार होईल काय?

(९३) **कलिसंतरणोपायः**—मोठें वादळ सुटावें, परचक्र यावें किंवा आग लागावी, अशा वेळीं जो जें सांपडेल तें घेऊन जसा पळत सुटतो, तीच स्थिति हिंदु समाजाची झालेली आहे. कलियुगांत घोर आचार व विचार होणार. पाप फार, आयुष्य कमी, साधनें कमी म्हणून झटपट मोक्षाचा मार्ग सांगण्याकरितां कोणी सत्यनारायण, तर कोणी सत्यविनायक आणि यांसारखीं शेकडों व्रतें समाजाला सांगितलीं. पौराणिक व्रतावैकल्यांची

भूमिका कलिकल्पनेवरच अधिष्ठित आहे. अनेक व्रतें व दानें, अन्नसंतर्पणें हीं या कलिकालांत तरून जाण्याकरितां सांगितलीं आहेत. साधुसंतांनीं तर कलियुगांत अनर्थ होणार, धर्म लोपणार, नीति नष्ट होणार, आचार बुडणार व शेवटीं जगाचा अंत होणार असें पाहून त्यांतून सुटका होण्याकरितां नाममाहात्म्याचीं स्तुतिस्तोत्रें गायलीं. एक नाम, देवाचें नांव, रामकृष्ण हरी हा छंद जिभेला लागला, कीं आत्मोद्धार व जगदुद्धार होतो, असें पुराणांतील वचनांच्या आधारानें सांगून समाजाला त्यांनीं कांहीं अंशीं निर्भय केलें पण पुष्कळ अंशीं निष्क्रियही केलें.

विविध पुराणांमध्यें कलिसंतरणाचे जे उपाय आहेत ते असेः—

कलौ विश्वेश्वरो देवः कलौ वाराणसी पुरी ।
कलौ भागीरथी गंगा कलौ दानं विशिष्यते ॥ —काशीखंड
ध्यानं परं कृतयुगे त्रेतायां यजनं तथा ।
द्वापरे लिंगपूजा च कलौ शंकरकीर्तनम् ॥ —शिवपुराण
पुष्करं तु कृते सेव्यं त्रेतायां नैमिषं तथा ।
द्वापरे तु कुरुक्षेत्रं कलौ गंगां समाश्रयेत् ॥ —विष्णुधर्मोत्तर पुराण
ध्यायन्कृते यजन्यज्ञैस्त्रेतायां द्वापरेऽर्चयन् ।
यदाप्नोति तदाप्नोति कलौ संकीर्त्य केशवम् ॥ —व्यास
कलौ कलिमलध्वंसं सर्वपापहरं हरिम् ।
येऽर्चयंति नरा नित्यं तेऽपि वंद्या यथा हरिः ॥ —अग्निपुराण
कलिं सभाजयन्त्यार्या गुणज्ञाः सारभागिनः ।
यत्र संकीर्तनेनैव सर्वः स्वार्थोऽपि लभ्यते ॥ —श्रीभागवत

**भावार्थः**—कलियुगांत विश्वेश्वर हा देव, काशीवास, भागीरथीस्नान आणि दान हीं तारक आहेत. लिंगपूजा व शंकरकीर्तन यांमुळें उद्धार होतो. कलियुगांत गंगास्नानानें सद्गति मिळते. अन्य युगांत जें फल विविध साधनांनीं मिळतें तें कलींत केवळ केशवसंकीर्तनानें मिळतें. जे हरिपूजन करतात त्यांचीं सर्व पातकें नष्ट होतात. तात्पर्य नामस्मरण, दान, पूजा, कथाकीर्तन हीं कलियुगांतील उद्धाराचीं साधनें होत.

**( ९४ ) भोळसट विचारः**—या विचारांची छाप सबंध हिंदु समाजावर आहे. त्यामुळें तो निष्क्रियतेच्या गर्तेमध्यें पडलेला आहे. जुनें

जें काय होतें व असेल तें तेवढें चांगलें. नवें जें कांहीं दिसेल तें पाहिलें कीं कलिसंस्काराचा मनुष्य अगदीं चपापून जातो. आगगाड्या, मोटारी व विमानें पाहिलीं कीं तो म्हणतो हा कलीचा प्रताप आहे ! पण सर्वत्र बैलगाड्या रूढ केल्या म्हणजे कृतयुग चालू होईल काय ? तरुणांचे व तरुणींचे घोळके शिक्षणाकरितां एकत्र चाललेले पाहिले, तरुणीचे अंगांत पोलकें, पायांत चप्पल, तरुणाचे मस्तकावर केशालंकार आणि मनगटांत घड्याळ दिसलें कीं तो म्हणणार हें पहा कलीचें माहात्म्य ! पण मुलांमुलींना निरक्षर ठेवून, कोपरापर्यंत चोळ्या मुलींना घालावयाला लावून, मुलांच्या शेंड्या लांब ठेवल्या म्हणजे कलियुग जाऊन कृतयुग चालू होईल काय ? कलीच्या करणीमुळें म्हणे दुहेरी धोतरांचीं उपरणीं झालीं ! त्या ठिकाणीं आतां गोधड्या आणल्या कीं कृतयुग होईल काय ? मंत्रजागरणानंतर वैदिक ब्राह्मणसुद्धां चहाकॉफी पितात. तें पाहून जुना गृहस्थ म्हणतो, ‘ हा पहा कपबशांचा खडखडाट ! हाच कलीचा पराक्रम !! ’ वैदिकांना चहाच्या-ऐवजीं तुळशीचा काढा दिला, शास्त्र्यांच्या मनगटावरचीं घड्याळें काढून त्यांच्या गळ्यांत घटिकायंत्रें बांधलीं म्हणजे कलियुगाचा नायनाट थोडाच होणार आहे ? तरुणांनीं डोक्यावर जटाभार ठेवले व तरुणींनीं केशभूषा न करितां वल्कलें परिधान केलीं, आणि कपबशांच्या जागीं ताम्हनें व पंचपात्र्या यांचे ढीग रचले म्हणजे कलियुग जाऊन गायी लौकर दूध देतील, पाऊस वेळेवर पडेल, माणसें निरोगी होतील, राजे प्रजासेवक बनतील, असें या भोळसटांना वाटतें कीं काय ? जें जें नवें तें तें कलिप्रयुक्त म्हणून त्याचा तिरस्कार करणें चुकीचें नाहीं काय ? कांहीं दुर्बल विचाराचीं माणसें तर नवें जगत् पाहून हे नवे नवे भलते प्रकार पहाण्यापेक्षां मरण बरें, लवकर एकदां डोळे मिटोत, असें म्हणून मृत्यूची वाट पहातात ! तर कांहीं ‘ ईश्वरा, आतां अवतार घे, ’ अशी त्याची करुणा भाकतात नि कर्तव्यविन्मुख होऊन अगदीं स्वस्थ बसतात ! समाजाला क्रियाविहीन, आचारविहीन, नीतिन्याय-विहीन करण्याला ही कलिकल्पना फारच चांगली आहे. म्हणूनच नवा हिंदुधर्म या आचरट कलिकल्पनेचा नायनाट केला पाहिजे असें अट्टाहासानें सांगतो.

**(९५) हा कलि हिंदुस्थानांतच कां ?** :–हिंदुसमाजांत वावरत असलेली कलिकल्पना अन्य समाजांत नाहीं आणि अन्यधर्मांत नाहीं. जर ती तशी असती तर जपानची उन्नति झाली असती काय? इंग्लंड, अमेरिका, जर्मनी व रशिया यांचा उत्कर्ष या आचरट कलिकल्पनेनें झाला असता काय? जर अन्य समाजांत व राष्ट्रांत ही दुर्बल कल्पना वावरती तर तेथील जयिष्णु व वर्धिष्णु वृत्तीच्या लोकांनीं आधीं तिचा नायनाट केला असता. जगांत पंचमहाभूतें, चंद्र सूर्य इत्यादि सर्वत्र आहेत, त्याप्रमाणें कलिकल्पना सर्वत्र नाहीं. दुर्बल समाजाच्या बोकांडीं बसलेल्या या कलीचें उच्चाटण अतित्वरया केलें पाहिजे.

हा कलि खैबरखिंड ओलांडून अफगाणिस्थानांत जात नाहीं, महासागर ओलांडून अमेरिकेंत शिरत नाहीं. इंग्लंड, अमेरिका, फ्रान्स व रशिया यांच्याकडे तर हा अगदीं ढुंकूनही पहात नाहीं. याचें कारण त्या राष्ट्रांची शस्त्रसंपन्नता, शास्त्रसंपन्नता आणि संघटना हेंच होय. हिंदुसमाजानें आतां समर्थ झालें पाहिजे, बलवान् झालें पाहिजे, आक्रमणशील झालें पाहिजे. ही विजिगीषा कलीची हकालपट्टी केल्याविना सफल होणें अशक्य आहे.

**(९६) धर्मशास्त्र व कलिवर्ज्य:**–धर्मशास्त्रामध्यें एक स्वतंत्र कलिवर्ज्य प्रकरणच आदित्यपुराणांतर्गत म्हणून अस्तित्वांत आलेलें आहे. बहुतेक धर्मनिबंधकारांनीं या कलिवर्ज्यांचें स्तोम यथास्थित माजविलेलें आहे. निर्णयसिंधु, मदनपारिजात, स्मृतिकौस्तुभादि ग्रंथांत कलिवर्ज्य म्हणून अनेक गोष्टी सांगितलेल्या आहेत. कलियुगांत अग्निहोत्र, गोहनन, संन्यास, श्राद्धाकरितां मांस, दिरापासून प्रजोत्पादन, समुद्रसंयान वगैरे अनेक गोष्टी निषिद्ध सांगितलेल्या आहेत. निषिद्ध म्हणून सांगितलेलें अग्निहोत्र आज क्वचित् दृष्टीस पडतें. संन्याससंस्थाही सर्वस्वीं लुप्त झालेली आढळत नाहीं. शाकाहाराप्रमाणें मांसाहारही कांहीं लोकांना कांहीं परिस्थितींत अवश्य आहे. नियोगाचे स्थानीं पुनर्विवाह रूढ केला पाहिजे. समुद्रबंदी काढून परदेशगमन हें शास्त्रविहित आहे असें आतां म्हटलें पाहिजे. कलियुगांत क्षत्रियवैश्यांचा अभाव आहे, कलियुगांत शूद्र उपनीत नसावेत, वगैरे निर्बंध आतां काढलेच पाहिजेत. नवा हिंदुधर्म जेथें कलीच मानीत नाहीं

तेथें कलिवर्ज्यांची पर्वा तो कशाला करतो ? जुन्या हिंदुधर्मांत परदेशगमन, समुद्रगमन यासंबंधीं पुढील निषेधपर वाक्यें आहेत--

(९७) **परदेशगमन अवश्यः—**

**द्विजस्याब्धौ तु नौयातुः शोधितस्यापि संग्रहः ।** ( निषिद्धः )

समुद्रांतून नौकेनें गमन करणाऱ्या द्विजाला प्रायश्चित्त देऊनही जातींत घेतां येत नाहीं. तसेंच

**अब्ध्याजीवी न संग्राह्यो निष्कृत्यापि कलौ युगे ।**

समुद्रावर नौकानयनानें उपजीविका करणाऱ्याची प्रायश्चित्तानेंही शुद्धि होत नाहीं. ही विचारसरणी आज उपयोगी नाहीं. विद्यार्जनार्थ, व्यापाराकरितां आणि राष्ट्रीय हिताकरितां परदेशांत नुसतें गेलेंच पाहिजे असें नसून जग आक्रमिलें पाहिजे. चुकीकरितांच प्रायश्चित्त असतें. हिंदुसमाजानें एकाकाळीं अटकेपार जाणें ही चुकी मानली, पण आज परदेशावर **आक्रमण न करणें ही मोठी घोडचूक ठरणार आहे.** हें सर्व जग ईश्वराचें आहे, श्रीकृष्णाचें आहे, श्रीकृष्णभक्तांचें आहे; त्यांनीं वाटेल तिकडे जावें, आक्रमण करावें, संस्कृति देऊन विश्वाला आर्य बनवावें, असें नवा हिंदुधर्म सांगतो.

**ये सब भूमी श्रीकृष्णकी इसमे अटक कहां ?**
**जिसके मनमे अटक है उसको अटक रहा ।**

धर्मनिर्णयमंडळानें समुद्रयानाच्या दृष्टीनें पुढील निर्णय केला आहे.

‘ समुद्रयान निषिद्ध नसल्यानें तें प्रायश्चित्तार्ह तर नाहींच, उलट विद्यार्जनादि राष्ट्रहितोपयोगी कार्यासाठीं उत्तेजनार्ह आहे. ’

(९८) **नवा धर्मकृत्यसंकल्पः**–कलिकल्पना ही हिंदु समाजाच्या हाडींमाशीं खिळलेली आहे. दैनिक धर्मकृत्यसंकल्पामध्येंही ‘ कलि प्रथम चरणे ’ असें वाक्य आहे. ही तर्कदुष्ट कल्पना उखडून टाकावी म्हणून धर्मनिर्णयमंडळानें धर्मकृत्यसंकल्पामध्येंही पुढीलप्रमाणें फेरफार केला आहे:—

**धर्मकृत्यसंकल्प**–‘इह पृथिव्यां जम्बूद्वीपे भारतवर्षे दक्षिणापथे ( आर्यावर्ते वा ) अमुक ग्रामे अद्य श्रीमत् भगवतो महापुरुषस्य विष्णोराज्ञया प्रवर्तमानस्य ब्रह्मणो द्वितीये परार्धे श्रीश्वेतवाराहकल्पे वैवस्वतमन्वन्तरे अष्टा-

विंशतितम महायुगीय कलिप्रथमचरणे बौद्धावतारे अमुक नाम संवत्सरे अमुक मासे अमुक पक्षे अमुक तिथौ अमुक वासरे अमुक नक्षत्रे ' असा चालू आहे त्या ऐवजीं तो ' इहपृथिव्यां भारतवर्षे दक्षिणापथे (आर्यावर्ते वा) अमुक ग्रामे अद्य अमुक नाम संवत्सरे अमुक मासे अमुक पक्षे अमुक तिथौ अमुक वासरे अमुक नक्षत्रे ' असा म्हटला जावा.

तात्पर्य मुलखानिराळें कलियुग कल्पून जुना हिंदुधर्म प्रवृत्त झालेला आहे. नवा हिंदुधर्म हा आजच्या जगांतील साम्ययुग, उद्योगयुग, कर्तृत्वयुग गृहीत धरून अखिल हिंदूंना त्या दिशेनें विधि व निषेध सांगण्यास प्रवृत्त झालेला आहे.

(९९) **पुढील भागाची प्रस्तावनाः**—गेल्या आठ प्रकरणांत नव्या हिंदुधर्मांतील प्रमाणविचार समाप्त झाला. नव्या हिंदुधर्माची आवश्यकता, त्याचें स्वरूप, त्याचें अधिष्ठान, त्याचें क्षेत्र, त्याची व्याप्ति, त्याची पद्धति, त्याचें प्रामाण्य अशा सर्व विषयांचा ऊहापोह येथवर केला. आतां ' व्यवहार-विचार ' या विषयाकडे वळावयाचें आहे. नव्या हिंदुधर्माच्या आचरणा-करितां शरीरसामर्थ्य, मनःसामर्थ्य नि उद्योगवाद यांचें साहाय्य किती अवश्य आहे हें सांगून वर्ण, जाति, व्यवसाय, शिवाशीव, आहार इत्यादि प्रमुख विषय यांचा विचार पुढच्या भागांत करितों.

—*—

# भाग दुसरा

# व्यवहारविचार

## प्रकरण नववें

### 'नायमात्मा बलहीनेन लभ्यः'

(१००) **शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्ः**—नव्या हिंदुधर्माचें आचरण करण्यास आत्मबल, बुद्धिबल, मनोबल, शरीरबल, समाजबल, व शस्त्रबल अशा सर्वांची आवश्यकता आहे. निर्बलाला जगांत कोणी विचारीत नाहीं. धर्माचें ध्येय जें अभ्युदय नि निःश्रेयस तें साध्य करून घेण्यास मुख्य शरीरबल पाहिजे. म्हणूनच 'शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्' असें म्हटलें आहे. वैदिक पूर्वजांनीं आपल्या तेजस्वी प्रार्थनांमध्यें आम्ही शंभर वर्षें जगावें, शेकडों वर्षें राज्यें करावीं, शेकडों वर्षें उपभोग घ्यावा, आमचीं अंगें सुदृढ असावीं, शेकडों वर्षें आम्हीं चांगलें ऐकावें, चांगलें खावें, चांगलें पाहावें, आमच्या राष्ट्रांतील तरुण महाकर्ते, ज्ञाते, भोक्ते आणि वीर असावेत अशा मागण्या केल्या आहेत. पुरुषार्थप्राप्तीकरितां शरीरबल आवश्यक आहे. कारण पौरुष, पराक्रम व पुरुषार्थ यांची समव्याप्ति आहे. हिंदु तरुण उमद्या घोड्यावरून घोडदौड करणारे, पल्लेदार बंदुकी घेऊन अचुक निशाण मारणारे, रणगाड्यावर बसून रणगीतें गात हिमालयाच्या पलीकडे जाणारे, विमानें, आगबोटी आणि इतर लढाऊ साधनें हस्तगत करून स्वराष्ट्राला स्वतंत्र करणारे असे हवे आहेत. हें कार्य दुर्बलांना शक्य आहे काय ?

(१०१) **धकाधकीचा मामलाः**—

धकाधकीचा मामला । कैसा घडे अशक्ताला ॥<br>
याकारणें शक्ताला । नाना युक्ति सुचवाव्या ॥

**उदंड खस्तिचीं कामें । मर्द मारून जातसे ॥**
**नामर्द काय ते लंडी । सदा दुश्चित लालची ॥**–श्रीसमर्थ

कोणताही समाज नुसत्या बुद्धीनें जगूं शकत नाहीं. समाजांत बुद्धि, पौरुष, पराक्रम व कर्तृत्व असणें हें जिवंत असल्याचें लक्षण आहे. ' राजते तद्राष्ट्रम्.' जें दैदीप्यमान असतें तें राष्ट्र. हिंदुराष्ट्राला दैदीप्यमान करण्याकरितां हिंदु तरुणांनीं अनेक साहसें, अनेक दीर्घोद्योग, अनेक अचाट कर्में केलीं पाहिजेत आणि त्याचें साधन जें शरीर तें चांगलें कणखर, निरोगी आणि धट्टेकट्टे असें ठेवावयास पाहिजे. लांबून जोंवर सर्व प्रकार चालू आहे तोंवर ठीक आहे. पण हातघाई आली, दंड्यास दंडा, ठोशास ठोसा असा प्रसंग आला कीं तेथें शेवटीं धट्टेकट्टे शरीर व साहस हेंच उपयोगी पडतें. अनेक ठिकाणीं अहिंदूंचीं हिंदूवर आक्रमणें झालेलीं ऐकूं येतात. हिंदूंच्या वीर पुरुषाचें प्रतीक असलेली मूर्ति फोडली कीं हात तुटतो. स्त्रियांकडे वांकड्या नजरेनें पाहिलें कीं डोळे फुटून जन्मांध होण्याची पाळी येते आणि मिरवणुकीवर हल्ले केले कीं प्राणावरच बेततें, अशी दहशत आततायींना बसण्यास सामष्टिक संघटनेची आणि शरीरबलाची आवश्यकता आहे.

हिंदुसमाजांत शरीरबल नाहीं, गांवोगांवीं तालमी, आखाडे, व्यायामशाळा नाहींत, असें मुळींच नाहीं. सापेक्ष दृष्टीनें विचार केल्यास तें हिंदुसमाजांत अधिकच आहे. पण त्याचा संघटितपणाच्या अभावीं व्हावा तसा उपयोग होत नाहीं, हेंही तितकेंच खरें आहे.

**(१०२) हिंदु तरुण व व्यायामः**–हिंदुसमाजांतील तरुणांच्या मनोवृत्तीचें विश्लेषण केल्यास असें दिसतें कीं, जें स्वराज्य हिंदुराष्ट्राला हवें आहे, तें चालविण्याच्या पात्रतेकरितां भव्य, धिप्पाड व कणखर शरीरयष्टि संपादन करण्याकडे आजच्या तरुणांचें लक्ष जेवढें असावें तेवढें नाहीं. अजागळपणा, पोषाखीपणा, नाजूकपणा या भूषण मानण्याच्या गोष्टी नसून त्या अत्यंत दूषणास्पद आहेत असें हिंदु तरुणांनीं ध्यानांत ठेवावें. निर्बलता, निःसत्वता, निरुत्साह, छानछोकी, नटवेपणा हीं मृत्युमुखांत पडण्याचीं साधनें आहेत. कणखरपणा, काबाडकष्ट, अनेक प्रकारचीं कामें करणें, प्रसंगीं धैर्य, साहस व पराक्रम दाखवून प्रभावी होणें, हींच व्यक्तीच्या आणि

समाजाच्या दीर्घायुष्याचीं साधनें आहेत. इंग्लंड, जर्मनी, अमेरिका इत्यादि देशांतील मुत्सद्दी व संशोधक दीर्घायुषी असतात, मरेपर्यंत मोठमोठीं कार्यें करतात, हें लक्षांत घेऊन हिंदु तरुणांनीं व्यायामाकडे लक्ष दिलें पाहिजे. व्यायामाची उपयुक्तता, लाभ आणि महत्त्व सांगण्याचें हें स्थळ नव्हे. एका श्लोकांतच त्याचें महत्त्व असें आहे—

**लाघवं कर्मसामर्थ्यं दीप्तोऽग्निर्मेदसः क्षयः ।**
**विभक्तघनगात्रत्वं व्यायामादुपजायते ॥** —वाग्भट

शरीरचापल्य, कार्यास उत्साह, जठराग्नीची प्रदीप्तता, मेदक्षय, अवयवांचा घोटीवपणा व पिळदारपणा हे लाभ व्यायामापासून होतात.

**(१०३) पालकाचा शपथविधिः**–हिंदु तरुणांमध्यें व्यायामाची आवड उत्पन्न व्हावी म्हणून प्रत्येक हिंदु पालकानें मी देवाला, देशाला व व्यायामाला विसरणार नाहीं, अशी शपथ घेतली पाहिजे. देवाचें नित्य स्मरण, देशाकरितां कर्तव्याचें आचरण जसें केलें पाहिजे तसेंच व्यायामाचेंही नित्य उपासन केलें पाहिजे. तो व्यायाम लाठीकाठीचा असो, संघस्थानावरील संचलनाचा असो, सूर्यनमस्काराचा असो वा व्यायामशाळेंतील दंड, जोर, बैठका, कुस्तीचा असो. कोणताही व्यायाम सशास्त्र पद्धतीनें प्रत्येक हिंदूनें घेतला पाहिजे. प्रत्येक हिंदु पालकाला कोणत्याही वैय्यक्तिक आणि सामष्टिक व्यायामाचा नाद असला म्हणजे घरांत त्या तऱ्हेचे विचार मुलांच्या कानांवर पडतात. कुस्ती मारल्याच्या, संघ विजयी झाल्याच्या, शिकार केल्याच्या, आततायींना चोप दिल्याच्या, अचुक नेम मारल्याच्या गोष्टी मुलांचे कानांवर जर वरचेवर पडतील तर त्यांच्या शरीरांत जोम, मनांत धैर्य आणि वृत्तींत मस्ती उत्पन्न होऊन त्यांना उत्साह वाटेल. प्रत्येक हिंदूला आपला मुलगा रडत आला, भांडण घेऊन आला, वादी म्हणून आला तर वाईट वाटावें. दोन तडाखे देऊन जिकडच्या तिकडे पार घालवून प्रतिवादी म्हणून पुढें आला तर आनंद वाटावा.

हिंदु पालकांना आपलीं मुलें परीक्षेंत उत्तीर्ण व्हावींत, त्यांनीं लौकर शहाणे व्हावें, मिळवते व्हावें असें वाटणें साहजिक आहे, व तें योग्यही आहे. हिंदु तरुण जसे बुद्धिमान्, प्रज्ञेचा प्रकाश पाडणारे असे

हवेत, तसेच ते शरीरानें उंच, सशक्त, छातीनें रुंद आणि धडधाकटही हवेत. मुलगा अभ्यास किती करतो इकडे जसें कांहीं पालक लक्ष देतात, त्याबरोबरच त्यांनीं आपल्या मुलाच्या शरीराची वाढ, लांबी, उंची वगैरे-कडेही लक्ष द्यावें. म्हणजे अभ्यासाच्या प्रगतीप्रमाणें शारीरिक प्रगतीकडेही लक्ष असावें. पालक मुलांना ‘ चिरंजीव ’ हा शुभाशीर्वाद देतो, तो सार्थ व्हावा अशी जर इच्छा असेल तर मुलाच्या शरीरसंपत्तीकडे अधिक लक्ष देणें अत्यावश्य आहे.

(१०४) **पालकांचें कर्तव्यः**—आईबाप कष्ट सोसून धनदौलत मिळवितात व ती जतन करून मुलांचे स्वाधीन करतात. परंतु राष्ट्राची खरी संपत्ति म्हणजे तरुण पिढी आहे, राष्ट्राच्या संपत्तीचा कोश म्हणजे तरुण मुलें आणि मुली हींच होत. या जिवंत संपत्तीकरितां राष्ट्रांतील निर्जीव संपत्ति खर्चिली पाहिजे. मुलांमुलींच्या खाण्यापिण्याची, कपड्या-लत्त्याची, आरोग्याची आणि व्यायामाची काळजी जर पालक घेतील तर हें भावी राष्ट्रीय धन, ही राष्ट्राची संपत्ति चांगली राहील. आपल्या मुलांत दुबळपणा, भ्याडपणा, भित्रेपणा, चुकारपणा, उदासीनता, तुटक-पणा इत्यादि अनेक दोष आढळतात. हे नष्ट करण्याकरितां पालकांनीं दक्ष असावें. द्रव्य, गृह, अब्रू, स्वाभिमान, मानबिंदु, स्त्री, स्वधर्म व स्वराष्ट्र यांच्या संरक्षणाकरितां आपलीं मुलें मर्द कशीं बनतील, कर्तृत्ववान् कशीं होतील ही चिंता पालकांनीं केली पाहिजे. आपल्या पश्चात् मुलाचें कसें होईल ही काळजी करण्यापेक्षां आपल्या देखतच तो सर्व दृष्टीनें समर्थ होईल अशी काळजी पालकांनीं घेणें उचित आहे. मुलेंमुली प्रौढ होईपर्यंत त्यांना पौष्टिक, सकस, जीवनरसयुक्त असें अन्न खाऊं घालून धडधाकट बनविणें, हा हिंदु पालकांचा ब्रह्मयज्ञ आहे. पूर्वकालाचे पंच महायज्ञ नव्या कालाला अनुरूप करून घेतले पाहिजेत. नव्या कालाला अनुरूप असा नवा अध्यापनरूपी ब्रह्मयज्ञ म्हणजे मुलांच्या व्यायामाकडे, अभ्यासाकडे, प्रकृतीकडे, आरोग्याकडे लक्ष देणें हा होय.

(१०५) **हिंदु मुली व व्यायामः**—प्रत्येक हिंदु पालकानें आपल्या मुलींच्या व्यायामाकडे लक्ष देऊन त्यांनाही स्वसंरक्षणक्षम आणि प्रतिकारक्षम बनविलें पाहिजे. मुलांपेक्षां मुलींकडे सहाजिक दुर्लक्ष्य होतें. पण आजच्या

या समतेच्या कालांत दोहोंकडेही पालकांनीं सारखेंच लक्ष द्यावें. आपल्या मुली गृहिणी व माता व्हावयाच्या आहेत, हें ध्यानीं घेऊन त्यांचेकडून व्यायाम करून घ्यावेत. मुलगी ही दुसऱ्याचा अर्थ आहे, ती दुसऱ्याकडे जावयाची आहे, मुलीचे आईबाप हे तिचे विश्वस्त आहेत, हें पालकांनीं विसरूं नये. आजकालच्या राहाणींत जुन्या पद्धतीचीं घरगुती कामें नाहींत, आणि नवीन पद्धतीचा व्यायाम तर त्या घेऊंच शकत नाहींत अशी वस्तु-स्थिति आहे. गांवोगांवीं मुलींच्याकरितां स्वतंत्र क्रीडांगणें, व्यायामशाळा स्थापन करून तेथें जंबिये, तलवारी, लाठीकाठी या सर्वांचें आणि संचलनाचें शिक्षण द्यावयालाच पाहिजे. स्त्रियांची अब्रू, त्यांचा स्वाभिमान हा नेहमीं संशयांत असतो. त्याचें कारण स्त्रियांमध्यें स्वसंरक्षणाची शक्ति नाहीं, हें एक व दुसरें हिंदुसमाजाशेजारीं जे अहिंदु समाज आहेत, त्यांच्यामध्यें स्त्रियां-विषयीं अत्यंत अनुदार विचार असल्यामुळें हिंदु स्त्रियांवर कोणत्या वेळीं कोणता प्रसंग येईल याचा नेमच नसतो. म्हणून स्त्रियांना सदैव शस्त्रानें सुसज्ज ठेवलें पाहिजे. शस्त्रें वापरण्याचें योग्य शिक्षण त्यांना व्यवस्थित तऱ्हेनें मिळालें म्हणजे कोणच्याही प्रसंगीं पुरुषाचें साहाय्य असो वा नसो त्या मर्दाप्रमाणें आपलें संरक्षण करण्यास समर्थ होतील.

(१०६) **मल्लविद्याः**—हिंदु तरुणांनीं काटकपणा, जयिष्णुता, वीरता येण्यास जोर, जोडी, बैठका, मल्लखांब, कुस्ती असे विविध प्रकारचे व्यायाम करावेत. हिंदुराष्ट्र हें प्राचीन कालापासून मल्लांचें आहे. श्रीकृष्ण, कंस, बळिराम, दुर्योधन, दुःशासन, भीमसेन, जरासंध हे सर्व भारतीय वीर मल्लविद्येंत निष्णात होते. मल्लविद्येची परंपरा आतांपर्यंत हिंदुस्थानांत चालू आहे. मल्लविद्येमुळें प्रतिपक्षाला चुरशीनें चीत करण्याचें जें अवसान येतें, त्याचा विशेष तऱ्हेनें प्रादुर्भाव प्रत्येक हिंदूंत झाला तर अहिंदूंचीं आक्रमणें तेव्हांच लटकीं पडतील.

(१०७) **आदर्श व्यायामसंस्थाः**—गांवोगांवींच नव्हे तर गल्ली-गल्लींही हिंदुत्वनिष्ठेनें हिंदु—व्यायामशाळा जितक्या अधिक निघतील तितक्या हव्या आहेत. त्यांना जोडून निशाण मारण्याकरितां रायफलक्लबही असावेत. दांडपट्टा, लाठीकाठी, कुस्ती, जंबिये, ढाल—तलवार आणि निशाण मारणें

अशा सर्वांचें शिक्षण सुसज्जतेनें मिळण्याची व्यवस्था त्या ठिकाणीं असावी. या तऱ्हेच्या नमुनेदार व्यायामसंस्था महाराष्ट्रांत दहा पंधरा आहेत; फक्त निशाण मारण्याची तेथें व्यवस्था नाहीं. तें वैगुण्य लौकरच भरून निघेल तर उत्तम होईल. त्या नमुन्याचे आखाडे गांवोगांवीं स्थापन करण्याचे यत्न झाल्यास त्याचा तरुण हिंदु पिढीला फार उपयोग होईल. शाळेंत, घरांत, समाजांत आणि एकंदरींत सर्व वातावरणांत व्यायाम, संघटना, शिस्त, प्रतिकार, आक्रमण यांसंबंधाचे विचार सारखे खेळत राहिले पाहिजेत.

व्यायामामध्यें वैय्यक्तिक आणि सामष्टिक असे दोन प्रकार आहेत. नमस्कार, जोर बैठकादि व्यायामाचे प्रकार हे वैय्यक्तिक आहेत. संचलनाचे व अनेकांनीं मिळून करण्याचे व्यायामाचे प्रकार जितके वाढवितां येतील तितके वाढले पाहिजेत. आज तशा तऱ्हेचा स्तुत्य उपक्रम ठिकठिकाणीं चालू आहे. सामष्टिक बलाची, भावनेची, प्रतिकाराची आणि आक्रमणाची वृत्ति ज्या ज्या प्रकारानें हिंदु समाजांत उत्पन्न करतां येईल, त्या त्या प्रकारानें ती केली पाहिजे.

**(१०८) व्यायाम व हिंदुत्वनिष्ठा:**—व्यायाम हा श्रीमंतांचा विषय आहे, हा गोरगरिबांचा विषय नव्हे, कारण त्याला खुराक लागतो वगैरे कल्पना चुकीच्या आहेत. खुराक, अंडाहार, मांसाहार ज्याला शक्य असेल त्यानें तो घ्यावा. परंतु द्विदल धान्यें, फळभाज्या, पालेभाज्या, दहीं, दूध, तूप इत्यादि पदार्थ यांतही पुष्कळ जीवनसत्त्वें आहेत व सकसपणा आहे. अनुकूलतेप्रमाणें हवा असेल तसा आहार घेऊन, तो पचवून व्यायाम करावा, एवढेंच येथें सांगावयाचें आहे. नमस्कार, पोहणें, पळणें, घरांतील कामें करणें, ओझीं उचलणें, खणणें, शेतकाम करणें अशा सर्व तऱ्हेच्या कामानें व्यायाम होतो आणि काटकपणाही येतो. पोषाखी व्यायामापेक्षां सारखें आठ दहा तास शारीरिक काम करणें याचें महत्त्व विशेष आहे. अशी तऱ्हेचीं कामें करणारे, व्यायाम करणारे हिंदु लोक कांहीं कमी आहेत असें नाहीं. पण हें करण्यांत जी हिंदुत्वनिष्ठा असावयास पाहिजे तेवढीच नाहीं. मी हिंदु आहें, हिंदु राष्ट्राचा घटक आहें, हिंदुत्वाकरितां हिंदुराष्ट्राला स्वतंत्र करावयाचें आहे, आणि त्याकरितां ही तपश्चर्या आहे,

अशी वृत्ति असल्याविना हें सर्व फोल आहे. व्यायामही हिंदुत्वनिष्ठेनें केला पाहिजे, व्यायामसंस्थाही हिंदुत्वनिष्ठेनेंच चालविल्या पाहिजेत, तरच हिंदुत्वरक्षणार्थ त्यांच्या उपयोगाची आशा आहे. ना हिंदु, ना मुसलमान, ना खिस्ती, ना पार्शी, व्यायामाच्या क्षेत्रांत कसली आली आहे हिंदुत्वनिष्ठा, असें म्हणणारे ऐसपैस विचाराचे लोक कांहीं कमी आहेत असें नाहीं. पण या विश्वकुटुंबी वृत्तीनें हिंदुत्वाचें आणि हिंदुसमाजाचें रक्षण होणें शक्य नाहीं. हिंदुत्वनिष्ठेनें व्यायाम, शील, शिस्त, संघटना आणि वीरता यांचे शिक्षण देणारी **हिंदुस्थानांत एकमेव " राष्ट्रीय स्वयंसेवक संघ " ही संघटना** आहे. तिचा लाभ सर्व हिंदूंनीं अवश्य घ्यावा.

(१०९) **खेळांचें शिक्षणः**–हिंदु समाजाचें जीवन उत्साही, आनंदी आणि आवेशयुक्त होण्याकरितां शरीरबलसंवर्धनाचें एक अंग म्हणून विविध प्रकारचे सामुदायिक खेळ चालू करणें आवश्यक आहे. आयुष्य हा एक खेळ आहे. खेळामध्यें खेळाडूवृत्ति लागते. खेळाडूवृत्ति म्हणजे खेळ संपला कीं मागील विसरून जाणें ही होय. खेळामुळें एक सामष्टिक अहंवृत्ति उत्पन्न होते. खेळामुळें मनःप्रसाद आणि व्यायाम असा दुहेरी लाभ होतो. आट्यापाट्या, खोखो, हुतुतु या देशी खेळांत नव्या पद्धतीनें सुधारणा होऊं लागली आहे. विशेषतः शिस्त, आज्ञाधारकपणा व वरिष्ठाचें ऐकणें हे गुण या खेळांमुळें अंगीं येतात. क्रिकेट, टेनीस, फुटबॉल या विदेशी खेळांना तर आज राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय स्वरूप आलेलें आहे. हेही खेळ खेळून त्यांत प्रावीण्य मिळवून हिंदुराष्ट्राचें जगांत नांव करण्याचा प्रसंग खेळाडूंनीं वरचेवर साधला पाहिजे. दर आठवड्यास, दर महिन्यास निदान वर्षास तरी गांवोगांवीं सामुदायिक खेळांचे सामने घडवावेत. इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, अमेरिका इत्यादि देशांत ही खेळांची प्रथा जोरांत आहे. स्वतंत्र आणि समर्थ राष्ट्रांमध्यें खेळांच्या उपक्रमामुळें जें उत्साही जीवन मिळतें तें हिंदुसमाजाला मिळावें म्हणून येथील परिस्थितीप्रमाणें सामुदायिक खेळांचा उपक्रम करण्याचा हिंदूंनीं यत्न करावा.

(११०) **शस्त्रशिक्षाः**–शरीरबलाला शस्त्रास्त्रबलाचें साहाय्य पाहिजे. शस्त्रास्त्रबलाला क्षात्रवृत्तीची आवश्यकता आहे. आज हिंदुराष्ट्रामध्यें क्षात्र-

वृत्तीची आणि सशस्त्रतेची अत्यंत उणीव आहे. कारण निःशस्त्रीकरणामुळें हिंदुराष्ट्राची खच्ची झालेली आहे. अनेक आंदोलनें करून विविध मार्गांनीं शस्त्रास्त्रें वापरण्याचा जन्मसिद्ध हक्क मिळवून घेणें अपरिहार्य आहे. ज्याचें शस्त्र त्याचें राज्य. ज्याचें शस्त्र पल्लेदार त्याची सत्ता दूरदूरच्या देशांत अनिरुद्धपणें नांदते असा प्रत्यक्ष अनुभव आहे. शस्त्राविना शरीरबल व्यर्थ आहे. शरीरबल हवें, तसेंच शस्त्र, अस्त्र हींही हवींत. शस्त्र व अस्त्र या दोनच विद्या. शस्त्र म्हणजे क्षात्रतेज आणि अस्त्र म्हणजे बुद्धितेज. हिंदुराष्ट्र शस्त्रवान्, अस्त्रवान्, युक्तिवान्, बुद्धिवान् व्हावयास हवें असेल आणि त्या राष्ट्राला स्वातंत्र्यलक्ष्मीनें संपन्न करावयाचें असेल तर शस्त्र, अस्त्र व शास्त्राची उपासना हिंदुसमाजांत घरोघरीं चालू झाली पाहिजे.

शक्तीनें मिळती राज्यें । युक्तीनें यत्न होतसे ॥
शक्तियुक्ति जये ठायीं । तेथें श्रीमंत नांदती ॥ —श्रीसमर्थ.

सैनिक शिक्षण हिंदुराष्ट्राच्या उद्धाराकरितां अत्यावश्यक आहे. प्रत्येक तालुक्याला न जमलें तरी प्रत्येक जिल्ह्याला सैनिक शिक्षण देणारी अशी संस्था हवी आहे. नाशिक येथील 'भोसला मिलिटरी स्कूल' या संस्थेच्या नमुन्यावर ठिकठिकाणीं सैनिक शिक्षण देणाऱ्या संस्था उत्पन्न व्हाव्या, त्यांमध्यें निदान हजार हजार तरी तरुणांच्या सैनिक शिक्षणाची व्यवस्था होईल अशी कार्यक्षमता असावी. हें घडवून आणण्याकरितां हिंदूंनीं आटोकाट प्रयत्न करावेत. यामुळेंच हिंदूंचें शरीरबल सार्थकीं लागेल, समाजबल वाढेल आणि मनोबलाला व बुद्धिबलाला यामुळेंच तेज येईल. नुसतें बुद्धिबल शस्त्रबलाविना व्यर्थ आहे. मन ही एक मोठी शक्ति आहे यांत शंका नाहीं. पण त्या मानसशक्तीला अस्त्रांचें साहाय्य लागतें. आत्मबलाचा (Soul-force) नगारा कितीही बडविला आणि 'धिक् क्षत्रियबलं ब्रह्मतेजो बलं बलम्' अशी कितीही उच्चस्वरानें घोषणा केली तरी या त्रिगुणात्मक जगतांत जोंवर रजतमांचें अस्तित्व आहे, तोंवर केवळ सत्त्व गुणाला कोणी विचारणार नाहीं. उलट त्या सत्त्वगुणाचा अनौचित्यामुळें उपहासच होईल, हें हिंदुसमाजानें अवश्य ध्यानांत ठेवावें.

* वर क्षत्रियबल आणि ब्रह्मबल असे शब्द नाहींत. ब्रह्मतेजोबल असा शब्द आहे. त्याचा अर्थ केवळ 'सोल फोर्स', शापवाणी उच्चारली कीं शत्रु

चीत! असा नाहीं. ब्रह्मतेजांत तपश्चर्येनें मिळविलेलें वैज्ञानिक ज्ञान, मृत्यु-किरण, संमोहन वायु अथवा शत्रूला नामोहरम करणारी कांहीं तरी गुप्त शक्ति असली पाहिजे. विश्वामित्रापुढें वसिष्ठ ब्रह्मदंड घेऊन उभे राहिले असें रामायणांत वर्णन आहे. नुसत्या ब्रह्मदंडानें म्हणजे शापवाणीनें, 'सोल-फोर्स'नें विश्वामित्र पराभूत झाला असें नसून, त्याच्या ब्रह्मदंडांत वरीलप्रमाणें कांहीं अद्भूत सामर्थ्य होतें, म्हणूनच तो पराभूत झाला असें मानलें पाहिजे. आजही अॅटम् बॉंब्सारखीं अस्त्रें त्या ब्रह्मदंडाचीच साक्ष देत आहेत.

—*—

# प्रकरण दहावें

## उत्थानयोग अर्थात् प्रयत्नवाद

हिंदुसमाजाच्या दौर्बल्याचा विचार करतांना असें दिसतें कीं हा समाज मनानेंच अधिक दुर्बल झालेला आहे. मनुष्य व पशु यांमध्यें इतर धर्म सारखे असले तरी बुद्धि, विवेक, मनोबल यांमुळेंच त्याचें पशूपेक्षां श्रेष्ठत्व ठरतें. नव्या हिंदुधर्माचें अधिष्ठान बुद्धि, तर्क, विवेक, मनोबल हें आहे असें सहाव्या प्रकरणामध्यें सांगितलें आहे. बुद्धि ही विचार करणारी शक्ति आहे. विचाराचें पर्यवसान कृतींत होतें. यास्तव कृति, प्रयत्न आणि उत्थान यांवरच नव्या हिंदुधर्माची भिस्त आहे. बुद्धियोग व उत्थानयोग यांचा समन्वय करून हिंदुसमाजानें आपला अभ्युदय करून घ्यावा. प्रस्तुत प्रकरणांत हिंदु समाजांतील मनोदौर्बल्याच्या कांहीं समजुतींची प्रथम चिकित्सा करून उत्थानयोगाचें म्हणजे प्रयत्नवादाचें महत्त्व पटवून द्यावयाचें आहे.

(१११) **शकुन:**—हिंदु समाजाच्या मनाचा अभ्यास करूं लागलें म्हणजे असें दिसतें कीं तें विविध कल्पनांनीं दुबळें झालेलें आहे: पायगुण, शकुन ही एक त्यांतलीच दुर्बल कल्पना आहे. घरांत नवें जनावर

आणलें, नवा नोकर ठेवला, देवांच्या नव्या मूर्ती घरांत आणल्या, पाहुणा आला, नवी सून आली, फार काय पण घरांत धर्मग्रंथ आणले तर त्यांचाही पायगुण बाधतो किंवा लाभतो, असल्या समजुती आहेत. हें पायगुणाचें प्रस्थ दिवसानुदिवस कमी होत आहेच, पण तें समूळ उखडून टाकणें भाग आहे.

बोडका ब्राह्मण पुढें आला, विधवा पुढें आली, मांजर आडवें आलें, कुत्रें रडूं लागलें, घुबड घरावर बसलें कीं कांहीं अशुभ होतें. बोलतां बोलतां शिंक आली, जांभई आली, डोळा लवला तर त्याचा आणि कार्याचाही संबंध जोडण्यांत येतो. हीं सर्व दुबळेपणाचीं लक्षणें आहेत; हर्ष राजा एकदां अन्य देश हस्तगत करण्यास गेला. घोड्यावरून उतरतांच तर्जनींतील मुद्रिका खालीं पडली. दुबळे लोक तो अपशकून समजूं लागले. पण हर्षानें ती पडलेली मुद्रिका माझी मुद्रा नि स्वाक्षरी या देशावर आतां खास होणार असें सुचविते, असें म्हणून आवेशानें लढून त्यानें तो देश जिंकला. तात्पर्य दुर्बळाचा जो अपशकून तो सबलाचा शुभशकुन असतो !

(११४) **प्राणि व अशुभत्वः**–शकुन, पायगुण, यांप्रमाणेंच पक्ष्यांचा स्पर्श अशुभ समजणें हे सगळे दुर्बळ विचार आहेत. कावळा चुकून डोक्यावर बसला कीं मृत्यु प्राप्त होतो, पाल अंगावर पडली कीं कांहीं अशुभ होतें, टिटवी ओरडली, सरड्याचा स्पर्श झाला कीं कांहीं वेडेंवांकडें होतें, अशा कल्पना निघून त्यांकरितां प्रायश्चित्तेंही सांगितलीं गेलीं. यःकश्चित् पाल ती काय व ती अंगावर पडली म्हणजे भिण्याचें कारण तें काय ? आणि प्रायश्चित्त कशाला ? पण पुराणामध्यें यासंबंधाचीं प्रायश्चित्तें सांगितलीं गेलीं आहेत—

पल्लीपतन–**तिलमाषादिदानं च स्नात्वा देयं द्विजन्मने ।**
**पिनाकिनं नमस्कृत्य जपेन्मंत्रं षडक्षरम् ।**
**शतं सहस्रमथवा सर्व–दोष–निबर्हणम् ।**
**शिवालये प्रदद्याद्वा दीपं दोषोपशांतये ।** –आदित्यपुराण ।

या श्लोकांत सांगितलेलें तीळ, उडीद यांचें दान, स्नान, शंकराचा षडक्षरी मंत्र वगैरे प्रायश्चित्तें पाल पडल्यावर व एखादा सरडोका अंगावर चढला तरीहि करावें असें म्हटलें आहे.

कावळ्याच्या स्पर्शाबद्दल नारदसंहितेंतील म्हणून पुढील श्लोक दिलेले आहेत—

मस्तके वायसस्पर्शे दारिद्र्यं मरणं कलिः ।
कट्यां स्कंधे महाभीतिररिष्टं चैव कीर्तितम् ॥
योषितां मस्तके भर्तुर्विनाशो वा सुतस्य च ।
दिवा वा यदि वा रात्रौ यः पश्येत् काकमैथुनम् ।
स नरो मृत्युमाप्नोति ह्यथवा स्थाननाशनम् ॥

कोणतीही कल्पना संस्कृत श्लोकांत ग्रथित केली म्हणजे तिला कसें शास्त्राचें स्वरूप येतें याचें हें वरील उदाहरण आहे. कर्ता मनुष्य कावळा जवळ आला तर तो आपल्या कार्यास साहाय्य करण्यास आला आहे असेंच समजेल. पालीच्या स्पर्शानें तिचेंहि साहाय्य आहे असें तो मानील. पण दुबळे लोक दुर्बळ विचार धारण करितात. याप्रमाणें मनोदौर्बल्याचे अनेक प्रकार हिंदु समाजांत दृष्टीस पडतात त्याचें सर्वस्वीं निराकरण करणें अवश्य आहे.

**(११३) पंचांगांतील योग व मुहूर्तः**—पायगुण, शकुन आणि पशुपक्ष्यांचा स्पर्श यांप्रमाणेंच पंचांगांतील विविध योगांचीही आडकाठी हिंदुसमाजाला होते. व्यतिपात, वैधृति, दग्धयोग, मृत्युयोग अशा योगांवर घराबाहेर पडूं नये, न्यायालयांत काम असल्यास तेथें उपस्थित राहूं नये. कारण या योगावर हटकून अपयश येतें, अशा समजुतीनें माणसें तारखा चुकवितात व आर्थिक हानि करून घेतात ! इंग्रजाचीं कोर्टें हीं योग पाहून तारखा ठरवीत नाहींत. पंचांगाचें नुसतें एक पान पाहिलें तर त्या पंधरवड्यांत मृत्युयोग व दग्धयोग यांच्या एकदोन तरी फेऱ्या होतातच ! व्यतिपात, वैधृति हे कुयोग सोडून अगदीं अमृतसिद्धि योगावर जरी प्रयाण केलें तरी यश येतेंच असें नाहीं. कांहीं माणसें हे असले कुयोग असले म्हणजे अशुभ टळावें म्हणून दानधर्मही करितात. उठल्या बसल्या मनुष्य हे असले योग आणि मुहूर्त पाहूं लागला तर त्याच्या हातून कोणतेंही कार्य होणार नाहीं. पंचांग पाहून सण, वार, श्राद्ध, पक्ष, हव्यकव्य इत्यादि कृत्यें त्या त्या तिथीस नियमानें करावीं. पण प्रत्येक कार्याला शुभाशुभ पाहाण्याची व मुहूर्त शोधण्याची जी पद्धति आहे, ती अनिष्ट आहे. प्रयाणास मुहूर्त,

पेरण्यास मुहूर्त, खळें करणें, तिवडा रोवणें, रास भरणें, मुलांना पाळण्यांत घालणें, नांव ठेवणें वगैरे वगैरे अनेक कार्यांना मुहूर्त लागतात. मुहूर्त न मिळाले म्हणजे गरीब बिचारे शेतकरी नुकसानही करून घेतात. बरें, इतके मुहूर्त दरसाल व दररोज पाहून त्यांच्या कपाळाचें दारिद्र्य संपत नाहीं, कर्जनिवारण होत नाहीं. त्यांचें तापत्रय जें आहे तें आहेच!! मग या मुहूर्तांची अडचण पाहिजे कशाला? या यंत्रयुगांत सगळें यंत्राप्रमाणें चाललें पाहिजे. यंत्र हें वाटेल तेथें वाटेल तेव्हां आपलें कार्य देतें. तसें यांत्रिकत्व समाजाच्या नि व्यक्तीच्या ठिकाणीं आलें पाहिजे.

(११४) **दुःस्वप्नबाधाः**–पंचांगांतील योगाप्रमाणें कांहीं माणसांना स्वप्नांचीही अडचण होत असते. झोंप चांगली आली नाहीं म्हणजे स्वप्नें पडतातच. त्यांचें शुभाशुभ विचारण्यांत व शांति करण्यांत वेळ घालविणें हा खुळचटपणा आहे. दिवसभर श्रम केले, सदुद्योग केला कीं रात्रीं जमिनीला पाठ टेकतांच गाढ झोंप येते. म्हणून स्वप्नांची उठाठेव न करतां

**दिवसार्धेन तत्कुर्यात् येन रात्रौ सुखं स्वपेत्।** –महाभारत

दिवसभर चांगला उद्योग करावा.

(११५) **भुतेंखेतें**:–हिंदुसमाजाच्या दुबळ्या मनावर भुतेंखेतें, मुंजे, समंध, डाकिणी, पापिणी, हडळ यांचेंही साम्राज्य आढळतें. अंधेऱ्या घरांत, वठलेल्या झाडावर, ओसाड आवारांत, मसणवटींत नष्टांश झालेल्या घरांत, मुंजा, ब्रह्मसमंध, झोटिंग, वेताळ असा कोणी तरी बसलेला असतोच! तेथें कोणी गेल्यास त्यांच्या तो बोकांडीं बसतो; म्हणून अंगारे, धुपारे, दोरे, गंडे असले प्रकार भूतबाधेच्या प्रतिकाराकरितां माणसें करीत असतात! भुतें, ब्रह्मसमंध, पिशाच्च हें कोणीं पाहिलें असतें, असें मुळींच नाहीं. एक म्हणतो, दुसरा म्हणतो म्हणून त्या ठिकाणीं जाण्यास कोणी धजावत नाहीं. पुष्कळशीं भुतेंखेतें आणि वेताळ हीं काल्पनिक असतात. ही कल्पनेची बाधा नष्ट करण्याकरितां कांहीं तंत्र, कांहीं मंत्र करावे लागतात, असें भुतें काढणारे कांहीं लोक म्हणतात.

लोकवार्ता, परंपरा, दंतकथा, यांवरूनच भुतें मानण्यांत येतात. त्यामुळें कोणीं सुंदर बांधलेलीं घरें सोडून जातात, तर कोणी आपलीं शेतें दुस-

ऱ्यास विकतात. कोणी भुतें घालविण्याकरितां देवरुष्याला बोलावतात. सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें तर दिवसेंदिवस भुतांची लोकसंख्या कमी होत आहे असें दिसतें. आगगाड्यांचे मार्ग वाढले, मोटारींचें दळणवळण वाढलें, कारखाने वाढले, गिरण्या वाढल्या, त्या त्या ठिकाणचीं भुतें व समंध हीं आतां बेपत्ता झालेलीं आहेत. यंत्ररूपी राक्षस पाहिला कीं समंध; वेताळ हे पळून जातात! पूर्वीं भुतें अधिक होतीं याचें कारण निरक्षरता व अज्ञान हेंच होय. साक्षरतेमुळें भुताखेतांची संख्या कमी झाली, असें औदुंबर, श्रीनृसिंहवाडी-बिऱ्हाडसिद्धाचें कवठें इत्यादि ठिकाणीं जाऊन शोधपूर्वक पाहिलें तर दिसून येतें. ज्ञानामुळें चिकित्सा वाढली, निर्भयता आली आणि अज्ञानजन्य कल्पना नष्ट झाल्या. भूतयोनी जगांत नसेलच असें नाहीं. उत्कट वासनेमुळें पुनर्जन्म होतो. कांहीं भूतचेष्टा खऱ्याही असतील. परंतु हीं भुतें उठल्या-सुटल्या माणसांच्या बोकांडीं बसतात, त्यांना ताप देतात या कल्पना चुकीच्या आहेत. "भित्यापाठीं ब्रह्मराक्षस" हीच म्हण खरी आहे. *

---

***टीप**—आम्ही वाई येथें गंगापुरीच्या वाटावर भानूंच्या वाड्यांत अठरा वर्षे होतों. कृष्णाकाठीं जुना वाडा, जवळ नाला, काटेरी शिके-काईचीं झुडुपें, नदीकडेलाच एक बुरूज त्यामुळें तेथें एक ब्रह्मसमंध आहे अशी समजूत होती व आहे. वाईतील जुने रहिवासी येतांजातां त्या बुरुजास नमस्कार करीत. कोणी आवसेस व शनिवारीं नारळ फोडीत, खडीसाखर ठेवीत व नैवेद्यही देत. आम्ही आणि प्राज्ञपाठशाळेंतील प्रौढ मुलें त्या बुरुजावर वाटेल तेव्हां रात्रीं अपरात्रीं वावरत असूं आणि प्रथम तर शौचाची सोयही आम्ही त्या बुरुजावरच खालीं नाला होता म्हणून केली होती. आम्हाला व प्राज्ञपाठशाळेंतील विद्यार्थ्यांना हा ब्रह्मसमंध कधीं दिसला नाहीं. तो आमच्या वाटेस आला नाहीं. ज्या जागेला बाधेची जागा म्हणून प्रथम चार आणे भाडेंही कोणी देत नव्हतें त्याच जागेला पुढें आठ आण्यापासून दोनअडीच रुपयांपर्यंत भाडें आम्हीच देऊं लागलों. आम्ही जर बाधेच्या नांवावर जागा सोडली असती, तर आम्हा भित्ऱ्यांच्या बोकांडीं तो ब्रह्मसमंध बसलाच असता! स्वानुभवाचें उदाहरण म्हणून मुद्दाम दिलें आहे. कोणाचा उपहास व्हावा किंवा करावा हा हेतु नाहीं.

ज्यांचें मन दुर्बळ त्याच्याचमागें हीं भुतें लागतात. कर्मफलप्रक्रियेप्रमाणें भुतांवरही नियंत्रण आहे. प्रत्येक गांवांत जेवढीं भुतें मानण्यांत येतात तितकेच देव तेथें असतात. हे देव स्वस्थ बसून सैतानाचें राज्य चालूं देतील, असें म्हणतां येणार नाहीं. भुतें असलीं तरी तीं दुर्बल आहेत, माणसानें त्यांना भीक न घालतां वागावें. हिंदुसमाजाला त्रास देणारीं जीं आसपास जिवंत भुतें आहेत, तीं गाडून टाकण्याचा यत्न हिंदुसमाजानें केला पाहिजे. हिंदुसमाजानें ईश्वरस्मरणपूर्वक आपलें कर्तव्य करीत राहावें, म्हणजे भुतांची बाधा होणार नाहीं. तीं बिचारीं गती घेतील. जो कर्तव्यदक्ष असतो, स्वधर्मरत असतो, विचारपूर्वक यत्न करतो, त्याच्या वाटेला हीं भुतें जात नसतात. दुबळ्यांच्या मागें त्यांचा उपद्रव असतो, हें ध्यानांत ठेऊन हिंदुसमाजानें वागावें.

येथवर हिंदुसमाजाचें मन दुबळें करण्याला ज्या गोष्टी कारणीभूत झालेल्या आहेत, त्यांतील कांहींचें विवेचन उदाहरणार्थ म्हणून केलें. अशा पुष्कळ गोष्टी आहेत. त्यांचा तर्कशुद्ध पद्धतीनें विचार करूनच निरास केला पाहिजे. जुन्या हिंदुधर्मांतील चार वाद हिंदु समाजाला दुर्बल करीत आहेत. ते म्हटले म्हणजे कलिवाद, ग्रहवाद, दैववाद व देववाद हे होत. यांतील कलिवादाचा विचार आठव्या प्रकरणांत आला आहे, देववादाचा विचार पुढें प्रकरण छत्तीसमध्यें येईल. प्रस्तुत ग्रहवाद व दैववाद यांचा विचार करूं.

**(११६) नवग्रह व मानवी कर्तृत्वः**–जगांत चंद्र, सूर्य, पृथ्वी आणि इतर ग्रह आहेत. त्या ग्रहांचीं आकर्षणेंही आहेत. परंतु त्या ग्रहांच्या इष्टानिष्टतेवर मानवी कर्तृत्व अवलंबून नाहीं, यास्तव त्यांचा रोष कमी होण्याकरितां दानें, अनुष्ठानें करीत बसणें, ज्योतिष्याचे घरीं पत्रिका घेऊन धांवपळ करीत राहाणें हें चुकीचें आहे. कांहीं आजार आला, खटला चालू झाला, परीक्षा आली कीं ज्योतिष्याकडे पळत सुटण्याची चाल जशी अडाण्यांत आहे तशीच ती आजच्या शिक्षितांतही दिसूं लागलेली आहे. दैनिक वर्तमानपत्रांत दिनभविष्य, आठवड्याचें भविष्य, महिन्याचें भविष्य असतेंच ! चार वर्तमानपत्रें जवळ जवळ ठेवून एका राशीचें भविष्य पडताळूं लागलें म्हणजे परस्पर इतका विरोध दिसतो कीं त्यावरून

ज्योतिष हें एक शास्त्र आहे, ग्रहयुतींचा आणि हवामानाचा संबंध आहे, इतकेंही मान्य करवत नाहीं. नवग्रहांची गति निसर्गाप्रमाणें चालू आहेच. सगळेच ग्रह सर्वस्वीं अनुकूल असे क्वचितच होणार; त्याकरितां शनिमहात्म्याचीं पारायणें केलीं, नवग्रहांचे जप केले, तिल, माष, तैल यांचें दान केलें तरी वक्री ग्रह सरळ मार्गी थोडकेच होणार आहेत? ग्रहांच्या मुख्य दशा, उपदशा, अंतरदशा असतील तशा चालू रहावयाच्याच! त्यांच्या शोधांत माणसानें **आपली दुर्दशा करून न घेणें हाच उत्तम मार्ग होय!** * प्रत्येक हिंदूनें अंतःस्फूर्ति, विचार, धैर्य, उत्साह यांच्या साहाय्यानें आपापलें कर्तव्य करावें. ग्रहांचें काम ग्रह करोत, आपलें काम आपण करावें हाच उत्तम पक्ष होय.

(११७) **वेदांमध्यें दैववाद नाहीं:**—हिंदुसमाजाच्या मनावर जी दैववादाची वा नशीबाची पक्कड आहे ती वैदिक विचारसरणी आणि वेदांतांतील कर्मफलप्रक्रिया यांना सोडून आहे. वेदांमध्यें दैववाद नाहीं. वेदांतील विचार उत्साहवर्धक, स्फूर्तिदायक असे आहेत, हें पुढील कांहीं मंत्रांवरून दिसून येईल—

**नानाश्रांताय श्रीरस्ति । पापो नृषद्वरोजनः ।**
**इंद्र इच्चरतः सखा । चरैवेति ॥१॥** –ऐ. ब्रा.

श्रमाविना श्रीची प्राप्ती नाहीं. आळशी मनुष्य पापी समजावा. मनुष्याचा मित्र ईश्वर आहे, म्हणून यत्न करावा, पुरुषार्थ संपादन करावा.

**पुष्पिण्यौ चरतो जंघे । भूष्णुरात्मा फलग्रहिः ।**
**शेरेऽस्य सर्वे पाप्मानः । श्रमेण प्रपथे हताः चरैवेति ॥२॥** ऐ. ब्रा.

जो चालतो (व्यायाम घेतो) त्याच्या मांड्या पुष्ट होतात. फलप्राप्तीपर्यंत यत्न करणारा प्रभावशाली होतो. त्याच्या मार्गांत येणारे पापभाव (विघ्नें) नष्ट होतात. यासाठीं यत्न करा, कष्ट करा.

---

* ग्रहांचे योग, स्वप्नें आणि अपशकुन यांचें फल केवळ काकतालीय न्यायानें दृष्टोत्पत्तीस येतें! यास्तव जाणते पुरुष त्यांचा धाक मानीत नाहींत.
—वेणीसंहार नाटक अंक २ रा.

आस्ते भग आसीनस्योर्ध्वस्तिष्ठति तिष्ठतः ।
शेते निपद्यमानस्य चराति चरतो भगः । चरैवेति ॥३॥

—ऐ. ब्रा.

जो घरीं बसतो त्याचें नशीबही बसतें, जो उभा राहातो त्याचें नशीबही उभें राहातें; जो निजतो त्याचें दैवही निजून राहातें; त्याचप्रमाणें जो चालूं लागतो त्याचें दैवही त्याच्या बरोबर येऊं लागतें. म्हणून प्रयत्न केला पाहिजे, साक्षेपी झालें पाहिजे.

चरन्वै मधु विन्दति चरन्स्वादुमुदुंबरं ।
सूर्यस्य पश्य श्रेमाणं योन तंद्रयते चरन् । चरैवेति ॥

—ऐ. ब्रा.

मधमाशी भ्रमण करूनच मध मिळवितें. पक्षीही संचार करूनच मधुर फळें प्राप्त करून घेतात. सूर्याचें तेज व त्याची शोभा हीं त्याच्या सतत व निरलस भ्रमणाचीं फळें होत. यासाठीं प्रयत्न करा, परिश्रम करा.

(११८) भारतांतील उत्थानयोगः—महाभारतांत याच आशयाचे विचार ठिकठिकाणीं आलेले आहेत.

अकृत्वा मानुषं कर्म यो दैवमनुवर्तते ।
वृथाश्राम्यति संप्राप्य पतिं क्लीबमिवांगनाः १३।६।२०
असंशयं दैवपरः क्षिप्रमेव विनश्यति ॥ १२।१०५।२२
उदाराणां तु सत्कर्म दैवं क्लीबा उपासते ॥ १२।१३९।८२
नह्युत्थानमृते दैवं राज्ञामर्थं प्रसाधयेत् ॥ १२।५६।१४
यत्नो हि सततं कार्यस्ततो दैवेन सिध्यति ॥ १२।१६३।५०
सुमंत्रिते सुविक्रांते सुकृते सुविचारिते ।
सिध्यन्त्यर्था महाबाहो दैवं चात्र प्रदक्षिणम् ॥ ३।३६।७
उत्थानवीरः पुरुषो वाग्वीरानधितिष्ठति॥१२।५८।१५
उत्थानेनामृतं लब्धं उत्थानेनासुरा हताः ॥
उत्थानेन महेन्द्रेण श्रैष्ठ्यं प्राप्तं दिवीह च ॥ १२।५८।१४
विद्या तपो वा विपुलं धनं वा ॥
सर्वं ह्येतद्व्यवसायेन शक्यम् ॥ १२।१२।४५

**भावार्थः**—यत्न न करतां जो दैवाच्या मागें लागतो, तो क्लीब पतीशीं गांठ पडलेल्या स्त्रीप्रमाणें वृथा कष्टी होतो. दैववादी मनुष्य निःसंशय सुशीघ्र नाश पावतो. क्लीब दैवाची आराधना करतो, तर मर्द सतत उद्योग करतो. राजालासुद्धां उद्योगाशिवाय सिद्धि मिळत नाहीं. सतत यत्न करावा त्याला दैवाची जोड मिळतांच यश मिळतें. हे महाबाहो, सुविचार, सुमंत्र, सुकृत व सुविक्रम यांनीं कार्यसिद्धि होते. कारण या चतुष्टयाभोंवतीं दैव घिरट्या घालीत असतें. शब्दशूरापेक्षां कर्तृत्ववानाचें महत्त्व अधिक असतें. यत्नानेंच देवांना अमृतप्राप्ति झाली. यत्नानेंच असुरांचा नाश झाला आणि यत्नाच्या जोरावरच महेंद्रानें स्वर्गांत श्रेष्ठपद मिळविलें. विद्या, तप व लौकिक यांपैकीं कांहीं पाहिजे असेल तर यत्नच केला पाहिजे.

**(११९) योगवासिष्ठांतील उद्योगवादः**—श्रीरामचंद्र एकदां निराशेनें कर्तव्यविहीन अशा वृत्तींत बसल्याचा प्रसंग योगवासिष्ठांत चित्रित केला आहे. त्या प्रसंगीं वसिष्ठांनीं दैववादाचें खंडण करून यत्नवादाचा जो पुरस्कार केला आहे तो त्यांच्याच शब्दांत येथें देणें उचित आहे—

परं पौरुषमाश्रित्य दंतैर्दंतान् विचूर्णयन् ।
शुभेनाशुभमुद्युक्तं प्राक्तनं पौरुषं जयेत् ।।
यत्नवद्भिः दृढाभ्यासैः प्रज्ञोत्साहसमन्वितैः ।
मेरवोऽपि निगीर्यन्ते कैव प्राक् पौरुषे कथा ।।
दैवं संप्रेरयति मां इति दग्धधियां मुखं ।
अदृष्टश्रेष्ठदृष्टीनां दृष्ट्वा लक्ष्मीर्निवर्तते ।।
मूढानुमानसंसिद्धं दैवं यस्यास्ति दुर्मतेः ।
दैवाद्दाहोऽस्ति नैवेति गंतव्यं तेन पावके ।।
दैवमेवेह चेत् कर्तृ पुंसः किमिव चेष्टया ।
स्नानदानासनोच्चारान् दैवमेव करिष्यति ।।
कालवद्भिर्विनिर्णीतं पांडित्यं यस्य राघव ।
अनध्यापित एवासौ तज्ज्ञश्चेद्दैवमुत्तमम् ।।
मूढैः प्रकल्पितं दैवं तत्परास्ते क्षयं गताः ।
प्राज्ञास्तु पौरुषार्थेन पदमुत्तमतां गताः ।।

**ये शूरा ये च विक्रांता ये प्राज्ञा ये च पंडिताः ।**
**तैस्तैः किमिव लोकेऽस्मिन् वद दैवं प्रतीक्ष्यते ॥**
**भोक्ता तृप्यति नाभोक्ता गन्ता गच्छति नागतिः ।**
**वक्ता वक्ति न चावक्ता पौरुषं सफलं नृणाम् ॥**

योगवासिष्ठांतील यासारखे आणखी किती तरी श्लोक देण्याजोगे आहेत. पण तो मोह आवरून त्या न दिलेल्या आणि वर दिलेल्या श्लोकांचें सार फार उद्बोधक आहे म्हणून तें भावार्थानें देतों—

'हे रामचंद्रा, जगांत सर्व कांहीं यत्नानेंच मिळतें. मात्र तो यत्न सम्यक्प्रयुक्त पाहिजे. अचुक यत्न पाहिजे. कार्यकारणसंबंध लक्षांत घेऊन तो यत्न पाहिजे. उद्योगानेंच कोणी सामान्य मनुष्यही इंद्रपदाची प्राप्ति करून घेतो. उद्योगानेंच त्रैलोक्याचें ऐश्वर्य उपभोगितां येतें. दैव हा पदार्थ मूर्खांनीं व आळशांनीं आणलेला आहे. दैवाचें अस्तित्व प्रयत्नांतच आहे. कर्मच जर नसेल तर प्रारब्ध येणार कुठलें ? रामा, पूर्वकर्माला प्रारब्ध म्हणतात. पण तें प्रारब्धही पूर्वप्रयत्नांचेंच फल असतें. पूर्वकर्म व उद्योग हे दोन एडके आहेत. त्यांत पूर्वकर्मरूपी एडक्याला उद्योगानें व तीव्रतर क्रियमाणानें हटवितां येतें. उद्योग हें प्रत्यक्ष प्रमाण व दैव हें अनुमान प्रमाण होय. अनुमानापेक्षां प्रत्यक्षाची किंमत केव्हांही अधिक आहे. दांत ओंठ खाऊन, धैर्य धरून उद्योग केला पाहिजे व प्रारब्धाची कल्पना यत्नानें पायांखालीं तुडविली पाहिजे. जगांतील राज्यें उद्योगीच मिळवितात. जगांतील उलाढाली कर्ते लोकच करितात. परंतु षंढ मात्र 'नशीब नशीब' म्हणून हांका मारीत बसतात ! एखाद्या भिक्षुकावर एकदम राज्याभिषेक झाला आणि एखाद्या गरीब मुलीला एकदम राजानें पट्टमहिषी केली तर त्या ठिकाणीं दैवाचा थोडासा अंश आहे, पण पूर्वप्रयत्न मात्र जोरदार आहे. सर्व कांहीं दैव करितें अशी कल्पना असेल, तर दैवानेंच दाह होईल म्हणून अग्नींत उडी टाकावी ! दैवानेंच मृत्यु येईल म्हणून कड्यावरून घालून घ्यावें ! दैवानेंच मुलगा पंडित होईल म्हणून त्याला शाळेमध्यें न घालतां निरक्षर ठेवावें ! दैवांत असेल तर जगेन म्हणून विष प्यावें ! दैवांत आरोग्य असेल तर स्नान, कपडे धुणें, घर स्वच्छ ठेवणें यांची आवश्यकता

नाहीं म्हणून घाणेरडें असावें!! रामा, दैवपर माणसें क्षीण झालीं आहेत आणि मेलीं आहेत. जे शूर, वीर, पराक्रमी, प्राज्ञ, अतिप्राज्ञ झाले ते पौरुषप्रयत्नानेंच उत्तम पदाप्रत गेले आहेत. अनुद्योगाच्या मागें लागून मनुष्यानें पुरुषगर्दभ होऊं नये. या संसारकुहरांतून जर सुटावयाचें असेल तर शास्त्रनियंत्रित उद्योग करून मनुष्यानें मुक्त झालें पाहिजे. रामा, आळशांनीं आणि षंढांनीं दैव पुढें आणलें आहे. तें कार्यकारणविवर्जित आहे. त्याचें स्तोम माजवूं नकोस. दैव हें रड्या लोकांनीं पुढें आणिलें आहे. परंतु कर्त्या पुरुषांनीं त्या दैवाला लाथ मारिली आहे. *

**(१२०) समर्थांचा अचुक यत्नवादः**—श्रीसमर्थ रामदासांनीं राष्ट्राला समर्थ करण्याकरितां अचुक यत्नाचा, दीर्घोद्योगाचाच पुरस्कार केलेला आहे. दीर्घोद्योगानें विधिलिखित (नशीब, प्रारब्ध) बदलतां येतें असें ते म्हणतात—

**रेखा तितुकी पुसोनी जाते। प्रत्यक्ष प्रत्यया येतें॥**
**डोळेझांकणी करावी ते। काय निमित्य ?॥**

समर्थ वाङ्मयांतील सारभूत उपदेश पुढील वचनांत आहे—

**वन्ही तो चेतवावा रे, चेतवीतांच चेततो॥**
**विवेक जाणिजे तैसा वाढवीतांच वाढतो॥**
**संग तो साक्षपी याचा धरितां साक्षपु घडे॥**
**केल्यानें होत आहे रे, आधीं केलेंचि पाहिजे॥**
**यत्न तो देव जाणावा। अंतरीं धरितां बरें॥**
**अचुक यत्न तो देवो। चुकणें दैत्य जाणिजे॥**

—श्रीसमर्थ—स्फुट कविता.

यत्नदेवाचे उपासक जे श्रीसमर्थ त्यांचेंच अनुकरण आतां हिंदुसमाजानें केलें पाहिजे. कष्टाविण फळ नाहीं, राज्य नाहीं, मान्यता नाहीं, म्हणजे यत्नाविना कांहीं नाहीं; असा वेदकालापासून उपदेश असतांना,

* योगवासिष्ठांत मुमुक्षुव्यवहार प्रकरणामध्यें यत्नवादाप्रमाणें **अभ्यासाचें महत्त्व** मोठ्या बहारीचें वर्णिलें आहे. त्याकरितां आमच्या 'नवयुगविद्यार्थीधर्म' पुस्तकांतील सहावें प्रकरण पहावें.

दैवानेंच सर्व कांहीं होतें, विद्या मिळते, धन मिळतें; राज्य, आरोग्य व पुत्र यांचीही प्राप्ति दैवानेंच होते. दैव, सद्दी, ग्रहदशा ही अनुकूल असली म्हणजे झालें. दैवाची लीला अगाध आहे, ती अटळ आहे, इत्यादि दुर्बल विचार आज हिंदुसमाजांत दिसतात ते सर्वस्वीं घालविले पाहिजेत. माणसानें विचारपूर्वक यत्न करावा, तो तीव्रतर करावा, त्यांत कांहीं न्यून न ठेवतां परिपूर्ण करावा. या तऱ्हेनें प्रयत्नांची शिकस्त केल्यावर जर कार्यसिद्धी न होईल तर कांहीं अदृष्ट शक्ति आहे असें मनःसमाधानार्थ समजावें. अचुक यत्न केला कीं यश येतें असा सामान्य नियम आहे म्हणून प्रयत्नवादच श्रेयस्कर मानावा. क्वचित् यश न दिसल्यास कांहीं अदृष्ट शक्ति आहे असें मानावें लागतें. आर्त, दुःखित, पीडित, व्याधिग्रस्त अशा माणसांच्या समाधानाकरितां दुःखप्रसंगीं दैववाद सांगितलेला आढळतो.

(१२१) **दैववाद कां यत्नवादः**—वेदांतशास्त्रदृष्ट्या कर्मांचे प्रारब्ध, संचित व क्रियमाण असे तीन विभाग होतात. जें भोगतों तें प्रारब्ध, जें भोगावयास अवशिष्ट असतें तें संचित व जें नित्य नवें कर्म तें क्रियमाण होय. यांतहि क्रियमाण म्हणजे मनुष्य प्रतिदिनीं जो यत्न नि जें कर्म करतो, त्यालाच महत्त्व अधिक आहे. तीव्रतर क्रियमाणानें प्रारब्ध हटवितां येतें. प्रारब्ध हें सांठलेल्या डबक्यासारखें असतें तर क्रियमाण हें धो धो वाहणाऱ्या प्रवाहासारखें असतें. क्रियमाणाचें स्वातंत्र्य मनुष्याला आहे. मनुष्य हा प्रवाहांत वाहात जाणारा केवळ ओंडका नाहीं. तो स्वतंत्र ( स्वतंत्रः कर्ता ) असून त्याच्या ठिकाणीं कर्तृत्व आहे. म्हणून प्रारब्ध वा नशिबापेक्षां उद्योग वा क्रियमाणाचीच मातब्बरी विशेष आहे.

दैव श्रेष्ठ कां उद्योग श्रेष्ठ, याचें उत्तर उद्योगच श्रेष्ठ हें होय. मनुष्य करतो कीं ईश्वर करवितो, याचें उत्तर ईश्वर स्वतः होऊन कांहीं करीत नाहीं तर तो तें करणाऱ्याकडूनच करवून घेतो, असें आहे. 'कुर्वन्तं तं हि कारयति.' जो उद्योग करीत असेल त्याकडूनच ईश्वर तें करवून घेतो. अगदीं बसा व झोंपाळू मनुष्याच्या पाठींत लाथ घालून ईश्वर त्याला कधींही कर्मप्रवृत्त करीत नाहीं.

(१२२) **दैववाद सोडा**:—नवा हिंदुधर्म हिंदुसमाजाला असें सांगतो, कीं दैववादाचा धिक्कार करा व उत्थानयोगाचा स्वीकार करा. दैवाच्या मस्तकीं शेंदूर भरून उद्योगशक्तिचामुंडेपुढें त्याला बळी द्या. मानानें जगा. दैव म्हणून कपाळाला हात लावीत न बसतां सिंहाप्रमाणें आक्रमणाची झडप घालण्यास सिद्ध व्हा.

—*—

# प्रकरण अकरावें

## वर्णव्यवस्था

नव्या हिंदुधर्माचें आचरण करण्यास शरीरबल, मनोबल, उद्योग यांची अत्यंत आवश्यकता आहे, म्हणून प्रथम त्यांचें विवेचन केलें. आज व्यवहारांत धर्माचीं मुख्य अंगें जात, जेवण, धंदा, शिवाशीव व लग्न हीं समजलीं जातात. व्यवहारांतील मुख्य धर्मक्षेत्र एवढेंच मर्यादित आहे. यास्तव वर्ण, जात, व्यवसाय, शिवाशीव व आहार यांसंबंधीं नव्या हिंदु-धर्मातील विधिनिषेध कोणते आहेत यांची स्पष्ट कल्पना यापुढील सहा प्रकरणांत वाचकांना द्यावयाची आहे. विवाह व तदनुषंगिक विषय यांचें विवेचन पुढील भागांत आहे.

(१२३) **एकजाति हिंदुसमाज**:—जुन्या हिंदुधर्मांत ज्यांना उद्देशून श्रुतिस्मृतिपुराणांनीं विधिनिषेध सांगितलेले आहेत ते सर्व लोक वर्ण व जाति या शब्दांनीं बोधित होणाऱ्या क्षेत्रामध्यें मोडतात. प्राचीन काळीं वर्णव्यवस्था होती, आज जातिसंस्था आहे. नव्या हिंदुधर्माला वर्ण आणि जाति या दिसत नाहींत. तर अखंड एकजिनसी अशी **एक हिंदुजातीच** दिसते. वर्णसंस्थेचें कार्य होऊन गेलें. आजची जातिसंस्था जन्मजात

उच्चता, नीचता व शिवाशीव अशा त्रिदोषांनीं युक्त असल्यामुळें उन्नतर अशा समाजरचनेची आतां अपेक्षा आहे. म्हणून नवा हिंदुधर्म अखिल हिंदूंची एक हिंदुजाति मानतो; आणि अखिल हिंदूंना उद्देशून जे विधिनिषेध सांगावयाचे आहेत ते तो सांगतो.

आज वर्णसंस्था व व्यवस्था लुप्त झालेली आहे. आजचा हिंदुसमाज जातिबद्ध आहे. तथापि पूर्वकालीं वर्णसंस्था कोणच्या स्वरूपाची होती, याची कल्पना प्राचीन वाङ्मयाच्या आधारें संक्षेपानें देतों.

(१२४) **ऋग्वेदांतील वर्णांचे उल्लेखः**—ऋग्वेदसंहिता ही सर्वात प्राचीन समजतात. ऋग्वेदकालीं आर्य व अनार्य एवढे दोनच वर्ग अस्तित्वांत होते. या कालाच्या शेवटीं पुरुषसूक्तामध्यें ब्राह्मण, राजन्य, वैश्य आणि शूद्र हे चार शब्द आले आहेत. ब्रह्म, क्षत्र, विश हे शब्द बरेच वेळां निराळ्या अर्थानें आलेले आहेत. पुरुषसूक्त हा मागाहूनचा प्रक्षेप असावा असें अनेक विद्वानांचें मत आहे. 'विशः' हा शब्द अनेक ठिकाणीं ऋग्वेदांत येतो; परंतु त्याचा अर्थ सामान्य लोक असाच आहे.

**यच्चिद्धि ते विशो यथा प्रदेव वरुणव्रतं मिनीमसि द्यवि द्यवि ।**
—ऋ. १।२५।१

क्षत्रिय शब्द ऋग्वेदांत पुष्कळ वेळां येतो. पण त्याचा अर्थ बलवान् 'तथा राष्ट्रं गुपितं क्षत्रियस्य ।' (ऋ. १०, १०९, ३) 'आ राजाना-मह ऋतस्य गोपा सिंधुपती क्षत्रिया यातमर्वाक् ।' (ऋ. ७, ६४, २) एवढाच दिसतो. इंद्रालाही क्षत्रिय हें विशेषण लावलेलें आहे. क्षत्रिय म्हणजे विशिष्ट वर्ग असा नसून बलिष्ठ असा अर्थ आहे. पुढील ऋचेंत हा अर्थ अगदीं स्पष्ट आहे—

**अग्निरीशे बृहतः क्षत्रियस्य अग्निर्वाजस्य परमस्य रायः ।**
ऋ. ४।१२।३.

अग्नि हा मोठ्या बलाचा, अन्नाचा व उत्कृष्ट धनाचा स्वामी आहे असें त्यांत म्हटलें आहे.

ब्राह्मण हा शब्द अतिरात्र या नांवाच्या यागांत देवांची स्तुति गाणारा 'ब्राह्मणासो अतिरात्रे न सोमे सरो न पूर्णमभितो वदन्तः ।' 'ब्राह्मणासः

सोमिनो वाचमक्रत । ' ( ऋ. ७, १०३, ७–८ ) अशा अर्थानें आलेला आहे. इतरत्रही ब्राह्मण हा शब्द अनेक वेळां स्तुति व सूक्त अशा अर्थानेंच आलेला आहे. ब्रह्म शब्दाचा अर्थ सूक्त, स्तुति, स्तोत्र असाच प्रामुख्यानें दिसतो; ब्राह्मणवर्ग अशा अर्थानें तो दिसत नाहीं. ' अकारि ते हरवो ब्रह्मनव्यं, ' ( ऋ. ४, १६, २१ ) ' अकारि ब्रह्म समिधानं तुभ्यं, ' ( ऋ. ४, ६, ११ ) ब्रह्म, क्षत्र आणि विश यांचे हे अर्थ पाहिले म्हणजे वर्णसंस्था त्या कालीं दृढ झाली नव्हती असें अनुमान निघतें.

**(१२५) ब्राह्मण शब्दाचा प्राचीन अर्थः**—ब्राह्मण या शब्दाचा फार प्राचीन काळाशीं व संस्कृतीशीं संबंध येतो. ऋग्वेदांत ब्राह्मण व ब्राह्मणपुत्र या अर्थानें ' ब्रह्मन् ' हा शब्द आलेला आहे. यज्ञामध्यें चार वेदांचे ऋत्विज लागतात. त्यांत एक ब्रह्मा आहे. ' ब्रह्मन् ' याचा मूळ अर्थ विश्वव्यापक तत्त्व असा असल्यामुळें त्याचा ब्राह्मण शब्दाशीं संबंध जोडतां येत नाहीं. होता, उद्गाता, अध्वर्यु व ब्रह्मा असें वर्गीकरण होण्यापूर्वी ब्रह्मन् हा शब्द उत्पन्न झालेला होता. त्यावरून पुढें यज्ञसंस्थेशीं संबद्ध असा हा वर्ग निर्माण झाला असावा. ब्राह्मणाला जातिस्वरूप येण्यापूर्वी तो मांत्रिकपणा, वैद्यक, कवि, स्तोत्रकर्ता, प्रवक्ता या नात्यानें परिचित असावा.

वैश्य व राजन्य हे शब्द ऋग्वेदांत येत नाहींत. ते पुढें तैत्तिरीय संहिता, तैत्तिरीय ब्राह्मण इत्यादिकांत आढळतात. म्हणजे त्या कालांत ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे तीन पृथक् वर्ण होऊन त्यांचे परस्परसंबंध ठरून गेले असावेत.

**( १२६ ) शूद्राचा चातुर्वर्ण्यांत समावेशः**—चौथा वर्ण जो शूद्र तो असंस्कृत, अशुचि, काळा असा दिसतो. तो रानटी होता. म्हणूनच शतपथ ब्राह्मणांत ' पशु वा एतच्छ्मशानं यच्छूद्रः ' म्हणजे ' शूद्र हा चालतें ( पशु ) स्मशानच होय ' असें म्हटलें असून वसिष्ठ–धर्मसूत्रांत ( १८, ११–१२ ) त्याचा अनुवाद करून ' तस्माच्छूद्रसमीपेनाध्येतव्यम् ' म्हणजे शूद्राच्या संन्निध वेदांचें अध्ययन करूं नये, असा निष्कर्ष काढला आहे. शूद्रापेक्षां निषादांना अधिक अधिकार होते. निषाद राजाला यज्ञाधिकार होता हें पुढील वचनावरून सिद्ध होतें. ' निषादस्थपतिं याजयेत् ; '

शूद्र हा आर्यसहवासानें पुढें सुधारला. कालांतरानें त्याचे ठिकाणीं वर्णत्व आलें व धर्मत्वहि आलें असें व्यासस्मृतीवरून दिसतें. 'शूद्रः चतुर्थो वर्णोऽपि वर्णत्वात् धर्ममर्हती।' पुरुषसूक्तांत जें चातुर्वर्ण्याचें अलंकारयुक्त वर्णन आहे तें याच कालांतील होय.

(१२७) **दस्यु व आर्यः**—ऋग्वेदांत वरचेवर जो शब्द येतो तो दस्यु किंवा दास हाच होय. हे दास काळ्या वर्णाचे आणि आर्य गौर-वर्णी, दास अव्रती म्हणजे यज्ञ न करणारे तर आर्य हे व्रती म्हणजे यज्ञ करणारे होते. या उभयतांचा विग्रह चांगलाच दिसतो. दासांचा पराभव करून त्यांना हांकून द्यावें, अशा कल्पना मंत्रांत दिसतात. आर्य आणि दस्यु यांना नीट ओळख, आणि अव्रत अशा दस्यूंना शिक्षा करून यज्ञ करणाऱ्या आर्यांच्या स्वाधीन कर, असें ऋग्वेदांत 'विजानीह्यार्यान्ये च दस्यवो बर्हिष्मते रंधया शाशदव्रतान्' ( ऋ. १, ५९, २. ) म्हटलें आहे. असेंच आर्य–दस्यु यांचे संबंधदर्शक उल्लेख ( ऋ. १, १७४, ७; २, ११, ४. ) वगैरे ठिकाणीं आहेत. आर्य व दस्यु यांची गांठ पडल्यावर बलिष्ठ अशा आर्यांच्या समाजांत समरस होण्याजोगी दस्यूंची मनःस्थिति नव्हती; म्हणून त्याला प्रथम आर्यांनीं कनिष्ठ स्थान दिलें. हाच दस्यु पुढें शूद्र म्हणून आर्यांच्या समाजांत समाविष्ट झाला असावा. चर्षणी म्हणजे शेती करणारे आणि इतर मिळून पंचजनांचा उल्लेख ऋग्वेदांत आहे. पांचवा वर्ण निषाद हा होय.

( १२८ ) **तैत्तिरीय ब्राह्मणांतील उल्लेखः**—तैत्तिरीय संहिता आणि ब्राह्मणें या कालीं त्रैवर्णिकांत उच्चनीच भाव नव्हता. पण पुढें उच्चनीच-त्वाच्या कल्पना आढळतात. विश्वामित्र नि वसिष्ठ, कार्तवीर्य आणि जमदग्नि यांच्यामधील लढा हेंच सांगतो. वैश्य हा दोन वर्णांहून कमी. तो 'आद्य' म्हणजे खाण्यास योग्य असेंच समजण्यांत येऊं लागलें होतें. तांड्य ब्राह्मणांत वैश्य हें ब्राह्मणांचें व क्षत्रियांचें अन्न होय, ब्राह्मण हा राज्य करण्याला योग्य नाहीं, त्यानें तोंडानें शौर्य दाखवावें, असें वर्णन आहे. क्षत्रियापेक्षां ब्राह्मण दुबळा व तो दरिद्री म्हणून क्षत्रियावलंबी असे. विद्वान् ब्राह्मण व राजा यांची योग्यता सारखी, असे उल्लेख पुढें गौतम धर्मसूत्रांत आले आहेत. तथापि त्यापूर्वी राजाला श्रेष्ठ व ब्राह्मणाला कमी असें

समजत असत. ब्रह्म आणि क्षत्र यांची परस्पर–आवश्यकता आहे, त्यांनीं गुण्यागोविंदानें वागावें, अशा कल्पनाही तैत्तिरीय ब्राह्मणांत ( ३, ९, १४, १–२ ) अश्वमेधप्रकरणांत सांगितल्या आहेत. 'यदा खलु वै पुरुषः श्रियमश्नुते वीणास्मै वाद्यते...न वै ब्राह्मणे श्री रमते इति ब्राह्मणोऽन्यो गायेद्राजन्योऽन्यः'। 'नवै ब्राह्मणे राष्ट्रं रमते।' लक्ष्मी ब्राह्मणाच्या ठायीं रमत नाहीं; राष्ट्रहि एकट्या ब्राह्मणामुळें रमत नाहीं. संपत्ति असेल तरच त्या पुरुषाजवळ कोणी वीणा वाजवील म्हणून दोघांनीं सहकार्य करून गावें, या उल्लेखावरून ब्राह्मणक्षत्रियांतील उच्चनीचता प्रतीत होते.

**(१२९) चातुर्वर्ण्याची बनावटः**–जगांतील कोणत्याही मनुष्य-समाजामध्यें व्यवस्था फार उशीरानेंच होते. अव्यवस्थेंतून व्यवस्था उत्पन्न होण्याला कांहीं काल स्वाभाविकच लागतो. त्या दृष्टीनें चातुर्वर्ण्य-व्यवस्थेपूर्वी बराच कालपर्यंत हिंदुस्थानांतील वैदिक हिंदु समाज हा संक्रमणावस्थेमध्यें होता हें सिद्ध आहे.

पूर्वी एका काळीं समाजांत वर्ण नव्हते. जसजशी आवश्यकता उत्पन्न होत गेली, तसतसे ते उत्पन्न झाले, त्यासंबंधीं बृ. आ. अ. १ ब्रा. ४ मध्यें पुढील वर्णन आहे—

**ब्रह्म वा इदमग्र आसीदेकमेव तदेकं सन्नव्यभवत् तच्छ्रेयो-रूपमत्यसृजत क्षत्रं यान्येतानि देवत्रा क्षत्राणीन्द्रो वरुणः सोमो-रुद्रः पर्जन्यो यमो मृत्युरीशानः। तस्मात्क्षत्रात्परं नास्ति ॥११॥**

**स नैव व्यभवत् स विशमसृजत यान्येतानि देवजातानि गणश आख्यायन्ते वसवो रुद्रा आदित्या विश्वेदेवा मरुत इति ।१२॥**

**स नैव व्यभवत् सशौद्रं वर्णमसृजत पूषणमियं वै पूषेयं हीदं सर्वं पुष्यति यदिदं किं च ॥१३॥**

**भावार्थः**—पूर्वी हा समाज ब्राह्मणरूपानेंच होता, म्हणजे एकवर्ण होता; पण तो प्रभावी होऊं शकला नाहीं. म्हणून त्यानें योग्य निवड करून क्षत्रियवर्ण बनविला. हे जे इंद्र, वरुण, सोम, रुद्र, पर्जन्य, यम, मृत्यु व ईशान असे देवांचे संरक्षक ते क्षत्रिय होत. म्हणून समाजांत क्षत्रियां-पेक्षां कोणीही श्रेष्ठ नाहीं.

क्षत्रियवर्ण उत्पन्न केला तरी तो समाज पूर्ण बनला नाहीं, म्हणून त्यानें वसु, रुद्र, आदित्य, विश्वेदेव आणि मरुत असे जे देव समूह-रूपानें उल्लेखिले जातात, त्यांचा वैश्यवर्ण बनविला म्हणजे समाजाचें वैगुण्य घालविण्याकरितां ब्रह्म व क्षत्रिय यांच्या जोडीला वैश्यांचीं संघटित मंडळें स्थापन केलीं.

त्रैवर्ण्य उत्पन्न झालें तरी समाजाचें पूर्ण सामर्थ्य वाढलें नाहीं असें दिसलें. तें वैगुण्य घालविण्याकरितां त्या समाजानें आपलें पोषण करणारा शूद्रवर्ण उत्पन्न केला. कारण ही पृथ्वी म्हणजेच पूषा होय. म्हणून हें जें कांहीं आहे त्या सर्वांचें ही पृथ्वीच पोषण करते, म्हणून सर्व समाजाचें पोषण करणारा शूद्रवर्ण निर्माण केला.

वरील वाजसनेयि ब्राह्मणांतील मंत्र आणि त्यांचा आशय ध्यानीं घेतला म्हणजे समाजाचा विकास म्हणजेच चातुर्वर्ण्य होय, असें सिद्ध होतें.

**(१३०) एकवर्णी समाजः**–पूर्वी एका काळीं एकवर्ण समाज होता, एकदम चार वर्ण उत्पन्न झालेले नाहींत. त्यासंबंधीं अनेक वचनेंही आढळतात. कांहीं वचनें उपलक्षण म्हणून देतों—

**एकवर्णमिदं पूर्वं विश्वमासीद्युधिष्ठिर।**
**कर्मक्रियाविभेदेन चातुर्वर्ण्यं प्रतिष्ठितम् ॥**

–म. भा. वनपर्व अ. १८०

**अर्थः**–हे युधिष्ठिरा! पूर्वी या जगांत एकच वर्ण होता; परंतु पुढें कर्म व क्रिया यांच्या भेदामुळें चार वर्ण निर्माण झाले.

तसेंच भागवतांतही आहे—

**एक एक पुरा वेदः प्रणवः सर्व वाङ्मयः।**
**देवो नारायणो नान्यः एकोऽग्निर्वर्ण एव च॥** ९–१४–४

महाभारतांतच असेंही सांगितलें आहे कीं,

**न विशेषोऽस्ति वर्णानां सर्वं ब्राह्ममिदं जगत्।**
**ब्रह्मणा पूर्वसृष्टं हि कर्मभिर्वर्णतां गतम् ॥ १० ॥**

–म. भा. शां. प. अ. १८६

**अर्थः**—ब्रह्मदेवानें पूर्वी हें जग निर्माण केलें त्या वेळीं वर्णभेद नव्हता. सर्व ब्राह्म होते, परंतु कर्मांच्या योगानें निरनिराळे वर्ण झाले. श्रीमत् भागवतामध्येंही असेंच म्हटलें आहे कीं पूर्वी हंस नांवाचा एकच वर्ण होता.

**आदौ कृतयुगे वर्णो नृणां हंस इतीरितः ।**
**कृतकृत्याः प्रजा जात्या तस्मात्कृतयुगं विदुः ॥ १० ॥**

—श्री. भा. स्कं. ११ अ. १७

**अर्थः**—प्रथम कृतयुगांत मनुष्यांचा हंस नांवाचा एकच वर्ण होता. त्या युगांत प्रजा जन्मतःच कृतकृत्य होत्या. म्हणजे जन्मसार्थक्याकरितां त्यांना कोणत्याही इतर कृत्याची जरूर नव्हती, म्हणून या युगाला कृतयुग म्हणतात.

वाल्मिकी रामायण उत्तरकांड अ. ३० श्लो. १९ मध्यें ‘ पूर्वी एकवर्ण समाज होता, त्यांची भाषा एक होती, रूपानेंही त्यांत वैलक्षण्य नव्हतें, ’ असें वर्णन आहे.

**(१३१) चातुर्वर्ण्याची कुठें स्थापना झाली ?**:—ही वर्णसंस्था प्रथम उत्तरकुरु व उत्तरमद्र आणि गंगा व यमुना यांच्या मधील प्रदेशांत स्थापन झाली असावी. ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हे आर्यांचेच भिन्नभिन्न गट होते, ते पुढें एकाच समाजरचनेंत येऊन मिसळले. ऋग्वेदकालीं एकटा ब्राह्मणवर्णच असावा. पुढें क्षत्रवर्ण येऊन मिळाला. पुढें तिसरा वर्ण आला, त्याला वैश्य असें नांव दिलें गेलें.

**(१३२) प्रसरणशील चातुर्वर्ण्यः**—प्राचीनकालीं हे वर्ण अनेक निर्बंधांनीं अभेद्य नव्हते. क्षत्रियाचा ब्राह्मण व ब्राह्मणाचा क्षत्रिय होत असे. योग्यता, इच्छा व सामर्थ्य असतां पूर्वी खालचा मनुष्य वर जात असे. स्वधर्माचरण सोडल्यानें क्षत्रियांचे वैश्य झाल्याचीं व वैश्यांचे ब्राह्मण झाल्याचीं उदाहरणें आढळतात. जन्म व धंदा आणि इतर बंधनें यांनीं चातुर्वर्ण्य बराच काल दृढ झालेलें नव्हतें. आनुवंशिक संस्कार धंद्यास उपयोगी पडतो हें खरें, पण ब्राह्मणाचा मुलगा ब्राह्मण आणि क्षत्रियाचा मुलगा क्षत्रिय हा अग्रह फार पुढें उत्पन्न झाला. शूद्रसमावेशनानंतर जन्म, वृत्ति व संस्कार यांमुळें चातुर्वर्ण्याला दार्ढ्य आलें, आणि स्मृतिकालीं चातुर्वर्ण्य हें जन्मावलंबी ठरलें, त्याला पुढें कर्मविपाकाचीही जोड देण्यांत आली.

चातुर्वर्ण्य जेव्हां जन्मसिद्ध झालें नव्हतें, त्या वेळीं तें प्रसरणशील कसें होतें, याची कल्पना वायुपुराण, विष्णुपुराण, अग्निपुराण, ब्रह्मांडपुराण, मत्स्यपुराण, भागवत इत्यादि अनेक ग्रंथांवरून येते—

(१३३) वर्णांतराचे आधारः—

विश्वामित्रो नरपतिर्मान्धाता संस्कृतिः कपिः ।
वार्धाश्वः पुरुकुत्सश्च भास्वान् गृत्समदः प्रभुः ॥
आर्ष्टिषेणोऽजमीढश्च छागो गार्ग्यस्तथैव च ।
कक्षीवांश्च विरूपश्च मुद्गलो हरितस्तथा ॥
रथीतरश्च कण्वश्च विष्णुवृद्धादयो नृपाः ।
क्षत्रोपेता द्विजा ह्येते तपसा चर्षितां गताः ॥ —वायुपुराण.

यावरून मूळचे क्षत्रिय असून तपश्चर्येनें त्याच जन्मीं ब्राह्मण बनले, हें सुस्पष्ट होत आहे.

इन्द्रो वै ब्रह्मणः पुत्रः क्षत्रियः कर्मणाऽभवत् ।
ज्ञातीनां पापवृत्तीनां जघान नवतीर्नव ॥११॥

—म. भा. शां. प. अ. २२

**अर्थः**—ब्रह्मदेवाचा पुत्र इंद्र कर्मानें क्षत्रिय बनला व त्यानें नव्याण्णव पापकर्मी ज्ञातींचा वध केला.

याचप्रमाणें क्षत्रियांचे ब्राह्मण झाले असें दाखविणारे श्लोक वायुपुराण अ. ६६ मध्यें आहेत—

दायादश्चापि गर्गस्य शिनिबद्धाद् बभूव ह ।
स्मृताश्च ते ततो गार्ग्याः क्षेत्रोपेता द्विजातयः ॥
मुद्गलस्यापि मौद्गल्याः क्षेत्रोपेता द्विजातयः ।
एते ह्यङ्गिरसः पक्षे संश्रिताः कण्वमुद्गलाः ॥
तस्यामुत्पादयामास मान्धाता त्रीन् सुतान् प्रभुः ।
पुरुकुत्समम्बरीषं मुचुकुन्दं च विश्रुतम् ॥
अम्बरीषस्य दायादो यौवनाश्वः परः स्मृतः ।
हारीतो युवनाश्वस्य हारीताः शूरयः स्मृताः ॥
एते ह्यङ्गिरसः पुत्राः क्षेत्रोपेता द्विजातयः ॥ इति ।

वरील उताऱ्यांत ‘ क्षेत्रोपेता द्विजातयः ’ या पदाकडे वाचकांचें लक्ष आम्ही वेधूं इच्छितों.

**पूरोर्वंशं प्रवक्ष्यामि यत्र जातोऽसि भारत । —भागवत**
**यत्र राजर्षयो वंश्या ब्रह्मवंश्याश्च जज्ञिरे ॥ —स्कं. ९ अ. २०**

केवळ ब्राह्मणक्षत्रियच नव्हेत तर चारही वर्णांचे लोक एकाच वंशांत उत्पन्न झाल्याचे दाखले आहेत, ते खालीं दिले आहेत—

**पुत्रो गृत्समदस्यापि शुनको यस्य शौनकः ।**
**ब्राह्मणा क्षत्रियाश्चैव वैश्याः शूद्रास्तथैव च ॥**
**एतस्य वंशे संभूता विचित्रैः कर्मभिर्द्विजाः ॥**

वायु. अ. ३०, श्लो. ४

( हाच श्लोक ब्रह्मपुराण अ. ९ मध्येंही आला आहे. )

याच पुराणामध्यें ऋषभाच्या शंभर पुत्रांपैकीं नव्वद क्षत्रिय व दहा ब्राह्मण झाल्याचा उल्लेख आहे. अग्नि व ब्रह्मांडपुराणांत याला अनेक आधार मिळतात.

श्रीमत् भागवत स्कं. ९ अ. १७ मध्यें चंद्रवंशीय राजा पुरूरवा याचें वर्णन आहे. तें वाचलें म्हणजे क्षत्रियाचे ब्राह्मण कसे होत असत याची कल्पना येते—

**यः पूरुरवसः पुत्र आयुस्तस्याभवत्सुताः ।**
**नहुषः क्षत्रवृद्धश्च रजीरंभश्च वीर्यवान् ॥१॥**
**अनेना इति ... ... ... ॥**

चंद्रवंशांतील राजा पुरुरवा याचा पुत्र आयु यास पांच पुत्र झाले. नहुष, क्षत्रवृद्ध, रजी, रम्भ व अनेना इत्यादि.

**क्षत्रवृद्धसुतस्यासन् सुहोत्रस्यात्मजास्त्रयः ॥२॥**
**काश्यः कुशो गृत्समद इति गृत्समदादभूत् ॥**
**शुनकः शौनको यस्य बह्वृचप्रवरो मुनिः ॥३॥**

क्षत्रवृद्धाचा पुत्र सुहोत्र वा शुनहोत्र यास तीन पुत्र झाले; ते काश्य, कुश व गृत्समद हे होत. गृत्समद हा अंगिरा ऋषींचा शिष्य होऊन ब्राह्मण झाला. हा गृत्समद—आंगिरस ऋग्वेदांतील दुसऱ्या मंडलाचा मंत्रद्रष्टा आहे.

गृत्समदाचा पुत्र शुनक, त्याचा पुत्र शौनक हा भृगुऋषींचा शिष्य म्हणून भार्गवगोत्री झाला; यानें बृहद्देवता, ऋक्प्रातिशाख्य, आणि गृह्यकर्मादिकांवर कारिका लिहिल्या आहेत. याच्याबद्दल सायणाचार्यांनीं ऋग्वेद-भाष्यांत उतारा दिला आहे.

**य: आंगिरस शौनहोत्रो भूत्वा भार्गवः** —भा. स्कं. ९
**शौनकोऽभवत् स गृत्समदो द्वितीयं मंडलमपश्यत्**
**रम्भस्य रभसः पुत्रो गंभीरश्चाक्रियस्ततः ॥१०॥**
**तस्य क्षेत्रे ब्रह्म जज्ञे शृणु वंशमनेन सः ॥**

राजा पुरूरवा याच्या आयुनामक पुत्राचा रम्भ नांवाचा पुत्र, त्याचा रभस, त्यास अक्रिय नांवाचा पुत्र झाला. त्याचा सर्व वंश ब्राह्मण झाला. आयूचा ज्येष्ठ पुत्र नहुष, यास ययाति नामक पुत्र झाला. ययातीची पट्टराणी देवयानी ही शुक्राचार्य नांवाच्या ब्राह्मणाची मुलगी होती. ययातीला यदु, तुर्वसु, द्रुह्यु, अनु आणि पुरु असे पांच पुत्र होते.

**पूरोर्वंशं प्रवक्ष्यामि यत्र जातोऽसि भारत ।** भा. स्कं. ९
**यत्र राजर्षयोवंश्या ब्रह्मवंश्याश्च जज्ञिरे ॥** अ. २०॥१॥

पट्टराणी देवयानी हिची दासी शर्मिष्ठा ही ययातीची दुसरी राणी होती. हिचा कनिष्ठ पुत्र पूरु हा बापाच्या कृपेनें राज्यावर बसला. ह्या पुरूच्या वंशांतच भरत नांवाचा विख्यात राजा होऊन गेला. त्याच्या नांवानें भारतवंश प्रसिद्धीस आला. राजा पुरूचे वंशांत ब्राह्मण व क्षत्रिय असे दोन्ही उत्पन्न झाले.

**ऋतेयो रन्तिभारोऽभूत्त्रयस्तस्यात्मजा नृप ॥** भा. स्कं. ९
**सुमतिर्ध्रुवोऽप्रतिरथः कण्वः प्रतिरथात्मजः ॥** २०।६
**तस्य मेधातिथिस्तस्मात्प्रस्कण्वाद्या द्विजातयः ॥**

राजा पुरूपासून दहावा ऋतेयु नांवाचा राजा झाला; त्याचा पुत्र रन्तिभार, त्याला तीन पुत्र होते. सुमति, ध्रुव व अप्रतिरथ हे ते होत. अप्रतिरथाचा पुत्र कण्व, हा ब्राह्मण झाला. कण्वाचा पुत्र मेधातिथी, त्याचा पुत्र प्रस्कण्व, याचे वंशज कण्व किंवा काण्वायन या नांवाचे ब्राह्मण आहेत.

वरील उताऱ्यांवरून चातुर्वर्ण्य हें जन्मावलंबी नव्हतें, त्याला धंद्यामुळें दार्ढ्य आलें नव्हतें हें स्पष्ट दिसतें. या कालांत वर्ण धंद्यावर अवलंबून नव्हता. एकाच कुटुंबांत अनेक धंदे करणारीं माणसें होतीं. 'कारुरहं ततो भिषगुपलप्रक्षिणी नना । नानाधियो वसूयवोऽनु गा इव तस्थिमेन्द्रायेन्दो परिस्रव'। ( ऋ. ९, ११२, ३ ) या मंत्रांत ऋषि म्हणतो, 'मी स्तोत्रकर्ता ( पुरोहित ) आहें, माझा बाप वैद्य आहे, आणि आई दळण कांडण करते.' अशा रीतीनें द्रव्यार्जनार्थ अनेक धंदे त्या वेळीं करीत. राजेसुद्धां पौरोहित्य करीत असत.

(१२४) **जन्म व चातुर्वर्ण्यः**—या कालानंतर पुढें हळुहळू ब्राह्मण म्हणजे देवता, भूदेव अशी त्याची स्तुति होऊं लागली; आणि पुढें स्मृति आणि पुराणें या कालांत जन्मजात उच्चनीचपणाच्या कल्पना रूढ झाल्या. सर्वांत ब्राह्मण श्रेष्ठ, त्याच्या खालचा क्षत्रिय, त्याच्या खालचा वैश्य, त्याच्या खालचा शूद्र आणि त्याच्याही पलीकडे इतर संकर जाति नि अस्पृश्य जाति वगैरे मानल्या गेल्या.

**वर्णः**—प्राचीन वाङ्मयांत वर्ण व जाति हे शब्द क्वचित् एकाच अर्थानें वापरलेले असले तरी एका वर्णांत अनेक जातींचा समावेश होत असे. आज ब्राह्मणवर्णांत अनेक जाति असून त्या अद्याप पृथक्पणानेंच राहात आहेत. स्मार्तसंप्रदायांत जसे विविध देवतांचे उपासक अन्तर्भूत होतात, तसेच शूद्र वर्णांतहि अनेक जातींचे लोक समाविष्ट होतात, हें अमरकोशांतील एक शूद्र वर्ग घेतला तर त्यावरूनही दिसून येतें. आज मोटार चालविणाऱ्यांचा वर्ग घेतला तर त्यांत अनेक जातींचे लोक पडलेले दिसतात. हजामतीच्या धंद्यांत कुणबी, मराठा, लिंगायत, परदेशी अशा निरनिराळ्या जातीचे लोक आपापले जातिधर्म पाळून राहातात. अनेक जातींना योग्यतेनुरूप विशिष्ट वर्णांमध्यें घालणें आणि सर्वांमध्यें समान संस्कृतीचा प्रसार करणें असें हें कार्य बुद्धपूर्वकालापर्यंत चालू होतें.

आपस्तंबादि धर्मसूत्रांमध्यें व मन्वादि स्मृतींमध्यें चार वर्णांच्या व्यवहारासंबंधीं पुष्कळच विवेचन आलेलें आहे. कल्पनेकरितां कांहीं वचनें देतों.

( १३५ ) स्मृतिसूत्रांतील आधार व भावार्थः—

चत्वारो वर्णा ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्राः ॥४॥
तेषां पूर्वः पूर्वो जन्मतः श्रेयान् ॥५॥
अशूद्राणामदुष्टकर्मणामुपनयनं वेदाध्ययनमग्न्याधेयं फलवन्ति च कर्माणि ॥६॥ —आपस्तंब ( १–१–१ )
शुश्रूषाशूद्रस्येतरेषां वर्णानाम् ॥७॥ — „ ( १–१–१ )
विषमगते त्वाचार्ये उग्रतः शूद्रतो वाहरेत् ॥२०॥
सर्वदा शूद्रत उग्रतो वाचार्यार्थस्याहरणं धर्म्यमित्येके ॥२१॥ ( १–२–७ )
सर्ववर्णानाँ स्वधर्मे वर्तमानानां भोक्तव्यँ शूद्रवर्जमित्येके ॥१३॥ —आपस्तंब ( १–६–१८ )
आर्याधिष्ठिताः वा शूद्राः सँस्कर्तारः स्युः ॥४॥ „ ( २–२–३ )
वध्यः शूद्र आर्यायाम् ॥९॥ „ ( २–१०–१७ )
जिव्हाच्छेदनँ शूद्रस्य आर्यँ धार्मिकमाक्रोशतः ॥१४॥ —आपस्तंब ( २–१०–२७ )
अवरोऽप्यार्यः शूद्रेण ॥११॥ —गौतम (अ. ६ प्र. १ )
शूद्रश्चतुर्थो वर्ण एकजातिः ॥५१॥
आचमनार्थे पाणिपादप्रक्षालनमेवैके ॥५१॥ गौ. (अ.१ प्र. २)
आर्यस्त्र्यभिगमने लिङ्गोद्धारः स्वहरणं च ॥२॥
अथ हास्य वेदमुपशृण्वतस्त्रपुजतुभ्यां श्रोत्रप्रतिपूरणमुदाहरणे जिव्हाच्छेदो धारणे शरीरभेदः ॥४॥ —गौतम ( अ. ३ प्र. २ )
चत्वारो वर्णा ब्राह्मणक्षत्रियविट्शूद्राः ॥१॥
तेषां वर्णानूपूर्व्येण चतस्रो भार्या ब्राह्मणस्य ॥२॥ तिस्रो राजन्यस्य ॥३॥ द्वे वैश्यस्य ॥४॥ एका शूद्रस्य ॥५॥ —बौधायन (प्र. १ अ. ८)
शूद्रेषु पूर्वेषां परिचर्या ॥५॥
अवध्यो वै ब्राह्मणः सर्वापराधेषु ॥१८॥ बौधायन (प्र.१ अ.१०)
अयन्त्रितकलत्रा हि वैश्यशूद्राभवन्ति ॥१५॥

कर्षणशुश्रूषाधिकृतत्वात् ॥१६॥ बौधायन ( प्र. १ अ. ११ )
गवार्थे ब्राह्मणार्थे वा वर्णानां वाऽपि संकरे
गृह्णीयातां विप्रविशौ शस्त्र धर्मव्यपेक्षया ॥८०॥

बौधायन ( प्र. ४ अ. ५ )

एतेषां परिचर्या शूद्रस्व ॥२४॥ अनियता वृत्तिः ॥२५॥

—वसिष्ठ अ. २

शूद्रान्नेनोदरस्थेन यः कश्चिन्म्रियते द्विजः ।
स भवेत्सूकरो ग्राम्यस्तस्य वा जायते कुले ॥२६॥

—वसिष्ठ अ. ६

एके वैतच्छ्मशानं ये शूद्रास्तस्माच्छूद्रसमीपेनाध्येतव्यम् ॥९॥
अथापि यमगीताञ्श्लोकानुदाहरन्ति ॥१०॥
स्मशानमेतत्प्रत्यक्षं ये शूद्राः पापचारिणः ।
तस्माच्छूद्रसमीपे तु नाध्येतव्यं कदाचन ॥११॥
न शूद्राय मतिं दद्यान्नोच्छिष्टं न हविष्कृतम् ।
न चास्योपदिशेद्धर्मं न चास्य व्रतमादिशेत् ॥१२॥ .

—वसिष्ठ अ. १८

ब्राह्मणस्य अध्यापनम्, क्षत्रियस्य शस्त्रनित्यता
वैश्यस्य पशुपालनम्, शूद्रस्य द्विजातिशुश्रूषा
शूद्रस्य सर्वशिल्पानि । आपद्यनंतरा वृत्तिः ॥ —विष्णु अ. २
अथमहापातकिनो ब्राह्मणवर्जं सर्वे वध्याः । न शारीरो ब्राह्मणस्य दंडः ।
दर्पेण धर्मोपदेशकारिणो राजा तप्तमासेचयेत् तैलमास्ये ।

विष्णु अ. ५

ब्राह्मणानां प्रसादेन दिवि तिष्ठन्ति देवताः ।
ब्राह्मणाभिहितं वाक्यं न मिथ्या जायते क्वचित् ॥२२॥

विष्णु अ. १९

अथ ब्राह्मणस्य वर्णानुक्रमेण चतस्रो भार्या भवन्ति ।
तिस्रः क्षत्रियस्य, द्वे वैश्यस्य एका शूद्रस्य ॥ —विष्णु अ. २४

द्विजस्य शूद्रा भार्या न धर्मार्थे भवेत् सा तु रत्यर्थमेव ॥
—विष्णु अ. २६

आर्धिकः कुलमित्रं च दासगोपालनापिताः ।
एते शूद्रेषु भोज्यान्ना यश्चात्मानं निवेदयेत् ॥—विष्णु अ. ५७

योऽधीत्य विधिवद्वेदं वेदान्तं न विचारयेत् ।
स सान्वयः शूद्रकल्पः स पाद्यं न प्रपद्यते ॥८२॥
—उशनस अ. १

विज्ञातव्यास्त्रयोऽप्येते यथाकालमसंस्कृताः ।
सावित्रीपतिता व्रात्याः सर्वधर्मबहिष्कृताः ॥९॥ शंख. अ. २

लोकानां तु विवृद्ध्यर्थं मुखबाहूरुपादतः ।
ब्राह्मणं क्षत्रियं वैश्यं शूद्रं च निरवर्तयत् ॥३१॥
अध्यापनमध्ययनं यजनं याजनं तथा ।
दानं प्रतिग्रहं चैव ब्राह्मणानामकल्पयत् ॥८८॥
एकमेव तु शूद्रस्य प्रभुः कर्म समादिशत् ।
एतेषामेव वर्णानां शुश्रूषामनसूयया ॥९१॥ मनु. अ. १

सवर्णाग्रे द्विजातीनां प्रशस्ता दारकर्मणि ॥
शूद्रैव भार्या शूद्रस्य सा च स्वा च विशःस्मृते ।
ते च स्वा चैव राज्ञश्च ताश्च स्वाचाग्रजन्मनः ॥१३॥
न ब्राह्मणक्षत्रिययोरापद्यपि हि तिष्ठतोः ।
कस्मिंश्चिदपिवृत्तान्ते शूद्रा भार्योपदिश्यते ॥१४॥
शूद्रां शयनमारोप्य ब्राह्मणो यात्यधोगतिम् ।
जनयित्वा सुतं तस्यां ब्राह्मण्यादेव हीयते ॥१७॥ —मनु. अ. ३

न शूद्राय मतिं दद्यान्नोच्छिष्टं न हविष्कृतम् ।
न चास्योपदिशेद्धर्मं न चास्य व्रतमादिशेत् ॥८०॥—मनु. अ. ४

यस्य राज्ञस्तु विषये श्रोत्रियः सीदति क्षुधा ।
तस्यापि तत्क्षुधा राष्ट्रमचिरेणैव सीदति ॥१३४॥ —मनु. अ. ७

यदा स्वयं न कुर्यात्तु नृपतिः कार्यदर्शनं ॥
तदा नियुञ्ज्याद्विद्वांसं ब्राह्मणं कार्यदर्शने ॥९॥

जातिमात्रोपजीवी वा कामं स्याद्ब्राह्मणब्रुवः ।
धर्मप्रवक्ता नृपतेर्न तु शूद्रः कथंचन ॥२०॥

शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं धर्मो यत्रोपरुध्यते ।
द्विजातीनां च वर्णानां विप्लवे कालकारिते ॥३४८॥–मनु. अ. ८

विप्राणां वेदविदुषां गृहस्थानां यशस्विनाम् ।
शुश्रूषैव तु शूद्रस्य धर्मो नैश्रेयसः परः ॥३३४॥

शुचिरुत्कृष्टशुश्रूषुर्मृदुवागनहंकृतः ।
ब्राह्मणाद्याश्रयो नित्यमुत्कृष्टां जातिमश्नुते ॥३३५॥–मनु. अ. ९

सर्वेषां ब्राह्मणो विद्याद्वृत्त्युपायान्यथाविधि ।
प्रब्रूयादितरेभ्यश्च स्वयं चैव तथा भवेत् ॥२॥

ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यस्त्रयो वर्णा द्विजातयः ।
चतुर्थ एकजातिस्तु शूद्रो नास्ति तु पञ्चमः ॥४॥

न शूद्रे पातकं किंचिन्न च संस्कारमर्हति ।
नास्याधिकारो धर्मेऽस्ति न धर्मात्प्रतिषेधनम् ॥१२६॥

यथा यथा हि सद्वृत्तमातिष्ठत्यनसूयकः ।
तथातथेमं चामुं च लोकं प्राप्नोत्यनिन्दितः ॥१२८॥
शक्तेनापि हि शूद्रेण न कार्यो धनसंचयः ।
शूद्रो हि धनमासाद्य ब्राह्मणानेव बाधते ॥१२९॥–मनु. अ. १०

स्ववीर्याद्राजवीर्याच्च स्ववीर्यं बलवत्तरम् ।
तस्मात्स्वेनैव वीर्येण निगृह्णीयादरीन्द्विजः ॥३२॥–मनु. अ. ११

ब्रह्मक्षत्रियविट्शूद्रा वर्णास्त्वाद्यास्त्रयो द्विजाः ।
निषेकाद्याः श्मशानान्तास्तेषां वै मन्त्रतः क्रियाः ॥१०॥
शूद्रस्य द्विजशुश्रूषा तयाऽजीवन् वणिग्भवेत् ।
शिल्पैर्वा विविधैर्जीवेद् द्विजातिहितमाचरन् ॥१२०॥
–याज्ञवल्क्य अ. १

शूद्रस्य द्विजशुश्रूषा परमो धर्म उच्यते ।
अन्यथा कुरुते किंचित्तद्भवेत्तस्य निष्फलम् ॥७१॥ पराशर अ. १

शूद्रान्नं शूद्रसंपर्कः शूद्रेण तु सहासनम् ।
शूद्राज्ज्ञानागमश्चापि ज्वलन्तमपि पातयेत् ॥३२॥
—पराशर अ. १२

दुःशीलोऽपि द्विजः पूज्यो न तु शूद्रो जितेंद्रियः ।
कः परित्यज्य गां दुष्टां दुहेच्छीलवतीं खरीम् ॥३३॥
—पराशर अ. ८

अग्निकार्यात् परिभ्रष्टाः संध्योपासनवर्जिताः ।
वेदं चैवानधीयाना सर्वे ते वृषलाः स्मृताः ॥२९॥
—पराशर अ. १२

शूद्रान्नं शूद्रसंपर्कं शूद्रेणैव सहासनम् ॥
शूद्राज्ज्ञानागमः कश्चिज्ज्वलन्तमपि पातयेत् ॥७३॥—आंगिरस
शूद्रान्नेन तु भुक्तेन मैथुनं योऽधिगच्छति ॥९॥
यस्यान्नं तस्य ते पुत्रा अन्नाच्छुक्रस्य संभवः ॥—आपस्तंब अ. ८
जन्मना ब्राह्मणो ज्ञेयः संस्कारैर्द्विज उच्यते ॥१४१॥
विद्यया याति विप्रत्वं श्रोत्रियस्त्रिभिरेवच ॥
देवो मुनिर्द्विजो राजा वैश्यः शूद्रो निषादकः ।
पशुर्म्लेंच्छोऽपि चाण्डालो विप्रा दशविधाः स्मृताः ॥३७३॥
क्रियाहीनश्च मूर्खश्च सर्वधर्मविवर्जितः ।
निर्दयः सर्वभूतेषु विप्रश्चाण्डाल उच्यते ॥३८३॥
वेदैर्विहीनाश्च पठन्ति शास्त्रं। शास्त्रेण हीनाश्च पुराणपाठाः ।
पुराणहीनाः कृषिणो भवन्ति। भ्रष्टास्ततो भागवता भवन्ति ॥
—अत्रिसंहिता

परदेवार्चको विप्रस्तदधीनो भवेद्यदि ।
मासत्रयं तदन्नाशी जीवञ्शूद्रत्वमाप्नुयात् ॥२१॥—लघु. आश्व.
यो न संध्यामुपासीत ब्राह्मणो हि विशेषतः ।
स जीवन्नेव शूद्रस्तु मृतः श्वा चैव जायते ॥२६॥ —दक्ष अ. २
वेदाभ्यासो हि विप्राणां विशिष्टं तप उच्यते ॥२३॥—दक्ष अ. २

शूद्रो वर्णश्चतुर्थोऽपि वर्णत्वाद्धर्ममर्हति ।
वेदमन्त्रस्वधास्वाहावषट्कारादिभिर्विना ॥६॥
वणिक्किरातकायस्थमालाकारकुटुम्बिनः ।
एते चान्ये च बहवः शूद्रा भिन्नाः स्वकर्मभिः ॥११॥—व्यास अ. १

शूद्रधर्मो—द्विजातिशुश्रूषा पापवर्जनं कलत्रादिपोषणं कर्षण-पशुपालनभारोद्वहनपण्यव्यवहारचित्रकर्मनृत्यगीतवेणुवीणामुरजमृदंगवादनादीनि ॥देवल॥

* भावार्थः—ब्राह्मणादि चार वर्ण हे जन्मानें एकापेक्षां एक श्रेष्ठ होत. अदुष्टकर्मानें युक्त असणारे जे त्रैवर्णिक त्यांचेंच उपनयन, अध्ययन व अग्नि-

* वर जीं धर्मसूत्रें व स्मृति यांतील वचनें दिलीं आहेत, त्यांचे विद्वानांनीं अंदाजानें जे काल ठरविले आहेत; ते असेः—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ आपस्तंब धर्मसूत्र | खि. पू. | ८०० | १६ पाराशरस्मृति | ,, | ३०० |
| २ गौतम धर्मसूत्र | ,, | ६५० | १७ आपस्तंबस्मृति | ,, | ३०० |
| ३ बौधायन धर्मसूत्र | ,, | ६०० | १८ बृहद्यम व यमस्मृति | ,, | ३०० |
| ४ वसिष्ठ धर्मसूत्र | ,, | ५०० | १९ बृहस्पतिस्मृति | ,, | ३०० |
| ५ विष्णु धर्मसूत्र | ,, | ४५० | २० संवर्तस्मृति | ,, | ३५० |
| ६ उशनःसंहिता | ,, | ४०० | २१ अत्रिस्मृति व संहिता | ,, | ४०० |
| ७ शंखस्मृति | ,, | ४०० | २२ लघुविष्णु, लघुहारित, | | |
| ८ गोभिलस्मृति | ,, | ४०० | लघुशातातप, लघुशंख,इ. | | |
| ९ मनुस्मृति | ,, | ३०० | अनेक लघु व वृद्ध स्मृत्या | इ. स. | ४०० |
| १० लिखित व हारितस्मृति | ,, | २०० | २३ वेदव्यासस्मृति | ,, | ४५० |
| ११ याज्ञवल्क्यस्मृति | इ. स. | १०० | २४ दक्षस्मृति | ,, | ४५० |
| १२ लघुआश्वलायनस्मृति | ,, | १५० | २५ वृद्धहारितस्मृति | ,, | ५०० |
| १३ आंगिरसस्मृति | ,, | २०० | २६ शंख लिखितस्मृति | ,, | ५०० |
| १४ शातातपस्मृति | ,, | २०० | २७ देवलस्मृति | ,, | ६०० |
| १५ प्रजापतिस्मृति | ,, | २०० | २८ औशनसस्मृति | ,, | ६५० |

कार्य इत्यादि कर्में फलद्रूप होतात. शूद्रानें इतर वर्णांची सेवाच करावी. गुरु आपत्तीमध्यें असल्यास त्यानें शूद्र व उग्र या शिष्यांकडून द्रव्य हरण करावें.

आपत्ति नसतांनासुद्धां शूद्र व उग्र यांचेकडून द्रव्य हरण करणें हें धर्म्य होय, असें कित्येकांचें मत आहे. स्वधर्मानें वागणाऱ्या त्रैवर्णिकांच्या घरीं परस्परांनीं जेवावें. पण शूद्रगृहीं जेवूं नये असें कांहींचें मत आहे.

आर्यांनीं नेमलेले शूद्र त्रैवर्णिकाचे घरीं स्वैपाक करीत असत. ( व तें अन्न प्रोक्षण केल्यावर ब्राह्मणांनाही चाले. ) शूद्रानें आर्यस्त्रीशीं गमन केल्यास त्याला ठार करावें व शूद्र जर ब्राह्मणाला मोठ्या ऐटीनें आक्रोशपूर्वक धर्म सांगूं लागेल तर त्याचा जिव्हाच्छेद करावा.

आर्य कितीही कनिष्ठ असला तरी श्रेष्ठ. शूद्रानेंसुद्धां त्याला नमस्कार करावा. शूद्र हा एक चौथा वर्ण होय. त्यानें आर्यांना आचमन व पादप्रक्षालनाकरितां पाणी आणून द्यावें. शूद्रानें आर्यस्त्रीशीं गमन केल्यास त्याचें लिंगच्छेद करून सर्वस्व हरण करावें. तो जर वेद ऐकेल तर त्याच्या कानांत शिसें व लाख यांचा रस ओतावा. वेद उच्चारल्यास जिव्हाच्छेद व पाठ करणारास ठार करावें.

वर्ण चार, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे ते होत. ब्राह्मणाला चार वर्णांच्या, क्षत्रियाला तीन, वैश्याला दोन व शूद्राला एक वर्णाची स्त्री करण्याचा अधिकार आहे. शूद्रानें फक्त तीन्ही वर्णांची सेवा करावी. ब्राह्मणानें सर्व अपराध केले तरी तो अवध्य होय. वैश्य व शूद्र यांच्या

---

मागील पानावरून ]

याज्ञवल्क्य स्मृतीमध्यें याज्ञवल्क्य स्मृतीपूर्वीं झालेल्या मनु, अत्रि, विष्णु, हारित, याज्ञवल्क्य, उशना, अंगिरा, यम, आपस्तंब, कात्यायन, बृहस्पति, पराशर, व्यास, शंख, लिखित, दक्ष, गौतम, शातातप व वसिष्ठ अशा एकोणीस धर्मशास्त्रप्रयोजकांच्या नांवांचा उल्लेख आहे. तसेंच पराशर स्मृतींमध्येंही मानव, वसिष्ठ, काश्यप, गार्ग्य, गौतम, औशनस, अत्रि, विष्णु, संवर्त, दक्ष, आंगिरस, शातातप, हारित, याज्ञवल्क्य, आपस्तंब, शंख, लिखित, कात्यायन, प्राचेतस अशा १९ धर्मशास्त्रप्रयोजकांचा उल्लेख आहे. त्यावरून हे स्मृतिकार पूर्वीं झाले असावेत.

स्त्रियांवर त्यांचें स्वतांचें नियंत्रण राहूं शकत नाहीं. कारण कृषि व शुश्रूषा या कामांमुळें हे लोक पराधीन असतात.

गोरक्षण, ब्राह्मणरक्षण आणि वर्णरक्षणार्थ प्रसंगीं ब्राह्मण आणि वैश्य यांनींसुद्धां शस्त्रें धारण करावींत.

शूद्रानें फक्त सेवाच करावी. तिचें स्वरूप निश्चित नाहीं. शूद्रान्न पोटांत असतांना जो द्विज मरतो तो ग्रामसूकर होतो, किंवा शूद्रकुलांत जन्माला येतो. शूद्र हा एक स्मशान आहे म्हणून त्याच्या समीप अध्ययन करूं नये, अशा आशयाचा एक यमगीतेंत श्लोक आहे. शूद्र हे प्रत्यक्ष पापचारी असतात, म्हणून त्यांच्या समीप अध्ययन तर करूंच नये, पण त्यांना व्रत, धर्म, बुद्धि, नियम हीं कांहींच सांगूं नयेत.

विष्णुधर्मसूत्रामध्यें ब्राह्मणानें अध्यापन, क्षत्रियानें शस्त्रग्रहण, वैश्यानें पशुपालन आणि शूद्रानें द्विजसेवा करावी व सर्व शिल्पेंही करावीं, असें म्हटलें आहे. आपत्कालामध्यें प्रत्येकानें जवळची वृत्ति करावी. ब्राह्मण सोडून सर्व महापातकी वध्य होत. ब्राह्मणाला शारीरदंड करूं नये. मोठ्या तोऱ्यानें ब्राह्मणाला जो धर्माच्या गोष्टी सांगूं लागेल, त्याच्या तोंडांत राजानें तापलेलें तेल ओतावें. ब्राह्मणाच्या प्रसादानें आकाशांत देवता वास करि-तात. म्हणूनच त्याचें वाक्यही मिथ्या होत नाहीं. ब्राह्मणाला वर्णानुक्रमानें चार, क्षत्रियाला तीन, वैश्याला दोन व शूद्राला एक अशा स्त्रिया करितां येतात. द्विजाला शूद्रभार्या ही धर्माकरितां विहित नसून संभोगाकरितांच आहे असें समजावें. अर्धेलीनें शेत करणारा, कुलमित्र, दास, गोपाल नापित हे आणि जो मी आपला आहें असें म्हणेल, हे सर्व भोज्यान्न होत.

केवळ वेद पाठ करून संतुष्ट राहूं नये, तर वेदांताचा विचार करावा. तसें न केल्यास ब्राह्मण शूद्र होतो व मानास पात्र होत नाहीं, असें उशनस्संहितेमध्यें म्हटलें आहे. द्विज जर यथाकालीं उपनीत न झाले तर ते सावित्रीपतित, व्रात्य व सर्वधर्मबहिष्कृत असे समजावे, असें शंखस्मृति म्हणते.

(१३६) **मनुकालीन चातुर्वर्ण्यः**—येथवर आपस्तंब, गौतम, बौधा-यन, वसिष्ठ, विष्णू, उशनस् व शंख यांच्या वचनांवरून त्या कालीं

चतुर्वर्णांची स्थिति काय होती ती पाहिली. आतां मनूपासून देवलापर्यंत या व्यवस्थेंत काय काय उलाढाली झाल्या हें पाहाणें आवश्यक आहे. अलीकडचें टोंक देवल व प्राचीन टोंक आपस्तंब होय. बरोबर मध्यें साधारणतः मनु हा पडतो. म्हणून त्याचें म्हणणें काय आहे, हें पाहिलें पाहिजे.

लोकांच्या वृद्धीकरितां ब्रह्मदेवानें ब्राह्मणादि चार वर्ण निर्माण केले. ब्राह्मणानें अध्यापन, अध्ययन, यजन, याजन, दान व प्रतिग्रह अशीं षट्कर्में करावींत. शूद्रानें इतर वर्णांची सेवा निर्मत्सर बुद्धीनें करावी. कारण त्याला ब्रह्मदेवानें तेंच कर्म सांगितलें आहे.

सवर्ण स्त्री करणें हें द्विजांना प्रशस्त होय. इतरवर्णीय स्त्रिया करणें हें एकंदरींत गौणच होय. शूद्रानें शूद्र भार्या, वैश्यानें स्ववर्णांतील व शूद्रांतील अशा दोन भार्या, क्षत्रियाला स्ववर्णीय आणि वैश्यशूद्रांतील भार्या, आणि ब्राह्मणाला स्ववर्णासह इतर सर्व वर्णांतील स्त्रिया करण्याचा अधिकार आहे. एकंदरींत कोणच्याही आपत्तीमध्यें ब्राह्मणक्षत्रियांनीं शूद्र स्त्रीशीं विवाह करूं नये, शूद्र स्त्रीशीं संबंध ठेवणारा ब्राह्मण अधोगतीला जातो व त्याचा पुत्रही ब्राह्मण्यापासून भ्रष्ट होतो. शूद्राला उच्छिष्ट अगर हविर्भाग देऊं नये. त्याला धर्म, व्रत आणि बुद्धि सांगूं नयेत. ज्या राजाच्या प्रांतांत विद्वान् ब्राह्मण भुकेनें मरतो, त्या राष्ट्रावर लौकरच अनिष्ट प्रसंग येतो. जेव्हां राजा स्वतः न्यायदानाचें काम करूं शकत नाहीं, त्यावेळीं त्यानें विद्वान ब्राह्मणांना नेमावें. केवळ नामधारी जातिमात्र असा ब्राह्मण असला तरी चालेल, परंतु राजानें शूद्राला धर्मप्रवक्ता म्हणून कधींच नेमूं नये. जेथें धर्माचा उपरोध होईल, वर्णविप्लवाचा प्रसंग येईल अशा प्रसंगीं स्वसंरक्षणार्थ आणि स्त्रिया इत्यादींच्या रक्षणाकरितां, द्विजांनीं शस्त्र धारण करावें. ( अशा प्रसंगीं त्यांनीं हत्या केली तरी दोष नाहीं. )

वेदवेत्त्या कुटुंबवत्सल विप्रांची सेवा शूद्रानें करावी. त्यांतच त्याचा मोक्ष आहे. शुद्धाचारी, उत्कृष्ट सेवक, निगर्वी, मधुरभाषी असा शूद्र त्रैवर्णिकांच्या आश्रयामुळें उत्कृष्ट जातीप्रत प्राप्त होतो. ब्राह्मणानें सर्वांच्या वृत्तीचा विचार करावा. त्यांना त्यांचे धर्म सांगावेत व स्वतः तसें वागावें. ब्राह्मणादि तीन वर्ण हे द्विजाति व चौथा वर्ण शूद्र होय. पांचवी जात किंवा वर्ण अस्तित्वांत नाहीं. शूद्राचे ठिकाणीं पातक नाहीं, त्याला संस्कार

नाहीं, व त्याला कसलाहि धार्मिक विधिनिषेध नाहीं. शूद्र जसजसा निर्मत्सर व असूयारहित होतो, तसतसा तो उत्तम लोकाप्रत जातो. शूद्र समर्थ झाला तरी त्यानें द्रव्यसंग्रह न करावा. कारण द्रव्यामुळें तो ब्राह्मणांना त्रास देऊं लागेल. स्ववीर्य आणि राजवीर्य यांपैकीं स्ववीर्य हेंच बलवत्तर समजून ब्राह्मणांनीं स्वपराक्रमानें आपल्या शत्रूंचा निग्रह करावा. राजाकडे आपलें गाऱ्हाणें नेऊं नये.

**याज्ञवल्क्यः**—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांपैकीं पहिले तीन द्विज होत. त्यांचे सर्व संस्कार गर्भाधानापासून अंत्येष्टीपर्यंत समंत्रक व्हावेत. शूद्रानें द्विजसेवा करावी. त्यावर उपजीविका न झाल्यास वणिक् वृत्ति किंवा शिल्पही करावें. (व्यापार करण्याची परवानगी याज्ञवल्क्य प्रथमच शूद्रास देतो.) द्विजाचें हित करीत त्यानें आयुष्य घालवावें. कारण द्विजसेवा हा शूद्राचा परमधर्म होय.

**पराशरः**—शूद्रानें द्विजसेवा करावी. त्याशिवाय तो जर अन्य कर्म करील तर तें निष्फळ होतें. शूद्रान्नभक्षण, शूद्रसमागम, शूद्रापासून ज्ञानप्राप्ति केल्यास तेजस्वी ब्राह्मणसुद्धां अधःपतित होतो. जितेंद्रिय अशा शूद्रापेक्षां दुःशील असा द्विज पूज्य होय. कारण दुधाळ गाढवीपेक्षां नाठाळ गाय केव्हांही श्रेष्ठ होय. अग्निकार्य, संध्योपासना व वेदाध्ययन न करणारे ब्राह्मण वृषल होत.

आंगिरसांनेंही शूद्रान्न, शूद्रसंपर्क व शूद्रसमागमाचा पराशराप्रमाणें निषेध केला आहे.

आपस्तंबानें शूद्रान्न भक्षण करून जो प्रजोत्पादन करील त्याची प्रजा शूद्रच होते, असें म्हटलें आहे.

**अत्रिः**—जन्मानें ब्राह्मण्य, संस्कारानें द्विजत्व, विद्येनें विप्रत्व येतें आणि जन्म, संस्कार व विद्या यांमुळें श्रोत्रियत्व येतें. देव, मुनि, द्विज, राजा वैश्य, शूद्र, निषाद, पशु, म्लेंछ आणि चंडाल असे ब्राह्मणांचे दहा वर्ग पडतात. क्रियाहीन, मूर्ख, सर्वधर्मविवर्जित, निर्दय असा ब्राह्मण चंडाल होय. वेदविहीन ब्राह्मण शास्त्री होतात, शास्त्रहीन ब्राह्मण पुराणिक होतात, पुराणहीन ब्राह्मण कृषी करून पोट भरूं लागतात आणि सर्वांत भ्रष्ट असे ब्राह्मण म्हणजे कृषीलाही जे नालायख ते भागवत होतात म्हणजे बुवा

बनतात ! अत्रिसंहितेंतील हे वरील विचार पुष्कळच निर्भीड व वस्तु-स्थितिनिदर्शक आहेत.

**लघुआश्वलायनः**—पराधीन होऊन दुसऱ्यांच्या देवाची पूजा करणारा म्हणजे पुजारी होऊन त्यावर तीन महिने जगणारा ब्राह्मण शूद्रत्वाप्रत जातो.

**दक्षः**—जो ब्राह्मण संध्या करीत नाहीं, तो जिवंत असेपर्यंत शूद्र व मेल्यानंतर कुत्रा होतो. वेदाभ्यास हें ब्राह्मणांचें विशिष्ट तप आहे. शूद्र हा चौथा वर्ण आहे, म्हणून वर्णत्वामुळें तो धर्माला प्राप्त होतो. मात्र तो धर्म वेदमंत्र व यज्ञरहित असतो. ( शूद्राला कसलाही धर्म नाहीं, त्याला कसलाही संस्कार नाहीं, असें जें पूर्वस्मृतिकारांनीं म्हटलेलें आहे त्याउलट व्यासस्मृति असें म्हणते कीं शूद्र हा एक वर्ण आहे व त्याला धर्म असला पाहिजे. त्यावरून त्या कालीं शूद्र अनेक व्यवसायांत शिरूं लागलेला होता हें उघड आहे.) वाणिज्य, सावकारी, कारकुनी, माळी नि कुटुंबाला उप-युक्त असे न्हावी, गोपालक, कुंभार इत्यादि धंदे करणारे शूद्र व्यासकालीं होते.

मिताक्षरेमध्यें देवलाच्या नांवावर जें एक वचन दिलेलें आहे, त्यांत शूद्रानें शेती, पशुपालन, भार वाहणें, व्यापार, चित्रकर्म, नृत्य, गीत, वीणा, अलगुज, मृदंग इत्यादि वाद्येंही वाजवावींत असें म्हटलेलें आहे. त्यावरून शूद्र हा देवलाच्या कालीं पुष्कळच सुधारलेला होता, हें स्पष्ट होतें.

(१३७) **वर्णव्यवहार व सांस्कृतिक साम्यः**—आपस्तंबादि धर्म-सूत्रकार व मन्वादि स्मृतिकारांचीं चार वर्णांच्या व्यवहारासंबंधाचीं महत्त्वाचीं वचनें भावार्थासह वर दिलीं आहेत. त्यावरून त्या वेळचें चातुर्वर्ण्य आजच्या कल्पनेप्रमाणें रोटीबंद आणि बेटीबंद नव्हतें, तर तें प्रवाही होतें, असें स्पष्ट दिसतें. शूद्र स्त्रीचा निषेध बऱ्याच स्मृतिकारांनीं केला असला तरी अनुलोमविवाहाला मान्यता दिलीच आहे. चार वर्णांपैकीं ब्राह्मण व शूद्र यांच्या धर्मांचें आणि राजधर्मांचें विवेचन ठिकठिकाणीं दिसतें. पण क्षत्रिय व वैश्य यांच्यासंबंधींचें व त्यांच्या कर्तव्याचें विवेचन फारसें आढळत नाहीं. ब्राह्मणाचें श्रेष्ठत्व, महत्त्व आणि उच्चत्व हें पावित्र्याच्या दृष्टीनें ठिकठिकाणीं दर्शविलें असलें तरी आचार व व्यवसाय या दृष्टीनें ब्राह्मण खालीं खालीं येऊं लागले होते, असें वरील वचनावरूनच दिसतें.

वेदाध्ययन व संध्या न करणें, शास्त्रविहित व्यवसाय सोडून अन्य व्यवसाय करणें हीं जीं पातित्याचीं लक्षणें तीं ब्राह्मणांमध्यें दृग्गोचर होऊं लागलीं होतीं. ब्राह्मणाचें क्रमानें खालीं खालीं येणें आणि शूद्राचें क्रमानें उच्च स्थितीप्रत जाणें एकसमयावच्छेदेंकरून चालू होतें. कारण शूद्रा-संबंधाचे पहिले कठोर निषेध जाऊन तो त्याबाहेर शिल्प, वाणिज्य, नृत्य, गीत, वाद्य या क्षेत्रांत पडूं लागलेला होता. समाजोपयुक्त अनेक व्यवसाय शूद्रानें स्वीकारल्यामुळें त्याचा उत्कर्ष होऊं लागलेला होता. शूद्र हा प्रथम गांवाबाहेर स्मशानांत स्मशानतुल्यच असा एका काळीं असणारा, पण तो वाणी झाल्यावर त्याच्या दुकानांतील पदार्थ त्रैवर्णिकांना चालू लागले. त्यानें नृत्य व गीत यानें द्विजांना मोहून टाकलें. शूद्राच्या घरचे फराळाचे पदार्थ द्विजांना आवडूं लागले. ही क्रांति विकासानेंच होत गेलेली दिसते. क्षत्रिय व वैश्य यांची स्थिति ब्राह्मणांसारखीच अपकर्षाची दिसते. त्या-संबंधानें फारसे उल्लेख नाहींत. पुष्कळ ब्राह्मण कृषि व अन्य व्यवसाय करूं लागले. क्रियाहीन व मूर्ख ब्राह्मण समाजांत वाढूं लागले आणि ब्राह्मणा-मध्येंही अत्रिस्मृतींत सांगितल्याप्रमाणें दहा जाति झाल्या. त्यावरून वरचा वर्ण हा व्यवसाय व संस्कार यांनीं खालीं येत गेला व त्याउलट खालचा वर्ण उच्च व्यवसायामुळें वर चढत गेला. तात्पर्य सर्व वर्ण एकाच पातळींत आले असें वरील वचनावरून स्पष्ट दिसतें. आजचा हिंदु-समाज वर्णबद्ध नाहीं, तर तो जातिबद्ध आहे. वर्णोचित व्यवसाय, वर्णोचित संस्कार आणि वर्णोचित विद्या यांचा अभाव आज सर्व वर्णांत आहे. वर्ण हा केवळ जन्मावलंबी नव्हता. तो विद्या, व्यवसाय व संस्कार यांवर अवलंबून होता. आजच्या हिंदुसमाजांत वर्णलोप झाला असून जन्मजात श्रेष्ठकनिष्ठपणाच्या तत्त्वावर अधिष्ठित अशी जातिसंस्था आहे.

वर्णाश्रमाचे अभिमानी आजही चार वर्ण आहेत असें निश्चित समजतात. परंतु सनातनीवर्ग कलियुगांत ब्राह्मण व शूद्र "कलावाद्यन्तयोः स्थितिः" हे दोनच वर्ण आहेत, क्षत्रिय वैश्यांचा अभाव आहे असें सम-जतो. पीठस्थ शंकराचार्यही याच समजानें क्षत्रियवैश्यांचें अस्तित्व नाहीं, त्यांना उपनयनाधिकार नाहीं असलीं आज्ञापत्रें देतात. चातुर्वर्ण्य हा शब्दच

मुळीं सापेक्ष आहे. एक वर्ण नसेल तर इतरही नसणारच. ज्या प्रकारचे आज ब्राह्मण आहेत त्याच प्रकारचे इतरही आहेत. क्षत्रियवैश्यांचा जसा संस्कारलोप झाला आहे, तसाच तो ब्राह्मणांचाही विद्या नि वृत्ति-संकरानें झालेला आहे. खालीं आलेल्या ब्राह्मणानें जन्मजात श्रेष्ठत्वाची भावना ठेवून इतरांना तुच्छ लेखल्यामुळेंच समाजांत असंतोष माजतो. म्हणूनच धर्मनिर्णय मंडळानें असा निर्णय दिला आहे कीं, "कलियुगांत क्षत्रिय वैश्य नाहींत असें कित्येक विद्वान् घोषित करितात तें अयथार्थ आहे." जर इतर दोन वर्ण असतील तर क्षत्रियवैश्यही आहेत. आज चौथ्या शूद्र वर्णांत जावयास कोणीही सिद्ध नाहीं. अर्थात् सर्वच सारख्या पातळींत आहेत, म्हणून वर्णाची भाषाही बोलण्याचें प्रयोजन नाहीं. हा वाद जीर्ण झालेला आहे, त्याचीं खंडणेंही झालेलीं आहेत, म्हणून अधिक विवेचन नको.

हिंदु जातींतील कोणताही मनुष्य आज कोणतीही विद्या शिकतो व जमेल तो व्यवसाय करतो. त्यामुळें त्याच्या स्पर्शास्पर्शाच्या व संसर्गाच्या कल्पनांमध्यें बदल झाला असून रोटीबंदी व बेटीबंदी एवढ्यांतच जातीचें वैशिष्ट्य येऊन बसलें आहे. किंबहुना आपल्या गटाबाहेर जेवूं नये, मुलगी देऊं नये व आपल्या गटाबाहेरील मुलगी करूं नये अशा बंधनांनीं युक्त असलेला गट म्हणजे जाति, एवढाच जाति शब्दाचा अर्थ आहे. त्या जातिसंस्थेचा विचार पुढील प्रकरणांत करूं.

---

# प्रकरण बारावें

## जातिसंस्था

(१३८) **वर्ण व जाति यांतील भेद**:—आजचा हिंदुसमाज हा वर्णबद्ध नसून जातिबद्ध आहे. किंबहुना जातिसंस्था हें एक आजच्या हिंदुसमाजाचें वैशिष्ट्य बनलेलें आहे. जात ही केवळ जन्मावर ठरविली जाते. जाति म्हणजे सदृश मनुष्यांचा समुच्चय होय. या समुच्चयामध्यें

आपल्या एकत्वाची व इतरांपासूनच्या भिन्नत्वाची भावना असते. विशिष्ट संघांत जन्म होणें व त्या संघाबाहेर लग्न न करणें, एवढाच हल्लीं जातीचा अर्थ समजतात. पूर्वी संघाबाहेर भोजन न करणें, ज्या त्या संघानें आपापलाच धंदा करणें असाही दंडक होता, पण आतां तोही नाहीं. हिंदुसमाजांतील अनेक जातींमध्यें पोटजातीही आहेत, प्रत्येक व्यक्ति ही जातीवरून अथवा पोटजातीवरूनच आज ओळखली जाते. वर्णावरून व्यक्तीला सांप्रत ओळखलें जात नाहीं. पूर्वी एका काळीं व्यक्तीचा निर्देश वर्णावरून होत असावा. वर्ण आणि जाति या एक नव्हेत. वर्णाला विद्या, व्यवसाय, संस्कार यांचें बंधन होतें. जातीला तें बंधन नसून तिचें अधिष्ठान जन्म आहे.

(१३९) **जाति व जन्मः**—हिंदुसमाजांतील जातींत जन्मजात उच्चनीचतेची भावना आहे. इतरांपासून आपला निराळेपणा दाखविण्याचा हा मार्ग आहे. उच्चनीचपणा आहे म्हणून इतर जातीशीं विवाह नाहीं. अमुक जात उच्च व अमुक जात कनिष्ठ हें ठरविण्याचें माप पावित्र्याची कल्पना हें आहे. अधिकार, संपत्ति, राहाणी इत्यादि निमित्तानें उच्चनीचता स्थापन करण्याचा प्रकार मनुष्यस्वभावांतच आहे; पण हिंदुसमाजांतील जातींची उच्चनीचता आर्थिक, राजकीय अशा कारणांनीं न ठरवितां जन्मावरच ठरविली गेली आहे! जन्माबरोबर जन्मसिद्ध असा अधिकार व्यक्तीला मिळत असतो.

(१४०) **जाति कशा बनतात ?**:—आज हिंदुसमाजांत वर्णसंस्था नाहीं, जातिसंस्था मात्र आहे. चार वर्ण म्हणजे चार जाति असें नाहीं. हिंदुसमाजांतील जातींत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्यादि आर्यजाति, शूद्रादि अनार्य जाति, अनुलोमप्रतिलोम–विवाहजन्य आर्यानार्य संकरजाति, आणि ज्यांना आर्यांनीं आपल्यांत पचवून घेतलें अशा सर्व जातींचा अन्तर्भाव आहे. इतर देशांतही जाति होत्या व आहेत, पण त्या फार थोड्या आहेत. १९११ च्या शिरगणतीमध्यें दोन हजार तीनशे अठ्ठ्याहत्तर जाति हिंदुसमाजांत आढळुन आलेल्या आहेत. तीस कोट हिंदूमध्यें या अडीच हजार जातींचा समावेश झालेला आहे. मुंबई इलाख्यांत सुमारें दीडहजार जाति आहेत. या सर्व जाति ईश्वरानें केल्या आहेत, अशी एक भ्रामक समजूत

आहे. जाति ईश्वरानें केल्या आहेत, असें म्हणण्याचा उद्देश जन्मजात उच्चनीचपणा ईश्वरानेंच लावून दिला आहे असें सांगण्याचा आहे. कारण प्रत्येक जात स्वतःला कांहीं जातींपेक्षां उच्च समजते व कांहींपेक्षां नीच समजते. जातीच्या उत्पत्तीशीं ईश्वराचा संबंध लावणें आणि जन्मजात श्रेष्ठकनिष्ठपणा मानणें या दोन्ही कल्पना अशास्त्रीय आहेत. सर्व जाति धंद्यामुळें उत्पन्न झाल्या आहेत हीही कल्पना चुकीची आहे. जाति या केवळ धंद्यानेंच अगर जन्मानेंच बनल्या नसून आचार, व्यवसाय, आहार, उपास्य, क्रान्ति, उत्पात, देशभेद, पंथ, वंश अशा अनेक कारणांनीं त्या बनलेल्या आहेत. धर्मपंथावरून जोगी, गोसावी, मानभाव या जाति बनलेल्या आहेत. देशभेदामुळें कनोजी, कऱ्हाडे, कोंकणस्थ, देशस्थ, गोवर्धन, (नाशकाजवळचा प्रदेश) सह्यवासी (सहवासी), बारदेसकर, कुडाळदेसकर, देवरुखे अशा जाति बनलेल्या आहेत. सुतार, तेली, माळी, लोहार, गवळी, तांबट, कोष्टी, कासार, चांभार इत्यादि जाति धंद्यावरून पडल्या हें उघड आहे. पुष्कळ जाति वंशमूलक आहेत. उदाहरणार्थ जाट, अहीर, गुजर, लोहाणा, भाटिया, भिल्ल, गोंड इत्यादि. कांहीं जाति राष्ट्रस्वरूपी आहेत. उदाहरणार्थ मागध, वैदेहक, आवंत्य वगैरे. मुख्य जातींतील पोटजातीही अशाच कारणांनीं झालेल्या आहेत. त्यावरून या जाति ईश्वरकृत नाहींत असें सिद्ध होतें.

(१४१) जातींचें वर्गीकरणः—हिंदु समाजांतील सर्व जातींना ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या चार गटांत कोंबणें हें अशास्त्रीय आहे. आज चौथ्या वर्णांत जावयास कोणीही सिद्ध नाहीं; आणि मूळच्या त्रैवर्णिकांमध्येंही वृत्तिसंकर झाला असल्यामुळें त्या तीन वर्णांतही सर्व जातींना कोंबणें इष्ट नाहीं. जातींचें वर्गीकरण शिरगणतीच्या अधिकाऱ्यांनीं सहा प्रकारानें केलेलें आहेः—(१) राष्ट्रजातिस्वरूपी जाति (२) कर्मनिर्णित जाति (३) संप्रदायमूलक जाति (४) संकरमूलक जाति (५) स्थानांतरमूलक जाति (६) भिन्नाचारमूलक जाति.

(१४२) भारतीय आर्यवृत्ति व जातिः—आज जगांत ज्या तऱ्हेची जातिसंस्था नाहीं तशी हिंदुस्थानांत असण्याचें कारण भारतीय आर्यांची अपकृष्ट, असंस्कृत अशा लोकांशीं आणि पोटार्थी म्हणून आलेल्या

बहिस्थांशीं सहानुभूतीनें वागण्याची वृत्ति हें होय! शेजारास आलेल्या लोकांशीं शेजारधर्माप्रमाणें वागून त्याला हळुहळू सुसंस्कृत करून उन्नतीचा मार्ग दाखविण्याची जी भारतीय आर्यांची दूरदृष्टि तीमुळेंच या सर्व जाति अस्तित्वांत आल्या आहेत. असंस्कृतांना सुसंस्कृत करून अपकृष्टांना उत्कृष्ट करून, गुन्हेगारांना सभ्य बनवून आपल्या समाजांत पूर्ण एकरूप करून घेण्याची प्रक्रिया चालू असतांना ती ज्या ज्या गटावर पूर्णपणें यशस्वी झाली नाहीं ते ते सर्व गट म्हणजे या जाति होत. बौद्धक्रांती-सारखी जर क्रांति झाली नसती तर कदाचित् या सर्व जातींना सादृश्या-मुळें चातुर्वर्ण्यांत पुरें समाविष्टही होतां आलें असतें!

(१४३) **प्रबल दुर्बल संबंधः**—प्रबळ समाजाची जेव्हां दुर्बळाशीं गांठ पडते तेव्हां त्यांचा पूर्ण निःपात करणें, त्यांना गुलाम करणें किंवा त्यांना आत्मसात् करणें, असे तीन प्रकार संभवतात. भारतीय आर्यांनीं दुर्बळांना व अपकृष्टांना रेडइंडियन लोकांप्रमाणें नष्ट केलें नाहीं, गुलाम केलें नाहीं, खिश्चन व मुसलमानांप्रमाणें छलबलानें धर्मांतर करावयास लावून आत्मसात् केलें नाहीं, तर त्यांच्याशीं सहानुभूतीनें वागून त्यांना उन्नतीचा मार्ग दाखविला. स्वतःची संस्कृति न सोडतां, स्वतः हीन स्थितींत न जातां संस्कृतिहीन समाजांना शेजारीं राहाण्यास स्थळ देऊन त्यांना हळूहळू सुसंस्कृत करून आत्मसात् करण्याचा जो आर्यांचा प्रयोग त्यांतूनच शेंकडों जातींचा उगम आहे.

(१४४) **विविध ग्रंथकारः**—हिंदुसमाजांतील जातिसंस्थेसंबंधानें वेद, स्मृति आणि पुराणें यांमध्यें पुष्कळच विचार केलेला आहे. म. म. पं. श्रीधरशास्त्री पाठक, पं. काणे, डॉ. केतकर, डॉ. घुर्ये, सेनॉर्ट, रिस्ले, इबेटसन्, एन्थॉवेन वगैरे विद्वानांचे या विषयावर प्रमाण मानतां येतील असे ग्रंथ आहेत. त्यांतील पं. काणे यांच्या 'History of Dharmashastra' ( व्हाल्यूम २, प्रकरण २, पृष्ठें १९ ते २४ ) या इंग्रजी ग्रंथाधारें जाति-संस्थेचे गुण दाखवून पुढें वेदकालीन जातीकडे वळतों.

आजचा हिंदु समाज जातिबद्ध आहे आणि जन्मजात उच्चनीचतेमुळें जातिसंस्थेला हिडीस स्वरूप आलेलें आहे. तथापि त्या संस्थेंतील कांहीं गुण पाश्चात्य ग्रंथकार सांगतात ते असेः—

"निसर्गाचे आणि राज्यक्रांत्यांचे द्विविध धक्के बसले तरी कित्येक शतकें हिंदु समाज जो टिकून राहिला आहे त्याचें एक प्रमुख कारण त्याची जातिसंस्था होय. जातिसंस्था ही त्या संस्थेंतील प्रत्येक व्यक्तीला स्थान, मान, धंदा व मित्रमंडळ देते. ती मनुष्याचा आर्थिक स्पर्धेपासून बचाव करते व त्याला संरक्षण देते आणि आपण एका विशिष्ट संस्थेचे घटक आहों, असा अभिमान उत्पन्न करते. जातिसंस्था म्हणजे प्रत्येक हिंदूची आर्थिक, सामाजिक, हितवर्धक आणि औदार्यास पात्र अशी एक घटनाच आहे,"

( Vision of India पान २६२–६३ ले. सिडने लो ).

" हिंदुसमाजांतील जातिसंस्था म्हणजे माझ्या मतें कायद्याच्या आधारानें केलेला सर्वोत्कृष्ट यत्न होय. यामुळेंच हिंदुसमाज अगदीं रानटी अवस्थेप्रत पोचला नाहीं. ज्यावेळीं सर्व यूरोप अनेक प्रकारच्या गोंधळांत सांपडला होता, त्यावेळीं हिंदुसमाजानें आपलें डोकें शाबूत ठेवून शास्त्रें, कला, सुधारणा आणि संस्कृति यांची वाढ केली. "

( पीपल ऑफ इंडिया ले. अॅबेडयूबीअस )

" जातिसंस्था म्हणजे समाजसत्ता वादाचा एक प्राचीन आश्चर्यकारक शोधच होय; कीं ज्यामुळें हिंदुसमाज अराजकता, औद्योगिक स्पर्धा आणि भांडवलशाही यांपासून वांचला. अगदीं गरीबापासून तों व्यापारी मंडळापर्यंत या संस्थेनें व्यवस्था राखिली होती. "

( यूरोप व आशिया ६७२ ले. मेरेडिथ टाऊन्सेंड. )

जातिसंस्थेच्या विरुद्ध खुद्द हिंदुसमाजांतील पुष्कळ सुधारकांनीं लिहिलेलें आहे. मग मेन, शेरिंग् आणि अन्य ग्रंथकारांनीं त्या संस्थेचे वाभाडे काढले असल्यास व त्या निमित्तानें ब्राह्मणांवर टीका केली असल्यास त्यांत आश्चर्य तें काय ? कांहीं पाश्चात्य ग्रंथकार जातिसंस्था ही ब्राह्मणांनीं आपल्या महत्त्वाकरितां शोधून काढली असें म्हणतात. परंतु तें अज्ञानमूलक आहे. वर्णसंस्थेच्या पूर्वी जातिसंस्था होती, असें वैदिक वाङ्मयावरून सिद्ध होतें. शेरिंगनें ( हिंदु ट्राइब्ज आणि कास्ट ) या आपल्या ग्रंथाच्या तिसऱ्या भागांत जातिसंस्था व ब्राह्मण यांवर झोड उठवून दिली आहे. त्यास महामहोपाध्याय पं. काणे यांनीं मोठें मार्मिक उत्तर दिलें आहे, तें असें:—

" परकीय आक्रमणें, क्रांतिकारक लढाया आणि अराजकता यांच्यापासून हिंदुसमाजाचें रक्षण जातिसंस्थेनेंच केलें आहे. त्यावरून परिस्थितीशीं मिळतें घेण्याची वृत्ति जातिसंस्थेंत कशी आहे, हें तत्त्व हे टीकाकार विसरतात. तसेंच ब्राह्मणाविषयीं कडक टीका करतांना त्यांनीं कित्येक शतकें संस्कृति व संस्कृतवाङ्मय अत्यंत स्वार्थत्यागपूर्वक कसें जतन केलें आहे तेंही हे विसरतात. जातिसंस्थेमुळें कोणताही मनुष्य अयोग्य ठरत नसे. त्याची वागणूक त्याच्या समाजामध्यें मानार्ह होती. तो आपल्या जातीच्या धंद्यामुळें समाजाकरितां उत्पादन करी; ज्यावेळीं सर्व धंदे यंत्राविना हातानेंच करीत असत त्यावेळीं तें कौशल्य वाढण्यास जातिसंस्थेनें फार मदत केली आहे. समाजस्वास्थ्याच्या दृष्टीनें या संस्थेचें हें महत्त्व टीकाकार विसरतात. "

(१४५) **वेदांतील जातिः**—वेदकालीं वर्णही होते आणि जातीही होत्या, असे उल्लेख सांपडतात. उदाहरणार्थ तैत्तिरीय संहितेमध्यें (४–५।४) रुद्राध्यायांत क्षत्ता, तक्ष, रथकार, कुलाल, कर्मार, पुंजिष्ट, निषाद, इषुकृत, धन्वकृत, मृगयु, श्वनी अशा जातींना नमस्कार केलेला आहे. यांतील क्षत्ता म्हणजे शूद्रापासून क्षत्रिय स्त्रीला झालेला पुत्र एवढा सोडल्यास बाकीच्यांचे अर्थ यथासंख्य कर गोळा करणारा, सुतार, कुंभार, लोहार, फासेपारधी, कोळी, बाण करणारे (शिकलगार), बुरुड, पारधी, कुत्रे बाळगणारे असे आहेत. अशाच तऱ्हेचे उल्लेख अथर्ववेदांत (३, ५, ६, ७) व वाजसनेयी संहितेंत (१६, २७) व तैत्तिरीय ब्राह्मणांत (३, ८, ५, १–३) आलेले आहेत. पूर्वमीमांसेंत रथकाराचा उल्लेख आहे. निषादस्थपति म्हणजे निषाद राजा, उग्र, आयोगव, कंटककार, कितव अशांचा उल्लेख शतपथब्राह्मणांत (१३, ५, ४, ६,) आलेला आहे. चंडाळाचा व त्याच्या योनीचा उल्लेख छांदोग्य (५, १०, ७) व तैत्तिरीय ब्राह्मण (३, ४, १४, १) अशा ठिकाणीं आहे. आज ज्या अर्थानें आपण जाति शब्द वापरतों, त्या अर्थानें वेदांमध्यें व उपनिषदामध्यें जाति शब्द नाहीं. छांदोग्य व बृहदारण्यक यांखेरीज कुठेंही उपनिषदांत जातींचा उल्लेख नाहीं व असण्याचें कारणही नाहीं. सूत्रकालापासून हा शब्द आजच्या अर्थानें वापरण्यांत आला आहे. गौतम धर्मसूत्रांत जातिधर्म असा उल्लेख आहे. तथापि मनूनें

वर्ण व जाति शब्द एकाच अर्थानें पुष्कळ ठिकाणीं वापरलेला आहे. मनूनेंही देशधर्म, जातिधर्म, कुलधर्म असें अ. १ श्लो. ११८ मध्यें म्हटलें आहे. गीतेंतही जातिधर्माचा उल्लेख आहे. पाणिनीच्या सूत्रांत जाति शब्द आजच्या अर्थानें वापरलेला नाहीं. पण 'कुलालादिभ्यो वुञ्' सूत्रांत (४, ३, ११८) कुलालादि गणांत बुरुड, चंडाल, निषाद, कर्मार, कुंभकार, श्वपाक इत्यादींचा अन्तर्भाव केलेला आहे. वार्तिककार कात्यायन, महाभाष्यकार पतञ्जली यांनीं जातींचे उल्लेख केलेले आहेत.

जातिसंस्था अगोदरची आणि वर्णसंस्था नंतरची असें कांहींचें मत आहे. परंतु वर्णसंस्था प्राचीन व जातिसंस्था अर्वाचीन असें स्मृति व धर्मसूत्रें यांवरून सिद्ध होतें. सर्वांत प्राचीन सूत्रकार आपस्तंब व अर्वाचीन स्मृतिकार देवल या दोन टोकांमधील फक्त आठदहा स्मृतिकारांनीं जातिसंबंधाचा विचार केलेला आहे.

(१४६) **आपस्तंबकालीन जातिः**—आपस्तंब फक्त चार वर्ण व प्रतिलोमापैकीं चांडाल, पौल्कस आणि वैण यांचा उल्लेख करतो. गौतमानें अंबष्ठ, उग्र, निषाद, दौष्मंत, पारशव हे अनुलोम आणि सूत, मागध, आयोगव, क्षत्ता, वैदेहक व चंडाल हे प्रतिलोम सांगितले आहेत. म्हणजे वर्ण चार, अनुलोम पांच व प्रतिलोम सहा यांचा उल्लेख करून गौतमानें पुढें त्यांची उत्पत्ति दिली आहे. ब्राह्मणीला, ब्राह्मणक्षत्रियादि चार वर्णांपासून ब्राह्मण, सूत, मागध व चंडाल असे पुत्र होतात. क्षत्रियस्त्रीला अनुक्रमें ब्राह्मणक्षत्रियादिकांपासून मूर्धावसिक्त, क्षत्रिय, धीवर व पुल्कस असे पुत्र होतात. वैश्यस्त्रीला ब्राह्मणादिकांपासून अनुक्रमें भृज्जकंठ, माहिष्य, वैश्य, वैदेह असे पुत्र होतात, आणि शूद्रस्त्रीला ब्राह्मणादि वर्णांपासून अनुक्रमें पारशव, यवन, करण व शूद्र असे पुत्र होतात. गौतमानें एकंदर सोळा जातींचा उल्लेख केला आहे. पैकीं दौष्यंताला 'दौष्यन्त' व क्षत्त्याला 'कृत' असेंही दुसरें एक नांव कांहीं प्रतींत आहे. पण गौतमानें वरील अनुलोमांमध्यें 'करणाचा' उल्लेख केलेला नाहीं.

(१४७) **बौधायन व जातिः**—बौधायनानें पहिल्या प्रश्नाच्या आठ व नऊ अध्यायांमध्यें जातिविचार केलेला आहे. परंतु त्या दोन अध्यायांमध्यें एकवाक्यता नाहीं. कांहीं जातींची उत्पत्ति परस्परविरुद्धच दिसते.

तथापि अध्याय ९ मधीलच चर्चा प्रमाण मानून ती आम्ही येथें देतों. बौधायनानें चार वर्णांशिवाय रथकार, अंबष्ठ, सूत, उग्र, मागध, आयोगव, वैण, क्षत्ता, पुल्कस, कुक्कुट व श्वपाक यांचा उल्लेख केलेला आहे. यामध्यें गौतमापेक्षां रथकार, कुक्कुट व श्वपाक यांचा उल्लेख अधिक आहे व गौतमोक्त कांहीं जातींचा उल्लेख नाहीं. ब्राह्मण व क्षत्रिया आणि क्षत्रिय व वैश्यस्त्री यांच्या संततीला ब्राह्मण व क्षत्रियच म्हणावयाचें असें बौधायन म्हणतो. म्हणजे त्यानें पितृसावर्ण्य सांगितलें आहे. ब्राह्मण व वैश्यस्त्री यांपासून अंबष्ठ, ब्राह्मण व शूद्रा यांपासून निषाद, क्षत्रिय व शूद्रा यांपासून उग्र आणि वैश्य व शूद्रा यांपासून रथकार होतो, असें अनुलोमासंबंधानें सांगून प्रतिलोम गौतमाप्रमाणेंच सांगितलेले नाहींत. उग्र व क्षत्त्याची स्त्री यांपासून श्वपाक, वैदेहक व अंबष्ठापासून वैण, निषाद व शूद्रापासून पुल्कस, शूद्र व निषादी यांपासून कुक्कुट अशी कांहींची उत्पत्ति दिलेली आहे.

(१४८) **वसिष्ठप्रोक्त जातिः**—वसिष्ठ धर्मसूत्रांत अध्याय १२ मध्यें चंडाल, वैण, अंत्यावसायी, रामक, पुल्कस, सूत, अंबष्ठ, उग्र, निषाद-पारशव इत्यादींचे उल्लेख आहेत. गौतम व बौधायन यांनीं सांगितलेले सर्व अनुलोम वसिष्ठानें दिलेले नसून प्रतिलोम मात्र सहा सांगून त्याची उत्पत्तीही निराळीच दिलेली आहे. ती अशीः- शूद्र व क्षत्रिया=वैण, शूद्र व वैश्या=अंत्यावसायी, वैश्य व ब्राह्मणी=रामक, वैश्य व क्षत्रिया=पुल्कस, क्षत्रिय व ब्राह्मणी=सूत, आणि शूद्र व ब्राह्मणी चांडाल इत्यादि.

(१४९) **विष्णुधर्मसूत्रांतील जातिः**—वसिष्ठानंतर विष्णुधर्मसूत्रामध्यें जातिविचार आहे व येथूनच जातींचे धंदे सांगण्याला प्रारंभ झालेला आहे. यापूर्वीं जातींच्या धंद्याचा विचार ग्रंथांत आढळत नाहीं. विष्णुधर्मसूत्रांमध्यें चार वर्णांशिवाय आयोगव, पुक्कस, मागध, चांडाल, वैदेहक व सूत हे अनुलोम सांगितले असून त्यांचे धंदेही अनुक्रमें रंगावतरण, व्याधता, स्तुतिक्रिया, बहिर्वास व मृतवस्त्रधारण, स्त्रीरक्षा व अश्वसारथ्य असे सांगितले आहेत. अनुलोमांची उत्पत्ति जवळ जवळ पूर्वसूत्रकारासारखीच सांगितली आहे. अनुलोम संतति मातृसवर्ण समजावी. प्रतिलोमसंतति आर्यविगर्हित समजावी आणि सर्वांचा समान जातीशींच लग्नव्यवहार

व्हावा, असें विष्णूचें मत आहे. त्यावरून या काळीं मातृसावर्ण्य रूढ होऊन पितृसावर्ण्य मागें पडलें आणि प्रत्येक जातीचे स्वजातीशींच अन्नलग्नव्यवहार होऊं लागले, असें अनुमान निघतें.

(१५०) **मनुकालीन जातिः**—विष्णूनंतर मनु, याज्ञवल्क्य, औशनस, वृद्धहारित व वेदव्यास इत्यादींनीं जातिविचार केला आहे. त्यांतील मनूचा विचार बराच विस्तृत आहे. मनूनें सहा अनुलोम दिलेले नाहींत. अंबष्ठ, निषाद व उग्र असे तीन दिलेले असून ब्राह्मण व क्षत्रिया, क्षत्रिय व वैश्या आणि वैश्य व शूद्रा, यांच्या संततीला त्यानें अनुल्लेखावरून पितृसावर्ण्यांतच घातलेलें आहे. प्रतिलोम पूर्वाचार्यांच्याप्रमाणेंच सांगितलेले नाहींत. मनूनें एकंदर तीन अनुलोम, सहा प्रतिलोम, वीस संकरजाति व चार वर्ण सांगितले असून सुमारें वीस जातींचे धंदे सांगितले आहेत, ते असे—

१ **सैरिंध्र**—वेणीफणी करणें, अंगसंवाहन व मृगादिवध.
२ **मैत्रेय**—सकाळीं घंटा वाजवून राजादींची स्तुति करणें.
३ **मार्गव**—दास—कैवर्त—(घंदा) नावांचा धंदा करणें.
४ **चर्मकार**—चामर्डी व जोडे यांचा धंदा.
५ **अंध्र व मेद्**—गांवाबाहेर राहून अरण्यपशु मारणें.
६ **पांडुसोपाक**—बुरुडाचा धंदा.
७ **आहिंडिक**—बंधनस्थानसंरक्षण.
८ **सोपाक**—फांशी देणें, वध्यघाती.
९ **अंत्यावसायी**—डोंबाचा स्मशानांतील धंदा करणें.
१० **सूत**—अश्वसारथ्य करणें.
११ **अंबष्ठ**—रोगशांत्यादि चिकित्सा.
१२ **वैदेहक**—अन्तःपुरांतील स्त्रीकार्य.
१३ **मागध**—स्थल व पथवणिज्या.
१४ **निषाद्**—मासे मारणें.
१५ **आयोगव**—सुतारकाम (पण कोणी नट व पाथरवट असा अर्थ करितात.)

१६ **चंचुमद्गु**–अरण्यांतील पशु मारणें.

१७ **क्षत्ता, उग्र, पुक्स**–या तीन जातींनीं बिळांतील उंदीर वगैरे मारणें.

१८ **धिग्वण**–ढोरांचा धंदा.

१९ **वेण**–झांजा, ढोल वगैरे वाजविणें.

२० **चांडाल, श्वपच**–बहिर्वास, श्वगर्दभधन, प्रेतें पुरणें.

## मनूनें सांगितलेल्या संकर जाति

पहिलें नांव पुरुषाचें व दुसरें स्त्रीचें समजावें.

१ ब्राह्मण + उग्र = आवृत्त, २ ब्राह्मण + अंबष्ठ = आभीर,
३ ब्राह्मण + आयोगव = धिग्वण, ४ निषाद + शूद्र = पुक्स,
५ शूद्र + निषाद = कुक्कुटक, ६ क्षत्ता + उग्र = श्वपाक,
७ वैदेह + अंबष्ठ = वेण, ८ दस्यु + आयोगव = सैरंध्र,
९ वैदेह + आयोगव = मैत्रेयक, १० निषाद + आयोगव = मार्गव–दास–कैवर्त,
११ निषाद + वैदेहक = चर्मकार, १२ वैदेहक + कारावर = अंध्र,
१३ वैदेहक + निषाद = मेद, १४ चंडाल + वैदेह = पांडुसोपाक,
१५ निषाद + वैदेह = आहिंडिक, १६ चंडाल + पुक्स = सोपाक,
१७ चंडाल + निषाद = अंत्यावसायी १८ ब्राह्मण + वैदेहक = चंचु,
१९ ब्राह्मण + बंदि = मद्गु.

मनूनें व्रात्य, ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य स्त्रीपुरुषांपासून अनुक्रमें पुढील जाति सांगितल्या आहेतः–

(१) भूर्जकंटक–आवंत्य–वाटधान–पुष्पध–शैख.

(२) झल्ल–मल्ल–निच्छवी–नट–करण–खस–द्रविड.

(३) सुधन्वाचार्य–कारुष–मैत्र–सात्वत.

(१५१) **याज्ञवल्क्यस्मृतींतील जातिः**–याज्ञवल्क्य हा मनूनें न सांगितलेले मूर्धावसिक्त, माहिष्य व करण असे अनंतर अनुलोम सांगतो; आणि अंबष्ठ, उग्र व निषाद यांचींही नांवें देतो. सूत, मागध, वैदेह, आयोगव, क्षत्ता व चांडाल अशीं प्रतिलोमाचीं नांवें तो देतो. सहा अनु-

लोम व सहा प्रतिलोम यांशिवाय माहिष्यपुरुष व करणस्त्री यांपासून एक रथकार तो अधिक देतो. म्हणजे चार वर्णांशिवाय तेरा जातींचा उल्लेख याज्ञवल्क्यानें केला आहे. याज्ञवल्क्यानंतर पराशरानें कांहीं फारसा जातिविचार सांगितलेला नाहीं. पण दास, नापित, गोपाल व आर्धिक य चौघांची उत्पत्ति कोणच्याही स्मृतिकारानें न सांगितलेली अशी पराशरानें सांगितलेली आहे व हे चार शूद्र भोज्यान्न होत, असें तो म्हणतो.

(१५२) **व्यासकथित चंडाल व शूद्र**:—वेदव्यासस्मृतीमध्यें एक शूद्रब्राह्मणीसंभव, दुसरा कुमारीसंभव आणि तिसरा सगोत्रस्त्रीसंभव असे तीन जन्मचंडाल सांगितले आहेत. व्यासांनीं शूद्रांचे धंद्यामुळें झालेले वर्धकी, नापित, गोप, आशाप, कुंभकार, वणिक्, किरात, कायस्थ, मालाकार व कुटुंबी असे दहा प्रकार सांगितले आहेत.

(१५३) **औशनसस्मृतींतील जातिः**—आंगिरस व अत्रि हे अनुक्रमें अंत्यजाचे पांच व सात प्रकार सांगतात. व्यासस्मृतींत अंत्यजाचे बारा प्रकार सांगितलेले आहेत. लघुआश्वलायनस्मृतीमध्यें माहिषेय, वैकुंठ, वृषलेय व गोळकांतील कुंड व रंड अशा पांच जाति सांगितल्या आहेत. औशनसस्मृतीमध्यें एकंदर अडतीस जातींची उत्पत्ति व त्यांचे धंदे सांगितले आहेत. या अडतीसांपैकीं विवाहसंबंधानें झालेल्या सूत, वेणुक, चर्मकार, मागध, चांडाल, श्वपच, आयोगव, तार्मोपजीवि, सूनिक, उद्बंधक, पुक्कस, रजक, नर्तक, वैदेहक, चर्मोपजीवि, सूचिक, मूर्धावसिक्त, नृप, गूढजातक, अंबष्ठ, पारशव, सूत (याची उत्पत्ति निराळी दिली आहे), उग्र, सूचक, तक्षक, मत्स्यबंधक, कटकार व काकवच इत्यादि अठ्ठावीस जाति आहेत व चौर्यकर्मानें झालेल्या रथकार, पुलिंद, रंजक, चक्री, भिषक्, कुंभकार, निषाद, मणिकार, शूलिक, कटकार अशा दहा जाति आहेत.

मनु व उशनस् या दोघांनींच जातींच्या उत्पत्तीचा, नांवाचा व धंद्याचा विचार विस्तृतपणें केलेला आहे; परंतु या दोघांत त्यासंबंधाची एकवाक्यता नाहीं. मनूनें सांगितलेल्या कित्येक जाति उशनसानें सांगितलेल्या नाहींत.

(१५४) **औशनस व जातींचे धंदे**:—मनु व औशनस या दोन्ही स्मृतींत ज्यांचीं नांवें आहेत अशा जाति म्हटल्या म्हणजे सूत, उग्र, निषाद,

अंबष्ठ, वैदेहक, पुक्कस, आयोगव, मागध व चंडाल या होत. या नऊ जातींचे धंदे मनूनें सांगितल्यापेक्षां निराळे आहेत व कांहींचे मनुकालापेक्षां सुधारलेले धंदे दिसतात. मनुकालीं जो उग्र उंदीर मारून खात असे, तो पुढें रक्षणाचें काम करूं लागला. अश्वसारथ्य करणारा सूत हा व्यापारधंदे करूं लागला. मासे मारणारा निषाद अरण्यांत जाऊन तेथील श्वापदांवर नेम धरूं लागला. पूर्वीचा पुक्कस हा कलाल बनून दारू विकूं लागला व वैदेहक हा अन्तःपुरांतील स्त्रीकार्य सोडून शेळ्या, मेंढ्या व गाई पाळून त्यावर निर्वाह करूं लागला. चंडालाचें काम मनुकालीं गांवाबाहेरच होतें, पण तो गांवांतील मलापकर्षण ( भंगीकाम ) करण्याकरितां गांवांत येऊं लागला. यावरून मनुकालापेक्षां औशनसकालीं समाजस्थिति पालटली होती व म्हणूनच लोकांचे धंदेही पालटले होते, असें अनुमान निघतें.

(१५५) **गृह्यसूत्रें व जातिः**—गृह्यसूत्रांत फार थोड्या जातींचीं नांवें आलेलीं आहेत. कारण श्रौत व गृह्यसूत्रांतील मुख्य जो धार्मिक विषय त्याच्याशीं संबद्ध असलेल्या जातींचा उल्लेख त्या ग्रंथांत येणें साहाजिक आहे. आश्वलायन गृह्यसूत्रांत कुलाल, दिवाकीर्ति, अपकृष्ट, तक्षकर्मोपजीवि अशा कांहीं जाति उल्लेखिलेल्या आहेत. पाणिनी कुलालादि गणांत व्यास, बरुड (बुरुड ), निषाद, चंडाल, बिंब यांचीं नांवें उच्चारतो. ग्रामशिल्पि, ग्रामकुलाल, ग्रामनापित असे भेद पाणिनीनेंही केलेले आहेत. वार्तिककार सूत व उग्र यांचीं नांवें देतो. रथकार हें नांव आपस्तंब, कात्यायन, बौधायन सूत्रांत आलें आहे. सत्याषाढ सूत्रामध्यें निषाद व जैमिनी सूत्रामध्यें सौधन्वन हीं नांवें आहेत. कौटिलीय अर्थशास्त्रांत चंडाल, पाषांड, अंबष्ठ, निषाद, पारशव हीं नांवें आलीं आहेत.

(१५६) **जात्युत्पत्तीचें तौलनिक पत्रकः**—सर्व जातींच्या उत्पत्तीचा तक्ता तुलनात्मकदृष्ट्या देऊन उत्पत्तीमध्यें व धंद्यामध्यें कशी एकवाक्यता नाहीं हें समजणें मनोरंजक आहे; परंतु तें कार्य महामहोपाध्याय पंडित श्रीधरशास्त्री पाठक यांनीं ' **अस्पृश्यतेचा शास्त्रार्थ** ' या आपल्या सुप्रसिद्ध ग्रंथांत विस्तृत केलें असल्यामुळें केवळ अनुलोम व प्रतिलोम यांच्या उत्पत्तीचें आमचें पत्रक पान १४९ वर देऊन पान १५० वर त्याचें परीक्षण करतों.

| अनुलोम गौतम | बौधायन | वसिष्ठ | विष्णु | मनु | याज्ञवल्क्य | औशनस | वृद्धहारित |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ब्रा. क्षत्रिया–मूर्धावसिक्त | ब्राह्मण | अनुलोमांचीं नांवें देत नाहीं. | अनुलोमांचीं नांवें देत नाहीं. | नांव देत नाहीं | मूर्धावसिक्त | मूर्धावसिक्त | मूर्धावसिक्त |
| ब्रा. वैश्या–भृज्जकंठ (भूर्जकंठ) | अंबष्ठ | | | अंबष्ठ | अंबष्ठ | अंबष्ठ | अंबष्ठ |
| ब्रा. शूद्रा–पारशव | निषाद (पारशव) | | | निषाद (पारशव) | निषाद(पारशव) | पारशव | निषाद |
| क्षत्रि. वैश्या–माहिष्य | क्षत्रिय | | | नांव देत नाहीं | माहिष्य | सूत | माहिष्य |
| क्षत्रि. शूद्रा–यवन | उग्र | | | उग्र | उग्र | नांव देत नाहीं | उग्र |
| वैश्य शूद्रा–करण | रथकार | | | करण | करण | सूचक | करण |

याज्ञवल्क्य ‘ रथकार ’ हें अधिक नांव अनुलोमांत नवीन देतो.

| प्रतिलोम | गौतम | बौधायन | वसिष्ठ | विष्णु | मनु | याज्ञवल्क्य | औशनस | वृद्धहारित |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| क्षत्रिय ब्राह्मणी– | सूत | सूत | सूत | सूत | सूत | सूत | सूत | सूत |
| वैश्य क्षत्रिया– | धीवर | आयोगव | पुक्कस | पुक्कस | मागध | मागध | आयोगव | मागध |
| वैश्य ब्राह्मणी– | मागध | वैदेहक | रामक | वैदेहक | वैदेहक | वैदेहक | मागध | वैदेहक |
| शूद्र वैश्या– | वैदेह | मागध | अंत्यावसायी | आयोगव | आयोगव | आयोगव | वैदेहक | आयोगव |
| शूद्र क्षत्रिया– | पुक्कस | क्षत्ता | वैण | मागध | क्षत्ता | क्षत्ता | पुक्कस | क्षत्ता |
| शूद्र ब्राह्मणी– | चंडाल | चंडाल | चंडाल | चंडाल | चंडाल | चंडाल | चंडाल | चंडाल |

वृद्धहारित रथकार हें अधिक नांव प्रतिलोमांत नवीन देतो.

(१५७) **पत्रकाची चिकित्साः**—ब्राह्मण व क्षत्रिया यांच्या पुत्राला बौधायन ब्राह्मण म्हणतो, मनु त्याचें नांव देत नाहीं. वसिष्ठ व विष्णू हे मनूशींच एकमत आहेत आणि गौतम, याज्ञवल्क्य, औशनस व वृद्धहारित असे चार त्याला मूर्धावसिक्त म्हणतात. ब्राह्मण व वैश्यापुत्राला गौतम भृज्जकंठ उर्फ भूर्जकंटक म्हणतो. पण मनूनें हें नांव व्रात्य—विप्रस्त्री पुरुष-संततीला दिलें आहे. दोन स्मृतिकार याचें नांव देत नाहींत व पांच त्याला अंबष्ठ असें म्हणतात. निषाद, पारशव जातीबद्दल सर्वांची एकवाक्यता आहे. क्षत्रियवैश्यापुत्राला कोणी क्षत्रिय म्हणतात, कोणी माहिष्य म्हणतात, तर कोणी सूत म्हणतात. क्षत्रियाचा धंदा प्रसिद्धच आहे. सूताचा धंदा अश्वसारथ्य आहे. पण माहिष्याचा धंदा या दोघांपेक्षां निराळा आहे. क्षत्रिय व शूद्रापुत्राला गौतम यवन म्हणतो, तर इतर कांहीं उग्र म्हणतात, पण औशनस त्याची उत्पत्ति निराळी देतो. गौतम-बौधायनवसिष्ठादि धर्मसूत्रांत जसा म्लेंच्छदर्शन, संभाषण व सहवासाचा निषेध आहे तसा यवनाचा नाहीं. क्षत्रियशूद्रापुत्र जो यवन तो गौतमकालीं हिंदु होता. कारण तो अनुलोम होता. पण उग्राचा धंदा व यवनाचा धंदा एकच सांगितला आहे असें नाहीं. उग्रानें बिळांतील प्राणी मारून खावे असें मनु म्हणतो, तर त्यानें राजाज्ञेनें रक्षणाचें काम करावें असें औश-नस म्हणतो. त्यावरून यवन व उग्र यांची उत्पत्ति एक असली तरी नांवामध्यें भेद असून धंद्यामध्येंही भेद आहे. वैश्य व शूद्रापुत्राला करण, रथकार, सूचक अशीं भिन्नभिन्न नांवें आहेत. पण रथकाराचा धंदा सारथ्य, सूचकाचा धंदा शिंपीकाम व करणाचा धंदा याहून निराळाच आहे. याज्ञवल्क्य रथकाराची उत्पत्ति माहिष्यपुरुष व करणस्त्री यांपासून देतो.

(१५८) **एकवाक्यता नाहीं:**—प्रतिलोमापैकीं सूत आणि चंडाल या दोघांबद्दल सर्वांचें एकमत आहे; पण वैश्य व क्षत्रियापुत्राला कोणी धीवर, कोणी आयोगव, कोणी पुक्कस, तर कोणी मागध अशीं भिन्नभिन्न नांवें देतात. यांचे धंदेही अगदीं परस्परविरुद्ध असे आहेत. धीवर म्हणजे कोळी, आयोगव म्हणजे सुतार, पुक्कस म्हणजे कलाल किंवा गांवा-बाहेर राहून बिळांतील प्राणी खाणारा व मागध हा फिरता किंवा बैठा

व्यापार करणारा मनुष्य असे त्यांचे विविध धंदे आहेत. वैश्य व ब्राह्मणी-पुत्राला वसिष्ठ रामक म्हणतो. हें नांव अपूर्व आहे. याचा धंदा कोणी दिलेला नाहीं; पण मागध आणि वैदेहक यांचे धंदेही एक नाहींत. वैदेहकानें अन्तःपुरांतील स्त्रीकार्य करावें, असें मनु म्हणतो, तर औशनस त्यानें शेळ्या, मेंढ्याचा व्यापार करावा असें म्हणतो. मागधाचें कार्य कोणी व्यापार तर कोणी भाटकर्म असें सांगतो. शूद्र व वैश्या यांच्या पुत्राला अगदीं निराळीं अशीं नांवें दिलीं आहेत. वसिष्ठ त्याला अंत्यावसायी म्हणजे डोंबाची वृत्ति करणारा म्हणतो, तर एक दोन स्मृतिकार त्याला वैदेहक व मागध म्हणतात, आणि चौघे त्याचा आयोगव म्हणून उल्लेख करतात. स्मशानक्रिया करणें, व्यापार करणें व शेळ्या-मेंढ्या पाळणें हें धंदे परस्परविरुद्ध आहेत. तसेंच आयोगव शब्दाचे अर्थही पुष्कळांनीं अगदीं विरुद्ध असे दिलेले आहेत. आयोगव म्हणजे सुतार, पाथरवट, नट व कोष्टी इतके विविध अर्थ आहेत. तात्पर्य, यांतही परस्परविरोधच आहे. त्याचप्रमाणें पांचवा प्रतिलोम जो शूद्र–क्षत्रियापुत्र त्याला कोणी बुरुड, तर कोणी कलाल, कोणी व्यापारी, कोणी दासीपुत्र असें म्हणतात व त्याचे धंदेही भिन्नभिन्न सांगतात. सारांश उत्पत्ति आणि धंदा यासंबंधानें कोणाचा कोणाशीं मेळ नाहीं; म्हणून या दिलेल्या उपपत्त्या खऱ्या नाहींत हें उघड होतें. मागध, वैदेहक, अवंत्य इत्यादि नांवें देशवाचक असतांना त्यांची उत्पत्ति संकराच्या कल्पनेवर बसविलेली आहे. पण ती चुकीची आहे. एतावता हिंदुसमाजांत आज ज्या जाति दिसतात त्यांची वाढ अगदीं अलीकडील आहे. या जाति ईश्वरकृत नाहींत. स्मृतिकारांनीं दिलेल्या सर्व जातींची बेरीज अघळपघळपणें केली तरी ती संख्या साठपाऊणशेंपेक्षां अधिक भरत नाहीं. म्हणून आजच्या हिंदुसमाजाचा विचार करतांना श्रुतिस्मृतिपुराणांतील जातींच्या माहितीचा उपयोग केवळ इतिहासापेक्षां अधिक नाहीं.

**(१५९) जन्मापेक्षां गुणालाच माना**:—जातिसंस्था वर्णसंस्थेच्या पूर्वींची असो वा नंतरची असो, किंवा वर्णसंस्थेला पूरक असो, तिजमुळें एकाकाळीं समाजधारणेला साह्य झालें यांत शंका नाहीं. बुद्धोत्तर कालांत जन्माला जसजसें अधिक महत्त्व येऊं लागलें, तसतसें तें एकंदरींत समाज-

धारणेला मारक आहे ही गोष्ट धर्मशास्त्रप्रयोजकांच्या ध्यानीं आलेली दिसते. म्हणूनच त्यांनीं जन्माला मान न देतां गुणाला मान द्यावा अशी घोषणा केली. चार वर्ण म्हणजेच चार जाति असा आग्रह एकाकाळीं होता, पण वर्ण चार आणि जाति असंख्य यामुळें तो मेळ जमेना! वर्णविभागांमध्यें आचार, तप व तज्जन्य संस्कार यांचा कांहीं संबंध नाहीं. जाति ही आई-बापांवरूनच ठरवावयाची, पश्वादिकांप्रमाणें माणसांची जात जन्मावरच असते, ब्राह्मण जन्मानेंच ठरतो आणि क्षत्रियादि जातिसुद्धां जन्मावलंबीच आहेत हें पुढील वचनांवरून दिसून येईल.

**' नत्वाचारनिमित्त वर्णविभागे प्रमाणं किंचित्।...न तप-आदीनां समुदायो ब्राह्मण्यं न तज्जनितः संस्कारः न तदभिव्यंग्या जातिः, किं तर्हि मातापितृजातिज्ञानाभिव्यंग्या प्रत्यक्षसमधिगम्या। '**

–तंत्रवार्तिक ( जै. १–२–१ )

**' सर्वेषां जन्मना जातिर्नान्यथा कर्मकोटिभिः पश्वादीनां यथा जातिर्जन्मनैव न चान्यथा। सापि स्थूलस्य देहस्य भौतिकस्य न चात्मनः॥ जन्मनैव महाभागो ब्राह्मणो नाम जायते। '**

–शिवमहात्म्य खंड ( १२.५१–५२ )

**(१६०) वेदांतील उदाहरणः**–शूद्राला कनिष्ठ समजत हें सिद्धच आहे. परंतु केवळ शूद्र स्त्रीची संतति म्हणून हेटाळणी करणें कसें अन्यायाचें आहे, हें वेदांतील एका आख्यायिकेच्या द्वारें सांगतों.

एकदां सरस्वती नदीच्या तीरावर बहुत ऋषी मिळून सत्र करीत होते. त्या ठिकाणीं ( सत्रांत भाग घेण्याच्या हेतूनें ) कवष ऐलूष आला. तेव्हां तो (कवष) दासीपुत्र म्हणजे शूद्रस्त्रीपासून झालेला, धूर्त, जुगारी अर्थात् ब्राह्मण नव्हे म्हणून त्यास सत्रांत यज्ञदीक्षा कशी द्यावी असा ऋषी विचार करूं लागले. शेवटीं ह्यास दीक्षा देऊं नये असें ठरवून ऋषींनी त्याला तेथून दूर घालविलें. ज्या ठिकाणों पिण्याकरितां पाणीही मिळणार नाहीं अशा सरस्वतीपासून दूरच्या प्रदेशांत त्यास सोडल्यामुळें त्या ठिकाणीं तो तहानेनें व्याकुळ झाला. पाणी कोठेंही मिळेना. तेव्हां त्या कवष ऐलूषानें **' प्रदेवत्रा ब्रह्मणे गातु '** हें अपोनप्त्रीय सूक्त म्हणून देवांची प्रार्थना

केली. त्या सूक्तांतील प्रार्थनेनें देव त्याजवर संतुष्ट झाले व त्यास पिण्याकरितां पाणी मिळालें; इतकेंच नव्हे तर तो कवष ऐलूष देवांना प्रिय झाल्यामुळें सरस्वती नदी आपला प्रवाह सोडून त्याच्या आसमंतात् वाहूं लागली. ज्या प्रदेशांत हा सरस्वतीचा नवीन प्रवाह सुरू झाला तो देश 'परिसारक' या नांवानें प्रसिद्ध झाला. ज्या ठिकाणीं ऋषी सत्र करीत होते, तेथें सरस्वतीचा प्रवाह कोरडा झालेला पाहून ऋषींना आश्चर्य वाटलें; व त्याजबद्दल चौकशी करतांना आढळून आलें कीं, सरस्वतीचा प्रवाह कवषाकडे गेला. तेव्हां ऋषींनीं विचार केला कीं, ज्या अर्थी देवांनीं कवषाची योग्यता जाणली, त्या अर्थी आपण त्याला बोलावून आपणांत घ्यावा, व तो ब्राह्मण आहे असें समजून त्याला सत्रांत यज्ञदीक्षा द्यावी. त्याप्रमाणें ऋषींनीं त्याला आदरानें बोलावून व त्याचें ब्राह्मण्य कबूल करून त्याला सत्रांत यज्ञदीक्षा दिली. इतकेंच नव्हे तर त्यानें म्हटलेलें 'प्रदेवत्रा ब्रह्मणे गातु' हें अपोनप्त्रीय सूक्त सर्व ऋषींनीं प्रेमानें म्हणून देवतांची प्रार्थना केली. अजूनही श्रावणीच्या वेळीं हें सूक्त म्हणण्यांत येतें. ( ऐ. ब्रा. द्वि. पंचिका )

(१६१) **महाभारत व इतर ग्रंथांतील आधार:**—वेदांतील वरील आख्यायिका गुणालाच मान द्यावा या तत्त्वाची निदर्शक आहे. पण जन्मापेक्षां गुणाला मान द्यावा ही बंडखोरीची घोषणा महाभारतांतच अट्टाहासानें केली असून तिनें जुन्या समजुतीला चांगला धक्का दिला! महाभारतांत ठिकठिकाणीं यासंबंधाची चर्चा आलेली आहे, तिचे स्पष्टीकरणार्थ कांहीं वचनें देतों:—

सत्यं दमस्तपो दानमहिंसा धर्मनित्यता ।
साधकानि सदा पुंसां न जातिर्न कुलं नृप ॥ वनपर्व १८१-४२-४३
शूद्रयोनौहि जातस्य सद्गुणान् उपतिष्ठतः ।
वैश्यत्वं लभते ब्रह्मन् क्षत्रियत्वं तथैव च ॥
आर्जवे वर्तमानस्य ब्राह्मण्यमभिजायते । वनपर्व २१२-११
सत्यं दानमथाद्रोह आनृशंस्यं त्रपा घृणा ।
तपश्च दृश्यते यत्र स ब्राह्मण इति स्मृतः ॥ शांति. १८९।४-८

शूद्रे चैतद्भवेल्लक्ष्य द्विजे तच्च न विद्यते ।
न वै शूद्रो भवेच्छूद्रो ब्राह्मणो न च ब्राह्मणः ॥ वनपर्व १८०-२१
तस्मात्क्षत्रियं मा मंस्था जल्पितेनैव वै द्विजम् ।
य एव सत्यान्नापैति स ज्ञेयो ब्राह्मणस्त्वया ॥ उद्योगपर्व ४३-४९
यस्तु शूद्रो दमे सत्ये धर्मे च सततोत्थितः ।
तं ब्राह्मणमहं मन्ये वृत्तेन हि भवेद् द्विजः ॥ वनपर्व २१६।१४-१५
न योनिर्नापि संस्कारो न श्रुतं न च संततिः ।
कारणानि द्विजत्वस्य वृत्तमेव तु कारणम् ॥ —अनुशासन अ. १४३
शूद्रोऽपि शील–संपन्नो गुणवान् ब्राह्मणो भवेत् ।
ब्राह्मणोऽपि क्रियाहीनः शूद्रात् प्रत्यवरोभवेत् ॥ —वनपर्व अ. १८०
स्वभावः कर्मच शुभं यत्र शूद्रेऽपि तिष्ठति ।
विशिष्टः स द्विजातेर्वै विज्ञेय इति मे मतिः ॥ —अनुशा. अ. १४३
एतैः कर्मफलैर्देवि न्यूनजातिकुलोद्भवः ।
शूद्रोप्यागमसंपन्नो द्विजो भवति संस्कृतः ॥ —अनुशा. अ. १४३
कर्मभिः शुचिभिर्देवि शुद्धात्मा विजितेंद्रियः ।
शूद्रोऽपि द्विजवत् सेव्य इति ब्रह्माऽब्रवीत् स्वयम् ॥—अनुशा. अ. १४३
सर्वोयं ब्राह्मणो लोके वृत्तेन तु विधीयते ।
वृत्ते स्थितस्तु शूद्रोऽपि ब्राह्मणत्वं नियच्छति ॥ अनुशा. १४३
न कुलं वृत्तहीनस्य प्रमाणमिति मे स्थितिः ।
अंत्येष्वपि हि जातानां वृत्तमेव विशिष्यते ॥ उद्यो. अ. ३४

याच विचारसरणीचा अनुवाद भागवत, वृद्धगौतमस्मृति आणि भविष्यपुराणादि ग्रंथांत कोठें कोठें केलेला आहे म्हणून त्यांतील एकएक आधार येथें देतोंः—

यस्य यल्लक्षणं प्रोक्तं पुंसोवर्णाभिव्यंजकम् ।
यदन्यत्रापि दृश्येत तत्तेनैव विनिर्दिशेत् ॥ भा. स्कं. ७ अ. ११
न जातिः पूज्यते राजन् गुणाः कल्याणकारकाः ।
चण्डालमपि वृत्तस्थं तं देवा ब्राह्मणं विदुः ॥ वृद्धगौतम

चत्वार एकस्य पितुः सुताश्च तेषां सुतानां खलु जातिरेका ।
एवं प्रजानां हि पितैक एव पित्रैक भावान्न च जातिभेदः ॥
तपः श्रुतं च योनिश्च एतद् ब्राह्मणकारकम् ।
भविष्यपुराण ब्रा. ४२ अ. ४५

तपःश्रुताभ्यां यो हीनो जाति ब्राह्मण एव सः । महाभाष्य
त्रीणि यस्यावदातानि विद्यायोनिश्च कर्म च ।
एतच्छिवं विजानीहि ब्राह्मणाग्रस्य लक्षणम् ॥ महाभाष्य

**भावार्थः**–सत्य, दम, दान, अहिंसा, धार्मिकता यानेंच मनुष्याची योग्यता वाढते. ती जाति व कुल यांनीं वाढत नाहीं. सत्य, दान, अद्रोह, दया, विनय, तप, हे गुण जेथें दिसतील, तेथें तो ब्राह्मण समजावा. सत्यदानादि गुण जर ब्राह्मणांत न दिसले आणि ते शूद्रांत दिसले तर तो ब्राह्मण अब्राह्मण होय आणि शूद्र ब्राह्मण होय. जो सत्यापासून ढळत नाहीं तो ब्राह्मण समजावा. सूद्राच्या ठिकाणीं दम, सत्य, धर्म इत्यादि गुण असतील तर तो द्विज होय. द्विजत्वाला एक शील पुरे आहे. शीलापुढें जाति, संस्कार, विद्या यांची मातब्बरी नाहीं. शीलसंपन्न शूद्र ब्राह्मण समजावा व शीलविहीन ब्राह्मण शूद्रापेक्षांही खालचा समजावा. स्वभावानें, शुभ कर्मानें, विद्येनें, इंद्रियनिग्रहानें आणि शुद्धकर्मानें शूद्र हा द्विजाप्रमाणें सेव्य होय असें ब्रह्मदेव म्हणतो. शीलावरूनच ब्राह्मण व शूद्र ठरतो. अंत्यजादिकांमध्येंसुद्धां विशेष शील दिसलें तर तोही श्रेष्ठ होय. वर्णनिदर्शक लक्षणें जेथें दिसतील त्या व्यक्तीचा त्या वर्णानें निर्देश करावा. जातिपेक्षां गुणच कल्याणकारक होत. म्हणून शीलवान् चंडालही ब्राह्मण होय. परमेश्वरस्वरूपी पित्याचे चार वर्ण म्हणजे चार पुत्र होत. या सर्वांच्या जाति एकच होत. सर्वांचा पिता परमेश्वर हा एकच असल्यामुळें त्यामध्यें जातिभेद मानण्याचें कारण नाहीं. तप, विद्या व जन्म यांवरच ब्राह्मणत्व अवलंबून आहे. या तिहीनें जो हीन असेल तो जातिब्राह्मण होय. विद्या, योनि व कर्म हीं ज्याचीं उज्ज्वल आहेत तोच ब्राह्मण होय.

**(१६२) एकजिनसी हिंदुसमाजः**–जुन्या धर्मशास्त्रांत जन्मजात जातिसंस्थेचें जें विवेचन आहे त्याची कल्पना येथपर्यंत दिली. भविष्य-

कालांत ही जन्मजात जातिसंस्था टिकणें शक्य नाहीं. नव्या हिंदुधर्माला या इतक्या जाति दिसत नसून अखिल हिंदूंची एकच जाति आहे असें तो मानतो आणि अखिल हिंदूंच्यामध्यें सांस्कृतिक दृष्ट्या एकरूपता उत्पन्न करण्याचा तो उपदेश करतो. जातिसंस्था ही जी आजवर टिकली याचें कारण आचार व शिक्षण यांतील विषमता हें होय. सर्व जातींमध्यें जें विचारमूलक, आचारमूलक आणि वरवर दिसणारें सादृश्य असावयास पाहिजे तें यापूर्वी नव्हतें व तशा तऱ्हेचा यत्नही नव्हता; म्हणून जातिसंस्था टिकून राहिली. जातिसंस्थेविरुद्ध बौद्ध, जैन, लिंगायत, मानभाव इत्यादिकांनीं बंड केलें, जोराचे आघात केले, परंतु त्यांच्या संप्रदायामध्येंही पावित्र्यजन्य उच्चनीचपणाच्या कल्पना घुसल्या. अहिंसा, ब्रह्मचर्य, शुद्धता, अपरिग्रहादि नियम अतिरेकाला गेले, आणि या संप्रदायांतही जन्मजात उच्चनीचतेच्या कल्पनेवर चातुर्वर्ण्य आणि जाति रूढ झाल्या. पण आजचा काळ हा सर्व जातींमध्यें सांस्कृतिक दृष्ट्या सादृश्य उत्पन्न होण्याला फार अनुकूल आहे. जातिजातींमध्यें असलेलें सांस्कृतिक अंतर झटाझट तुटत आहे व राहिलें–साहिलें तुटण्याच्या मार्गास लागलेलें आहे. सर्व गट सुसंस्कृत आणि कल्पना, भावना, आचार, व्यवहार यांमध्यें सदृश दिसूं लागले कीं हिंदुजातीला अखंड एकजिनसी समाजाचें स्वरूप येईल.

**(१६३) जात कशी विसरावी ?** :–जाति मोडा, जात्युच्छेद करा, सबगोलंकार करा ही भाषा हिंदुसमाजाला मुळींच मानवत नाहीं. एकंदरींत हा अतियोगही आहे. त्यापेक्षां ज्या जाति सदृश असतील, ज्यांच्यामध्यें अन्तर्बाह्य सांस्कृतिक सादृश्य स्पष्ट दिसतें अशा जातींचें एकीकरण करा हें सांगणें मानवतें. जातिभेदाचे कंगोरे बरेच तीक्ष्ण आहेत. जन्मजात उच्चनीचता व अस्पृश्यता यामुळें एकमेकांबद्दल अनादर आहे, शुभाशुभाच्या कल्पना आहेत. सकाळीं उठून अमुक जातीचें तोंड पाहिलें कीं अपशकून होतो असें प्रत्येक जातीच्या परिपाठांत आहे. मध्यकालांतील पोथ्यांत व निबंधग्रंथांत या असल्या कल्पना आहेत. त्या सर्व नाहींशा होण्याचा मार्ग म्हणजे बुद्धिवादानें समाजाचा अनुनय करणें, जाति ईश्वरकृत नाहींत हें पटवून देणें आणि

प्रत्येक व्यवहारांत जात विसरण्यास शिकविणें, हा होय. कोर्टें, कचेऱ्या, शाळा यांमध्यें आणि शिरगणतीच्या वेळींही आपण हिंदु आहों एवढीच नोंद करावी. हिंदूंतील जातींचा उल्लेख मुळींच करूं नये. जात हिंदु, धर्म हिंदु, राष्ट्र हिंदु आणि संस्कृति हिंदु असें जेथें तेथें हिंदूपण दिसूं लागलें म्हणजे हळुहळू जातींचें विस्मरण होईल. जात विसरणें, अन्य जातीसंबंधाच्या अनुदार कल्पना सोडणें आणि सदृश जातींचें एकीकरण करणें अशा मुरडीनें, हिंदुसमाजांतील जातिसंस्थेचें जें आज अनिष्टत्व भासत आहे तें हळूहळू नाहींसें होईल. आजच्या पिढीनें हा उपक्रम केल्यास पुढची पिढी हिंदुत्वनिष्ठेनें, हिंदुजातीच्या अभिनिवेशानेंच वागूं लागेल आणि हिंदुसमाजाला अखंड एकजिनसी समाजाचें स्वरूप त्वरीत येईल.

(१६४) **उच्चतर समाजरचनाः**–आजचा हिंदुसमाज हा वर्ण-बद्ध नसून जातिबद्ध आहे. वर्णसंस्थेचें काम संपलें आहे. वर्णसंस्थेचेंच काय, पण जातिसंस्थेचेंही काम आतां संपलें असून अखंड एकजिनसी असा हिंदुसमाज यापुढें व्हावयाचा आहे. यासंबंधानें सुविख्यात संशोधक पुरातत्त्वभूषण कै. राजवाडे यांचे विचार फार मननीय आहेत. ते म्हणतातः—

'रंगानें, चेहऱ्यानें, दिनचर्येनें व संस्कृतीनें महाराष्ट्रांतील ब्राह्मण, मराठे, कुणबी, महार, मांग इत्यादि आर्य व आर्यानार्य अशा सर्व जाति सांवळ्या, नीटस, स्नानशील बनल्या असून, आतां निषिद्ध खाद्यपेय वगळलें असतां बहुतेक एकजिनसी होण्याच्या मार्गाला लागल्या आहेत. वर्णांचें आणि जातींचें समाजरचनेंत जें कार्य व्हावयाचें तें बरेंच होऊन चुकलें आहे. ह्याहून उच्चतर समाजरचनेचा काल ह्यापुढें उगवेल असा निश्चित अंदाज दिसतो...'

'सर्व जातींचा एकच सांवळा रंग झाल्याकारणानें वर्णभेदाचें आतां कारण उरलें नाहीं, आणि बहुतेक सर्व जाति अन्योन्यवृत्तींचें उल्लंघन गेलीं हजार वर्षें करूं लागल्यामुळें जातिभेदाचीही मातब्बरी, कातकरी, भिल्ल वगैरे लोक वगळले तर वृत्तिदृष्ट्या म्हणजे निर्वाहदृष्ट्या राहिली नाहीं.'

(–राधामाधवविलासचंपू, प्रस्तावना पृष्ठ २००)

आज समाजसत्तावादी वर्गनिरपेक्ष, धर्मनिरपेक्ष केवळ अर्थमूलक अशा समाजरचनेची भाषा बोलत आहेत. तें कांहीं असलें तरी अखिल हिंदुसमाज सांस्कृतिक दृष्ट्या एकजिनसी होणें अवश्य आहे.

**(१६५) कंगोरे झिजत आहेतः**–हिंदु हा शब्द राष्ट्रवाचक व संस्कृतिवाचक आहे. हिंदु हा एक पारमार्थिक संप्रदाय नाहीं. भिन्न भिन्न संस्कृतींना पचविणारी ती घटना आहे. उच्च प्रकारची वृत्ति व आचार सर्व व्यक्तींमध्यें उत्पन्न करण्याची प्रक्रिया या संस्कृतीनें चालविलेली आहे. साक्षरता व शिक्षण यामुळें तें कार्य आतां जोरानें चालू आहे. आकांक्षा नि संस्कार उत्पन्न करण्याचें कार्य शिक्षण करतें व त्यामुळें व्यवहार्य व प्रत्यक्ष असें अभ्युदयस्वरूपी ध्येय गांठण्यास समाज प्रवृत्त होतो.

जुन्या धर्मांतील दुर्बल कल्पनांमुळें आजची हिंदुजाति ही दुर्बल व अप्रसरणशील अशी बनली आहे. नवा हिंदुधर्म हिंदुजातीला संकुचित कल्पनांच्या बेड्या तोडून प्रसरणशील होण्यास उत्तेजन देतो. हिंदुजाति जितकी प्रसरणशील होईल तितकी ती बलिष्ठ होईल. त्याबरोबरच जन्मजात उच्चनीच कल्पनेचे कंगोरे भराभर झिजून जातील.

**(१६६) हिंदुसमाजाचें नवें केंद्रः**–हिंदुराष्ट्राच्या उत्कर्षाकरितां अखिल हिंदुजाति एकवटली पाहिजे. हिंदुसमाजाचें केंद्र यापुढें समाजांतील प्रज्ञा, पौरुष, पैसा, सेवा व हिंदुत्वनिष्ठा ज्यांच्या ठिकाणीं आहे अशांचा गट होईल. त्यामध्यें अखिल हिंदूंतील प्रज्ञा, पौरुष, पैसा, सेवा व हिंदुत्वनिष्ठा यांनीं युक्त असलेल्या सर्वांचा समावेश होईल. या केंद्राच्या भोंवतीं सबंध हिंदुसमाज वावरूं लागेल. पूर्वी हिंदुसमाजाचें केंद्र ब्राह्मण होतें. आज सर्व जातींना सत्ता, संपदा व संस्कृति यांचीं द्वारें मोकळीं झाल्यामुळें तें केंद्र गेलें आहे. पण नव्या कालाला अनुरूप असें नवें केंद्र उत्पन्न झालें कीं त्या केंद्राचें अनुकरण सर्व समाज करूं लागेल आणि उदात्त हेतूप्रीत्यर्थ सबंध हिंदुजाति बद्धपरिकर झालेली आढळेल.

अखिल हिंदुसमाजांतील शिक्षण, संस्कार, राहाणी, आचार, संस्कृति इत्यादि ज्यांचीं सम असतील अशा कुटुंबांचा प्रत्येक तालुक्याच्या गांवांत एक गट असावा, या गटानें आपल्यांत समाविष्ट करण्याजोगी अखिल

हिंदूंतील जी व्यक्ति आढळेल तिचा सहकुटुंब समावेश करावा. समाजांत जसे निरनिराळे संप्रदाय आहेत त्याप्रमाणें समान दर्जा देण्याचा हा एक संप्रदाय निघाला पाहिजे. योग्य माणसास बरोबरीचा मान मिळतो असा समज समाजांत रूढ झाला म्हणजे या संप्रदायाचें कार्य संपलें.

---*---

# प्रकरण तेरावें

## जात्युत्कर्ष*

(१६७) जात्युत्कर्ष या जन्मींच होतो:—आजचा हिंदुसमाज जातिबद्ध आहे. पण जन्मजात उच्चता, नीचता, नि अस्पृश्यता, नवा हिंदुधर्म मानीत नाहीं. कारण एखाद्या जातींत जन्म येणें ही गोष्ट पूर्वकर्माधीन आहे. या जगांत व या जन्मांत माणसाला इच्छास्वातंत्र्य व कर्मस्वातंत्र्य आहे. म्हणूनच त्याला "नराचा नारायण" होण्याचा अधिकार आहे. यत्नानें, उद्योगानें, व्यवसायानें, शिक्षणानें आणि परिस्थितीनें माणसाची उन्नति होते; हें प्रत्यक्ष आहे. म्हणूनच निरक्षराला साक्षर, साक्षराला सुबुद्ध, सुबुद्धाला विचारवंत होण्याचा व मागासलेल्याला पुढारलेल्या वर्गांत जाण्याचा अधिकार आहे. जुन्या धर्मशास्त्रांतसुद्धां कोठें कोठें या जन्मांतच शिक्षण, संस्कार, व्यवसाय यांमुळें मनुष्य जात्युत्कर्ष करून घेतो अशा आशयाचे विचार आलेले आहेत. आपत्तीमुळें आणि मोहामुळें वरचे वर्ग खालच्या वर्गांच्या व्यवसायांत पडतात, आणि महत्त्वाकांक्षेमुळें खालचे वर्ग वरच्या वर्गांच्या व्यवसायांत शिरतात. यामुळें व इतर कारणांमुळें एकाची संस्कृति सुधारते व दुसऱ्याची हीन होते. धंद्याचा व संस्कृतीचा सर्वांशानें संबंध नसला

* या विषयावर पं. दसरींचा 'धर्मविवादस्वरूप' ग्रंथ पाहा.

तरी पुष्कळच संबंध आहे. वृत्तिसंकर व कर्मसंकर चालू ठेवून कोणताही मनुष्य त्या त्या वर्णांत राहूं शकणार नाहीं. गौतम व याज्ञवल्क्य यांचे पुढील विचार मननीय आहेतः—

(१६८) प्राचीन आधारः—

आर्यानार्ययोर्व्यतिक्षेपे कर्मणः साम्यम् ।।६९।। —गौतम (अ.२ प्र.२)

जात्युत्कर्षो युगे ज्ञेयः सप्तमे पंचमेऽपि वा ।
व्यत्यये कर्मणां साम्यं पूर्ववच्चाधरोत्तरम् ।।९६।। —याज्ञवल्क्य अ.१

गौतमः—आर्य आणि अनार्य यांच्यामध्यें जर कर्मांची अदलाबदल झाली तर आर्य अनार्यकर्मांनें अनार्य होतो व अनार्य, आर्यकर्म—स्वीकारानें आर्य बनतो. प्रसिद्ध टीकाकार हरदत्त म्हणतो—

आर्यस्त्रैवर्णिकः। अनार्यः शूद्रः । तयोः कर्मण आचारस्य व्यतिक्षेपे व्यत्यासे सति तयोः साम्यमेव भवति । न परिचार्य परिचारकभावः । ब्राह्मणादिरप्यनार्यकर्मा चेन्न शूद्रेण परिचरणीयः । शुद्रोऽप्यार्यकर्मा चेदनार्यकर्मभिरितरैर्जात्यपकर्षेण नावमन्तव्य इति ।

भावार्थः—आर्य हें त्रैवर्णिक व अनार्य हा शूद्र होय. यांच्या कर्मांमध्यें उलटापालट झाली म्हणजे उभयतांत साम्य उत्पन्न होतें आणि सेव्य-सेवक भाव नष्ट होतो. ब्राह्मण जर अनार्यकर्मा असेल तर शूद्रानें जशी त्याची सेवा करूं नये तशीच ब्राह्मणांनीं आर्यकर्मी शूद्राची शूद्र म्हणून निंदाही करतां कामा नये. 'शूद्रोऽपि द्विजवत् सेव्यः' या वाक्यांत तोच अर्थ स्पष्ट आहे.

शूद्रयोनौहि जातस्य सद्गुणान् उपतिष्ठतः ।
वैश्यत्वं लभते ब्रह्मन् क्षत्रियत्वं तथैव च ।।११।।
आर्जवेवर्तमानस्य ब्राह्मण्यमभिजायते ।। महाभारत—.
वनपर्व अ. २१२

ह्या पान १५३ वर छापलेल्या श्लोकांतही शूद्राचा ब्राह्मण होतो हें सांगितलें आहे.

**याज्ञवल्क्यः**—पांचव्या किंवा सातव्या पिढींत जात्युत्कर्ष होतो. युग म्हणजे पिढी होय. कर्मांचा व्यत्यास म्हणजे उलटापालट झाली कीं पुढारलेला वर्ग ज्या जातीचा व्यवसाय स्वीकारतो ती जाति त्याला प्राप्त होते व मागसलेला वर्ग ज्या पुढारलेल्या जातीचा व्यवसाय करतो, त्या वर्गांत तो समाविष्ट होतो. या श्लोकावरील मिताक्षरा फार मार्मिक आहे:—

**तस्मिन् व्यत्यये सति यद्यापद्विमोक्षेऽपि तां वृत्तिं न परित्यजति तदा सप्तमे षष्ठे पञ्चमे वा जन्मनि साम्यं यस्य हीनवर्णस्य कर्मणा जीवंति तत्समानजातित्वं भवति । तद्यथा । ब्राह्मणः शूद्रवृत्त्या जीवंस्तामपरित्यजन् यदि पुत्रमुत्पादयति सोऽपि तयैव वृत्त्या जीवन्पुत्रान्तरमित्येवं परंपरया सप्तमे जन्मनि शूद्रमेव जनयति ।**

**भावार्थः**—आपत्कालीं ब्राह्मणानें खालच्या वर्णाची वृत्ति करावी. पण आपत्ति संपल्यावर जर तो ती वृत्ति ( धंदा ) न सोडील तर पांचव्या किंवा सहाव्या पिढींत ज्या हीन वर्णाच्या धंद्यावर तो जगतो, त्याच हीन वर्णांत हाही जातो. उदाहरणार्थ, आपत्कालीं ब्राह्मणानें शूद्राचा धंदा स्वीकारला, पण आपत्ति संपल्यावरही जर तोच धंदा त्यानें चालवला व त्यांतच पुत्र व नातू अशी परंपरा उत्पन्न केली, तर सातवी पिढी शूद्र वर्णाची होते.

**(१६९) व्यवहारांतील म्हणीः**—सदाचार, संस्कृति, शिक्षण व उच्च व्यवसाय यांमुळें जात्युत्कर्ष होतो, असें दाखविणारीं अनेक वचनें महाभारत अ. ३७, शां. प. अ. २९१, अनुशा. प. १४३ मध्यें आहेत. विस्तारभयास्तव तीं येथें देत नाहीं. जिज्ञासूंनीं तीं मुळांतूनच वाचावीं. समाजांत जे वाक्प्रचार व ज्या म्हणी असतात, त्यांवरूनही जात्युत्कर्षाची कल्पना येते. उदाहरणार्थ, ‘ रजपुताणि तण पिढिये गड चढे ’ म्हणजे सामान्य रजपुताची मुलगी ही तीन पिढ्यांमध्यें राजाची बायको होण्यालाही योग्य होते. ‘ मा मारवाडीणी दिक्री शकलाणी ’ म्हणजे आई ही सामान्य मारवाडीण असते पण तिची नात शुक्लाची म्हणजे ब्राह्मणाची ( तीन पिढ्यांमध्यें ) बायको होऊं शकते.

**( १७० ) नव्या हिंदुधर्मांचें आश्वासनः**—जुन्या धर्मशास्त्रांत माणसानें या जन्मीं चांगलें वर्तन करावें म्हणजे पुढच्या जन्मीं त्याला उच्च

प्रकारच्या जातींत जन्म मिळतो असें पुष्कळ ठिकाणीं सांगितलेलें आहे. तें सत्कर्माला उत्तेजन व उच्च स्थितीचें आश्वासन या दृष्टीनें उत्तम असलें तरी या जन्मांत मला पुढारलेल्या गटांत जातां येईल कीं नाहीं या प्रश्नाला तें उत्तर समाधानकारक नाहीं. या जगांत, या जन्मीं शिक्षण, संस्कार, यत्न, व्यवसाय व संस्कृति यांमुळें जात्युत्कर्ष होतो, असेंच आश्वासन आज हवें आहे व तें नवा हिंदुधर्म देतो.

(१७१) **एक अव्यवहार्य कल्पनाः**–जात्युत्कर्षाची जुन्या धर्मशास्त्रांतील एक कल्पना अशी आहे कीं वरच्या वर्गाशीं अनुलोम विवाह करीत गेल्यास सातव्या किंवा पांचव्या पिढींत वरचा वर्ण प्राप्त होतो. ब्राह्मण व निषादी यांचा विवाह झाला. तिच्या मुलीचा पुन्हां ब्राह्मणाशीं विवाह, तसाच नातीचा, पणतीचा, खापरपणतीचा पुनःपुन्हां ब्राह्मणाशीं विवाह होत गेला म्हणजे सातव्या पिढींत तिजपासून होणारी सर्व संतति ब्राह्मण ठरते. पण ही कल्पना व टीकाकारानें केलेला हा अर्थ अव्यवहार्य वाटतो. सात पिढ्यांपर्यंत सारखा ब्राह्मण-निषादीजन्य मुलीशीं लग्न लावणारा ब्राह्मण भेटेलच असें नाहीं. प्रत्येक पिढी तीस वर्षांची धरली तरी दोनशें दहा वर्षांची जंत्री ही ठेवणार कोण? धर्माधिकारी, कां नृपाधिकारी, कां धर्मसंस्था? राजानें या बाबतींत नोंद ठेवावी, त्या कामावर अधिकारी नेमावेत असा राजधर्मांत कोठेंहि उल्लेख नाहीं. महाभारत व कौटिलीय अर्थशास्त्र अशा सर्वमान्य ग्रंथांत यासंबंधाचा कोठेंही उल्लेख नसल्यामुळें हा अर्थ सयुक्तिक वाटत नाहीं. जर अशा लग्नांची नोंद नसेल, त्यावर अधिकारी नसतील तर कार्यसाधु लोक तीन पिढ्या होतांच सात पिढ्या झाल्या असें म्हणतील व जात्युत्कर्ष करून घेतील. परंतु हा अर्थ जातींचा उत्कर्ष व्हावा या दृष्टीनें दिला नसून श्लोकावरील क्लिष्ट टीकेचा एक नमुनाच समजला पाहिजे.

(१७२) **समानसंधि व जात्युत्कर्षः**–आजच्या या यांत्रिक युगांत धंद्यांतील अमंगलपणा नष्ट होत आहे. अमंगल धंदे नव्या साधनांनीं स्वच्छतेनें करतां येत आहेत. अमक्यानें अमुकच धंदा करावा, अमुकच शिक्षण घ्यावें, अमुकच तऱ्हेनें रहावें, अमक्या तऱ्हेचा पोषाख करावा, असें बंधन आज घालणें शक्य नाहीं, इष्ट नाहीं व योग्यही नाहीं.

पूर्वकालिन बंधनें त्या काळीं योग्य असलीं तरी आज तीं अनिष्ट आहेत. व्यवसाय, शिक्षण व रहाणी यांत सुधारणा करून घेण्याची समान संधि आज प्रत्येक व्यक्तीला नवा हिंदुधर्म देत आहे. उच्च रहाणी, उच्च संस्कार, आर्यसभ्यता यांचा अवलंब प्रत्येक हिंदूनें करावा व स्वतःचा व आपल्या गटाचा उत्कर्ष जेवढा करतां येणें शक्य आहे तेवढा करून घ्यावा.

जुन्या हिंदुधर्मांतील कल्पनेप्रमाणें व्यक्तीच्या बऱ्यावाईट कर्मांची, नीतिअनीतीची, पापपुण्याची कसोटी म्हणजे जात होय! मनुष्य केवळ उच्च जातींत जन्मला म्हणून तो पुण्यवान्, नीतिवान् व सत्कर्मी ठरतो, आणि केवळ खालच्या जातींत जन्मला म्हणून तो पापी, अनीतिमान् व कुकर्मी ठरतो. खालच्या जातींतील मनुष्य कितीही पुण्यवान्, नीतिमान्, आचारवान् असला तरी या जन्मीं त्याला पुढें येण्यास संधि नाहीं. सामाजिक व व्यावहारिक क्षेत्रांतसुद्धां त्याचा उत्कर्ष व्हावयाचा नाहीं. तर मेल्यानंतर त्याला म्हणे वरच्या जातींत जन्म घेतां येईल! वरच्या जातींतील मनुष्य कितीही अनीतिमान्, पापी व दुराचारी असला तरी त्याचा या जन्मीं धार्मिक, सामाजिक दर्जा कायम राहतो. फार तर त्याला मेल्यानंतर खालच्या जातींत ईश्वर घालील! या कल्पनेंतच हिंदुसमाजांतील असंतोषाचें, वैषम्याचें नि विग्रहाचें बीज आहे. जन्माची खुंटी इतकी बळकट आहे कीं ती मेल्याशिवाय निघूंच शकत नाहीं. ज्यानें त्यानें आपापल्या जातीचे धंदे, बंधनें, आचार-विचार पाळावे, ईश्वरानें जेथें जन्म घातला आहे तेथें सुखानें रहावें, ही कल्पना खालच्या जातींतील बुद्धिमान् व कर्तृत्ववान् व्यक्तीला असह्य व जाचक आहे. कारण त्यामुळें व्यक्तीला पुढें येण्यास संधीच नाहीं. हा अन्याय नष्ट करण्याचा उपाय म्हणजे खालच्या जातींतील व्यक्ति जर वरच्या जातींतील आचारविचार, बंधनें व संस्कृति यांनीं युक्त असेल तर तिला वरच्या जातींत समाविष्ट करणें आणि वरच्या जातीच्या माणसांत जर त्या जातीला योग्य असे आचारविचार व शील नसेल तर त्याला खालच्या जातींत घेणें, हा होय. पूर्वीं ही प्रथा होती. म्हणूनच शूद्राचा ब्राह्मण होई व ब्राह्मणाचा शूद्र होई. ठोंब्या ब्राह्मणांना राजानें वेठीला धरून काम करून घ्यावें, ( कामं तान् धार्मिको राजा बलिं विष्टिं च कारयेत् ) असें म्हटलें आहे.

जन्मभर हलकेंसलकें काम करणारा अविद्य, दुर्वृत्त ब्राह्मणब्रुव हा ब्राह्मणच ठरतो आणि इतर गटांतील विद्वान्, शीलवान्, कर्तृत्ववानांना बरोबरीचा दर्जा मिळत नाहीं. आजच्या या यंत्रारूढ जगांत समाजाची घडी विसकटली आहे, व उटकळाही आणली आहे. एक यंत्र हजार लोकांना बेकार करतें, त्यामुळें जातींचे पूर्वींचे धंदे करण्याची सोय राहिलेली नाहीं. यंत्रयुगांत जातींचे धंदे टिकविणें व आर्थिक तत्त्वावर जातींचें समर्थन करणें मुळींच शक्य नाहीं. यास्तव जात्युत्कर्षाला वाव दिला पाहिजे.

मनुष्याला या जगांत ' येची देहीं येची डोळां ' जर मोक्ष मिळतो तर याच देहांत व्यावहारिक उत्कर्ष कां मिळूं नये ? पूर्वी अनुलोमप्रतिलोम विवाह होत होते. त्यामुळें समाजांत प्रसरणशीलता होती. 'पायींची वहाण पायीं बरी', ज्यानें त्यानें जन्मल्या ठिकाणीं राहावें हें तत्त्वज्ञान चुकीचें आहे. आजच्या कालांत प्रत्येकाला याच जन्मीं समान संधि मिळावी, समाजांत जें महनीय, उच्च, मानाचें व ऐश्वर्याचें स्थान असेल तें कोणत्याही हिंदूला विद्वत्ता, कर्तृत्व व योग्यता दाखवून मिळालें पाहिजे. त्याला धर्माची नि समाजाची आडकाठी नसावी.

जुना इतिहास हेंच सांगतो. " आपण कुणबट आहों, आपण शूद्र आहों, कशाला करा स्वराज्याची उठाठेव ? " या जुनाट विचारांत शिवाजीमहाराज सांपडले असते तर हिंदवी स्वराज्यसंस्थापना झाली असती काय ? कारण चंद्रोजीराव मोरे हे शिवाजी महाराजांना कुणबटच समजत होते. पैजार उचलणारा राणोजी शिंदे, मेंढ्या हाकणारा मल्हारराव होळकर, दर्भसमिधा घेऊन धर्मकर्म करणारा श्रीवर्धनकर भट हे जर जुन्या जन्मजात कल्पनेच्या चौकटींतच बसलेले राहाते तर त्यांच्याकडून हिंदवी स्वराज्याच्या कार्यांत जी महनीय कामगिरी झाली ती झाली असती काय ? संधि मिळतांच त्या कालांत अखिल हिंदूंतील सर्व लोक पुढें आले. शिदनाक महार हा सैन्यांतील सरनाईक झाला, श्रीवर्धनकर भटजी मुख्य प्रधान झाला, आणि शिंदे, होळकर, गायकवाड हे सेनापती झाले. आज तशी संधि मिळाल्यास अखिल हिंदु समाजांतून अनेक कर्तृत्ववान् माणसें पुढें येतील. हिंदुसमाजाच्या खोल तिजोरीमध्यें पुष्कळ गुप्त आणि सुप्त असें धन आहे. ही तिजोरी जरा खालवर हालविल्यास हें धन हिंदु-

समाजाला मिळणार आहे. त्यामुळें हिंदुधर्म, हिंदुसमाज व हिंदुराष्ट्र यांच्या उत्कर्षाला साह्य होईल हें काय सांगावयास पाहिजे ?

आज जगामध्यें निरनिराळ्या समाजांतील व्यक्तींना पुढें येण्यास समानसंधि मिळते म्हणून तीं राष्ट्रें उदयाला आलेलीं आहेत. जी. आय. पी. रेल्वेच्या मेल व एक्सप्रेस गाड्यांत बसलें म्हणजे जसें या टोंकापासून त्या टोंकापर्यंत जातां येतें तशी प्रसरणशीलता जगांतील समाजांत आहे. ती असल्यामुळेंच एका कल्हईवाल्याचा मुलगा * 'पिलग्रिम्स प्रोग्रेसचा' कर्ता झाला; कोष्टयाचा मुलगा कोलंबस यानें अमेरिका खंड शोधून काढलें; कलालाचा मुलगा जो क्रॉमवेल त्यानें इंग्लंडांत राज्यक्रांति केली; खाटकाचा मुलगा डेफो, शिकलगाराचा मुलगा डेमॉस्थेनिस, शेतकऱ्याचा मुलगा होमर, विणकऱ्याचा मुलगा शेक्सपिअर, पाथरवटाचा मुलगा साक्रेटीस इत्यादिकांनीं संधि मिळतांच कर्तृत्व दाखवून राष्ट्रीय उन्नतीस साह्य केलें हें सर्वश्रुत आहे. भारतीय वीर कर्णानेंही एका प्रसंगीं '**दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषम्**' असेंच उत्तर दिलेलें आहे.

**(१७३) अस्पृश्यांचा उत्कर्षः**–उत्क्रान्तिवादाप्रमाणें जडसृष्टींत सुद्धां बदल होतो. मग शिक्षण, संस्कृति व सभ्यता यांच्यामुळें माणसामध्यें बदल होत नाहीं हें म्हणणें तर्कदुष्ट नाहीं काय ? जुन्या स्मृतिग्रंथाधारें अकराव्या प्रकरणांत असें दाखविलें आहे कीं मूळ त्रैवर्णिक समाज होता, पुढें शूद्राची हळूहळू उन्नति करून त्याला चातुर्वर्ण्यांत स्थान मिळालें. त्याच धोरणानें आज पूर्वास्पृश्यांची अस्पृश्यता नष्ट करणें योग्य आहे. आज अस्पृश्यांमध्येंही शिक्षणाचा प्रसार होत आहे, राहणी सुधारत आहे, धंद्यामध्येंही यांत्रिक युगामुळें सुधारणा होत आहे, घाणेरड्या चाली सुटत आहेत म्हणून त्यांना स्पृश्यांचे सर्व अधिकार मिळणें युक्त आहे.

**(१७४) त्यांचें उज्ज्वल हिंदुत्वः**–**वर्णोत्कर्षमवाप्नोति नरः पुण्येन कर्मणा ।**– महाभारत. मनुष्याला चांगल्या कर्मामुळें, चांगल्याच्या सहवासामुळें याच जन्मीं उत्कर्ष करून घेतां येतो. पूर्वास्पृश्य हे आर्यसहवासांत

* हीं नांवें प्राध्यापक श्री. म. माटे, एम्. ए. यांच्या "अस्पृश्यांचा प्रश्न" या ग्रंथांतील आहेत. वाचकांनीं तो ग्रंथ अवश्य वाचावा.

गेलीं दोन हजार वर्षे आहेत, आर्यसहवासामुळें त्यांनीं सर्वस्वीं आर्यसंस्कृति स्वीकारिली आहे, त्यांनीं हालअपेष्टा, अपमान व तिरस्कार अशा परिस्थितींतही हिंदुत्वाचा नंदादीप तेवत ठेवला आहे, म्हणून त्यांना स्पृश्य हिंदूंप्रमाणें बरोबरीचे समजणें योग्य होणार आहे. पूर्वास्पृश्यांनीं हिंदुधर्म, हिंदुसंस्कृति व हिंदुराष्ट्र यांच्या विकासाकरितां व रक्षणाकरितां इतिहासकालापासून आजवर रक्त सांडलें आहे व महनीय त्यागही केला आहे हें ध्यानीं घेऊन त्यांना तीर्थामध्यें स्नान व मंदिरांत देवदर्शनही करूं द्यावें.

हिंदूंची संख्या घटत आहे म्हणून, अहिंदूंचीं आक्रमणें त्या वर्गांवर होत आहेत म्हणून, लोकशाहीच्या स्वराज्यास त्यांचें साह्य व्हावें म्हणून, माणुसकीची वागणूक दिली पाहिजे म्हणून, हिंदुतत्त्वज्ञानाचा उच्च सिद्धांत पाळला पाहिजे म्हणून आणि सर्व दृष्टींनीं अत्यावश्यक म्हणून या अस्पृश्यवर्गांचा उत्कर्ष–जात्युत्कर्ष–करणें भाग आहे. निकृष्टाला उत्कृष्ट करण्याचा जो आर्यसंस्कृतीचा स्वभाव, त्याशीं हें कृत्य अत्यंत सुसंगतच आहे.

(१७५) **मॅंडेल व आनुवंशिकताः**–कांहीं जुन्या विचाराचे ग्रंथकार नवीन शास्त्रांचे आधार देऊन, वडाची साल पिंपळाला लावून हिंदुस्थानांतील जातिभेदाचें आनुवंशाच्या दृष्टीनें समर्थन करतात. जीवनशास्त्र, सुप्रजाजननशास्त्र यांचे आधार तोंडीं लावायला घेऊन प्रत्येक मुख्य व पोटजातींतील श्रेष्ठ गुणांची जोपासना होत असेल तर हिंदुसमाजांतील चार हजारच काय, पण चाळीस हजार जाति झाल्या तरी चालतील असेंही ते बेधडकपणें म्हणत असतात! पण ही निव्वळ धूळफेक आहे. आनुवंशिक पद्धतीनें जातिजातींतच काय पण कुलाकुलांमध्येंही श्रेष्ठकनिष्ठपणा असूं शकतो, असें मत प्रथम गॉल्टन यानें मांडलें. यानें गणितागत पद्धतीनें आंकडे मांडून कित्येक पिढ्या तपासून आठ पिढ्यांपासूनचे गुणदोष संततीमध्यें उतरतात असें सिद्ध केलें. युरोपखंडभर या सिद्धांताची कांहीं दिवस चहा झाली. पण पुढें मॅन्डेलनें वाटाण्यावर विविध प्रयोग करून आनुवंशिक प्रक्रियेचे नियम असिद्ध ठरविले. कुलाचा श्रेष्ठ व कनिष्ठपणा आनुवंशिक असतो हें ठरविण्यास संख्यापद्धति स्वीकारणें चुकीचें आहे असें त्यानें ठरविलें. तेव्हांपासून मॅन्डेलची पद्धतीच सर्वमान्य झालेली आहे. या पद्धतीवरून

कोणत्याही कुलाचा व जातीचा जन्मजात श्रेष्ठकनिष्ठपणा सिद्ध होत नाहीं. सर्व माणसें सारख्याच शक्तिबुद्धीचीं आहेत, असें कोणीच मानत नाहीं. आनुवंशिक संस्कारांना कांहीं मर्यादेपर्यंत महत्त्व आहे. मानवानें पिंडगत अनुवंशाच्या जोडीला सांस्कृतिक अनुवंश निर्माण केलेला आहे व त्याच्या जोरावर त्यानें निसर्गावर विजय मिळविलेला आहे. शिक्षण, संस्कार, आर्थिक व सामाजिक परिस्थिति या साधनांनीं दुर्गुणांची पीछेहाट होऊन सद्गुण येत असतात. नेचरप्रमाणें नर्चरला महत्त्व आहे. म्हणजे दैवापेक्षां उद्योगाचीच मातब्बरी अधिक आहे. वास्तव जन्मजात श्रेष्ठपणा किंवा जन्मजात अस्पृश्यता यांचें समर्थन होऊंच शकत नाहीं. एखाद्याला कनिष्ठ ठरवावयाचें, त्यानें पुढें येऊं नये म्हणून नियम करावयाचे व तुझ्यांत कर्तृत्ववान् माणसेंच नाहींत, असें म्हणून त्याची हेटाळणी करावयाची; हा प्रकार जेत्यांनीं आजवर जितांच्या बाबतींत नेहमींच केलेला आहे. हिंदुस्थानांतील लष्करी अधिकारी असल्या आंकड्याचें भारूड पुढें ठेवूनच हिंदूंमध्यें लढाऊ गुण कमी आहेत, असें वाग्जाल पसरीत असतात. तें जसें वस्तुस्थितीविरुद्ध आहे, तद्वतच आनुवंशिक संस्काराच्या नांवाखालीं व श्रेष्ठ गुणांच्या जोपासनेच्या मिषानें विद्यमान जातिभेदाचें समर्थन करणें अश्लाघ्य आहे.

(१७६) **इतर लंगडीं कारणें**:—जातिसंस्थेची तरफदारी करतांना संस्कृतीचें चिरंजीवित्व, सुप्रजोत्पादन, लोकसंख्येचें नियमन, अन्नाची यथाधिकार वांटणी, जीवनार्थ कलहाचें नियंत्रण, कामादि विकारांचे समाजावर अनिष्ट परिणाम न होऊं देण्याची शक्यता, स्त्रीपुरुषांचें सुखदुःख, सांसर्गिक विकारास प्रतिबंध इत्यादि विविध कारणें देण्यांत येतात. हीं सर्व कारणें अंशतः खरीं आहेत असें धरलें तरी आज प्रत्येक व्यक्तीला जातिनिरपेक्ष, पंथनिरपेक्ष, समानसंधी मिळाली पाहिजे. ज्यांच्या ठिकाणीं बुद्धि व कर्तृत्व असेल, त्यांची कुचंबणा होतां कामा नये.

(१७७) **पोटजातिसंघांचें चुकीचें समर्थन**:—हिंदुसमाजांतील मुख्यजाति व पोटजाति यांच्या समर्थनाचा हा एक प्रकार झाला. दुसरा एक प्रकार आर्थिक दृष्ट्या सांगण्यांत येत असतो. प्रत्येक जातीनें आपापल्या जातींतील बेकारांना उद्योग मिळावे, विद्यार्थ्यांना शिक्षण मिळावें, आणि अनाथ व निराश्रित यांना साह्य व्हावें याकरितां आपापले संघ

स्थापन करण्यास प्रारंभ केला आहे. अखिल हिंदुसमाजाच्या संघटनेच्या दृष्टीनें प्रत्येक पोटजातीचे संघ निघणें ही विघटनाची मुहूर्तमेढ होय ! आधींच हिंदुसमाजांत आपल्यापुरतेंच पाहण्याची प्रवृत्ति आहे. प्रत्येक जात जर स्वतःपुरतीच पाहूं लागेल तर या मुंबई इलाख्यामध्यें* सर्व जातींचे मिळून जवळ जवळ चारशे साडेचारशे संघ होतील. आणि हें एवढ्यावरच थांबेल असें नाहीं. म्हणून आज अखिल हिंदूंनीं समस्त हिंदु आपण एक आहों या भावनेनें एक होणें अवश्य आहे. निदान तें ध्येय डोळ्यापुढें ठेवून मुख्य जातींतील सर्व पोटजाती एक करून समस्त महाराष्ट्रिय ब्राह्मण, समस्त महाराष्ट्रिय मराठे, समस्त महाराष्ट्रिय महार अशा नांवानें एक झालें पाहिजे. पोटजाति व त्यांचे संघ मोडून मुख्य जातींत जर ते समाविष्ट झाले तर जातींची संख्या कमी होऊन हिंदुसमाजाचें बल वाढेल.

पोटजातिसंघांमुळें ब्राह्मणाब्राह्मणांत विघटना अधिक वाढते आणि सर्व ब्राह्मण एक असतांना विनाकारण दुजाभाव उत्पन्न होतो. दशविध ब्राह्मणांचें दुःख एकच आहे, आर्थिक हितसंबंध एकच आहेत, सामाजिक अडचणीही एकच असतांना या निरनिराळ्या जातीय संस्थांमुळें काय अधिक साधतें हेंच समजत नाहीं. पोटजातींचे संघ काढून, फंड उभारून विद्यार्थ्यांना मदत करतां येते. पण हे शिष्यवृत्त्या घेणारे विद्यार्थी पुढें हाच भेदभाव वाढवितात. हिंदुसमाजाचा घटक म्हणून दशविध महाराष्ट्रिय ब्राह्मणांचा एखादा संघ स्थापन करणें याला कांहीं अर्थ आहे. समस्त ब्राह्मणांचा एक संघ झाल्यास सर्वांचा मिळून चांगला निधि उभारला जाईल. त्याचा उपयोग बेकारीच्या निवारणाकडे होईल. हुषार विद्यार्थ्यांना विमानविद्या, नौकानयनशास्त्र, सैनिकशास्त्र, संशोधन, वरिष्ठ नोकऱ्या अशांचें शिक्षण घेण्याकरितां द्रव्यसाह्य करतां येईल. तसेंच आजच्या राष्ट्रिय जीवनाला उपकारक अशा ज्या शिक्षणाच्या अनेक शाखा आहेत त्या सर्व शाखांत बुद्धिमान् तरुण पेरले जाण्यास या निधीचें साह्य होईल.

समस्त दशविध ब्राह्मण एक ही कल्पना समाजांत मुरल्यास विवाहाचें क्षेत्र व्यापक होईल, त्यामुळें लग्नाची अडचण पुष्कळ कमी होईल. यास्तव

---

* पोटजातींच्या संख्येकरितां प्रकरण १९ पाहा.

दशविध ब्राह्मणांनीं आपल्यांतील हे पोटजातिभेद व संघ लौकर एक करावेत. कांहीं व्यक्तींना पुढें येण्यास हे असले संघ ठेवणें सोयीचें असतें. निवडणुकीचे वेळीं हे संघ हाताशीं धरितां येतात! हिंदुसमाजांतील प्रत्येक पोटजात स्वतःला उच्च व अन्य जातीला कमी लेखीतच आहे, या संघांमुळें तेंच पातक वाढण्याचा संभव आहे!

(१७८) **पोटजातिसंघांचे दुष्परिणामः**—या पोटजातिसंघांची जर ही साथ आर्थिक निमित्तानें अशीच वाढली तर श्रीशिवाजी महाराज हे मराठा जातींत उत्पन्न झाले, श्रीसमर्थरामदास ऋग्वेदी देशस्थांत उत्पन्न झाले, संग्रामदेवता लक्ष्मीबाई यांचा जन्म कऱ्हाडे जातींत झाला, योगीश्वर याज्ञवल्क्य हे युजुर्वेदी कुलांत उत्पन्न झाले, या संकुचित वृत्तीनें समस्त हिंदूंचीं हीं अभिमानस्थानें जातवारीवर वाटलीं जातील! संकुचितपणा एकदां आला कीं त्याला सीमाच नसते. तो कोणत्या थरावर जाईल याचा नेम नसतो. यास्तव अनुवंश व अर्थ या दोन्ही दृष्टीनें या जातिसंस्थेचें आणि पोटजातीसंघांचें समर्थन करणें सर्वथैव अयुक्त होय.

—*—

# प्रकरण चौदावें

## व्यवसाय

(१७९) **परिस्थिति व व्यवसायः**—समाजधारणा, समाजप्रभव व समाजाचा अभ्युदय हें हिंदुधर्मांचें ध्येय आहे. यास्तव हिंदुसमाजाच्या धारणपोषणार्थ विविध प्रकारचे व्यवसाय हिंदुसमाजानें केले पाहिजेत. समाजाच्या जशा अवस्था असतात तसे व्यवसाय पालटतात. कृषिपूर्वकालीन समाज, कृषिकालीन समाज, यंत्रकालीन समाज यांमध्यें गरजेप्रमाणें व्यवसाय उत्पन्न होतात. आजचा हिंदुसमाज या नव्या युगांत व नव्या कालांत असल्यामुळें नव्या परिस्थितींत उत्पन्न झालेले, नव्या परिस्थितील

आवश्यक असलेले असे सर्व व्यवसाय हिंदुसमाजानें हस्तगत केले पाहिजेत, असें नवा धर्म सांगतो.

(१८०) **ब्राह्मण व अध्यापनः**–जुन्या हिंदुधर्मांत एका काळीं वर्णव्यवस्था होती. त्यावेळीं चार वर्णांनीं आपापल्या प्रवृत्तीला अनुरूप असे कोणते व्यवसाय करावेत, ह्यासंबंधाचे नियम घालून दिलेले होते. उद्योगासंबंधाची व्यवस्था कोणत्याही कालांत फार थोडा काल टिकते, कारण परिस्थिति पालटत असते. ब्राह्मणांनीं अध्यापन, याजन व प्रतिग्रह यांवर निर्वाह करावा असें जुना हिंदुधर्म सांगतो. परंतु त्याच वेळीं अध्यापनावर जगूं नये असें म्हणणारेही लोक होते.

**गृहीत्वा वेतनं वेदं योऽध्यापयति मूढधीः ।**
**अधीते यो हि वा दत्त्वा तावुभौ पापिनौ स्मृतौ ॥**

—सौरपुराण १०, ४२

याचाच अनुवाद कालिदासानें पुढें मालविकाग्निमित्रांत केला आहे—

**‘यस्यागमः केवलजीविकायै तं ज्ञानपण्यं वणिजं वदंति।’**

—मा. वि. १, १७

ज्यानें केवळ पोटासाठींच विद्याध्ययन केलें, त्याला ज्ञान विकणारा वाणी म्हणावें. यज्ञ हा केव्हां तरी व्हावयाचा व जेव्हां होईल त्यावेळीं ब्राह्मणाला दक्षणा मिळावयाची. प्रतिग्रह म्हणजे दान मिळणें हें इतरांच्या औदार्यावर अवलंबून असे. त्यामुळें त्या काळींसुद्धां सर्व ब्राह्मणांचा निर्वाह केवळ या तीन उद्योगांवर होत असेल असें दिसत नाहीं.

विद्यार्थ्याला परिपूर्ण विद्या शिकवावी व दक्षिणा मागावी अशी पद्धत प्राचीन काळीं होती. सर्वसामान्य ब्राह्मण विद्यार्थी गुरुदक्षणा ती काय देणार? श्रीमान् राजपुत्र नि वैश्यपुत्र असे विद्यार्थी आले तरच चांगली गुरुदक्षणा व अग्रहारादि दान मिळण्याचा संभव होता; परंतु असे प्रसंग क्वचितच येत. गुरुदक्षणेकरितां कौत्स हा शिष्य निष्कांचन रघुराजाकडे गेला. त्यानें कुबेरावर स्वारी करण्याचें ठरविलें. इतक्यांत कुबेरानें रघूचें कोशागार सुवर्णानें भरून टाकलें व तें रघुराजानें कौत्साला दिलें, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. महाभारतांतील धौम्य ऋषीच्या उत्तंक नामक

शिष्याची गोष्ट या तऱ्हेचीच आहे. असले अपवाद सोडल्यास तत्कालीन ब्राह्मणसमाज इतर अनेक व्यवसाय करून जगत होता, हें उघड दिसतें.

**(१८१) ब्राह्मण व कृषिः**—आपत्कालीं वरच्या वर्णानें खालच्या वर्णाची वृत्ति स्वीकारावी 'आपदि अनंतरा वृत्तिः'। (विष्णु. २-१५) असें विष्णुधर्मसूत्र सांगतें. मनूही हेंच म्हणतो—

**अजीवंस्तु यथोक्तेन ब्राह्मणः स्वेन कर्मणा ।**
**जीवेत्क्षत्रियधर्मेण स ह्यस्य प्रत्यनन्तरः ॥८१॥**
**उभाभ्यामप्यजीवंस्तु कथं स्यादिति चेद्भवेत् ।**
**कृषिगोरक्ष्यमास्थाय जीवेद्वैश्यस्य जीविकाम् ॥८२॥** मनु अ. १०

भावार्थः—ब्राह्मणाला यथोक्त कर्मानें जगतां न आलें तर त्यानें प्रथम क्षात्रकर्म करून पोट भरावें, व तें न जमलें तर कृषिगोरक्ष्यादि वैश्यकर्म करून जगावें.

या अनुज्ञेवरून परिस्थितीमुळें अपवाद वाढत चालले होते व अनेक व्यवसायांत ब्राह्मण पडूं लागले होते असें दिसतें. परिस्थितीचें दडपण जसजसें आलें तसतसे स्मृतिकारांनीं आपले नियम सैल केले. ब्राह्मणानें कृषि करावी असें आपस्तंब व गौतम म्हणत नाहींत. पण बौधायन म्हणतो—

'**प्राक् प्रातराशात् कर्षी स्यात्**' —बौधायन प्र. २ अ. २ श्लो. ८२ न्याहारीच्या वेळेपर्यंत शेती करावी. कदाचित् त्या कालीं तेवढ्यावर निर्वाह होत असावा. पण पुढें कृषींत जसा अधिक वेळ जाऊं लागला, तसा वेदाध्ययनाला अडथळा झाला. म्हणून तो म्हणतो, शेती व वेदाध्ययन हें एखाद्या समर्थ ब्राह्मणालाच शक्य आहे. अशक्तानें कृषीचा नाद सोडून द्यावा हें बरें.

**वेदः कृषिविनाशाय कृषिर्वेदविनाशिनी ।**
**शक्तिमान् उभयं कुर्यात् अशक्तस्तु कृषिं त्यजेत् ॥१०७॥**

—बौधायन प्र. १ अ. ५

बौधायनापेक्षां वसिष्ठधर्मसूत्रकालीं परिस्थिति निराळी होती. म्हणून ज्यांच्या नाकांत वेसणी आहेत, अशा खोंडांना नांगराला जोडून शेती

करावी, असें तो म्हणतो व नांगर, वेसण आणि इतर कृषिविषय सांगतो त्यावरून त्या कालीं ब्राह्मण नांगरगट्टे होऊं लागले असें दिसतें.

तस्मात् सांडाभ्यां सनस्योताभ्याम्
पाक् प्रातराशात् कर्षी स्यात् ॥ —वसिष्ठ अ. २

(१८२) **पराशर व कृषिः**—मनु हिंसा होईल म्हणून कृषीचा निषेध करतो. याज्ञवल्क्यानें मनूचाच अनुवाद केला आहे. पण पुढें पराशरानें अहिंसेचें भय न बाळगतां षट्कर्मनिरत ब्राह्मणानें यत्नपूर्वक शेती करवावी, स्वतः करावी; क्षुधित, तृषित, श्रांत अशा बैलांना नांगराला जुंपूं नये, व्याधित, हीनांग व व्यथित असे बैल वर्ज्य करून, निरोगी व बलिष्ठ असे बैल नांगराला जुंपून शेती करावी व दुपारीं घरीं आल्यावर पंच-महायज्ञही करावेत, असें म्हटलें आहे. (पराशर स्मृ. अ. २ श्लो. २–४)

पराशरानंतर अनेक स्मृतिकारांनीं कृषि हा सर्व वर्णांचा सर्वसामान्य व्यवसाय असें मान्य केलें आहे. कृषि, पैसे घेऊन शिकविणें व पशुपालन हे व्यवसाय वृद्धहारितकालीं सर्वमान्य झालेले होते.

कृषिस्तु सर्व वर्णानां सामान्यो धर्म उच्यते ॥१७९॥
कृषिर्भृतिः पाशुपाल्यं सर्वेषां न निषिध्यते ॥१८२॥
—वृद्धहारित अ. ७

(१८३) **ब्राह्मण व वाणिज्यः**— परिस्थितिप्राप्त कृषिकर्मांची अनुज्ञा स्मृतिकारांनीं कशी वळणावळणानें दिली हें वर दाखविलें. आतां वैश्यवृत्तींतही ब्राह्मण कसा पडला हें पाहाण्याजोगें आहे. आपस्तंब, गौतम, बौधायन, वसिष्ठ इत्यादि धर्मसूत्रकारांनीं अविक्रेय पदार्थांची जी यादी दिली आहे, ती फारच मोठी आहे. त्या यादींतील पदार्थ वर्ज्य करून बाकीच्या वस्तूंचा व्यापार करून ब्राह्मण त्या कालीं तरी कसे जगत, हा प्रश्नच आहे.

वैश्यवृत्ति करणाऱ्या ब्राह्मणानें रत्नें, पाषाण, मोतीं, दगड, रेशमी व लोकरीचीं वस्त्रें, अजिनें, सूत, रंगविलेलें वस्त्र, अन्न, फराळाचे पदार्थ, सुगंधी पदार्थ, पाणी, औषधी, दुधाचे अनेक विकार, त्यापासून झालेलीं पक्वान्नें, लाख, शिसें, सरस, मिरें, ग्राम्य पशु, दाढांचे पशु, आरण्यपशु,

हिंस्र पशु, एकखुरी, द्विखुरी पशु, पक्षी, तीळतांदुळादि धान्यें इत्यादि विकूं नयेत, कारण त्यामुळें तो पतित होतो असें धर्मशास्त्र म्हणतें.

'त्र्यहेण शूद्रो भवति ब्राह्मणः क्षीरविक्रयात्' ॥३१॥

—वसिष्ठ अ. २

दूध विकल्यानें ब्राह्मण तीन दिवसांत शूद्र होतो, अशा या स्थितींत ब्राह्मणांनीं व्यापारांत किती डोकें वर काढलें असेल याची कल्पनाच करावी. चार पैसे चुकून मिळाले व ब्राह्मण व्याजबट्टा करूं लागला तर ब्रह्महत्त्येपेक्षां व्याजबट्टयाचें पातक मोठें असें म्हटलें आहे.

ब्रह्महत्त्यां च वृद्धिं च तुलया समतोलयत् ।
अतिष्ठद्भ्रूणहा कोट्यां वार्धुषिः समकम्पत ॥—वसिष्ठ २।४६

व्यापारांतील हे विधिनिषेध त्या काळींसुद्धां मुळींच पाळले जात नव्हते. अनेक ब्राह्मणांनीं या नियमांचें उल्लंघन केलेलें होतें. श्राद्धाला अभोज्य म्हणून जीं ब्राह्मणांचीं नांवें सूत्रांमध्यें व स्मृतींमध्यें दिलीं आहेत, त्यांवरून अनेक निषिद्ध धंदे ब्राह्मण करीत होते यांत शंका नाहीं.

'कुसीदवणिक्–शिल्पोपजीवि–ज्या–वादित्रतालनृत्यगीतशीलान्'

यांत अनेक व्यवसाय उल्लेखिलेले आहेत. शील, शब्दावरून ते प्रसंगोपात्त नसून नित्याचे होते हें उघड दिसतें.

**(१८४) शूद्राचे उच्च व्यवसायः**—आपत्कालीं म्हणा किंवा परिस्थिति म्हणून म्हणा, वरचे वर्ण खालचे व्यवसाय करीत होते. तर त्याउलट खालचा जो शूद्रवर्ण तो त्याच वेळीं वर चढत होता, असेंही दिसतें. शूद्रानें द्विजातिशुश्रूषा करावी, असें सर्व स्मृतिकारांनीं म्हटलें आहे. पण प्रत्येकाला हें कसें शक्य आहे ? म्हणून मनु म्हणतो—

अशक्नुवंस्तु शुश्रूषां शूद्रः कर्तुं द्विजन्मनाम् ।
पुत्रदारात्ययं प्राप्तो जीवेत्कारुककर्मभिः ॥९९॥ —मनु. अ. १०

द्विजशुश्रूषा करतां न येईल तर शूद्रानें कुटुंबपोषणार्थ अनेक शिल्पव्यवसाय करून जगावें. याज्ञवल्क्यानें शूद्राला शिल्पाशिवाय वाणिज्य करण्याचीही परवानगी दिली.

शूद्रस्य द्विजशुश्रूषा तयाऽजीवन्वणिग् भवेत् ।
शिल्पैर्वा विविधैर्जीवेद् द्विजातिहितमाचरन् ॥१२०॥
—याज्ञवल्क्य अ. १

याचें कारण शूद्रवर्ग त्यावेळीं अनेक वरच्या व्यावसायांमध्यें पडूं लागला असावा. देवलानें शूद्राला जवळ जवळ सर्व तऱ्हेचा व्यापार व शिल्पकर्में करण्याची मुभा दिलेली आहे.

' कर्षण–पशुपालन–भारोद्वहन–पण्यव्यवहार–चित्रकर्म–नृत्य-गीत-वेणुवीणामुरजमृदंगवादनादीनि '

**(१८५) युगानुरूप व्यवसायः**—व्यवसायामध्यें प्राचीन कालींसुद्धां कसा बदल होत गेला होता व तो कसा अपरिहार्य आहे याची कल्पना येथवर दिली. जीवनाचा प्रश्न कठिण असतो, व सर्व कालीं परिस्थिति एक नसते. म्हणून प्रजापतिसारख्या स्मृतिकाराला त्या त्या कालांत जे जे व्यवसाय सर्व लोक करीत होते त्यांना युगधर्म म्हणून मान्यता द्यावी लागली.

युगधर्मेण वर्णानां धनं ग्राह्यं द्विजातिभिः ॥५२॥ —प्रजापति.

त्या त्या कालांत अवश्य मानल्या गेलेल्या कोणत्याहीं धंद्यानें धन मिळवावें. युगधर्मानुरूप आपल्या स्वभावास साजेसा, समाजाला ज्याची गरज आहे असा कोणताही धंदा करून द्रव्य मिळवावें हें योग्य आहे. परिस्थितीप्रमाणें समाजाच्या गरजा वाढतात, व्याप वाढतो म्हणून आजच्या कालांत युगधर्मानुरूप सर्व तऱ्हेचे व्यवसाय करून हिंदुसमाजानें द्रव्य मिळवावें. पूर्वीचें चार वर्णांचें वर्गीकरण हें आतां उपयोगी नाहीं. प्रत्येक माणसामध्यें बुद्धि, पराक्रम, वाणिज्य व सेवा या वृत्ति यावयास पाहिजेत. अर्थात् प्रत्येक व्यक्ति चातुर्वर्ण्ययुक्त झाली पाहिजे.

धर्मशास्त्रामध्यें चार वर्णांचे सामान्यत्वानें व्यवसाय सांगितले असले तरी आपत्कालीं सर्वांनीं जें जमेल तें करावें असेंच सामान्यतः धोरण दिसतें. हें पुढील वचनांवरून ध्यानीं येईल:—

विद्या शिल्पं भृतिः सेवा गोरक्ष्यं विपणिः कृषिः ।
धृतिर्भैक्ष्यं कुसीदं च दशजीवनहेतवः ॥ मनु १०–११६

कृषिः शिल्पं भृतिर्विद्या कुसीदं शकटं गिरिः ।
सेवानूपं नृपो भैक्षमापत्तौ जीवनानि तु ॥ —याज्ञवल्क्य ३–४२
बह्वो वर्तनोपाया ऋषिभिः परिकीर्तिताः ।
सर्वेषामपि चैतेषां कुसीदमधिकं विदुः ।
अनावृष्ट्या राजभयाद् मूषिकाद्यैरुपद्रवैः ।
कृष्यादिके भवेद्धानिः कुसीदे सा न विद्यते ॥ बृहस्पति गृह. ८.
शिल्पाजीवं भृतिं चैव शूद्राणां व्यदधात्प्रभुः । वायुपुराण ८,१७१,
वाणिज्यं पशुपाल्यंच तथा शिल्पोपजीवनम् ।
शूद्रस्यापि विधीयन्ते यदा वृत्तिर्न जायते ॥ शान्तिपर्व २९५–४
शूद्रस्य द्विजशुश्रूषा सर्व शिल्पानि वाप्यथ ।
विक्रयः सर्वपण्यानां शूद्रकर्म उदाहृतम् ॥ उशनस्

**भावार्थः**—अध्यापन, शिल्प, निरोप पोचविणें, नोकरी करणें, व्यापार, शेती, गोरक्षण, अल्पसंतुष्टता, भिक्षा आणि व्याजबट्टा हे निर्वाहाचे दहा प्रकार आहेत. याज्ञवल्क्यानें गाडी ठेवून भाडें करणें, डोंगर खरेदी करून गवत व सरपण विकून त्यावर जगणें, राजाकडे जाऊन भिक्षा मागणें, जेथें खूप गवत व झाडें असतील अशा प्रदेशांत राहून जगणें असे मनूपेक्षां निराळे जीवनोपाय सांगितले आहेत. बृहस्पति तर म्हणतो अनेक उपायांपैकीं व्याजबट्ट्याचा उपाय चांगला; कारण अवर्षण, राजभय, उंदिरादिकांचा उपद्रव, असला त्रास जो शेतीमध्यें होतो, तो व्याजबट्ट्यांत होत नाहीं. शूद्रालासुद्धां शिल्प, वाणिज्य, पशुपालन, व्यापार हे सर्व धंदे करावयास सांगितले आहेत. केवळ द्विज–शुश्रूषाच त्याला सांगितली असें मुळींच नाहीं. ब्राह्मणालासुद्धां अध्यापन, याजन, प्रतिग्रहाशिवाय वैश्य व क्षात्रवृत्तिही करण्यास अनुज्ञा दिली आहे, हें पुढील गौतम, वसिष्ठ, वचनांवरून स्पष्ट होईलः—

प्राणसंशये ब्राह्मणोपि शस्त्रमाददीत ॥ गौतम ७–२५;
आत्मत्राणे वर्णसंवर्गे ब्राह्मण वैश्यौ शस्त्रमाददीयाताम् ।
वसिष्ठ ३–२४,

राज्ञो नियोगाद् योद्धव्यं ब्राह्मणेन विशेषतः ।
वर्तता क्षत्रधर्मेण ह्येवं धर्मविदो विदुः ॥ शल्यपर्व ६५–४२

यावरून चारी वर्णांतील वृत्ति प्रत्येक व्यक्तींत असल्या पाहिजेत हें उघड आहे.

(१८६) **अभ्युदय व व्यवसायः**—धर्म व अभ्युदय यांचा साक्षात् संबंध आहे. ऐहिक अभ्युदयाकरितां, राष्ट्रिय उत्कर्षाकरितां अनेक सत्ताक्षेत्रें, व्यवसाय व अर्थोत्पादक उद्योग हिंदुसमाजानें हस्तगत केले पाहिजेत. आज हिंदुराष्ट्राच्या उत्कर्षाकरितां सैनिक, नाविक, वैमानिक, शस्त्रास्त्रांचे कारखाने, धातूंच्या खाणी, इ. क्षेत्रांतील वरिष्ठ अधिकाराच्या जागा हिंदूंच्या हातीं आल्या पाहिजेत. व्हाइसरॉय, स्टेट सेक्रेटरी यांच्या सल्लागारांतही हिंदुत्वनिष्ठ हिंदु घुसले पाहिजेत. सर्व तऱ्हेचीं व्यवसायक्षेत्रें व आर्थिक क्षेत्रें हातीं आल्याविना अभ्युदयाला पूर्णता येत नाहीं. म्हणून धर्माला आणि अभ्युदयाला परिपूर्णता आणण्याकरितां राष्ट्रिय उन्नतीला पोषक व स्वतःच्या निर्वाहाला उपयुक्त असे सर्व व्यवसाय करण्यांत मुळींच अधर्म नाहीं. हिंदुसमाजांतील भ्रामक व भोळ्या समजुतीमुळें अभ्युदयवर्धक अनेक व्यवसाय सर्वस्वीं अहिंदूंनीं, विधर्मी आणि विदेशी अशा लोकांनीं व्यापलेले आहेत. हिंदुसमाजानें यापुढें धार्मिक व सामाजिक आडकाठी मनांत न आणतां अभ्युदयपोषक सर्व व्यवसायांकडे दृष्टि वळविली पाहिजे.

(१८७) **व्यवसायतंत्र शिकाः**—महाराष्ट्रांत महाराष्ट्रिय वैश्यवर्ग फार कमी आहे. सुशिक्षितांमध्यें वैश्यवृत्तीचे संस्कार नाहींत. दुसऱ्याचा अनुनय करून, त्याच्या पोटांत शिरून त्याचेकडून पैसे काढण्याची ही एक कला आहे. तिजकडे आजवर सुशिक्षितांनीं दुर्लक्ष्य केलेलें आहे. व्यापारांत सचोटी, चिकाटी, घसोटी, भांडवल, संघटना व कौशल्य यांची आवश्यकता आहे. महाराष्ट्रियांमध्यें मत्सर व अनुदारता हे दोष असल्यामुळें दोन महाराष्ट्रिय एकत्र आले कीं राजकीय तीन पक्ष काढून भांडत बसतात. पण अन्य लोक संभूयसमुत्थानानें (पातीच्या धंद्यानें) भांडवल उभारून मोठा उद्योग काढण्याच्या योजना करतात. व्यापारांत चिकाटी पाहिजे, थोडी घस सोसण्याची वृत्ति पाहिजे, आणि पातीदाराशीं अत्यंत सचोटीनें वागलें पाहिजे. व्यापार म्हणजे त्यांत

कांहींही करावें, इतरांबद्दल अनिष्ट ग्रह उत्पन्न करावा, कोणीकडून धंद्याचे निमित्तानें येणाऱ्या गिऱ्हाइकाला कायद्याच्या कचाटींत न सांपडतां काळ्या बाजारानें गंडवावें ! असा अनिष्ट समज झालेला दिसतो ! त्यामुळें व्यावसायिक क्षेत्रांत उत्कर्ष होण्यास अडचण पडते. कांहीं धंद्यांना धाडस, क्षात्रवृत्ति व थोडा भांडखोरपणाही लागतो. संघटना व भांडवल यांशिवाय कोणताच धंदा हल्लीं होऊं शकत नाहीं. म्हणून आज जगांत चालू असलेलें व्यापाराचें, कारखान्यांचें शास्त्र व तंत्र हस्तगत करून हिंदुसमाजानें मोठमोठे कारखाने, वखारी, पेढ्या काढून शास्त्रज्ञ व संशोधकवर्गाचें साह्य घेऊन जगांतील सर्व व्यावसायिकांवर मात केली पाहिजे.

**(१८८) अहिंदूंचें आक्रमणः**–सबंध हिंदुस्थानचें व्यापारीदृष्ट्या निरीक्षण केल्यास हिंदु राष्ट्रावर देशीविदेशी अहिंदु व्यापाऱ्यांचें आक्रमण होऊं लागलेलें आहे असें दिसतें. मलबार हा एक सोन्याचा तुकडा आहे. तेथील आवकजावक सर्व व्यापार पूर्वीं हिंदूंच्याच हातीं होता. गेल्या चार पांच वर्षांत आवक व्यापारांत अहिंदु घुसले आहेत. मद्रास भागांतही तीच स्थिति आहे. अहिंदु व्यापारी रंगून तांदळाच्या बोटीच्या बोटी भरून पूर्वपश्चिम किनाऱ्यावर पेरीत चालले आहेत. मद्रासेंतील बिड्यांचा सर्व व्यापार अहिंदूंच्या हातीं आहे. बंगाल, संयुक्तप्रांत, पंजाब, सिंध अशा सर्व प्रांतांत हीच स्थिति आहे. ही स्थिति ध्यानांत घेऊन हिंदूंनीं व्यापाराचें क्षेत्र हस्तगत केलें पाहिजे.

**(१८९) घरचे धंदे सुधाराः**—हिंदुसमाजांतील अनेक जातींमध्यें आज परंपरेनें अनेक धंदे चालू आहेत. त्या धंदेवाईकांनीं सांस्कृतिक शिक्षण अवश्य संपादावें; पण विशेषतः आपल्या व्यवसायांतील शिक्षण अधिक घेऊन तो कौशल्यानें करण्याचा यत्न करावा. आपापला धंदा अधिक कार्यक्षम करण्याकडे लक्ष द्यावें. आजच्या शिक्षणानें तरुणाला स्वतःच्या घरचा धंदा करणें कमीपणाचें वाटतें व त्यामुळें बेकारी वाढते. स्वतःच्या घरचा परंपरेनें आलेला धंदा अधिक कौशल्यानें करण्याची इच्छा तरुणांनीं धरल्यास तो उत्तम करतां येईल आणि बेकारी टळेल. उ. चांभार व ढोर यांतील शिक्षितांनीं कमाविलेल्या कातड्यांचे कारखाने काढून परदेशी व्यापाराला पायबंद घालावा. कुंभाराच्या शिक्षित मुलांनीं

मातीच्या भांड्यांचे कारखाने, सुशिक्षित रंगाऱ्यांनीं रंगाचे कारखाने, सुशिक्षित गौळ्यांनीं गोठलेलें दूध तयार करण्याचे कारखाने, फळेविक्यांनीं फळें–संरक्षणाचे कारखाने काढून त्या त्या क्षेत्रांतील परदेशी आयात बंद केली म्हणजे त्यामुळें हिंदुराष्ट्राचें आर्थिक हित होईल.

(१९०) **कोठें कोणतें क्षेत्र आहे?**:–पूर्वकालीं ज्यांची कल्पनाही नव्हती असे हजारो व्यवसाय आज उत्पन्न झालेले आहेत. त्यांतील कांहीं अशिक्षितांनीं व शिक्षितांनीं चालविलेले असून मोठ्या भांडवलांचे व्यवसाय विशेष शिक्षितांच्या आणि तज्ज्ञांच्या हातीं आहेत. त्या सर्वांची जंत्री येथें देणें अशक्य आहे. महाराष्ट्रांत आणि इतर प्रांतांतही फळांचे व्यापारी बहुतेक अहिंदूच दिसतात. अंड्यांचा अब्जावधी रुपयांचा व्यापार मुंबईसारख्या शहरांत व अन्यत्र अहिंदु दलालांकडून होतो. मच्छीमारीचा पूर्व पश्चिम समुद्रकिनाऱ्यावरील विशेष लाभाचा व्यवसाय अहिंदूंनींच बळकावला आहे. कलकत्ता शहरांत व अन्यत्र चामड्यांचा, मांसाचा व्यापार अहिंदूंच्याच हातीं आहे. बँड, ताशे इत्यादि वाद्यें वाजविण्याची मिरासच पुष्कळ ठिकाणीं अहिंदूंची झालेली आहे. अहिंदु वादक हिंदु मालकाच्या इच्छेविरुद्ध मिरवणुकींतील वाद्यें बंद करून नागरिकत्वाच्या जन्मसिद्ध हक्कावर गदा आणतात, हें सर्वश्रुत आहे. नाशिक, कल्याण, पूर्वखानदेश आणि इतरत्र दुधाचा धंदा अहिंदूंनींच बळकावलेला आहे. कित्येक शहरांत तर हिंदूंकडील चणेफुटाणेही मिळण्याची मारामार पडते. हें सर्व बारकाईनें ध्यानांत घेऊन हिंदु तरुणांनीं हीं सर्व क्षेत्रें आक्रमिलीं पाहिजेत.

(१९१) **धंद्यांत विटाळ नाहीं**:–खिळेमोळे, छत्र्या, टिनचीं उपकरणें, पटवेगारी, पिंजारी, कल्हईकाम या तऱ्हेच्या लहान लहान व्यवसायांतही कांहीं ठिकाणीं अहिंदूंची गर्दी दिसते. खिळ्यामोळ्याच्या दुकानाशीं चांभाराचा संबंध येतो म्हणून विटाळाच्या कल्पनेमुळें जर या धंद्यांत हिंदु पडत नसतील तर ती त्यांची चुकी आहे. **जो विटाळतो तो हिंदु नव्हे, असें नवा हिंदुधर्म सांगतो.** धंद्यामुळें सर्व तऱ्हेच्या लोकांशीं संबंध अवश्य येणारच. म्हणून दुकानांत बसल्यावर **कसलाच विटाळ** नसतो. गुजराथ, खानदेश, मध्यप्रांताचा पूर्वभाग, कर्नाटक इकडे हिंदु कल्हईवाले, पटवेगार,

पिंजारी यांना पुष्कळ वाव आहे. पंचवीस तीस रुपयांवर हे धंदे करतां येतात. दक्षिण महाराष्ट्रांत भीक मागणारे डवरी जसे कल्हईवाले झाले, तसे अनेक हिंदु भिक्षेकरी जर धंदेवाले होतील तर तें चांगलें होईल.

(१९२) **धोक्याची सूचनाः**– पानपट्टी व विडी, उदबत्ती, कापूर, नाडापुडी, सुगंधी सामान, फुलें, हारगजरे इ. विकणें, बांगड्या भरणें हे व्यवसाय पुष्कळसे हिंदु–स्त्रीवर्गाशीं संबद्ध आहेत. अहिंदु लोक या व्यवसायांच्या मिषानें हिंदु स्त्रियांशीं अतिप्रसंग करतात, प्रसंगीं स्त्रियांना पळवूनही नेण्याचा यत्न करतात असें नागपूर हिंदुसभेनें उघडकीस आणलें आहे. म्हणून हेही सर्व धंदे हिंदूंनीं केले पाहिजेत. हुबळी, गदग, बंगलोर, म्हैसूर भागांत आणि कांहीं ठिकाणीं टांग्यांचा धंदा सर्वस्वीं अहिंदूंच्या हातांत आहे. अहिंदु टांगेवाले, अहिंदु हमाल, अहिंदु फेरीवाले फार त्रासदायक असतात म्हणून हिंदूंनीं ते धंदे अधिक उत्तम करून दाखविणें उचित आहे.

(१९३) **स्मशानयात्रेचें साहित्यः**–हिंदूंमध्यें प्रेतें जाळण्याची पद्धति आहे. परंतु त्यानिमित्त लागणारें प्रेतयात्रेचें साहित्य विकणें, हिंदुलोक अशुभ समजतात. या अशुभ कल्पनेचा लाभ अहिंदु घेतात. पुष्कळ ठिकाणीं स्मशानांतील साहित्याचीं दुकानें व वखारी अहिंदूंच्याच हातीं आहेत. एक दोन सांथी आल्या म्हणजे हे स्मशानवासी लोक हिंदूंना जाळण्यास साहित्य पुरवून गब्बर होतात. यास्तव हिंदूंनीं स्मशानयात्रेचें साहित्य विकण्यांत अधर्म वा पाप नाहीं, असें समजून हिंदूंच्या अंत्यविधीला लागणाऱ्या साहित्याचीं दुकानें काढावीं. प्रेतसंस्कारास अवश्य तें साहित्य अशा हिंदु दुकानांतूनच घेणें, हें पावित्र्याच्या व भावनेच्या दृष्टीनें योग्य आहे. म्हणून अशा दुकानदारांना हलके समजूं नये. अंत्यविधि करणाऱ्या माणसास हिंदुसमाज अशुभ समजतो ! लग्न, मुंजी हे जसे संस्कार आहेत तसाच अंत्यविधीही संस्कार आहे. लग्नमुंजी चालविण्यास जसा पुरोहित लागतो, तसाच तो अंत्यविधीसही लागतो. म्हणून उत्तरक्रिया चालविणारा, बाराव्या व तेराव्यास भोजनास बसणारा भिक्षुक अशुभ न समजतां त्यालाही समाजानें मान दिला पाहिजे. कारण तो समाजाला उपयुक्त असाच धंदा करीत असतो.

(१९४) **दारूची मक्तेदारी**:–पिण्याच्या दारूची मक्तेदारी ही तर अहिंदूंची वतनदारी झालेली आहे. मद्यपान हें सर्व धर्मानें निषिद्ध ठरविलेलें आहे. तें आरोग्यदृष्ट्याही अहितकारक आहे. तथापि समाजाला तें एक मोठें व्यसन आहे. मद्यपान हें अत्यंत अनिष्ट असलें तरी अहिंदु जर ही मक्तेदारी लाटून तीवर गब्बर होणार तर हिंदूंनींसुद्धां त्या व्यवसायांत पडलेंच पाहिजे. अहिंदु लोक असे धंदे करून खूप पैसा मिळवितात व तो स्वसमाजाला बलिष्ठ करण्याकरितां देतात. हें लक्षांत घेऊन हिंदूंनींही ज्या ज्या धंद्यांत पैसा मिळेल ते ते धंदे करावेत आणि त्यावर मिळविलेल्या द्रव्याचा उपयोग हिंदु समाजाला समर्थ करण्याकडे करावा. हिंदुसमाजाशेजारीं अहिंदुसमाज आहेत त्यांना कोणत्याही धंद्याचा विधिनिषेध नाहीं. हिंदुसमाज मात्र विनाकारण पथ्याखालीं मरत आहे. खानदेशांत पूर्वी मद्रासेकडून तेल येत असे. कारण तेल काढण्याचा धंदा–त्यांत हत्या होते या समजुतीनें–निषिद्ध मानला जात होता ! खानदेशांत ज्यांनीं प्रथम तेलाचा धंदा सुरू केला, त्यांच्यावर बहिष्कारही घालण्यांत आला. पण पुढें त्या धंद्यावर चांगला पैसा मिळतो असें दिसतांच तो धंदा राजमान्य झाला व आज त्या धंद्यांत अनेक हिंदु पडलेले दिसतात.

(१९५) **व्यवसाय व समाजबंधुत्व**:–हिंदुराष्ट्राच्या अभ्युदयार्थ हिंदूंनीं जसे सर्व व्यवसाय हातीं घेतले पाहिजेत, तसेच समाजबंधुत्व व समष्टिधर्म या तत्त्वावर ते चालविले पाहिजेत. हिंदुसमाजांतील अडाण्यांना समाजबंधुत्वाची कल्पना नाहीं. शिक्षितांमध्यें अतिराष्ट्रियत्वाचें वारें शिरलेलें आहे. जुन्या वळणाच्या लोकांना विश्वबंधुत्वाची बाधा झालेली आहे. हे त्रिदोष वर्ज्य करून प्रत्येक हिंदु मनुष्यानें समाजबंधुत्वाचें तत्त्वज्ञान अंगीं बाणविलें पाहिजे.

(१९६) **अहिंदूंचा संबंध टाळा**:–प्रत्येक हिंदूनें ज्या ताटांत आपण जेवतों तें कोणीं केलें, जें अन्न मी खातों त्यांत अहिंदूचा हात आहे काय, माझ्या ताटाला कल्हई कोण लावतो, माझी बैठक कोणी तयार केली, मी ती कोणापासून विकत घेतली, माझ्या स्त्रियांच्या हातांत बांगड्या कोण भरतो, त्या कोठून येतात, मला जें दूध, फुलें, फळें, भाज्या, खाद्यपदार्थ लागतात ते कोणी उत्पन्न केले, ते मी

कोणापासून विकत घेतले, याचा विचार करून व समाजबंधुत्वाच्या नात्यानें अहिंदूंचा संबंध सर्वस्वीं टाळून सर्व व्यवहार हिंदूंशींच करण्याचा निश्चय केला पाहिजे. माझ्या घरच्या मंगल कार्यांत मी अहिंदूंचा बँड लावणार नाहीं, शोभेची दारू मीं अहिंदूंकडून घेणार नाहीं, मंगलकार्यांतील मंडप हिंदूकडूनच घालून घेईन, मोटार ड्रायव्हर, रक्षक, घरकाम करणारा वगैरे सर्व हिंदूच नेमीन, मी हिंदूकडूनच माल घेईन, हिंदूचेंच गिऱ्हाईक होईन, हिंदूलाच श्रीमंत करीन अशी वृत्ति प्रत्येक हिंदूनें ठेवली तरच निरनिराळ्या व्यवसायांतील हिंदूंना उत्तेजन मिळेल. स्वत: पोटभर जेवणें म्हणजे जसें इतरांना उपाशी ठेवणें नव्हे, स्वत:च्या मुलीचें लग्न करणें म्हणजे इतरांच्या मुली विधवा व्हाव्या अशी इच्छा करणें जसें नव्हे, तसेंच समाजबंधुत्वानें वागणें म्हणजे अहिंदूंचा द्वेष वा तिरस्कार करणें मुळींच नव्हे.

(१९७) **घरीं अहिंदु नोकर नको**:–पुष्कळ श्रीमंतांकडे, बड्या अंमलदारांकडे, सावकारांकडे, रावसाहेबांकडे, शिपाई, पहारेकरी, रखवालदार, तगाद्याचे गडी, पेढीवरील शिपाई यांमध्यें अहिंदूंचा भरणा अधिक आढळतो. हिंदुसमाजांत क्षात्रवृत्तीचे लोक नाहींत असें नाहीं. किंबहुना पुष्कळ आहेत. परंतु शेटसावकार, व्यापारी, इनामदार, जहागीरदार, संस्थानिक असे जे हिंदु आहेत त्यांच्यामध्यें समष्टिधर्म व स्वजनप्रेम नाहीं. त्यांनीं हा परधार्जिणेपणा व हें अतिराष्ट्रियत्व सोडून समाजबंधुत्व वाढवून वरील सर्व व्यवसाय हिंदूंनाच दिले पाहिजेत. मुलांना खेळविणें, घरचीं झाडलोट करणें, बाजारहाट करणें, लेकीसुनांना पोंचविणें नि आणणें असल्या कामांवर अहिंदूंना नेमणें फारच धोक्याचें आहे. घरगुती व्यवहारांत तर अहिंदूला स्थान नसावेंच, पण बाह्य व जागतिक व्यवहारामध्येंसुद्धां हिंदुत्वनिष्ठाच दाखविली पाहिजे.

(१९८) **पौरोहित्य**:–आज जोशी बिलानें पौरोहित्य गेलें. या धंद्यांत ना स्वाभिमान, ना अर्थप्राप्ति, ना मान अशी स्थिति आहे. म्हणून दिवसेंदिवस पुरोहितवर्ग घटत आहे. पण पुरोहितवर्गाची गरज यापुढें नाहीं असें नव्हे. अखिल हिंदूंमध्यें समानसंस्कृति उत्पन्न करण्याचें कार्य आज जोरानें चालू आहे व तें वाढणार आहे. म्हणून या धंद्यांत बहुश्रुत, चौकस,

पुरोगामी व व्यवहारज्ञ अशा लोकांनीं पडावें व एक जोडधंदा म्हणून पौरोहित्य करावें. पौरोहित्याची मक्तेदारी आतां ब्राह्मणाकडे राहाणार नाहीं. कोणाही तज्ज्ञ हिंदूनें या धंद्यांत पडावें. तज्ज्ञ म्हणूनच कोणाही हिंदु पुरोहिताला बोलवावें. दक्षिणा हें दान नव्हे, तो उपकार नव्हे, तर केलेल्या कामाची ती मजुरी आहे. प्रत्येक मनुष्य जसा काम करून मोबदला घेतो, तसाच दक्षिणा हा पुरोहिताचा मोबदला आहे. पुरोहितवर्ग स्वाभिमानानें व बाणेदारपणानें जर वागेल आणि आळस, अज्ञान, संकुचित वृत्ति व व्यवहारशून्यता हे दुर्गुण सोडील तर त्याची उपयुक्तता वाढेल, आणि त्या वर्गाची जी आज चेष्टा होत आहे तीही बंद पडेल.

**(१९९) व्यावसायिक कर्मयोगः—** कोणताही व्यवसाय करीत असतांना राष्ट्रिय कर्मयोगाची दृष्टि ठेवली पाहिजे. कोणताही व्यवसाय हा जगांत वाईट नाहीं. त्याच्या बुडाशीं असणारी जी वृत्ति तिजवरून माणसाची योग्यता ठरत असते. मन जितकें हलकें व असंस्कृत तितका तो व्यवसाय हलका ठरतो व मन जेवढें उदात्त तेवढा तो व्यवसाय उच्च होतो. दोषदृष्टीनें पाहिल्यास जगांतील कोणताही व्यवसाय सदोषच आहे.

**सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥४७॥** —गीता अ. १८

पैसा व चैन हें आयुष्याचें ध्येय नसून समाजसेवा व राष्ट्रोत्कर्ष हें आयुष्याचें ध्येय आहे, असें प्रत्येक हिंदूनें समजलें पाहिजे. पैशाकरितांच व्यवसाय करावयाचा असला तरी त्या द्वारानें स्वसमाजाची सेवा करून, लोकांच्या उपयोगीं पडून द्रव्य मिळवावयाचें हें ध्यानांत ठेवावें. कोणत्याही व्यवसायांत स्वाभिमान, कर्तव्यतत्परता, मनाचा मोठेपणा, प्रामाणिकपणा, दानत हे गुण अवश्य लागतात.

**(२००) व्यावसायिकांना संदेशः—** नवा हिंदुधर्म अखिल हिंदूंना सांगतो कीं हिंदुराष्ट्राच्या उत्कर्षाकरितां व धारणेकरितां वाटेल तो व्यवसाय करा, तो मनापासून करा, तो प्रामाणिकपणानें करा व संघटितपणें राष्ट्रोत्कर्षांत भर घाला. आपल्या आत्म्याचा अधःपात होईल असे वागूं नका. कोणताही व्यवसाय हौसेनें, उत्साहानें, दूरदर्शितेनें पुष्कळ लाभ व्हावा म्हणून करा. तो कौशल्यानें करा. शुद्धबुद्धीनें उत्तमांत उत्तम

व्यवसाय करण्याचा यत्न करा व प्रसंगीं जें बरें वाईट पुढें येईल त्यास तोंड देण्यास सिद्ध असा. प्रत्येक व्यवसाय समष्टिधर्म व राष्ट्रधर्म हे ध्यानीं घेऊन करा. अर्थप्राप्तीबरोबर राष्ट्राचा लौकिकही वाढावा, स्वतःची दानत, माणुसकीही वाढावी आणि उपजीविकाही व्हावी, हें सदैव मनीं बागवून जगतांतील सर्व व्यवसायक्षेत्रें आपल्या हातीं घ्या.

—*—

# प्रकरण पंधरावें

## शिवाशीव नि विटाळ

(२०१) **विटाळांचा अतिरेकः**—जुन्या हिंदुधर्मांत शिवाशीव नि विटाळ यांचें बंड फारच आहे. किंबहुना अनेक विटाळ मानणें हें हिंदुधर्माचें वैशिष्ट्य आहे, असें म्हटलें तरी चालेल! माणसामाणसांमध्यें जी जन्मजात उच्चनीचतेची कल्पना जुन्या हिंदुधर्मानें मान्य केली आहे तिच्यांतूनच अनेक विटाळांची उत्पत्ति झालेली आहे. हिंदुसमाजांतील पूर्वास्पृश्य वर्ग हा एकंदरींत कमी असतांनासुद्धां उगाच जी दुपटीतिपटीनें संख्या वाढविली जात आहे, त्याचें कारण विटाळांचा अतिरेक हेंच होय. बंगालमध्यें ज्यांचें पाणी चालतें अशांना 'जलाचरणीय' असें म्हणतात; व ज्यांचें तें चालत नाहीं त्यांना 'अस्पृश्य' लेखतात. महाराष्ट्रांत ब्राह्मणाला मराठ्याच्या हातचें, मराठ्याला साळ्याच्या हातचें आणि साळ्याला कोळ्याच्या हातचें पाणी चालत नाहीं; म्हणून हे परस्परास अस्पृश्य मानतात! लिंगायत, जैन व पंचाळ यांना ब्राह्मणाच्या हातचें पाणी चालत नाहीं, म्हणून ते ब्राह्मणाला अस्पृश्य समजतात आणि ब्राह्मण इतर जातींना अस्पृश्य समजतो! न्हावी व तेली हे दोघे परस्परांना अस्पृश्य समजतात. तात्पर्य, या कल्पनेमुळें संबंध हिंदुसमाजच जवळ जवळ अस्पृश्य झालेला आहे.

नव्या हिंदुधर्मांत असली जन्मावलंबी अस्पृश्यता मुळींच नाहीं, हिंदुसमाजांत हे जे शिवाशिवीचे व विटाळाचे संस्कार दूरवर घुसले आहेत व ज्यामुळें समाजांतील घटकांचें दूरीकरण झालेलें आहे ते सर्व नष्ट करणें अत्यावश्य आहे.

**(२०२) व्यवसाय व अस्पृश्यता:**—आज हिंदुसमाजाची कृषि-प्रधान अवस्था नाहीं. हिंदुसमाजामध्यें यांत्रिक युगामुळें व्यवसायामध्यें झटाझटा बदल होत आहे. व्यवसायांत बदल झाला कीं व्यवसायानुरूप भोंवतालच्या जगांतील स्पर्शास्पर्श, भक्ष्याभक्ष्य, भोज्याभोज्य या विषयांच्या कल्पनाही बदलूं लागतात. अध्ययन व अध्यापन हें कर्म करणाऱ्या वैदिकाच्या स्पर्शास्पर्शाच्या कल्पना, त्याचा मुलगा मोटार ड्रायव्हर असल्यास त्याच्या स्पर्शास्पर्शाच्या कल्पना, दुसरा मुलगा जर हॉटेल—कीपर नि तिसरा गांजा-दारूचा मक्तेदार असेल तर त्यांच्या शिवाशिवीच्या कल्पना अगदीं निराळ्या असणें स्वाभाविक आहे. आज हिंदुसमाजामध्यें अशी क्रांति होत आहे. तींत अस्पृश्यतेचें उच्चाटण निःसंशय होणार आहे. हिंदुसमाजांत केवळ मानीव अस्पृश्यांचीच अस्पृश्यता नसून अस्पृश्याशिवाय अनेक माणसांची, पशूंची, पक्ष्यांची आणि अचेतन अशा पदार्थांचीही अस्पृश्यता सांगितलेली आहे. तिची संख्या किती आहे हें समजावें म्हणून धर्मशास्त्रांतून कांहीं उतारे देतों:—

**(२०३) अस्पृश्यतेचे आधारः—**

**रजकश्चर्मकारश्च नटो बुरुड एव च ।**
**कैवर्तकश्च विज्ञेयो म्लेंच्छो भिल्लस्तथैव च ॥**
**मेधिकश्चिरवव्यालो हस्तलक्षदुघट्टिकाः ।**
**कोसेदिका भारुपदा मातङ्गाः पद्गोपकाः**
**वर्णानामाश्रमाणां तु सर्वदा तु बहिःस्थिताः ॥** —पराशरमाधवः
**रजकश्चर्मकारश्च नटो बुरुड एव च ।**
**कैवर्तमेदभिल्लाश्च सप्तैते चान्त्यजाः स्मृताः ॥३२॥**

—बृहन्नारदीय पुराण पूर्वखंड अ. १४.

**चर्मकारो भटो भिल्लो रजकः पुष्करो नटः ।**
**वराटो मेदचांडालौ दाशः श्वपचकौलिकाः ॥**

एतेऽन्त्यजाः समाख्याता ये चान्ये च गवाशनाः ।
एषां संभाषणात् स्नानं दर्शनादर्कवीक्षणम् ॥
—वेदव्यासस्मृति ॥ अ. १ श्लो. १२।१३

रजस्वलां सूतिकां वा चाण्डालं पतितं तथा ।
पाखण्डिनं विकर्मस्थं शैवं स्पृष्ट्वाप्यकामतः ॥३५९॥
श्वपचं पतितं स्पृष्ट्वा गोवालव्यजनादृते ॥३६०॥
विड्वराहं शुनं काकं गर्दभं यूपमेव च ।
मद्यं मांसं तथैवोष्ट्रं विण्मूत्रं शवमेव च ॥३६१॥
करकं जलफेनं च वृक्षनिर्यासमेव च ।
करञ्जं लशुनं चास्थि कंबलं शिग्रुमेव च ॥३६२॥
आरग्वधद्रुमं स्पृष्ट्वा सवासा जलमाविशेत् ।
कर्ममध्ये तु मार्जारं स्पृष्ट्वा स्नानं समाचरेत् ॥३६३॥
बौद्धशैवपिशाचानामालयं योऽनुगच्छति ।
सचैलमवगाह्यापः सावित्रीं त्रिशतं जपेत् ॥३६४॥
शैवानां पतितानां च बाह्यानां त्यक्तकर्मणाम् ।
उच्छिष्टस्पर्शनं कृत्वा गां वा दद्यात्पयस्विनीम् ॥३६५॥
—वृद्धहारित अ. ९.

नग्नान् पाशुपतान् बौद्धान् कालान् कौलान् दिशश्चरान् ।
एतान्दृष्ट्वा रविं पश्येत् स्पृष्ट्वा स्नानं समाचरेत् ॥—अपरार्क
चाण्डालं पतितं व्यङ्गमुन्मत्तं शवमन्त्यजम् ।
शृगालं सूतिकां नारीं रजसा च परिप्लुताम् ॥२२॥
श्वकुक्कुटवराहांश्च ग्राम्यान् स्पृशति मानवः ।
सचैलं सशिरः स्नात्वा तदानीमेव शुध्यति ॥२३॥—वृद्धशातातप.
गायकः कुक्कुटो यूपो ह्युदक्या वृषलीपतिः ।
पञ्चैते स्युरमेध्याश्च स्प्रष्टव्या न कदाचन ॥
—महाभारत पर्व १४ अ. ११६.

पाखण्डान् पतितांश्चैव तथैवान्त्यावसायिनः ।
नास्तिकांश्चित्रवृत्तींश्च पापानन्यांश्च नालपेत् ॥१॥
—विष्णुधर्मोत्तर खं. ३ अ. २१६

बौद्धान् पाशुपतान्जैनान् लोकायतिककापिलान् ।
विकर्मस्थान् द्विजान् दृष्ट्वा सवासा जलमाविशेत् ॥
—आचारमयूख

पतितचण्डालसूतिकोदक्याशवस्पृष्टितत्स्पृष्ट्यूपशमने
सचैलोदकोपस्पर्शनाच्छुध्येत् । इति । गौतम १४–२७–३४
यस्तु च्छायां श्वपाकस्य ब्राह्मणो ह्यधिरोहति ।
तत्र स्नानं प्रकुर्वीत घृतं प्राश्य विशुध्यति ॥ —आंगिरस
अभोज्यसूतिकापण्यमार्जारान्त्यश्वकुक्कुटान् ।
पतिताविद्धचण्डालमृतहारांश्च धर्मवित् ॥
संस्पृश्य शुध्यति स्नानादुदक्याग्रामसूकरौ ॥ —मार्कंडेयपुराण
नीलीं नीलीविकारांश्च मनुष्यास्थ्यपि वा द्विजः ।
चडाण्लपतितच्छायां स्पृष्ट्वा स्नानं समाचरेत्॥ —संवर्त
चितिं च चितिकाष्ठं च यूपं चण्डालमेव च ।
स्पृष्ट्वा देवलकं चैव सवासा जलमाविशेत् ॥ —स्मृत्यन्तरे
रजकश्चर्मकृच्चैव व्याधजालोपजीविनौ ।
निर्णेजकः सौनिकश्च नटःशैलूषकस्तथा ॥
मुखे भगस्तथा श्वा च वनिता सर्ववर्णगा ।
चक्री ध्वजी वध्यघाती ग्रामकुक्कुटसूकरौ ॥
एतैर्यदङ्गं स्पृष्टं स्याच्छिरोवर्जं द्विजातिषु ।
तोयेन क्षालनं कृत्वा आचान्तः प्रयतो मतः ॥ —शातातप
चक्रादिचिह्नरहितं प्राकृतं कलुषान्वितम् ।
अवैष्णवं तु तं दूरात् श्वपाकमिव संत्यजेत् ॥३०॥
अवैष्णवस्तु यो विप्रः श्वपाकादधमः स्मृतः ।
अश्राद्धेयो ह्यपांक्तेयो रौरवं नरकं व्रजेत् ॥३१॥
—वृद्धहारित अ. २

अजाविको माहिष्यश्च तथा च वृषलीपतिः।
तृणाग्रेणापि संस्पृष्ट्वा सवासा जलमाविशेत् ॥२६॥
रक्तवस्त्रस्य विक्रेता लाक्षारजक एव वा।
वेणुजीवनकैवर्ततक्षचर्मोपजीविनः ॥५२॥ —वृद्धयमस्मृति अ. ३
देवार्चनपरो विप्रो वित्तार्थी वत्सरत्रयम्।
असौ देवलको नाम हव्यकव्येषु गर्हितः॥ —अपरार्क.
स्पृष्ट्वा देवलकं चैव सवासा जलमाविशेत्। —स्मृत्यन्तरे.
आव्हायका देवलका नाक्षत्रा ग्रामयाजकाः।
एते ब्राह्मणचाण्डाला महापथिकपञ्चमाः ॥६॥

—महाभारत शां. प. अ. ७६

कर्मकाण्डप्रवृत्तो यः सर्वदा विष्णुनिन्दकः।
निन्दकः सज्जनानां च महाचाण्डाल उच्यते ॥१३॥

—पद्मपुराण अ. १३०

विद्याविनयसम्पन्ना विशालकुलसम्भवाः।
विष्णुभक्तिविहीना ये चण्डालसदृशाः स्मृताः ॥—भविष्यपुराण
विना यज्ञोपवीतेन विना चक्रस्य धारणात्।
विना द्वयेन वै विप्रश्चण्डालत्वमवाप्नुयात् ॥
शंखचक्रोर्ध्वपुण्ड्रादिरहितो ब्राह्मणाधमः।
स जीवन्नेव हि चाण्डालः सर्वधर्मबहिष्कृतः ॥ —पराशर
अचक्रधारी यो विप्रो बहुवेदश्रुतोऽपि वा।
स जीवन् एव चांडालो मृतो निरयमाप्नुयात् ॥—वृद्धहारित
कुशं काशं पलाशं च शिंशुपं यस्तु भक्षयेत्।
तावद्भवति चाण्डालो यावद् गंगां न पश्यति ॥ —गर्ग
मार्जारं रजकं वेणं धीवरं नटमेव च।
एतान् दृष्ट्वा नरो मोहादाचामेत् प्रयतोऽपि सन् ॥—संवर्त
यस्योर्ध्वपुण्ड्रं दृश्येत न ललाटे नरस्य हि।
तद्दर्शनं न कर्तव्यं दृष्ट्वा सूर्यं निरीक्षयेत् ॥२४॥

त्रिपुण्ड्रं यस्य विप्रस्य ऊर्ध्वं पुण्ड्रं न दृश्यते ।
तं दृष्ट्वाप्यथवा स्पृष्ट्वा सचैलं स्नानमाचरेत् ॥२५॥

—पद्मपुराण अ. ७९ खं. ५

विष्णुभक्तिविहीना ये चाण्डालाः परिकीर्तिताः
चाण्डाला अपि वः श्रेष्ठा हरिभक्तिपरायणाः ॥१२॥

—बृहन्नारदीय अ. ३७

चाण्डालो जायते देवि कार्तिके मांसभक्षणात् ॥५८॥

—उत्तरखंड अ. २२

औदुम्बरं बिल्वफल तथा श्लेष्मातकीफलम् ।
सर्वथा वर्जयेद्विद्वान् मासेऽस्मिन् माधवप्रिये ।
एतेष्वन्यतमं भुक्त्वा स चाण्डालो भवेद् ध्रुवम् ॥

—स्कांदे खण्ड २ अ. ७

एतेषां (माध्वानां) दर्शनादेव सचैलं स्नानमाचरेत् ।—सौरपुराण

मार्जारश्च गृहे यस्य सोऽप्यन्त्यजसमो नरः ।
भोजयेद्यस्तु विप्रेन्द्रान् मार्जारान् संनिधौ यदि ।
तच्चाण्डालसमं ज्ञेयं नात्र कार्या विचारणा ॥

—लिंगपुराण अ. ८५.

सकृदेव हि योऽश्नाति ब्राह्मणो ज्ञानदुर्बलः ।
निर्माल्यं शंकरादीनां स चांडालो भवेद् ध्रुवम् ॥९१॥

—पद्मपुराण खं. ६ अ. २५५.

स्नानकाले पुष्करिण्यां यः कुर्याद्दन्तधावनम् ।
ततो ज्ञेयः स चाण्डालो यावद्गंगां न पश्यति ॥१८॥

—पद्मपुराण खंड ७ अ. १०

रजकश्चर्मकारश्च नटो बुरुड एव च ।
कैवर्तम्लेंच्छभिल्लाश्च स्वर्णकारश्च सौचिकः ॥
तक्षकस्तिलयंत्री च सौनश्चक्री तथा ध्वजी ।
नापितः कारुकश्चैव षोडशैते जघन्यजाः ॥ —स्मृत्यर्थसारे.

पाखण्डिनो विकर्मस्थान् वामाचारांस्तथैव च ।
पंचरात्रान् पाशुपतान् वाङ्मात्रेणापि नार्चयेत् ॥
—कूर्मपुराण उत्तरार्ध अ. १६.

आरनालस्य यत्कुंभं त्यजेन्मद्यघटं यथा ।
आरनालं कालशाकं करञ्जं तिलपिष्टकम् ॥९९॥
लशुनं मूलकं शिग्रुं छत्रं कोशातकीफलम् ।
अलाबुं चान्त्रंशाकं च करनिर्मथितं दधि ॥१००॥
बिम्बं विड्जं च निर्यासं पीलु श्लेष्मातकं फलम् ।
आरग्वधं च पिण्याकं श्वेतवृन्ताकमेव च ॥१०१॥
उष्ट्राविमानुषीक्षीरमवत्सानिर्दशाहगोः ।
एतान्यकामतः स्पृष्ट्वा सवासा जलमाविशेत् ॥१०२॥
—वृद्धहारित अ. ११.

सिंधु-सौवीरसौराष्ट्रं तथा प्रत्यन्तवासिनः ।
कलिंगकौंकणान् वंगान् गत्वा संस्कारमर्हति ॥ —देवलस्मृति.

(२०४) पं. पाठककृत वर्गीकरणः—या सर्व वचनांचा भावार्थ न देतां महामहोपाध्याय पं. श्रीधरशास्त्री पाठक यांनीं 'अस्पृश्यतेचा शास्त्रार्थ' या ग्रंथांत पृ. ६९ येथें वर्गीकरण करून दिलेली यादी सादर करतों.

(१) दुर्गुणामुळें अस्पृश्यः—उच्छिष्ट पुरुष, मूर्ख, असंतुष्ट, कंजूष' कर्जबाजारी, दीर्घरोषी, कृतघ्न, नास्तिक, व्यंगी, व्याधित, कुष्टरोगी, पराधीन, षण्ढ, रजस्वला, अभिशस्त ( आरोपित ), रन्ध्रान्वेषी वगैरे.

(२) कर्मामुळें अस्पृश्य—पतित, कुशकाश (दर्भ) खाणारा, व्रत_ त्यागी, विकर्मस्थ, मातृपितृघात करणारा, स्त्रीघात करणारा, दारू पिणारा, गुरुतल्पग, अश्रुपात करणारा, वृषलीपति, प्रव्रज्याच्युत, विष देणारा, आग लावणारा, वेद विकणारा, वेदनिंदक, बायको टाकणारा, बहिष्कृत, प्रेतस्पर्श किंवा रजस्वलास्पर्श करणारा, परिस्थितीमुळें झालेले अस्पृश्य व पंचमहापातकी.

(३) धंद्यामुळें अस्पृश्य—देवलक, देवद्रव्योपजीवी (पुजारी वगैरे), पुरोहित (भिक्षुक), गायक, नर्तक, चित्रकार, राजसेवी, राजाचा प्रतिग्रह

घेणारे, वीणा वाजविणारे, बुरुड, चांभार, नाक्षत्र, ज्योतिषी, वैद्य, रंगारी, धोबी, लाखेचें रंगविलेलें कापड विकणारा, सुतार, सोनार, अपत्यविक्रयी, आव्हायक (धर्माधिकारी), नट, धीवर, निषाद, व्याध, व्याजबट्टा करणारे, बंदिक (भाट), वध्यघाती (फांशी वगैरे देणारा मांग), त्रिरव (पहारेकरी), न्हावी, कुंभार, व्यापारी (वणिक्), कायस्थ (लिपिजीवि), माळी, कोळी, ग्रामयाजक (ग्रामजोशी) वगैरे.

(४) **देशभेदांमुळें अस्पृश्य**– शबर, पुलिंद, म्लेंच्छ, किरात, कांबोज, यवन, चीन, शक, औण्ड्र, पौण्ड्र, बर्बर, हार, हूण, वार्ष्णेय, मागध, पल्हव, आंध्र, गुह, मद्रक, चुचुक, गांधार, द्राविड वगैरे.

(५) **द्वेषमूलक अस्पृश्य**–बौद्ध, जैन, कापालिक, पाशुपत, वैष्णव, अवैष्णव, चक्रधारी, भस्मरुद्राक्षधारी, शैव, रुद्रार्चक (रुद्राभिषेक करणारा), देवीपूजारहित, भैरवपूजक, त्रिपुण्ड्रधारी, (आडवें गंध लावणारे), ऊर्ध्वपुण्ड्रधारी (उभें गंध लावणारे).

(६) **जन्मामुळें अस्पृश्यः**–पारिभाषिक चांडाल (शूद्रापासून ब्राह्मण स्त्रीचे ठिकाणीं उत्पन्न झालेली संतति.)

ही यादी आणि हें वर्गीकरण ज्या मनुष्यांना अस्पृश्यता येते तेवढ्यापुरतेंच आहे. मनुष्येतर पशु, पक्षी आणि अचेतन पदार्थ यांचीं नांवें ध्यानांत घेण्याजोगीं आहेत. जे पदार्थ निषिद्ध म्हणून सांगितलेले आहेत त्या सर्वांचा विटाळ सांगितलाच आहे. त्याशिवाय पशु आणि पक्षी यांचींही नांवें अस्पृश्यांच्या यादींत आहेत.

(७) **अचेतन पदार्थः**–हातानें मोडलेलें दहीं, पाण्याचा फेस, दूधभोपळा, कांदा, लसूण, शेवगा, तांबडा मुळा, पांढरें वांगें, गाजर, तोंडलें, घोसाळें, दोडका, भोकरें, तिळकूट, कांजी, कमळाचे कांदे, विशिष्ट पालेभाज्या, फळभाज्या, कलिंगडें, टमाटो, झाडाचा चीक, डिंक, कांबळें, करंज, निळें वस्त्र, निळा रंग, पळस, शिसवें, उंबर, मुळा वगैरे.

(८) **पशुपक्षी**– डुक्कर, कुत्रें, मांजर, गाढव, उंट, एडका, कोल्हा, करकोचा, कोंबडा, कावळा, चिमणी, गिधाड, उंदीर, किडे, उवा वगैरे.

ज्यांचा स्पर्शदोष आहे असे पशु व पक्षी, निर्जीव पदार्थ आणि माणसें अशा सर्वांची बेरीज केली तर ती एकशेंसाठाचे पुढें जाते; आणि

यांतही आणखी इकडची तिकडची भर पडली तर एकंदर विटाळांची संख्या तीनशें ते चारशेंपर्यंत जाते.

**(२०५) तारतम्यानें विटाळ पाळाः**—आजचा हिंदुसमाज हे सगळे विटाळ पाळीत नाहीं; म्हणून नवा हिंदुधर्म असें सांगतो, कीं जन्मजात विटाळ, पशुपक्ष्यांचे विटाळ आणि निर्जीव पदार्थांचे विटाळ हिंदुसमाजानें यापुढें मुळींच मानूं नयेत. अस्वच्छता, अपवित्रता, अमंगळपणा, घाणेरडेपणा, दुर्गंधी ज्यामध्यें असेल, ती ज्यामुळें वाढेल अशा सर्वांचा विटाळ मानलाच पाहिजे. महारोगी, ज्यांच्या संसर्गानें रोग फैलावण्याचा संभव आहे असे रोगी, दुःशील, देशद्रोही, राष्ट्रघातक, संस्कृतिद्रोही, अत्यंत दुर्जन वगैरे लोकांवर संघटितपणें बहिष्कार घालून, त्यांचा विटाळ मानून सर्व क्षेत्रांत त्यांचें जीवन कठीण केलें पाहिजे.

पूर्वकालीं ज्यांना दुर्गुणी समजत व ज्यामुळें अस्पृश्यता उत्पन्न झाली, त्यांतील मूर्ख, व्याधित, कृतघ्न, इत्यादिकांचे विटाळ आजही मानणें अवश्य आहे. ज्या दुष्कर्मांमुळें पूर्वीं अस्पृश्य समजत असत त्यांतील मातृपितृघाती, स्त्रीघाती, मद्यपी, गुरुतल्पी, विष देणारा, आगलाव्या इत्यादि लोकांचे विटाळ त्यांनीं असलीं कर्मे करूं नयेत म्हणून आजही पाळण्याजोगे आहेत. धंद्यामुळें आलेली अस्पृश्यता आज बहुतेक जात चाललीच आहे आणि राहिलेली सर्व गेलीच पाहिजे. निषिद्ध म्हणून ज्या खाद्यपदार्थांना अस्पृश्य मानलें आहे, त्यांना आजच्या आहारशास्त्राच्या आधारानेंच स्पृश्य वा अस्पृश्य ठरविलें पाहिजे. नव्या हिंदुधर्मांत जन्मजात अस्पृश्यतेला मुळींच स्थान नाहीं. जुन्या हिंदुधर्मांतसुद्धां जन्मजात अस्पृश्यता श्रुतिमूलक नसून ती केवळ रूढीनें आलेली आहे.

**(२०६) वेदांत अस्पृश्यता नाहींः**—जुन्या हिंदुधर्मांचे मूल आधारभूत ग्रंथ जे वेद त्यांमध्यें अमुक एक जात अस्पृश्य किंवा अमुक विशिष्ट धंदा करणारे लोक हे अस्पृश्य असा उल्लेख नाहीं. आंगिरस पांच अंत्यज सांगतो. अत्रिस्मृतीमध्यें सप्त अंत्यजांचा उल्लेख आहे. व्यासस्मृतींत बारा अंत्यज सांगितले असून त्यांचीं नांवें चर्मकार, भट, भिल्ल, पुष्कर, नट, रजक, वराट, मेद, चांडाल, दाश, श्वपच व कौलिक अशीं दिलेलीं आहेत.

' चांडालः श्वपचः क्षत्ता सूतो वैदेहकस्तथा ।
मागधायोगवाश्चेति स्मृता अंत्यजजातयः ॥ '

या वचनांत जे सात अंत्यज सांगितलेले आहेत त्यांतील बरींच नांवें श्रुतींत येतात. तैत्तिरीय ब्राह्मणांत (३, ४, १४, १; ३, ४, १७, १.) ' वायवे चांडालम् ' असें वचन येतें. पण हा चंडाल आजच्या अर्थाचा चांडाल नव्हे. क्षत्ता हा शब्द तैत्तिरीय संहितेंत (४, ५, २) ' नमः क्षतृभ्यः ' असा आला आहे. पण श्रुतींतील हा क्षत्ता अस्पृश्य नाहीं. निषादाला स्मृतीमध्यें अस्पृश्य म्हटलें आहे. परंतु श्रुतींत त्याला वेदमंत्रांनीं रुद्रेष्टि करण्याचा अधिकार दिलेला आहे. ' निषादस्थपतिं याजयेत ' हें प्रसिद्ध वाक्य आहे. सूत म्हणजे स्तुतिपाठक असा अर्थ तैत्तिरीय ब्राह्मणांत आहे. 'गीताय सूतम्' हा सूत राजाजवळ बसे, अर्थात् तो अस्पृश्य नव्हता. आयोगव याचा यज्ञकर्मप्रसंगीं यज्ञोपयोगी वस्तु विकत घेण्याशीं संबंध असे, असें तैत्तिरीय ब्राह्मणांत ' आक्रयायायोगवम् ' म्हटलें आहे. मगध हें देशवाचक नांव असून त्याचेंही काम भाटाचें होतें. तैत्तिरीय ब्राह्मणांत ( ३, ४, १, १ ) ' अतिक्रुष्टाय मागधम् ' असें म्हटलें आहे. विदलकार म्हणजे बुरुड व किरात म्हणजे भिल्ल यांचाही निर्देश तैत्तिरीय ब्राह्मणांत ' पिशाचेभ्यो विदलकारम् ' ( ३, ४, ५ ) व ' गुहाभ्यः किरातम् ' ( ३, ४, १२ ) असा आढळतो. किराताचा उल्लेख तांड्य ब्राह्मणांतही आहे. तात्पर्य, पुढें स्मृतींत ज्यांना अस्पृश्य म्हणून उल्लिखित केलें ते श्रुतिकालीं अस्पृश्य होते, असें श्रुतीवरून सिद्ध होत नाहीं.

(२०७) **दोन पोंचट आधारः**—जन्मजात अस्पृश्यतेला आधार म्हणून जीं दोन वचनें पुढें करण्यांत येतात, त्यांवरूनही तसा बोध होत नाहीं. ' **तद्य इह रमणीयचरणा अभ्याशो ह यत् ते रमणीयां योनिमापद्येरन् ब्राह्मणयोनिं वा क्षत्रिययोनिं वा वैश्ययोनिं वाऽथ य इह कपूयचरणा अभ्याशो ह यत् ते कपूयां योनिमापद्येरन् श्वयोनिं वा सूकरयोनिं वा चंडालयोनिं वा ।** ' –छां. उ. (५, १०, ७).

जे चांगल्या आचरणाचे असतात ते तत्काल ब्राह्मणादि योनींत जन्मास येतात आणि जे कपूय म्हणजे निन्द्य आचरणाचे असतात ते निन्द्य म्हणजे कुत्र्याच्या, डुकराच्या किंवा चंडालाच्या योनींत जन्मतात.

येथें कुत्रा, डुकर व चंडाल यांची सांगड घालून दिली आहे. तथापि त्यावरून अस्पृश्यतेचा बोध होत नाहीं. श्राद्धाला वराहाचें मांस विहित आहे, म्हणून सूकर जसा अस्पृश्य नाहीं, तसाच साहचर्यामुळें चंडालही अस्पृश्य ठरत नाहीं.

जन्मजात अस्पृश्यतेला आधारभूत म्हणून जें दुसरें एक वचन बृ. आ. उ. ( १, ३, १० ) दाखविण्यांत येतें तें असें:–' सा वा एषा देवतैतासां देवतानां पाप्मानं मृत्युमपहत्य यत्रासां दिशामंतस्त-द्गमयांचकार तदासां पाप्मनो विन्यदधात्तस्मान्न जनमियान्नान्त-मियान्नेत्पाप्मानं मृत्युमन्ववायानीति । ' या वचनांतील ' न अंतमियात् ' या शब्दाचे अनेक अर्थ करून अंत म्हणजे अंत्य, अंत्य म्हणजे अंत्यज अर्थात् अस्पृश्य अशी ओढाताण करून अस्पृश्यता सिद्ध करण्याचा यत्न केला जातो. ' दिशामंतः ' म्हणजे अरण्य असा शांकर-भाष्यांत अर्थ केला आहे. त्यावरून अरण्यांत, ओसाड प्रांतांत जे लोक राहातात त्यांच्याशीं संभाषण, दर्शन इत्यादि करूं नये एवढाच अर्थ निघतो. याही वाक्यावरून जन्मावलंबी अस्पृश्यता सिद्ध होत नाहीं.

निरनिराळीं स्मृतिवचनें अस्पृश्यता सांगतात हें खरें, पण हीं वचनें श्रुतिमूलक नाहींत. परिस्थिति, धंदे आणि इतर कारणें यांमुळें जी अस्पृ-श्यता रूढ झाली, ती आतां नष्ट करणें अत्यावश्यक आहे.

(२०८) **अनवस्थाप्रसंगः**–माणसामाणसांत जी अस्पृश्यता जुन्या हिंदुधर्मांत सांगितली आहे, ती पाळावयाची म्हटल्यास अनवस्थाप्रसंगच येणार आहे. स्मार्तांनीं वैष्णवांना नि वैष्णवांनीं स्मार्तांना अस्पृश्य समजणें, पुजारी, गुरव, वैद्य, गवई, नट, ज्योतिषी, सुतार, सोनार, शिंपी, न्हावी, कुंभार, सावकार, कोळी, माळी इत्यादींनीं परस्परांना अस्पृश्य समजणें अनर्थावह आहे. केवळ चंडाल शब्दाच्या दृष्टीनें विचार केला तरी जुन्या धर्मशास्त्राप्रमाणें चंडालांचें पीकही हिंदुसमाजांत खूपच वाढलेलें आढळेल.

प्रथम प्रतिलोमसंकरापैकीं ब्राह्मणी–शूद्रसंभव एकच चंडाल होता. वसिष्ठ धर्मसूत्रांत—

' नास्तिकः पिशुनश्चैव कृतघ्नो दीर्घरोषकः ।
चत्वारः कर्मचांडाला जन्मतश्चापिपंचमः ॥२२॥ वसिष्ठ अ. ६

नास्तिक, चहाडखोर, कृतघ्न व दीर्घद्वेष्टा असे चार कर्मचंडाल सांगितलेले आहेत. अत्रिस्मृतींत संन्याशाच्या अपत्याला चंडाल म्हटलेलें आहे. अत्रिसंहितेंत ब्राह्मणांच्या दहा जाति सांगितल्या असून क्रियाहीन, मूर्ख व निर्दय ब्राह्मणाला चांडाल म्हटलें आहे. व्यासस्मृतीमध्यें सगोत्र-विवाहामुळें होणाऱ्या पुत्राला व कुवारपणांतील पुत्राला चंडाल म्हटलें आहे. यावरून पांच प्रकारचे कर्मचंडाल व चार प्रकारचे जन्मचंडाल सिद्ध होतात. यांत पुढें सोळा ग्रामचंडालांची भर पडलेली आहे. ते सोळा असेः–(१) परीट किंवा रंगारी (२) चांभार (३) बहुरूपी किंवा नाटकांतील नट (४) बुरुड (५) कोळी (६) म्लेंच्छ (७) भिल्ल (८) सोनार (९) शिंपी (१०) गारुडी (११) तेली (१२) मांग (१३) कुंभार (१४) कलाल (१५) न्हावी (१६) शिल्पजीवी. यांतच आणखी ५ चांडालांची भर घालण्याजोगी आहे.

आव्हायका देवलका नाक्षत्रा ग्रामयाजकाः ।
एते ब्राह्मणचाण्डाला महापथिक पंचमाः ॥ शांतिपर्व ॥७६।६॥

(२०९) सर्वच हिंदु चंडालः–चंडालांची संख्या वाढवीत गेल्यास सर्व हिंदुसमाजाला चंडालसमाज असेंच म्हणण्याचा प्रसंग येईल. त्यावरून पूर्वकालापासून आपण किती दूरदूर जात आहों आणि जुनें धर्मशास्त्र कसें अपुरें आहे एवढेंच सिद्ध होतें. जुन्या धर्मशास्त्राप्रमाणें आज देवळांत जाऊन दर्शन घेण्याला कोणीही हिंदु पात्र नाहींत. कारण जे लोक देवालयांत गेले असतांना देवालयांची शुद्धि करावी लागते ते असे आहेत—

प्रासादद्वेवहर्म्याणां चण्डालपतितादिषु ॥४०८॥
अन्तः प्रविष्टेषु तथा शुद्धिः स्यात् केन कर्मणा ।
गोभिः संक्रमणं कृत्वा गोमूत्रेणैव लेपयेत् ॥४०९॥
अवैष्णवस्पर्शनेऽपि एवं कुर्वीत वैष्णवः ॥४१३॥
—वृद्धहारित अ. ९

चंडालैरंत्यजैश्चैव तथान्यप्रतिलोमजैः ।
म्लेंच्छैश्च नीचचंडालैर्गुरुनिंदादिदूषितैः ।

एवमादिभिः संस्पृष्टे देवागारे विशेषतः ।
स्पृष्टे प्रवेशने बाधा पूजाकाले च दर्शने ॥

**भावार्थः**–वृद्धहारित म्हणतो कीं चंडाल, पतित हे देवालयाच्या आवारांत किंवा सभामंडपांत गेले कीं देवालय भ्रष्ट होतें. इतकेंच नव्हे तर वैष्णवांच्या देवालयांत स्मार्त, गाणपत्य व शिवभक्त गेला तरी तें देवालय भ्रष्ट होतें, म्हणून शुद्धि केली पाहिजे.* भृगु म्हणतो, 'चंडाल, अंत्यज, प्रतिलोमज, म्लेंच्छ, नीचचंडाल, गुरुनिंदक, पतित इत्यादि देवालयांत गेले म्हणजे देवालय भ्रष्ट होतें.'

**(२१०) देवालयें मोकळीं कराः**–वर सांगितलेले पंचवीस प्रकारचे चंडाल, बारा प्रकारचे अंत्यज, म्लेंच्छादि अहिंदु चंडाल, प्रतिलोमामुळें झालेल्या जाति, गुरूची टर उडविणारे विद्यार्थी, जुन्या शास्त्रानें जें करूं नये असें म्हटलें आहे तें करीत असल्यामुळें पतित झालेले, अशा सर्वांना देवालयप्रवेश वर्ज्य आहे. पतित हा शब्द इतका व्यापक आहे कीं जुन्या धर्मशास्त्राप्रमाणें आज पतित न झालेला एकही ब्राह्मण मिळणार नाहीं. ब्राह्मणाला पातित्य पंधरा कारणांमुळें येतें, तीं कारणें अशीं:—

(१) सायंप्रातःसंध्या न करणें (२) वेदाध्ययन न करणें (३) दूध, तूप इत्यादि विकणें व वाटेल तो धंदा करणें (४) कांदा, लसूण, गाजर इत्यादि खाणें (५) अनाश्रमी राहाणें (६) अग्निहोत्र न ठेवणें (७) शिल्पव्यवहारावर जगणें (८) आठव्या वर्षी मुलीचा विवाह न करणें (९) अवकीर्णी ब्रह्मचाऱ्यानें प्रायश्चित्त न घेणें (१०) देवपूजेचा धंदा करणें (११) जोसपणावर निर्वाह करणें (१२) पैसे घेऊन शिकविणें (१३) शूद्रांचे धंदे करणें (१४) सर्व संस्कार यथाविधि न करणें (१५) अनेक पातकांना सांगितलेलीं प्रायश्चित्तें न घेणें.

या दृष्टीनें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य इत्यादि सर्वांच्या पातित्याचा विचार केल्यास सर्व देवालयांना कुलपेंच ठोकावीं लागतील. आंत पुजा-

---

* हा आचार अद्याप कोचीन येथें 'तिरुमल देवस्वं' या देवळांत आहे. अवैष्णव ब्राह्मण विशिष्ट स्थळीं गेला तर देवालयाची शुद्धि करण्याकरितां त्याचेकडून प्रायश्चित्तदक्षिणा घेतात असा अनुभव आहे.

ण्यालासुद्धां जातां येणार नाहीं, कारण तोसुद्धां अस्पृश्य आहे. हा अनवस्थाप्रसंग टाळण्याकरितां अस्पृश्यताच नष्ट केली पाहिजे. ज्याला देवदर्शनाची इच्छा झाली, तो अत्यंत पवित्र होय. ह्या धोरणानें आजचे पूर्वास्पृश्य सर्व पवित्र आहेत असें समजून त्यांना दर्शनार्थ सर्व देवालयें मोकळीं ठेवावींत. सार्वजनिक देवालयें व जलाशय या ठिकाणीं मुळींच शिवाशिव नाहीं.

जलाशय व मंदिर प्रवेशास आधार— सार्वजनिक पानवठे, जलाशय, तीर्थें, क्षेत्रें आणि देवालयें अशा ठिकाणीं पूर्वास्पृश्यांचा स्पर्श दोष मानूं नये असेंही शास्त्र आहे

देवयात्रा विवाहेषु यज्ञप्रकरणेषु च ।
उत्सवेषु च सर्वेषु स्पृष्टास्पृष्टिर्न विद्यते ॥ —अत्रि ॥२४९॥
संग्रामे हट्टमार्गे च यात्रादेवगृहेषु च ।
उत्सव-ऋतु-तीर्थेषु विप्लवे ग्राम देशयोः ॥
महाजलसमीपेषु महाजनवरेषु च ।
अग्न्युत्पाते महापत्सु स्पृष्टास्पृष्टिर्न दुष्यति ॥ —स्मृत्यर्थसार ॥७९
विष्णवालयसमीपस्थान् विष्णुसेवार्थमागतान् ।
चाण्डालपुक्कसान्वापिस्पृष्ट्वा न स्नानमाचरेत् ॥ —नित्याचारपद्धति
श्रवणात् कीर्तनाद्ध्यानात्पूयन्तेऽन्त्यावसायिनः ।
—भागवत १०—७०—४३
उत्सवे वासुदेवस्यस्नायाद्योऽशुचिशंकया ।
तादृशं कल्मषं दृष्ट्वा सचैलं स्नानमाचरेत् ॥ —बृहस्पति स्मृति ॥
नद्यः कूप तडागानि सरांसि सरितस्तथा ।
असवृत्तान्यदोषाणि मनुःस्वायंभुवोऽब्रवीत् ॥ —औशनसस्मृति ॥
प्रदद्यात् सर्वभूतेभ्यो जलपूर्णं जलाशयम् ।
रमन्तु सर्वं भूतानि स्नानपानावगाहनैः ॥ —मत्स्यपुराण ॥

**भावार्थः**—देवादींच्या यात्रा, यज्ञसमारंभ, सर्व प्रकारचे धार्मिक सामाजिक उत्सव, समरांगण, बाजार, सार्वजनिक देवालयें, तीर्थें, महा-

जलाशय, जनसंमर्दाचीं स्थानें, आपत्प्रसंग अशा ठिकाणीं स्पर्शदोष नाहीं. महाविष्णूच्या देवालयासमीप विष्णुसेवेकरितां आलेल्या चांडालादिकांना स्पर्श केला तरी स्नानाचें प्रयोजन नाहीं; कारण हे अत्यंजादि श्रीविष्णूच्या श्रवण, कीर्तन, ध्यानानें पवित्र होत असतात. वासुदेवाच्या उत्सवांत विटाळ झाला अशा शंकेनें जो स्नान करतो, त्या पापी पुरुषाच्या दर्शनाबरोबर सचैल स्नान करावें ! नद्या, विहिरी, सरोवरें, हे सर्व जलाशय उघडे असतात, म्हणून तेथें पाणी भरण्याकरितां कोणीही आलें तरी शिवाशीव नाहीं. कारण सर्व जलाशयावर सर्व भूतमात्रांना स्नान, पान व अवगाहन यांचा आनंद मिळावा असा उत्सर्ग करणाऱ्याचा हेतु असतो व तो संकल्पांत उच्चारिला जातो.

(२११) **स्वधर्मीयच श्रेष्ठः**—अस्पृश्यादि लोक हे स्वधर्मीय आहेत. ते विधर्मी म्लेंच्छादिकापेक्षां श्रेष्ठ होत.

**गोमांसखादको यस्तु विरुद्धं बहु भाषते ।**
**सर्वाचारविहीनश्च म्लेंच्छ इत्यभिधीयते ॥** —बौधायन
**सभायां स्पर्शनं चैव म्लेंच्छेन सह संविशेत् ।**
**कुर्यात्स्नानं सचैलं तु दिनमेकमभोजनम् ॥** —देवल
**एतेऽन्त्यजाः समाख्याता ये चान्ये च गवाशनाः ।**
**एषां संभाषणात्स्नानं दर्शनादर्कवीक्षणम् ॥** —वेदव्यासस्मृति
**न म्लेंच्छाशुच्यधार्मिकैः सह संभाषेत ॥** —गौतम

वरील वचनांचा भावार्थ लक्षांत घेतल्यास शास्त्रांत विधर्मी म्लेंच्छादिकांच्या संसर्गास किती प्रायश्चित्त सांगितलें आहे हें समजेल. आज हिंदुसमाजाची वागणूक अशा म्लेंच्छादिकांशीं 'परजनेषु मैत्री' आणि अस्पृश्यादिकांशीं 'स्वजनेषु वैरं' अशी चाललेली नाहीं काय? हा मोठा अन्याय आहे. यास्तव जन्मजात शिवाशीव व विटाळ, धंद्यामुळें आलेली अस्पृश्यता सर्व घालवून अस्पृश्यांना जलाशयावर, पानवठ्यावर, हौदावर, विहिरीवर, सर्व सार्वजनिक ठिकाणीं स्नान, पान व जलभरण असे सर्व अधिकार दिले पाहिजेत. अस्पृश्य हे देवालयामध्यें दर्शनार्थ आणि कीर्तन, पुराण, प्रवचनादि श्रवणार्थ येऊं लागले, नळावर, विहिरीवर, सार्वजनिक जलाशयावर स्पृश्य हिंदूंप्रमाणें

पाणी भरण्यास येऊं लागले, तीर्थक्षेत्रादि ठिकाणचे त्यांचेवरील निर्बंध दूर झाले म्हणजे त्यांच्या अस्पृश्यतेचें संपूर्ण उचाटण झालें, असें समजावें. *

साक्षरता, लोकजागृति, सरकारचे कायदे आणि अस्पृश्य वर्गांत होत असलेली सुधारणा यांमुळें शहरांतील अस्पृश्यता जवळ जवळ गेली आहे व खेड्यांतूनही तिची हळूहळू हकालपट्टी होईल. अस्पृश्यांची राहाणी, वागणूक ही सुसंस्कृतपणाचीं झाली म्हणजे विटाळाचें नांवही ऐकूं येणार नाहीं.

पूर्वास्पृश्यांची संख्या सायमन कमिशनच्या रिपोर्टावरून फक्त साडे-चार कोट आहे. एकंदर हिंदुसमाजांत त्यांचें प्रमाण शेंकडा १४ आहे. मुंबई इलाख्यांत त्यांचें प्रमाण शेंकडा ११ इतकें कमी आहे, तर तें बंगालमध्यें शेंकडा ३२ इतकें आहे ! विविध हायकोर्टांनीं अस्पृश्यांना शूद्र समजूनच न्यायनिवाडे दिले आहेत. शिक्षण, नोकऱ्या, सार्वजनिक देवालयें, पाणवठे, सार्वजनिक स्थळें अशा सर्व क्षेत्रांत कायद्यानें अस्पृश्यांना स्पृश्यांच्या बरोबरीचा हक्क मिळाला पाहिजे व तसा त्यांनीं अवश्य यत्न करावा. पं. म. म. काणे यांच्या इंग्रजी धर्मशास्त्राच्या इतिहासाधारें हे आंकडे दिले आहेत. या विषयावरच म. म. पं. श्रीधरशास्त्री पाठक यांचा अस्पृश्यतेचा शास्त्रार्थ हा ग्रंथ वाचकांनीं वाचावा.

---

* **पावित्र्याची भावना**:—अस्पृश्यता आणि शिवाशिव यांच्या मुळाशीं जित व जेते, उच्च आणि नीच या भावना नसून मूळ पावित्र्याची भावना आहे. आई, बहिण व बायकोसुद्धां मनुष्याला विटाळसपणांत अस्पृश्य असते. सुतकी मित्र व नातलग यांचाही स्पर्शदोष मानण्यांत येतो. फार काय, पण उपनीत मुलाचा स्पर्शही भोजनप्रसंगीं दोषार्ह असतो. यावरून हें स्पष्ट आहे कीं पावित्र्यमूलक कल्पनेनेंच हा विटाळ आलेला आहे. ती कल्पना पुढें पुढें इतरांना बोचक झाली हें निराळें !

—*—

# प्रकरण सोळावें

## आहार

(२१२) **आहाराचा मुख्य उद्देशः**—आहाराचा मुख्य उद्देश शरीरधारणा, शरीराची वाढ, शरीराचें पोषण, प्रतिकारक्षमता आणि दीर्घायुष्य हा आहे. म्हणून शरीराच्या वाढीस कोणकोणतीं द्रव्यें आवश्यक आहेत व त्याकरितां माणसांनीं कोणकोणते पदार्थ खाल्ले पाहिजेत याचा विचार आरोग्यशास्त्र, वैद्यक आणि शास्त्रीय शोध यांच्या आधारेंच केला पाहिजे. आज पदार्थांतील ( जीवनतत्त्वें ) व्हिटॅमिन, प्रोटीन, फॅट यांच्या प्रमाणावर आहाराचें ग्राह्याग्राह्यत्व ठरविलें जात आहे. त्याच दृष्टीनें हिंदुसमाजाच्या आहाराचें परीक्षण करून वर्ज्यावर्ज्यविवेक करावयास पाहिजे. जुन्या हिंदुधर्मात आहाराचा विचार पुष्कळच केलेला आहे. अधिकारभेदानें अनेक नियमही सांगितलेले आहेत. त्यांतील कांहीं भाग ग्राह्य असला तरी रूढ धार्मिक समजुती, अदृष्ट व अपूर्व या दृष्टीनें यापुढें आहाराचा विचार करून भागणार नाहीं. कारण आहाराचा विषय आतां धर्मशास्त्राच्या कक्षेबाहेर निघाला आहे.

(२१३) **ही अढी कां ?**:—आहारामध्यें मांसाहार व शाकाहार असे दोन भेद आहेत; आणि त्यांतही पुन्हां भक्ष्याभक्ष्यविचार खाद्याखाद्यविचार पुष्कळंच आहे. हिंदुसमाजामध्यें पुष्कळ लोक मांसाहार करीत असले तरी एकंदरींत मांसाहाराबद्दल एक प्रकारची अढी आहे. किंबहुना मांसाहारी लोक हे शाकाहाऱ्यांपेक्षां कनिष्ठ अशाही कल्पना आहेत. यास्तव हिंदुसमाजांत मांसाहार पूर्वी कसा होता, त्यांत परिवर्तन कसें घडलें, नि सांप्रत मांसाहार कोणच्या हेतूनें केला पाहिजे, याचा विचार करूं.

(२१४) **वेदांतील मांसाहारः**—ऋग्वेदांत एका ऋचेंत इंद्रासाठीं पसतीस बैल शिजविल्याचा उल्लेख आहे.

**‘ उक्ष्णो हि मे पंचदश साकं पचन्ति विंशतिम्। उताहमद्मि पीव इदुभा कुक्षी पृणंति मे । ’** —ऋग्वेद १०–८६–१४

प्राचीन काळीं मधुपर्क हा आतिथ्याचा विधि सहा माननीयांच्या स्वागतासाठीं होत असे. त्या वेळेला मांस लागत असे. 'नामांसो मधुपर्को भवति' (आश्वलायन गृह्यसूत्र १, २४–२६). मधुपर्कप्रसंगीं जो मंत्र म्हणत (ऋग्वेद ८–१०१–१५) त्यांत गायीची स्तुति असून ही निरपराधी गाय मारूं नको असें म्हटलें आहे. मानवगृह्यसूत्रांत ( १, ९, १९-२२ ) मधुपर्कवर्णनांत हातांत तरवार घेऊन अतिथी मारूं नको म्हणेल तर गायीला सोडून देतो, असा उल्लेख आहे. हिरण्यकेशी गृह्यसूत्रांत स्नातकाचा विषय आला असतांना तेथेंही गायीसंबंधाचा उल्लेख आहे. (हि. गृ. १, १३, १०–१५ ) त्याचप्रमाणें ऐतरेय ब्राह्मण, शतपथ ब्राह्मण या ठिकाणींही उल्लेख आहेत. प्राचीन धर्मसूत्रांमध्यें मधुपर्क, श्राद्ध व यज्ञ यांमध्यें मांस आवश्यक म्हणून सांगितलेलें आहे. वसिष्ठधर्मसूत्र, आपस्तंबधर्मसूत्र व गौतमादि धर्मसूत्रांत मांसाहारार्थ पशुपक्षी कोणते खावे याचा विचार पुष्कळच आलेला आहे. तसेंच तो अनेक स्मृतींतही आलेला आहे. कल्पनेकरितां कांहीं वचनें उद्धृत करतों.

(२१५) स्मृति व मांसाहारः—

द्वौ मासौ मत्स्यमांसेन, त्रीन् हारिणेन, चतुरश्चौरभ्रेण, पंचशाकुनेन, षट्छागेन, सप्त रौरवेण, अष्टौपार्षतेन, नवगवयेन, दशमाहिषेण, एकादश कौर्मेण, संवत्सरं गव्येन पयसा तद्विकारैर्वा ॥

—विष्णु अ. ८०

द्वौ मासौ मत्स्यमांसेन त्रिमासान् हारिणेन च ॥१३७॥
औरभ्रेणाथ चतुरः शाकुनेनेह पञ्चतु ।
षण्मासांश्छागमांसेन रौरवेण नवैव तु ॥१३८॥
दशमासांस्तु तृप्यन्ति वराहमहिषामिषैः ।
शशोर्णवृकयोर्मांसैर्मासानेकादशैव तु ॥१३९॥
संवत्सरन्तु गव्येन पयसा पायसेन च ।
वार्ध्रीणसस्य मांसेन तृप्तिर्द्वादशवार्षिकी ॥१४०॥

—उशनःसंहिता अ. ३

न किंचिद्वर्जयेच्छ्राद्धे नियुक्तस्तु द्विजोत्तमः ।
न मांसं प्रतिषेधेत न चान्यस्यान्नमीक्षयेत् ॥६४॥

**योनाश्नाति द्विजो मांसं नियुक्तः पितृकर्मणि ।**
**स प्रेत्य पशुतां याति संभवानेकविंशतिम् ॥५५॥**

—उशनःसंहिता अ. ५

**भावार्थः**—मत्स्यमांसानें पितर दोन महिने तृप्त होतात. हरिण-मांसानें तीन महिने, उरभ्रमांसानें चार महिने, शकुनिमांसानें पांच महिने, मेषमांसानें सहा महिने, रुरुमांसानें सात महिने, पृषतमांसानें आठ महिने, गवयमांसानें नऊ, माहिषमांसानें दहा, कूर्ममांसानें अकरा आणि गायीच्या दुधातुपांच्या पदार्थांनीं पितर हे बारा महिनेपर्यंत तृप्त होत असतात. उशनःसंहितेमध्यें विष्णूचाच अनुवाद असून थोडा फरक आहे. तो असा—रुरुमांसानें पितर नऊ महिने तृप्त होतात, वराह व माहिष मांसानें दहा महिने, ससा, मेंढा व लांडगा यांच्या मांसानें अकरा महिने पितर तृप्त होत असतात. गायीच्या दुधादि पदार्थांमुळे पितर एक वर्षभर, वार्ध्रीणस (गेंड्याच्या) मांसानें पितर बारा वर्षेपर्यंत तृप्त होत असतात. श्राद्धीय भोजनास बसलेल्या ब्राह्मणानें पानांत कांहीं टाकूं नये. मांसान्नाला नाकें मुरडूं नयेत व दुसऱ्या अन्नाची अपेक्षा करूं नये. जो ब्राह्मण श्राद्ध-प्रसंगीं मांस खात नाहीं, तो मेल्यावर पशु होतो.

**मधुपर्के च यज्ञे च पितृदैवतकर्मणि ।**
**अत्रैव पशवो हिंस्या नान्यत्रेत्यब्रवीन्मनुः ॥४१॥**
**एष्वर्थेषु पशून्हिंसन् वेदतत्वार्थविद् द्विजः ।**
**आत्मानं च पशुं चैव गमयत्युत्तमां गतिम् ॥४२॥**
**या वेदविहिता हिंसा नियतास्मिंश्चराचरे ।**
**अहिंसामेव तां विद्याद्वेदाद्धर्मो हि निर्बभौ ॥४४॥** —मनु अ. ५

**भावार्थः**—मधुपर्क, यज्ञ, श्राद्ध एवढ्या प्रसंगीं पशुहिंसा अवश्य आहे, इतरत्र नाहीं असें मनु म्हणतो. वरील कार्याकरितां पशुहत्या केली तर तो पशु उत्तम गतीला जातो. जी वेदविहित हिंसा आहे ती अहिंसाच समजावी.

**(२१६) मनु व मांसाहारः**—मनुस्मृतीमध्यें मांसाहारासंबंधीं पुष्कळच उलटसुलट विवेचन आलेलें आहे. त्याचें सार पुढील श्लोकांत आहे—

न मांसभक्षणे दोषो न मद्येन च मैथुने ।
प्रवृत्तिरेषा भूतानाम् निवृत्तिस्तु महाफला ॥

—मनु. अ. ५ श्लो. ५६

मांसाशन, मद्यप्राशन व मैथुन यास दोष नाहीं. ही मनुष्याची प्रवृत्ति आहे; पण निवृत्ति झाली तर ती अधिक श्रेयस्कर आहे.

प्रजापति स्मृतिकार हा मघला दुवा दिसतो. त्या वेळीं समाज मांसनिवृत्त होण्याच्या मार्गास लागलेला होता. त्या सुमारास कलिवर्ज्य-प्रकरण आदित्यपुराणांत घातलें असावें आणि मांसाहाराला कलिवर्ज्यांत ढकललेलें असावें.

गृह्यसूत्रामध्यें आणि बृहदारण्यक उपनिषदामध्येंसुद्धां विशिष्ट प्रसंगीं मांसाहार अवश्य करावा असें म्हटलेलें आहे.

(२१७) प्रजापतिकृत परिवर्तनः—प्रजापति स्मृतिकारानें मांसाच्या जागीं माष आणून मांसाहारामध्यें परिवर्तन केलें, तें असें:—

मद्यमप्यानृ (प्यमृ) तं श्राद्धे कलौ तत्तु विवर्जयेत् ।
मांसान्यपि हि सर्वाणि युगधर्मक्रमाद्भवेत् ॥१५१॥
अतो माखा(षा)न्नमेवैतन्मांसार्थे ब्रह्मणा कृतम् ।
पितरस्तेन तृप्यन्ति श्राद्धं कुर्व(र्या)न्न तद्विना ॥१५२॥
यथा बलिष्ठं मांसत्वान्माखा(षा)न्नमपि तत्समम् ।
सौगंधिकं च स्वादिष्टं मधुरं द्रव्यभेदतः ॥१५३॥
भक्ष्यं भक्षविधौ यत्तु गर्हितं तद्विवर्जयेत् ।
अभक्ष्यमपि भक्ष्यं स्याद्देशधर्मेण वै मुने ॥१५४॥ —प्रजापति.

वरील श्लोकांत प्रजापतीनें माषान्नाचा पुरस्कार मोठ्या युक्तीनें केला आहे. पूर्वी श्राद्धामध्यें मद्यही विहित होतें. परंतु तें कलीमध्यें योग्य नाहीं. मांसाहारसुद्धां कलिवर्ज्य आहे. ब्रह्मदेवानें तपश्चर्या करून माष उत्पन्न केला, त्या अन्नानें पितर तृप्त होतात. हा माष मांसाइतकाच बलिष्ठ आहे. सुगंधी, स्वादु, रुचकर आणि मधुरही आहे म्हणून तो अवश्य खावा, ज्या कालीं जें गर्हित तें टाकावें असें तो म्हणतो. लोक-

विद्विष्ट धर्म आचरूं नये असें मनूचेंही म्हणणें आहे. देशकालसापेक्ष अभक्ष्य हें भक्ष्य होतें व भक्ष्य हें अभक्ष्य होतें, असें प्रजापतीचें निर्णायक मत आहे.

**(२१८) मांसनिवृत्तीचीं कारणें:**–वरील विवेचनावरून मांसाहार एका कालीं हिंदुसमाजांत राजरोस होता, तो करण्यांत कांहीं पाप मानीत नसत. पुढें प्रजापति स्मृतिकारापासून समाज अनेक कारणांनीं मांसनिवृत्त बनला. सर्व प्राणिमात्रांत एक चैतन्य भरलेलें आहे असें तत्त्वज्ञान प्रसृत झालें, अहिंसेच्या जोरदार प्रचारामुळें आणि इतर कांहीं कारणांमुळें हिंदुसमाजांत मांसनिवृत्ति आली.

बौद्ध व जैन धर्मांच्या अहिंसेच्या जोरदार प्रचारानें समाजांत मांसनिवृत्ति आली असें समजतात तें यथार्थ नाहीं. भगवान बुद्ध सूकरमांस खात होता, याला पंचनिपातांत आधार आहे. जैनसांप्रदायांतील श्रमणहि मांसाहार करीत असें आचारांगसूत्रावरून दिसतें. बुद्धसमकालीन कांहीं तपस्वी मांसाहार निषिद्ध समजत, तर जैन श्रमणांनीं मांसाहाराचें समर्थनही केलेलें आढळतें. रस्त्यांतून जात असतांना जें मिळेल तें शाकान्न वा मांसान्न ते भक्षण करीत. भिक्षूंना व श्रमणांना निमंत्रण देऊन त्यांचेकरितां मुद्दाम कोणी मांस शिजविल्यास तें ते खात नसत. (प्रो. कौसांबीकृत भगवान् बुद्ध, उत्तरार्ध–मांसाहार प्रकरण पहा.)

**(२१९) मांसाहार व क्रौर्य:**–आज हिंदुसमाजांतील शाकाहारी लोकांनीं मांसाहार करावाच असें म्हणतां येणार नाहीं. मांसाहारानें राष्ट्र स्वतंत्र होईल असें जर कोणी म्हणेल तर चिनी लोक मांसप्रवृत्त असतांना जपान्यांच्या आधीन झालेले आहेत; आणि तुर्कस्तान मांसाहारी असूनसुद्धां कर्तृत्वाच्या दृष्टीनें जरठ झाला आहे. म्हणून मांसाहाराचा आणि स्वातंत्र्याचा अन्योन्यसंबंध नाहीं. मांसाहाराचा आणि शौर्याचा संबंध नसला तरी क्रौर्य, त्वेष व आवेश यांचा आणि मांसाहाराचा संबंध आहे. समाजधारणेला त्वेष, द्वेष, संताप व शौर्याप्रमाणें क्रौर्य यांची आवश्यकता असते. क्रौर्यामुळें कत्तली करून, दहशत बसवून देश पादाक्रांत केल्याचीं उदाहरणें इतिहासांत सांपडतात. वाघ नि बहिरीससाणा हे क्रौर्यामुळेंच दहशत बसवितात. हत्ती, गेंडा, गवा, आणि रेडा हे पशु मांसाहारी नसतांही क्रूर

असतात. तथापि रक्तमांसकर्दमाचा संबंध जितका जास्त तितकें क्रौर्यही जास्त, हें शेजारीं असलेल्या अन्य समाजांच्या अत्याचारी वृत्तीवरून उघड होतें. यास्तव क्षात्रवृत्तीच्या लोकांनीं स्वतः शिकार करून, स्वतः मारून ताजें ताजें मांस खाणें अवश्य आहे.

**(२२०) मांसाहार व वैद्यशास्त्रः**—वैद्यशास्त्रदृष्टयाही मांसाहाराची आवश्यकता आहे. वाग्भटांतील सूत्रस्थानामध्यें कोणकोणत्या ऋतूंत कोणकोणतें मांस तुष्टिपुष्टिदायक आहे याचा विचार आहे. अनेक रोगांवर आणि रोग्यांच्या दुर्बलतेवर विशिष्ट पशूंचें रक्त व मांस अनुपान म्हणून सांगितलेलें आहे. शोकपीडित, भारवाही, प्रवासी, रुक्षप्रकृति लोक, अत्यंत क्षीण, ज्यांना दुधासारखे पदार्थही पचत नाहींत असे रोगी, वातरोगी, गार्भिणी, बाळंतिणी, विशेष काबाडकष्ट करणारे इत्यादींना शक्ति व आरोग्य यांकरितां मांसाहार करण्यास सांगितलें आहे. मांस हें एक अन्न आहे. शरीरधारणेस त्याची आवश्यकता आहे. त्यांत जर शरीरपोषक द्रव्यें असतील तर तें अवश्य खाल्लें पाहिजे.

**(२२१) अवश्य तर मांसाहार कराः**—अनेक भक्ष्यभोज्य अन्नांप्रमाणें मांस हें एक अन्न आहे. तें ज्याला आरोग्यदृष्ट्या अवश्य असेल, व शक्य असेल त्यानें तें खावें. मात्र मांस खातांना जिव्हालौल्य, चैन ही वृत्ति न ठेवतां शास्त्रीय दृष्ट्या, बलदृष्ट्या शरीररक्षणार्थ व इतर वृत्तींकरितां त्याची आवश्यकता कशी आहे, याचा शास्त्रशुद्ध विचार करून तें खावें. आहाराचा विषय परिस्थितिसापेक्ष आहे. आवश्यकता व अनुकूलता यांशीं त्याचा संबंध आहे, म्हणून आहाराच्या बाबतींत नवा हिंदुधर्म सर्व हिंदूंना पूर्ण स्वातंत्र्य देतो.

**(२२२) आहार व योग्यताः**मांसनिवृत्त समाजांतील कांहीं व्यक्तींनीं गरजेप्रमाणें मांसाहार कार्यक्षमतेकरितां केल्यास त्यांत कांहीं वावगें नाहीं, आणि मांसप्रवृत्त समाजांतील कांहीं व्यक्तींनीं तो सोडला तरी कांहीं बिघडत नाहीं. यांत पापपुण्य नाहीं व श्रेष्ठकनिष्ठता नाहीं. माणसाला श्रेष्ठकनिष्ठ समजण्याचीं जीं गमकें आहेत त्यांतील आहार हें गमक नाहीं. म्हणून शाकाहारी श्रेष्ठ व मांसाहारी कनिष्ठ हा समज चुकीचा आहे. माणसाची योग्यता त्याच्या अंगच्या गुणावर अवलंबून आहे.

मांसाच्या पदार्थांना एक प्रकारचा दर्प असतो. बोटींत गेल्यावर तेथेंही माशांचा एक प्रकारचा दर्प येतो. तो शाकाहाऱ्यांना सहन होत नाहीं, हें खरें आहे. पण कांदा व लसूण यांचाही दर्प ज्यांना सहन होत नाहीं असे कांहीं लोक आहेत. हा सर्व विषय संवयीचा आहे. म्हणून केवळ दर्पामुळें श्रेष्ठकनिष्ठभाव मानण्याचें कारण नाहीं.

**(२२३) प्राणरक्षणार्थ वाटेल तें खा:**— मांसाहारांत हिंसा आहे, यास्तव तो निंद्य आहे, असा एक विचार समाजांत आहे, पण तो चुकीचा आहे. जगांत कोणीही अहिंसेनें जगूं शकत नाहीं. जगण्याकरितां थोडी तरी हिंसा करावी लागतेच. 'जीवो जीवस्य जीवनम्' असा सृष्टीचा न्याय आहे. बलवान् दुर्बलाला खातो, हें प्रत्यक्ष आहे. अगदीं अपरिग्रही संन्याशालासुद्धां हिंसेशिवाय जगतां येणार नाहीं. कारण जगणें म्हणजेच हिंसा होय! मनु म्हणतो 'प्राणस्यान्नमिदं सर्वं' म्हणजे हें सर्व चराचर प्राणाचें अन्न आहे. प्राण जावयाच्या प्रसंगीं हिंसा करूनही जगावें असें शास्त्र आहे.

**प्राणात्यये तथा श्राद्धे...खादन्मांसं न दोषभाक्॥—याज्ञ. ११।१७९**
**सर्वान्नानुमतिश्च प्राणात्यये तद्दर्शनात्। —ब्रह्मसूत्र ३, ४, २८.**

हें लक्षांत घेतलें म्हणजे अहिंसेच्या दृष्टीनें मांसाहाराला नाकें मुरडण्याचें कारण नाहीं. जंतुशास्त्राप्रमाणें व सर बोस यांच्या शोधाप्रमाणें वनस्पति, फळें, झाडें यांमध्येंसुद्धां संवेदना व जीव आहे. त्या दृष्टीनें पाहिल्यास शाकाहारीसुद्धां हिंसा करूनच जगतो असें म्हणावें लागेल.

मद्यपान आरोग्यदृष्ट्या आणि इतर दृष्टीनेंही अपायकारक असल्यामुळें तें धर्मशास्त्रदृष्ट्याही निषिद्धच आहे. प्राचीनकाळीं निरनिराळ्या प्रकारच्या सुरा म्हणजे मद्य पीत असत आणि पुढें त्यांतील दोष दिसूं लागल्यामुळें 'सर्वं मद्यमपेयं' असा निषेध रूढ झाला व तोच हल्लींच्या कालांतही इष्ट आहे.

**(२२४) मांसनिवृत्तीची अशक्यता:**—मद्यमांसनिवृत्ति ही संस्कृतीची शेवटची पायरी होय. यांना न शिवणारे पृथ्वीच्या पाठीवर फारच थोडे लोक आढळतील. पशुपक्षी हें माणसांचें अन्न नसून ते अन्य उपयोगाकरितां आहेत. चंदनाचें झाड कोळशाकरितां नसून सुगंधाकरितां असतें.

यस्तु प्राणिवधं कृत्वा मांसेन तर्पयते पितॄन् ।
सोऽविद्वांश्चन्दनं दग्ध्वा कुर्यादंगारविक्रयम् ।। —बृहत्पराशर

म्हणूनच पशुयज्ञानें स्वर्ग मिळतो ही श्रुतीची कल्पना झिडकारली गेली. सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं सारखी संवेदना असते म्हणून सर्व—भूतात्मभावाचा व अहिंसेचा जोरदार प्रचार झाला. पण इतकें होऊनही समाज पूर्णपणें निवृत्तमांस झाला नाहीं ! जगांतील इतर समाज जोंवर पाशवी वृत्तीचे रानटी असे आहेत तोंवर हिंदुसमाजाला पूर्ण मांस—निवृत्त राहाणें कठीण आहे. तथापि पंच द्राविड ब्राह्मणांनीं पूर्वपरंपरेप्रमाणें मांसनिवृत्ति राखली तर कांहीं वाईट नाहीं.

(२२५) शाकाहारांतील वर्ज्यावर्ज्यः—जुन्या धर्मशास्त्राप्रमाणें शाकाहारांतील विधिनिषेध पाळणें अशक्य आहे. अभोज्य व अभक्ष्य पदार्थांची जी यादि जुन्या धर्मशास्त्रांत आपस्तंबादि धर्मसूत्रकारांनीं व मन्वादि स्मृतिकारांनीं दिलेली आहे तींत द्राक्षें, खजुर हीं फळें, ताकांतील लोणी, हातानें घुसळलेलें दही व ताक, मध, काळे हुलगे, पावटे, हरभरे, काळ्या गोंडाचे जोंधळे, म्हशीचें दूध, शेळीचें दूध, जिला वासरूं नाहीं अशा गायीचें दूध, कांदा, लसूण, डिंक, हिंग, शिळे पदार्थ, तूप, दूध, मांस, साखर, गूळ व सातू घालून केलेले व शिळे झालेले पदार्थ, गाजर, भोकरें, दह्यांत कालविलेले सातु, पोहे, वडे, फोडणीस टाकून केलेल्या भाज्या, शेवगा, कोहाळा, समुद्रकांठचें मीठ, भोपळा, पिंपळी, मिरें, मुळा, मातीपासून बनविलेलें मीठ, मसूर, हरभरे, उडीद, देवादिकांच्या उद्देशानें न केलेलीं पक्वान्नें, हुलगे, राळे, नाचणे इत्यादि तुच्छ धान्यें, पांढरें वांगें, नारळ, दोडके, तोंडलें, चिंच, घोसाळें इत्यादि अनेक पदार्थ वर्ज्य करण्यास सांगितलेले आहेत. शाकाहारांतील निरनिराळ्या पदार्थांचें वर्गीकरण जुन्या धर्मशास्त्रांत आश्रमदुष्ट, स्थानदुष्ट, कालदुष्ट, परिग्रहदुष्ट, संसर्गदुष्ट, क्रियादुष्ट, निमित्तदुष्ट अशा तऱ्हेनें केलेलें आहे. ब्रह्मचारी, यती, संन्यासी इत्यादिकांनीं जे पदार्थ खाऊं नयेत त्यांना आश्रमदुष्ट असें म्हटलेलें आहे. अशा लोकांनीं गीतेंत सांगितलेला सात्त्विक आहार करावा. रस्य, स्निग्ध, मधुर, हृद्य, सत्त्वसंपन्न असा आहार त्यांनीं करावा हें योग्य

आहे. कारण ' आहारशुद्धौ सत्त्वशुद्धिः ' आणि ' सत्त्वशुद्धौ ध्रुवा स्मृतिः ' असें वेदांताचें तत्त्व आहे. पण एवढा हा वर्ग सोडून दिल्यास सर्व-सामान्य समाजानें स्थानदुष्ट म्हणून खानावळींतील अन्नाचा त्याग करून भागणार नाहीं. अलीकडे हॉटेलें व खानावळी यांचा प्रचार फारच होत आहे. तेथें शिळें, घाणेरडें अन्न उपयोगांत आल्यास त्याचा प्रतिकार केला पाहिजे; आणि या लोकोपयुक्त संस्था स्वच्छ, शुद्ध, पवित्र अशा प्रकारचें अन्न देतील असें कायद्यानें त्यांना भाग पाडलें पाहिजे. शिळें, घाणेरडें, ज्यांतील रस नष्ट झाला आहे व त्याला दुर्गंधी येत आहे असलें कालदुष्ट अन्न खाऊं नये, हें योग्यच होय. रोगी, घाणेरडे यांच्या हातचें अन्न हें संसर्गदुष्ट म्हणून त्याज्यच आहे. याप्रमाणें भक्ष्यभोज्य अन्नामध्यें सारासार विचार करून वागलें पाहिजे.

(२२६) निषिद्ध पदार्थांचे उल्लेखः—जुन्या धर्मशास्त्रांत पुष्कळच पदार्थ निषिद्ध म्हणून सांगितलेले आहेत. कल्पनेकरितां दोनच उतारे देतों.

भूस्तृणं सुरसं शिग्रुं पालक्यं सिंधुकं तथा ।
कूष्मांडालाबुवार्ताककोविदारांश्च वर्जयेत् ॥१९॥
पिप्पलीं मरिचं चैव तथा वै पिंडमूलकम् ।
कृतं च लवणं सर्वं वंशाग्रं तु विवर्जयेत् ॥२०॥
राजमाषान्मसूरांश्च चणकान्कोरदूषकान् ।
लोहितान्वृक्षनिर्यासान् श्राद्धकर्मणि वर्जयेत् ॥२१॥

—शंखस्मृ. अ. १४

यच्छास्त्रेषु निषिद्धं तु तत्प्रयत्नेन वर्जयेत् ।
कोद्रवं चौलकं लुब्धं यावनालं तथा सितम् ॥११०॥
निष्पावं च मसूरांश्च तुच्छधान्यानि सर्वशः ।
भुक्तं पर्युषितं रुक्षं यज्ञे कर्मणि वर्जयेत् ॥१११॥
वर्जयेदारनालं च मद्यमांससमानि च ।
निर्यासान्वर्जयेत्सर्वान् विना हिंगु च गुग्गुलम् ॥११२॥
छत्राकं मूलकं शिग्रुं करंजं लशुनं तथा ।
कुम्भीदलं च पिण्याकं श्वेतवृन्ताकमेव च ॥११३॥

आंत्रं च नालिकाशाकं नारिकेलाख्यमेव च ।
पीलुं च शणपुष्पं च भूस्तृणं भौतिकं तथा ॥११४॥
कोशातकीं बिम्बफलं मद्यमांससमानि च ।
अभक्ष्याण्यप्यशेषाणि वर्जयेद्यज्ञकर्मसु ॥११५॥
कलिंगं कतकं बिम्बफलं जन्तुफलं तथा ।
वंशांकुरमलाबुं च तालहिन्तालके फले ॥११६॥
अश्वत्थं प्लक्षनीपं च वटमारग्वधं तथा ।
कलम्पिका च निर्गुण्डी मुण्डी वार्ताकमेव च ॥११७॥
ऊषरं लवणं चैव श्वेतं च बृहतीफलम् ।
नखचर्मातकं चैव चिंचिलं चेति यत्नतः ॥११८॥

—वृद्धहारित अ. ७

(२२७) **शास्त्रांचा परस्पर विरोधः**—परिच्छेद २२५ मध्यें जी वर्ज्य पदार्थांची यादी दिलेली आहे, तीमध्यें या वचनांतील सर्व पदार्थांचीं नांवें असल्यामुळें येथें त्याची पुनरुक्ति करीत नाहीं. वृद्धहारितानें शास्त्रानें जें जें निषिद्ध म्हणून सांगितलेलें आहे तें तें सर्व वर्ज्य करावें असें ठासून सांगितलेलें आहे. तसेंच या कट्टया वैष्णव स्मृतिकाराला देवाच्या नैवेद्याला जे पदार्थ वर्ज्य म्हणून सांगितलेले आहेत तेही सर्व भोजनास त्याज्यच वाटतात! पण आज तें शास्त्र पाळणें वैद्यशास्त्रदृष्ट्या, आरोग्यदृष्ट्या व व्यवसायदृष्ट्या अशक्य आहे. धर्मशास्त्र डिंक निषिद्ध म्हणतें; पण वैद्यशास्त्र बाभळीच्या डिंकाचे लाडू अत्यंत पौष्टिक म्हणून खावयास सांगतें. कोहाळा हा धर्मशास्त्रानें अभक्ष्यांत ढकलला आहे; पण वैद्यशास्त्र कूष्मांडपाक सेवन करण्यास सांगतें. गाजर, दोडका, मुळा, वांगें, शेवगा, हुलगा या पदार्थांत आरोग्यदृष्ट्या अनेक गुण आहेत. मुळा पाचक आहे, शेवगा सारक आहे, हुलगा ज्वरघ्न आहे, गाजर, टमाटो यांमध्यें जीवनद्रव्यें अधिक आहेत. कांदा, लसूण यांचा तर निषेध धर्मशास्त्रानें पुष्कळच केलेला आहे.

(२२८) **कांदा व पुनरुपनयनः**—

पलाण्डुलशुनञ्चैव भुक्त्वा चांद्रायणं चरेत् ॥११॥—उशनस अ. ९

लशुनपलाण्डुगृञ्जन……भक्षणे च ।

………प्रायश्चित्तान्ते भूयः संस्कारं कुर्यात् ॥–विष्णु अ. १५

पलाण्डुं गृञ्जनं चैव मत्या जग्ध्वा पतेत् द्विजः ॥१९॥

–मनु. अ. ५

लशुनपलाण्डुगृञ्जनभक्षणे तप्तकृच्छ्रम् ॥ ९ ॥

पुनरुपनयनं कृच्छ्रं च ॥ १० ॥ –लघुशातातप

वरील वचनांत कांदा, लसूण व गाजर वगैरे द्विजांनीं भक्षण केलें तर त्याला प्रायश्चित्त द्यावें, तें तप्तकृच्छ्र द्यावें, आणि पुन्हां त्याचें उपनयन करावें, असें म्हटलेलें आहे.

(२२९) **वैद्यशास्त्र व लसूण**:–कांदा, लसूण, गाजर नि टमाटो या पदार्थांचे बाबतींत धर्मशास्त्र व वैद्यशास्त्र यांचा परस्पर चांगलाच विरोध आहे. हे पदार्थ धर्मशास्त्र वर्ज्य म्हणून मानतें तर वैद्यशास्त्र यांना रोगनाशक, बलवर्धक म्हणून मान्यता देतें. लसणीमध्यें मधुरादि सहा रसांपैकीं पुष्कळ रस आहेत. तिची माळ करून गळ्यांत घालावी, असें वैद्यशास्त्र सांगतें. राहूच्या घशांत अमृत जात असतां मोहिनीनें त्याचें डोकें उडविल्यावर जो रक्तमिश्रित अमृतबिंदु पृथ्वीवर पडला त्यांतून लसूण उत्पन्न झाली, असें वर्णन वैद्यकग्रंथांत आहे. धर्मशास्त्रदृष्ट्या कलंज म्हणजे पोपई व टमाटोसारखे पदार्थ जरी निषिद्ध असले तरी वैद्यशास्त्रदृष्ट्या ते आयुष्य, बल व सत्त्ववर्धक आहेत, म्हणून अवश्य खाल्ले पाहिजेत.

(२३०) **शास्त्रशुद्ध शाकाहार**:–शाकाहारामध्यें आजच्या शास्त्राच्या दृष्टीनें शोध करून सर्वसामान्य माणसांना सुलभतया मिळतील आणि भिन्न भिन्न व्यावसायिकांनाही अवश्य असे पौष्टिक, सत्त्ववर्धक, आयुष्यकारक पदार्थ खाण्याचा उपक्रम केला पाहिजे. आज सुधारलेल्या राष्ट्रांत तूप, लोणी, मध, साखर, गहूं, विशिष्ट फळभाज्या, पालेभाज्या, दूध, फळें इत्यादि पदार्थ प्रत्येक माणसाला मिळाले पाहिजेत आणि जगण्याकरितां हें अन्न अवश्य आहे, असें सांगितलें जातें व सरकार तेंच व्यवहारांत आणतें. हिंदुसमाजानें जुन्या धर्मशास्त्रांतील वर्ज्यावर्ज्यांचा विचार

अदृष्ट व अपूर्वदृष्टीनें न करतां केवळ दृष्टाकडे आणि आजच्या जीवन-कलहाकडे पाहून शास्त्रशुद्ध पद्धतीनें शाकाहार करावा.

**(२३१) सोयसिंधु व शाकाहारः**–सांप्रत हिंदुसमाजानें आहारामध्यें परिवर्तन चालविलेंच आहे. चहा, कॉफी, कोको, ओव्हलटाईन हीं पेयें धर्मसिंधूचा आधार न पाहातां केवळ सोयसिंधूच्या आधारानें आतां मान्य झालेलीं आहेत. कॉफी देवाच्या नेवैद्याला चालते, सोंवळ्या आजीबाईनासुद्धां एकादशीला चहा चालतो आणि धर्ममार्तंड वैदिकांना, पुरोहितांना, मंत्रजागरानंतर आणि धर्मकर्मांचे पूर्वी चहा अवश्य लागतो! कांहीं दिवसांपूर्वी पपई, टमाटो यांना शिवतसुद्धां नसत. आतां डॉक्टर व वैद्य त्यांची प्रशस्ति करूं लागल्यामुळें हे पदार्थही चांदीच्या वाटींतून देवाच्या नेवैद्याकडे धांवूं लागलेले आहेत! शेवगा, गाजर, कांदा, लसूण खाल्ले म्हणून कोणी प्रायश्चित्त घेत नाहीं. वांगीं सर्वकालीं मिळतात म्हणून चातुर्मास्यांतही त्यांचें निषिद्धत्व गेलें आहे. मलबारांत वांगें निषिद्ध नाहीं, कारण तें मध्वाचार्यांना आवडे. हें सर्व परिस्थितिप्राप्त म्हणून दडपणानें न स्वीकारतां विचारपूर्वक अवश्य म्हणून स्वीकारावें.

मांसान्न आणि शाकान्न यांतील भक्ष्याभक्ष्य, खाद्याखाद्य विचार हा येथपर्यंत झाला. आतां हें अन्न कोणाच्या घरचें व हातचें खावें, भोज्य कोण, अभोज्य कोण, कोणाच्या पंक्तीस बसावें व बसूं नये, सहभोजनाचा प्रसंग आणावा कीं टाळावा इत्यादि आज उपस्थित झालेल्या प्रश्नांचा विचार करणें अवश्य आहे.

**(२३२) अभोज्यांचें परिगणनः**–जुन्या धर्मशास्त्रांतील अभोज्यान्न लोकांची यादी पाहूं लागलों तर आपस्तंब सुमारें पंचविसांचीं नांवें देतो. पुढें गौतम, वसिष्ठ, शंख इत्यादींनीं त्यांत भर घातलेली आहे, आणि याज्ञवल्क्यस्मृतींत जवळ जवळ पन्नासांची यादी आहे, ती अशीः–

चिक्कू माणूस, कैदेंत पडलेला, चोर, नपुंसक, नट, बुरुड, पातकी, व्याजबट्टा करणारा, गणिका, दीक्षित, बहुयाजक, वैद्य, रोगी-रागीट, व्यभिचारिणी, विद्या व द्रव्य यांनीं उन्मत्त, क्रूर, उग्र, पतित, व्रात्य, दांभिक, उच्छिष्टभोजी, पति व पुत्ररहित स्त्री, सोनार, स्त्रैण, गांव,

जोशी, शस्त्रविक्रयी, लोहार, सुतार, कोष्टी, हलकीं कामें करणारा, निर्दयी राजा, परीट, कृतघ्न, पदजीवि (मांग), रंगारी, मद्यविक्रयी, भाट, जारास आश्रय देणारा, टवाळखोर, खोटें बोलणारा, तेली, कुंभार, गाडीवान, वहानाचा धंदा करणारा, स्तुतिपाठक, सोमविक्रेता इत्यादींचे घरीं जेवूं नये.

हे अभोज्यान्न लोक ब्राह्मणांपैकीं असावेत असें म्हटलें तर वरील सर्व प्रकारच्या धंद्यांत ब्राह्मण शिरले होते, असें म्हणावें लागतें. हे अभोज्यान्न लोक ब्राह्मण नसून त्रैवर्णिक होते असें म्हटलें तर इतक्या सर्वांकडे ब्राह्मण व इतरही भोजनास जात येत असावेत.

**(२३३) भोज्यान्न शूद्रः**—पूर्वीं एक काळ असा दिसतो कीं शूद्र हा त्रैवर्णिकापेक्षां संस्कृतीनें व इतर सर्व प्रकारानें फारच हीन होता. पण पुढें हळुहळू त्याचा संबंध अधिक येऊं लागला व शूद्रापैकीं कांहींच्या घरीं भोजनास जाण्यास हरकत नाहीं असें शास्त्र निघालें.

शूद्रेषु दासगोपालकुलमित्रार्धसीरिणः ।
भोज्यान्ना नापितश्चैव यश्चात्मानं निवेदयेत् ॥

—याज्ञवल्क्य १–१६६

**भावार्थः**—दास, गुराखी, कुलमित्र, अर्धेलीनें शेती करणारा, व न्हावी हे भोज्यान्न होत. ज्यांचा संबंध अधिक येऊं लागला त्यांच्या घरचें अन्न ग्रहण करणें योग्य आहे, असें त्या वेळीं दिसलें म्हणून त्रैवर्णिकांत जसें भोजनप्रतिभोजन होत असे, तसेंच चातुर्वर्ण्यांतही तें परस्पर होऊं लागलें. बुद्धोत्तरकालांत कलिवर्ज्यांच्या कल्पनेनें आणि इतर कारणांनीं हा व्यवहार बंद झाला आणि हिंदुसमाजांत भेटीबंदी, लोटीबंदी, रोटीबंदी व बेटीबंदी अस्तित्वांत येऊन हिंदुसमाजांतील ऐक्याचा आणि दळणवळणाचा मोठा मार्ग बंद पडला.

**(२३४) सहभोजनाचें महत्त्वः**—सांप्रत दळणवळणाचीं साधनें, लोकांच्या आकांक्षा व इतर व्यवहार वाढल्यामुळें माणसांना अनेक ठिकाणीं जावें लागतें. जगांतील सर्व उलाढाली लक्षांत घेतां हिंदु माणसें निरनिराळ्या देशांत जितकीं अधिक जातील तितकीं जावयास पाहिजेत. यास्तव समष्टिधर्माचे दृष्टीनें पूर्वींचीं खानपानाचीं बंधनें शिथिल केलीं

पाहिजेत. आज अनेक कार्यांनिमित्त संमेलनें, सभा, परिषदा भरत आहेत. अखिल हिंदुसमाजांत समानसंस्कृति उत्पन्न होऊं लागली आहे. यान, आसन, अशन, गमन व भाषण हीं सर्व संस्कृतिप्रसाराचीं साधनें आहेत. उत्सव, सभा संमेलनें, यात्रा व समारंभ हे सर्व सामुदायिक प्रसंग आहेत. याप्रसंगीं माणसें विशिष्ट कार्याकरितां येत असतात. अशा प्रसंगीं समष्टिधर्म म्हणून अखिल हिंदूंचें एकपंक्तिभोजन अवश्य झालें पाहिजे. माणसाला कामाकरितां जगावयाचें असतें व जगण्याकरितां जेवावें लागतें. जेवण हें या दृष्टीनें गौण असलें तरी समाजांत बल वाढण्याची व सांस्कृतिक ऐक्य उत्पन्न होण्याचीं जीं साधनें आहेत, त्यांतील भोजन हें एक महत्त्वाचें अंग आहे; यास्तव अखिल हिंदूंनीं उच्चनीचपणाच्या व स्पृश्या-स्पृश्यत्वाच्या कल्पना विसरून एका पंक्तींत बसून भोजन करणें म्हणजे समतेची प्रचंड गर्जनाच होय!

**(२३५) समतेची गर्जनाः**—या समतेच्या गर्जनेला पोषक आणि नव्या हिंदुधर्माला साहाय्यक असा निर्णय परिवर्तनवादी पंडितांनीं दिला आहेः—

'हिंदूंतील कोणत्याही वर्गाच्या किंवा पोटजातीच्या व्यक्तींशीं सामुदायिक प्रसंगीं एकपंक्तिभोजन दोषावह नाहीं. मात्र शाकाहाऱ्यानें शाकाहारच ग्रहण करावा.'

**संभोजनं संकथनं संप्रश्नोऽथ समागमः ।**
**एतानि ज्ञातिकार्याणि न विरोधः कदाचन ॥**

—महाभारत ५।६४।११

भोजनप्रतिभोजन, संभाषण, सहवास हीं सर्व समाजामध्यें व ज्ञातीमध्यें एकोपा उत्पन्न करणारीं साधनें आहेत. यामुळें असलेला विरोधही नष्ट होतो. यास्तव समष्टिधर्म म्हणून सहभोजन अत्यावश्यक आहे.

**(२३६) एका आक्षेपाला उत्तरः**—सहभोजन हा एवढाच आतां पुरुषार्थ राहिला आहे, तो करून सब्रगोलंकार केला म्हणजे कृतकृत्यता झाली असें टवाळीनें कांहीं लोक म्हणतात; परंतु ज्यांना आजवर माणुसकीची वागणूक मिळाली नाहीं, त्यांना सहभोजनामुळें जो आनंद होतो, त्याची कल्पना 'जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे' अशीच आहे. वस्तूच्या अभावीं

वस्तूची किंमत कळते. सहभोजनाचें महत्त्व स्पृश्यांना वाटत नसलें तरी तें अस्पृश्यांना फार वाटतें. सामुदायिक सहभोजनें होऊं लागलीं कीं, सबगोलंकार होईल ही भीति व्यर्थ आहे. त्यामुळें समाजसंघटनेला चांगलें साह्य होईल.

**(२३७) सहभोजनांत पाप नाहीं:**–नव्या हिंदुधर्माप्रमाणें हिंदु-समाजांत जन्मजात उच्चनीचता नाहीं आणि अस्पृश्यता तर नाहींच नाहीं. म्हणून अखिल हिंदूंशीं एकपंक्तिभोजन करण्यांत पाप तर मुळींच नाहीं, पण समष्टिधर्मदृष्ट्या समाजसंघटनेचें पुण्यही आहे. सहभोजन म्हणजे एका ताटांत जेवणें नव्हे. कारण तो प्रकार घाणेरडा आहे. एका पंक्तीस जेवणें म्हणजे सहभोजन होय. समान संस्कृतीच्या, समान ध्येयाच्या, समान आचाराच्या हिंदूंनीं समष्टिधर्म म्हणून एकपंक्तिभोजन अवश्य करावें. सामुदायिक भोजनप्रसंगीं अन्नाची, स्थलाची व पात्राची शुद्धता व स्वच्छता यांची अतिशय काळजी घ्यावी. स्वयंपाकी व वाढपी हे स्वच्छ, कुशल व निरोगी असावेत. आपल्या आसपास क्वचित् आपल्यास प्रशस्त न वाटणारा असा मनुष्य जर चुकून भोजनास बसला तर दुसऱ्याची भावना न दुखवितां, दुसऱ्याला न कळतां, समष्टिधर्म न बिघडवितां पंक्तिदोष टाळण्याचा व पंगत तोडण्याचा मार्ग जुन्या धर्मशास्त्रानेंही सांगितलेला आहे.

**(२३८) पंक्तिदोष व प्रायश्चित्तः—**

अग्निना भस्मना वाऽपि स्तंभेन सलिलेन च ।
द्वारेण चापमार्गेण पंक्तिभेदो बुधैः स्मृतः ॥ –बृहस्पति
उदकं च तृणं भस्म द्वारं पंथास्तथैव च ।
एभिरंतरितं कृत्वा पंक्तिदोषो न विद्यते ॥ –हारित

**भावार्थः**–दोन पाटांमध्यें अग्नि ठेवला किंवा मध्यें खांब आलेला असला, पाण्याचा शिडकाव केला, एखादें दार मध्यें आलें किंवा वाढण्याची वाट मध्यें आली म्हणजे पंगत तुटते व पंक्तीचा दोष लागत नाहीं. यास्तव शास्त्राला धरून पंक्तीला घातलेली रांगोळी पुसून किंवा वेगळी रांगोळी काढून पंगत झाली असें मानण्याची रीत ग्वाल्हेरकडे आहे.

जुन्या धर्मशास्त्रानें जर वरीलप्रमाणें इतकी सवलत दिलेली आहे तर नवा हिंदुधर्म असें सांगतो कीं अखिल हिंदूंनीं विविध प्रसंगीं एकपंक्तिव्यवहार करण्यांत महान पुण्य आहे. त्यामुळें संघटनेस साह्य होतें.

**(२३९) सहभोजनांतील स्वयंपाकः**–अखिल हिंदूंच्या सामुदायिक सहभोजनामध्यें शाकाहार असावा. मांसाहाऱ्यांना शाकाहार चालतो. पण शाकाहाऱ्यांना मांसाहार चालू शकत नाहीं. म्हणून शाकाहाराचा पाक असतांना अखिल हिंदूंनीं एका पंक्तीस बसून भोजन करण्याचा आचार अधिकाधिक रूढ करावा. तसें करणें हा समष्टिधर्म आहे.

**(२४०) कोणाकडे जेवावें ?ः**–प्रत्येक व्यक्तीला नव्या हिंदुधर्माप्रमाणें व्यक्तिस्वातंत्र्य आहे. म्हणून त्यानें आपल्या घरीं कोणाच्या पंक्तीस भोजनास बसावें, कोणास भोजनास बोलवावें, हा त्याचा वैयक्तिक प्रश्न आहे. त्या बाबतींत जो तो स्वतंत्र आहे. परंतु भोजनप्रतिभोजनाचे प्रसंग शेजारधर्म म्हणून, व्यावसायिक क्षेत्र एक म्हणून आणि समानशील म्हणून पूर्वीपेक्षां अधिक येत आहेत. अशा वेळीं समान आहार असल्यास भोजनप्रतिभोजन हिंदूंमध्यें व्हावें. कोणाच्या हातचें व कोणाच्याकडे खावें यासंबंधानें आपस्तंबानें 'क आश्यान्नः' असा प्रश्न करून निरनिराळीं मतें देऊन शेवटीं दिलेला निर्णय आजही मान्य होण्याजोगा आहे.

**'पुण्यस्येप्सतो भोक्तव्यम् । पुण्यस्यानीप्सतो न भोक्तव्यम् ।**
**यतः कुतश्चाभ्युद्यतं भोक्तव्यम् ।'**

पवित्र व मनापासून अन्न देणाऱ्याच्या हातचें खावें, पण मनापासून न देणाऱ्याच्या हातचें खाऊं नये, प्रसंगीं तर कोणीही आणून देईल तें खावें.

**(२४१) भोजनास कोणास बोलवावें**ः–प्रत्येक हिंदूला व्यष्टिधर्म म्हणून निरनिराळ्या प्रसंगीं अनेकांना भोजनास बोलावण्याचा प्रसंग येतो. पुण्यसंपादनाच्या दृष्टीनें जो भोजनसमारंभ होईल त्यांत त्या व्यक्तीला पूर्ण स्वातंत्र्य आहे. उपनयन, विवाह, बारसें, उत्तरक्रिया, जयन्ति, उत्सव अशा प्रसंगीं प्रत्येकानें अखिल हिंदूंतील आपले जे जे परिचित, स्नेही, मित्र, समव्यवसायी असतील त्या सर्वांना अवश्य भोजनास

बोलवावें आणि एकपंक्ति भोजन करावें. अशा या धार्मिक समारंभांत विधर्मी, विदेशी यांचा संबंध आवर्जून टाळावा. सार्वजनिक उत्सव, हिंदुसभादि सामुदायिक प्रसंग, सण या प्रसंगीं अखिल हिंदूंचें सहभोजन व्हावें.

(२४२) खाऊनपिऊन बाटत नाहीं:–अमक्याच्या हातचें नि घरचें खाल्लें कीं हिंदु मनुष्य बाटतो ही चुकीची समजूत हिंदुसमाजामध्यें आहे. एकदां मनुष्य हिंदु म्हणून जन्माला आला कीं तो कुणाचेही पंक्तीला बसून, कुणाच्याही हातचें व घरचें खाऊन कशानेंही बाटत नाहीं. तर तो या जन्मींच नव्हे तर जन्मोजन्मीं हिंदु राहातो, असें नव्या हिंदुधर्माचें तत्त्व आहे. हिंदुराष्ट्राच्या उद्धाराकरितां हिंदुतरुणांनीं आज जगांत वाटेल तिकडे जावें. जेथें जेथें जी विद्या, ज्या राष्ट्रांत जें शास्त्र व जें ज्ञान असेल तें सर्व संपादन करून पचवून हिंदुराष्ट्राला त्यांनीं शास्त्रसंपन्न नि शस्त्रसंपन्न करावें. हिंदु तरुणांनीं खाण्यापिण्याची आडकाठी मनांत मुळींच न आणतां परदेशांत जेथें जें मिळेल व जेथें जें सुलभ असेल, जें प्रकृतीला मानवेल तें शाकान्न असो वा मांसान्न असो, तें विधर्मीय असो वा विदेशीय असो, तें सर्व खाऊन, पचवून, पुष्ट होऊन हिंदुराष्ट्राला त्यांनीं बलिष्ठ करावें.

येथवर व्यवहारांत ज्याला आज धर्माचें मुख्य अंग समजतात त्यांतील जात, जेवण, धंदा नि शिवाशीव अशा विषयांचा ऊहापोह केला. आतां विवाह व तदनुषंगिक विषयांचा विचार पुढील भागांत करतों.

—*—

# भाग तिसरा

# विवाहविचार

## प्रकरण सतरावें

### चार आश्रम व सर्वश्रेष्ठ गृहस्थाश्रम

(२४३) **वर्ण व आश्रम यांचे संबंधः**—वर्णाश्रम हें जुन्या हिंदु धर्माचें वैशिष्ट्य आहे. पैकीं वर्णव्यवस्थेचा विचार अकराव्या प्रकरणांत केला. प्रस्तुत चार आश्रम व सर्वश्रेष्ठ जो गृहस्थाश्रम त्याचें विवेचन करावयाचें आहे.

व्यक्ति व समष्टि यांचा जो संबंध तोच वर्ण व आश्रम यांचा आहे. एकेक वृक्ष मिळून वन होतें, एकेक जलबिंदु मिळून जलाशय होतो, तद्वत् एकेक व्यष्टि मिळून समष्टि होते. समाजाचा घटक या नात्यानें जें कर्तव्य तो वर्णधर्म, नि स्वतंत्र व्यक्ति या नात्यानें जें कर्तव्य तो आश्रमधर्म होय.

(२४४) **आश्रमव्यवस्थेचा उद्देशः**—चार आश्रम, चार वर्ण, चार पुरुषार्थ या कांहीं कोणीकडून जुळविलेल्या गोष्टी नव्हेत. धर्म, अर्थ, काम, मोक्ष, धारणा, संग्रह, सत्ता, नि उपभोग व शेवटीं या सर्वांपासून अलिप्त राहणें या वृत्ति मनुष्यांत जन्मसिद्ध असतात. मानवी अंतःकरणांत या ज्या निरनिराळ्या प्रवृत्ति, इच्छा असतात, त्यांना यथोचित मार्गी लावून देणें, व्यक्तीच्या उन्नतीला पूर्ण वाव देऊन मनुष्याच्या नैसर्गिक प्रवृत्तीचा विकास करणें, हें कार्य पूर्वी आश्रमव्यवस्थेच्या द्वारें होई. आश्रम म्हणजे राहण्याची पद्धति.

(२४५) **आयुष्याची वांटणीः**—मनुष्याचें आयुष्य साधारणतः (शतायुर्वै पुरुषः) शंभर वर्षें आहे. शंभर वर्षें जगावें, विजयी व्हावें,

पुरुषार्थी व्हावें अशा प्रार्थना वैदिक वाङ्मयांत आहेत. आशीर्वादही अशा अर्थांचे आहेत. (ऋग्वेद १०, १६१, ४) 'शतं जीव शरदो वर्धमानः शतं हेमन्तान् शतम् वसन्तान्' 'तूं शंभर वर्षें उत्कर्षानें जग' शंभर वर्षांच्या आयुष्याचे चार भाग केले म्हणजे प्रत्येक आश्रमाला पंचवीस वर्षें मिळतात. पहिल्या पंचविशींत विद्यार्जन, पुढच्या पंचविशींत गृहस्थाश्रम, तिसऱ्या पंचविशींत वानप्रस्थाश्रम व शेवटचीं पंचवीस वर्षें चतुर्थाश्रमाकरितां असें हें अर्वाचीन वर्गीकरण आहे. दोन आश्रम प्रपंचाचे व दोन परमार्थाचे. पहिले दोन आश्रम अभ्युदयाकरितां तर दुसरे दोन निःश्रेयसाकरितां अशी प्रवृत्ति–निवृत्तीची सांगड होती. पण बौद्धक्रांतीपासून चतुर्थाश्रमाचें महत्त्व वाढलें नि यति, संन्यासी, भिक्षु आणि निवृत्तिमार्गी साधू हे समाजाचे आदर्श बनले! ब्राह्मणग्रंथांत, स्मृतिग्रंथांत, पुराणांत, वेदांतग्रंथांत चार आश्रमांचें वर्णन, नियम, विधि व निषेध पुष्कळच आलेले आहेत. ते सर्व येथें न देतां सामान्यतः आश्रमांची वेदकालापासून कल्पना देतों.

(२४६) **वैदिक वाङ्मय व आश्रमः**–प्राचीन वैदिक वाङ्मयावरून असें दिसतें कीं आश्रमकल्पनेचा प्रादुर्भाव ब्राह्मणकालांत झाला. वेदांत वानप्रस्थ व संन्यास हे शब्द नाहींत. यति हा शब्द जादुगार, जादुटोणा करणारा अशा कुत्सित अर्थानें आलेला आहे. इंद्रानें यतींना लांडग्यापुढें टाकलें. ( इन्द्रो यतीन्सालावृकेभ्यः प्रायच्छत् । तै. सं. ६, २, ९, ५ ). ऋग्वेदांत गार्हपत्य हा शब्द गृहस्थाश्रम अशा अर्थी आलेला आहे. ( गृह्णामि ते सौभगत्वाय हस्तं......गार्हपत्याय देवाः । ऋ. १०,८५,३६ ). अथर्ववेदांत ब्रह्मचर्याची स्तुति आहे. शतपथ ब्राह्मणांत ( ११,५,४ ) 'ब्रह्मचर्यमागाम्' म्हणजे मी ब्रह्मचर्याप्रत प्राप्त झालों, असा उल्लेख आहे. त्यावरून त्या कालीं हे दोनच आश्रम असावेत.

छांदोग्योपनिषदामध्यें तीन आश्रमांचे दर्शक असे तीन स्कंध म्हणजे धर्मसमुच्चय सांगितलेले आहेत ( २, २३, १ ). त्यांतील 'यज्ञोऽध्ययनं दानमिति प्रथमः, तप एव द्वितीयः, ब्रह्मचार्याचार्यकुलवासी तृतीयः–ब्रह्मसंस्थोऽमृतत्वमेति' पहिला गृहस्थ, दुसरा तापस म्हणजे वानप्रस्थ, तिसरा ब्रह्मचारी व चवथा ब्रह्मसंस्थ म्हणजे परिव्राट्. बृहदारण्यकोपनिषदांत

प्रव्रज्याश्रमाचा उल्लेख आहे. जाबालोपनिषदांत 'ब्रह्मचर्यं परिसमाप्य गृही भवेत्। गृही भूत्वा वनी भवेत्। वनी भूत्वा प्रव्रजेत्। यदि वा इतरथा ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेत् गृहाद्वा वनाद्वा।–यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत्।' ब्रह्मचर्य संपल्यावर गृहस्थ व्हावें, नंतर वानप्रस्थ व्हावें व शेवटीं प्रव्रज्या घ्यावी किंवा ब्रह्मचर्यानंतर लगेच परिव्राट् व्हावें, नाहीं तर गार्हस्थ्यानंतर किंवा वनानंतर संन्यास आहेच." ज्या दिवशीं वैराग्य उत्पन्न होईल त्या दिवशींच कोणत्याही अवस्थेंतून सर्वसंगपरित्याग करावा. (जा. उ. ४) ऐतरेय ब्राह्मणांत चारी आश्रमांचा प्रथम उल्लेख सांपडतो. 'किन्नु मलं किमजिनं किमु श्मश्रूणि किं तपः' (ऐ. ब्रा. ३३, ११) यांतील अजिन, श्मश्रु व तप हे शब्द ब्रह्मचर्य, संन्यास व वानप्रस्थ यांचे दर्शक होत.

'यावज्जीवं अग्निहोत्रं जुहुयात्' आजन्म अग्निहोत्रच पाळावें अशा दंडकाचे वेळीं संन्यासाश्रम नसावा. एकंदरींत चार आश्रमांची व्यवस्था ब्राह्मणकालीं झाली असावी व तिला स्मृतिकालामध्यें व्यवस्थित स्वरूप मिळालें असावें. चारी आश्रमांचा अधिकार चारही वर्णांना होता, असा उल्लेख महाभारत शान्तिपर्वामध्यें (अ. ६१ श्लो. १२–१४) सांपडतो. पुढें योगी याज्ञवल्क्यानें आणि कांहीं पुराणांत व निबंधग्रंथांत ब्राह्मणाला चार, क्षत्रियाला तीन, वैश्याला दोन व शूद्राला एक असे आश्रम सांगितलेले आहेत. पण ही विभागणी तर्कशुद्ध नाहीं.

**(२४७) आश्रमासंबंधीं तीन पक्षः**–आपस्तंबादि धर्मसूत्रकार व मन्वादि स्मृतिकार चार आश्रमांबद्दल काय म्हणतात हें पाहिलें तर कोणी समुच्चय, कोणी विकल्प तर कोणी बाधपक्षाचा स्वीकार करतात असें दिसतें. चारही आश्रम अवश्य आहेत असें मनु, गौतम, दक्ष वगैरे सांगतात. पण ते गृहस्थाश्रमाची थोरवी वर्णन करितात. सर्व आश्रम सारख्याच योग्यतेचे आहेत, मात्र सर्वांचें पालन यथाशास्त्र झालें पाहिजे, असें आपस्तंब म्हणतो. गृहस्थाश्रम न स्वीकारतां ब्रह्मचर्यांतूनच वानप्रस्थ व संन्यास घेतां येतो असें कित्येक स्मृतिकार प्रतिपादतात. क्रमानें या सर्व आश्रमांतून जाणें हा समुच्चयपक्ष. ज्या दिवशीं वैराग्य उत्पन्न होईल त्याच दिवशीं वाटेल त्या आश्रमांतून चतुर्थाश्रम घेणें हा विकल्पपक्ष होय. बाधपक्षीय स्मृतिकार ब्रह्मचर्य व गृहस्थाश्रम एवढे दोनच आश्रम मानतात. बाकीचे

दोन आश्रम हे अंध, पंगु, दुर्बल, संसाराला नालायख यांच्याकरितां आहेत, असें त्यांचें मत आहे. बौधायनानें वानप्रस्थाची प्रशंसा इतकी केली आहे कीं तो सत्तराव्या वर्षीच संन्यासाश्रमाला परवानगी देतो. बौद्ध-कालीन स्मृतिकार तृतीय व चतुर्थ आश्रमाचें महत्त्व फार सांगतात.

**(२४८) आजचा ब्रह्मचर्याश्रमः**—बहुतेक स्मृति व सूत्रें यांमध्यें ब्रह्मचर्याश्रमाचें वर्णन आलेलें आहे. त्यांत विद्यार्थ्यांनीं कसें वागावें, केव्हां उठावें, कसें बसावें, कशी भिक्षा मागावी, कोणते अनध्याय पाळावेत, गुरूची सेवा कशी करावी इत्यादि विषयांचें विवेचन पुष्कळ आहे. आज तें कांहीं उपयोगी नाहीं. कारण त्या काळापासून आपण फार दूर आलों आहों. आज ब्रह्मचारी गुरुगृहांत जात नाहींत, भिक्षा मागून विद्याभ्यास करूं शकत नाहींत. पादत्राणें घालूं नयेत, छत्र्या घेऊं नयेत असले नियम ते पाळूं शकत नाहींत. पूर्वकालीन ब्रह्मचर्याश्रमांतील सर्व नियमांची चिकित्सा करून त्यांना विद्यार्थी-दशेंतील एक शिस्त असें नांव देणें योग्य होईल. आजही विद्यार्जना-करितां तशी शिस्त पाहिजेच आहे. आज जगांत जीं उत्कृष्ट विद्यापीठें आहेत व ज्यांतून लक्षावधी विद्वान्, शास्त्रज्ञ व शोधक निपजत आहेत, जेथें बुद्धिबल, शरीरबल, शिस्त व शील यांचें शिक्षण आज मिळत आहे, त्या विद्यापीठांचें, त्या विद्यालयांचें, त्या विद्यासाधनांचें अनुकरण आजच्या हिंदु तरुणांनीं अवश्य केलें पाहिजे.

**(२४९) ज्ञानसंपादनाचें व्रतः**—ब्रह्म म्हणजे ज्ञान, त्याच्या प्राप्ती-करितां जें व्रत पाळणें तो ब्रह्मचर्याश्रम होय. आजच्या कालांतही ज्ञानार्जनार्थ व्रतपालनाची अवश्यकता आहे. हिंदु तरुणांनीं व्रतशील राहून जगांतील ज्ञानें आत्मसात् केलीं पाहिजेत. पायांत जोडे घाला वा बूट घाला, डोक्यावर छत्र्या धरा वा सूर्यटोप्या घाला, झाडावर चढा वा गिरिशिख-रावर चढा, कोणत्याही परिस्थितींत जाज्वल्य देशाभिमानी व्हा, बळकट व्हा व ज्ञानसंपन्न व्हा असें नवा हिंदुधर्म हिंदु तरुणांना सांगतो. ( यासंबंधाचें विवेचन " **नवयुग विद्यार्थीधर्म** " या आमच्या पुस्तकांत आहे. विद्यार्थ्यांनीं तें पुस्तक समग्र वाचावें ). कोणत्याही परिस्थितींत जे नियम विद्यार्थ्यांनीं पाळणें अवश्य आहे तेवढे आपस्तंब धर्मसूत्राधारें देतों.

**(२५०) सर्वसामान्य नियमः–**

( १ ) अनृत्तदर्शी–अश्लील, अचकटविचकट नृत्य न पाहणारा.
( २ ) सभासमाजांश्चागंता–वाईट लोकांच्या संगतींत न जाणारा.
( ३ ) अजनवादशीलः–टवाळी न करणारा.
( ४ ) रहःशीलः–अभ्यासार्थ एकांत सेवन करणारा.
( ५ ) स्त्रीषु यावदर्थसंभाषी–तरुण स्त्रियांशीं कामापुरतें बोलणारा.
( ६ ) मृदुः–निगर्वी.
( ७ ) शान्तः–शांत.
( ८ ) दान्तः–आत्मसंयमी.
( ९ ) ह्रीमान्–विनयी.
(१०) दृढधृतिः–धैर्यशाली.
(११) अग्लास्नुः–उत्साही.
(१२) अक्रोधनः–निग्रही.
(१३) अनसूयुः–निर्मत्सरी.

**(२५१) गृहस्थाश्रमाची थोरवीः**–चार आश्रमापैकीं गृहस्थाश्रम हाच मुख्य आश्रम आजच्या कालांतही आहे. हिंदुसंस्कृति गृहस्थ–प्रधान आहे. गृहस्थाश्रमापासून हिंदूधर्माला प्रारंभ होतो. गृहापासून कुटुंबसंस्था व समाजसंस्था यांचा उद्‌भव होतो. समाजाचें केंद्र गृह व गृहाचें केंद्र गृहिणी या दृष्टीनें गृहस्थाश्रमाचें व गृहिणीचें महत्त्व फार आहे. मध्यंतरीं त्याला संन्यासाश्रमाच्या आक्रमणामुळें निस्तेजता आली. आज नवा हिंदुधर्म अखिल हिंदुसमाजाला आपापले सर्वश्रेष्ठ गृहस्थाश्रम अधिक सतेज, अधिक संपन्न, अधिक कार्यक्षम व अधिक स्वाभिमानी करा, असा उपदेश करतो. व्यक्ति, कुटुंब, समाज, राष्ट्रसंबंध जीं विविध कर्तव्यें आहेत त्यांनाच तीन ऋणें अशी पूर्वकालीं संज्ञा होती. तीं फेडण्याकरितां जन्म आहे, कर्तव्याकरितां नरदेह आहे, नागरिकत्व, मनुष्यत्व, बंधुत्व या सर्वांचा विकास होण्यास गृहस्थाश्रम हीच संस्था योग्य आहे. विवाहसंस्था नसावी, अवश्य तेवढीं मुलें उत्पन्न करावीं, त्यांची जोपासना सरकारनें करावी इत्यादि एकांतिक मतें सांगावयाला व ऐकावयाला गंमतीदार वाटलीं तरी तीं टिकाऊ नाहींत. गृहस्थाश्रम ही संस्था निसर्गाला धरून आहे.

यास्तव नैसर्गिक अशा या गृहस्थाश्रमाचें वर्णन निरनिराळ्या स्मृतिकारांच्या शब्दांत देतों.

(२५२) स्मृतींतील आधारः—

चत्वार आश्रमा गार्हस्थ्यमाचार्यकुलं मौनं वानप्रस्थ्यमिति ॥१॥
तेषु सर्वेषु यथोपदेशमव्यग्रो वर्तमानः क्षेमं गच्छति ॥२॥

—आपस्तंब (२–९–२१)

तस्याऽऽश्रमविकल्पमेके ब्रुवते ॥१॥
ऐकाश्रम्यं त्वाचार्याः प्रत्यक्षविधानाद्गार्हस्थ्यस्य गार्हस्थ्यस्य ॥३५॥

गौतम अ. ३

ऐकाश्रम्यं त्वाचार्या अप्रजनत्वादितरेषाम् ॥२९॥
जायमानो वै ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणैर्वा जायते ।
ब्रह्मचर्येणर्षिभ्यो यज्ञेन देवेभ्यः प्रजया पितृभ्य इति ॥४१॥

—बौधायन प्र. २ अ. ६

गृहस्थ एव यजते गृहस्थस्तप्यते तपः ।
चतुर्णामाश्रमाणां तु गृहस्थस्तु विशिष्यते ॥१४॥
यथा नदीनदाः सर्वे समुद्रे यान्ति संस्थितिम् ॥१५॥
यथा मातरमाश्रित्य सर्वे जीवन्ति जन्तवः ।
एवं गृहस्थमाश्रित्य सर्वे जीवन्ति भिक्षवः ॥१६॥ —वसिष्ठ अ. ७
सा भार्या या गृहे दक्षा सा भार्या या पतिव्रता ।
सा भार्या या पतिप्राणा सा भार्या या प्रजावती ॥१५॥
लालनीया सदा भार्या ताडनीया तथैव च ।
ताडिता लालिता चैव स्त्री श्रीर्भवति नान्यथा ॥१६॥

—शंखस्मृति अ. ४

यथा वायुं समाश्रित्य वर्तन्ते सर्वजन्तवः ।
तथा गृहस्थमाश्रित्य वर्तन्ते सर्व आश्रमाः ॥७७॥
यस्मात् त्रयोऽप्याश्रमिणो ज्ञानेनान्नेन चान्वहम् ।
गृहस्थेनैव धार्यन्ते तस्माज्ज्येष्ठाश्रमो गृही ॥७८॥ —मनु. अ. ३

ऋणानि त्रीण्यपाकृत्य मनो मोक्षे निवेशयेत् ।
अनपाकृत्य मोक्षं तु सेवमानो व्रजत्यधः ॥३५॥
ब्रह्मचारी गृहस्थश्च वानप्रस्थो यतिस्तथा ।
एते गृहस्थप्रभवाश्चत्वारः पृथगाश्रमाः ॥८७॥
सर्वेऽपि क्रमशस्त्वेते यथाशास्त्रं निषेविताः ।
यथोक्तकारिणं विप्रं नयन्ति परमां गतिम् ॥८८॥
सर्वेषामपि चैतेषां वेदस्मृतिविधानतः ।
गृहस्थ उच्यते श्रेष्ठः स त्रीनेतान्बिभर्ति हि ॥८९॥
यथा नदीनदाः सर्वे सागरे यान्ति संस्थितिम् ।
तथैवाश्रमिणः सर्वे गृहस्थे यान्ति संस्थितिम् ॥९०॥

—मनु. अ. ६

यत्रानुकूल्यं दम्पत्योस्त्रिवर्गस्तत्र वर्धते ॥७४॥—याज्ञवल्क्य अ. ३

अनाश्रमी न तिष्ठेच्च क्षणमेकमपि द्विजः ।
आश्रमेण विना तिष्ठन्प्रायश्चित्तीयते हि सः ॥१०॥—दक्ष अ. १
देवैश्चैव मनुष्यैश्च तिर्यग्भिश्चोपजीव्यते ।
गृहस्थः प्रत्यहं यस्मात्तस्माच्छ्रेष्ठो गृहाश्रमी ॥५७॥
त्रयाणामाश्रमाणां च गृहस्थो योनिरुच्यते ।
सीदमानेन तेनैव सीदन्तीहेतरे त्रयः ॥५८॥
मूलेनैकेन नष्टेन सर्वमेव विनश्यति ॥५९॥
तस्मात्सर्वप्रयत्नेन रक्षणीयो गृहाश्रमी ।
राज्ञा चान्यैस्त्रिभिः पूज्यो माननीयश्च सर्वदा ॥६०॥
गृहस्थोऽपि क्रियायुक्तो न गृहेण गृही भवेत् ।
तथैव पुत्रदारैश्च स्वकर्मपरिवर्जितः ॥६१॥
दया लज्जा क्षमा श्रद्धा प्रज्ञा त्यागः कृतज्ञता ।
एते यस्य गुणाः सन्ति गृहस्थो मुख्य उच्यते ॥६७॥

—दक्ष अ. २

संध्या स्नानं जपो होमः स्वाध्यायो देवतार्चनम् ।
वैश्वदेवस्तथाऽऽतिथ्यमुद्धृतं चापि शक्तितः ॥९॥

कृत्वैवं नव कर्माणि सर्वकर्मा भवेन्नरः ॥१०॥ –दक्ष अ. ३

गृहाश्रमात्परं नास्ति यदि भार्या वशानुगा ।
तया धर्मार्थकामानां त्रिवर्गफलमश्नुते ॥१॥
अनुकूला न वाग्दुष्टा दक्षा साध्वी प्रियंवदा ।
आत्मगुप्ता स्वामिभक्ता देवता सा न मानुषी ॥३॥
अनुकूलकलत्रस्य स्वर्गस्तस्य न संशयः ॥
प्रतिकूलकलत्रस्य नरको नात्र संशयः ॥४॥
गृहवासः सुखार्थं हि पत्नीमूलं च तत्सुखम् ।
सा पत्नी या विनीता स्याच्चित्तज्ञा वशवर्तिनी ॥६॥
अनुकूला ह्यवाग्दुष्टा दक्षा साध्वी प्रजावती ।
एतावद्गुणसंयुक्ता श्रीरेव स्त्री न संशयः ॥११॥
प्रहृष्टा मनसा नित्यं स्थानमानविचक्षणा ।
भर्तुः प्रीतिकरा या तु सा भार्या त्वितरा जरा ॥१२॥

–दक्ष. अ. ४.

यावन्न विन्दते जायां तावदर्धो भवेत्पुमान् ।
नार्धं प्रजायते सर्वं प्रजायेतेत्यपि श्रुतिः ॥१४॥
न पृथग्विद्यते स्त्रीणां त्रिवर्गविधिसाधनम् ।
छायेवानुगता स्वच्छा सखीव हितकर्मसु ।
दासीवाऽऽदिष्टकार्येषु भार्या भर्तुः सदा भवेत् ॥२७॥

–व्यास. अ. २

गृहाश्रमात्परो धर्मो नास्ति नास्ति पुनःपुनः ।
सर्वतीर्थफलं तस्य यथोक्तं यस्तु पालयेत् ॥२॥
गुरुभक्तो भृत्यपोषी दयावाननसूयकः ।
नित्यजापी च होमी च सत्यवादी जितेन्द्रियः ॥३॥
स्वदारे यस्य संतोषः परदारनिवर्तनम् ।
अपवादं न कुर्वीत तस्य तीर्थफलं गृहे ॥४॥ –व्यास. अ. ४

भावार्थः—

आपस्तंबः—गृहस्थ, आचार्यकुल, संन्यासी व वानप्रस्थ असे चार आश्रम होत. त्या सर्वांमध्यें यथाशास्त्र व अव्यग्रपणें धर्म पाळल्यास कल्याण होतें.

गौतमः—आश्रमांचा विकल्प आहे असें कोणी म्हणतात. श्रुतींमध्यें गृहस्थाश्रमाचें प्रत्यक्ष विधान आहे म्हणून तोच मुख्य होय व तो एकच आश्रम होय.

बौधायनः—इतर आश्रम हे वांझ आहेत; म्हणून गृहस्थाश्रम हा एकच आश्रम होय. हा पत्करून जन्माबरोबर आलेलीं तीन ऋणें ब्राह्मणानें ( मनुष्यानें ) फेडावींत. ब्रह्मचर्यानें ऋषीऋण, यज्ञानें देवऋण व प्रजेनें पितृऋण फेडावें.

वसिष्ठः—गृहस्थ हाच तपस्वी, तोच यजन करतो. चार आश्रमांत गृहस्थाश्रमाचीच मातब्बरी विशेष आहे. जशा सर्व नद्या व जलप्रवाह समुद्रांत विलीन होतात, जसे आईच्या आश्रयानें सर्व जीव जगतात, त्याप्रमाणें गृहस्थाश्रमावर सर्व आश्रम व भिक्षु जगत असतात.

शंखः—पतिव्रता, दक्ष, प्रजावती, पतीला जपणारी अशी जी तीच भार्या होय. तिच्या मनाप्रमाणें वागलें पाहिजे व प्रसंगीं तिजवर रागावलेंही पाहिजे. म्हणजे ती स्त्री ‘ श्री ’ होते.

मनुः—वायूच्या आश्रयानें सर्व जीव जसे जगतात तसे गृहस्थाश्रमावर सर्व आश्रम जगतात. सर्व आश्रमांना ज्ञान व अन्न देऊन गृहस्थाश्रमच जगवितो. म्हणून गृहस्थाश्रम श्रेष्ठ आहे. गृहस्थाश्रम स्वीकारून देव, ऋषि व पितर यांचीं ऋणें फेडून मग मोक्षाचा विचार करावा. गृहस्थाश्रम न स्वीकारतां, तीन ऋणें न फेडतां चौथ्या आश्रमांत गेल्यास अधःपात होतो. चारी आश्रम गृहस्थ–प्रभवच आहेत. ते यथाक्रम आचरले म्हणजे उत्तम गति प्राप्त होते. गृहस्थाश्रम सर्व आश्रमांत श्रेष्ठ होय.

याज्ञवल्क्यः—दंपतीचें परस्पर अनुकूल्य असलें कीं तीन पुरुषार्थ साधतात.

दक्षः—द्विजानें क्षणभरही अनाश्रमी असूं नये. अनाश्रमी राहिल्यास पातित्य येतें. देव, मनुष्य, पशु हे सर्व गृहस्थाश्रमावर जगतात. म्हणून

तोच आश्रम श्रेष्ठ होय. गृहस्थाश्रम क्षीण झाला कीं इतर आश्रम क्षीण होतात, म्हणून सर्व आश्रमांचें मूल गृहस्थाश्रम होय. वृक्षाचें मूल नष्ट झालें कीं त्याचा बुंधा, शाखा व पानें नष्ट होतात. म्हणून हरप्रयत्नेंकरून मूल जो गृहस्थाश्रम त्याचें रक्षण करावें. राजे व इतर यांनींही या आश्रमाला मान द्यावा. स्वकर्मभ्रष्ट व क्रियाविरहित असा गृहस्थ केवळ घरानें गृहस्थ होत नाहीं तर गृहस्थाश्रमाचीं कर्तव्यें करणारा व दया, लज्जा, त्याग, कृतज्ञता इत्यादि गुण असणारा तोच गृहस्थ होय. दान, अध्ययन, अतिथिसत्कारादि कर्मे करणारा गृहस्थ कृतकृत्य समजावा. गृहाश्रमामध्यें जर भार्या मनाप्रमाणें वागणारी व कार्यकर्ती असेल तर त्रिविध पुरुषार्थ साधतात. मधुरभाषी, अनुकूल, दक्ष, मनोनिग्रही व पतिसेवातत्पर जी स्त्री असेल ती देवताच होय. पतिपत्नींची परस्पर अनुकूलता ज्या घरांत असते तेथें स्वर्गसुख नांदतें व जेथें उलट स्थिति असते तेथें नरकतुल्य दुःख प्राप्त होतें. कोणतेंही सुख घरांतच मिळतें, तें पत्नीमूलक असतें. चित्तज्ञ, नम्र, वशवर्तिनी, अनुकूल, दक्ष व प्रजावान् एवंगुणविशिष्ट स्त्री साक्षात् श्रीच होय. पतीला जें प्रिय तें प्रसन्न मनानें करणारी, स्थल व प्रतिष्ठा यांचा विचार करून प्रेमानें वागणारी स्त्री तीच भार्या होय. तशा नसलेल्या स्त्रिया या 'जरे'चा अवतार होत.

व्यासः—जोंवर मनुष्य विवाह करीत नाहीं, तोंवर तो अर्धा असतो. स्त्री व पुरुष असे दोघे मिळून एक पूर्ण मनुष्य होतो व पूर्णत्वांतूनच प्रजनन होतें. स्त्रियांना पतिसहकार्याशिवाय स्वातंत्र्यानें पुरुषार्थाचें साधन नाहीं. शरीराबरोबर जशी छाया तशी प्रत्येक कर्मामध्यें पतीबरोबर स्त्री असते व ती प्रत्येक कार्य अगदीं अंग मोडून करते. गृहस्थाश्रमापेक्षां दुसरा धर्म नाहीं. तो यथोक्त पाळला कीं सर्व तीर्थांचें फळ त्याला मिळतें. श्रेष्ठाविषयीं आदर बाळगणारा, सेवकांचें पोषण करणारा, निर्मत्सर, दयावान्, सत्यवादी, जितेंद्रिय, स्वदाररत, परस्त्रीनिवृत्त असा जो पुरुष असेल, त्याच्या घरीं सर्व तीर्थांचें फल मूर्तिमंत वास करीत असतें.

(२५३) पुरुषार्थाचें साधनः—दक्ष व व्यासस्मृतींतील गृहस्थाश्रमासंबंधींचे वरील विचार फारच उदात्त आहेत. गृहस्थाश्रम हा तापदायक, अपवित्र, दुःखदायक असें वर्णन त्यांत मुळींच नाहीं. न्यायानें

द्रव्य मिळवावें, धर्म, समाज व राष्ट्रसंबद्ध कर्तव्यें करावीं, स्वस्त्रीचे ठिकाणीं संतुष्ट असावें, आणि प्रसन्न व समाहित चित्तानें सदैव वागावें, असें हे स्मृतिकार म्हणतात. प्रज्ञा, पराक्रम, प्रजा व पैसा या चार पुरुषार्थांचें साधन गृहस्थाश्रम हें आहे. प्रज्ञेनें जगताचें ज्ञान संपादन करावें, पराक्रमानें जगांतील उलाढालींत भाग घ्यावा, नि दुर्जनप्रतिकार करावा. द्रव्यार्जन करून अनेक कर्तव्यें पार पाडावींत व प्रजासातत्य टिकवून राष्ट्रांत चांगलीं माणसें निर्माण करावींत. गृहस्थाश्रम हीच या चतुर्विध पुरुषार्थांची जागा आहे. उत्तम गृहस्थ होणें, उत्तम पुरुषार्थी होणें, उत्तम नागरिक बनणें, या ध्येयाचें पुनरुज्जीवन आतां करावयास पाहिजे.

**(२५४) गृहस्थाश्रमाची चिकाटीः**—गेल्या हजार आठशें वर्षांत या गृहस्थाश्रमाची निंदा सारखी चाललेली आहे. भिक्षु, संन्यासी, संत व बुबा या निवृत्तिपर तत्त्वज्ञानाच्या प्रचारकांनीं समाजाचें केंद्र जो गृहस्थाश्रम त्याची आणि त्याचें मूळ जी गृहिणी तिची इतकी अतिरिक्त निंदा केली आहे कीं तिच्या तडाख्यांतून गृहस्थाश्रम ही संस्था आज कशीबशी टिकविली आहे, याबद्दल गृहस्थाश्रम्यांची पाठच थोपटली पाहिजे.

**(२५५) वैदिक कर्मयोग व आजचा गृहस्थाश्रमः**—उज्ज्वल गृहस्थाश्रमांतूनच वैदिक कर्मयोगाचा उद्भव होतो.

सुखाभ्युदयिकं चैव नैःश्रेयसिकमेव च ।
प्रवृत्त च निवृत्तं च द्विविधं कर्म वैदिकम् ॥८८॥
इह चामुत्र वा काम्यं प्रवृत्तं कर्म कीर्त्यते ।
निष्कामं ज्ञानपूर्वं तु निवृत्तमुपदिश्यते ॥८९॥
प्रवृत्तं कर्म संसेव्य देवानामेति साम्यताम् ।
निवृत्तं सेवमानस्तु भूतान्यत्येति पञ्च वै ॥९०॥ मनु. अ. १२

**भावार्थः**—अभ्युदयाला सुखकर व निःश्रेयसाला हितकर अशीं प्रवृत्त व निवृत्त हीं दोन वैदिक कर्में आहेत. इहपरलोकीं जें फलाकरितां केलें जातें तें प्रवृत्त कर्म होय, व ज्ञानपूर्वक निष्काम हेतूनें जें केलें जातें तें निवृत्त कर्म

होय. प्रवृत्तकर्मानें मनुष्य देवतांच्या साम्यतेस पोंचतो व निवृत्तकर्मानें म्हणजे निष्काम कर्मानें तो जन्ममरणातीत होतो.

गृहस्थाश्रमाचें ज्येष्ठत्व व श्रेष्ठत्व मनूनें ठसठशीतपणें सांगितलें आहे. वैदिक कर्मयोग हा शब्दप्रयोग मनुस्मृतींतच आहे. त्यावरून मनुकालीं वैदिक कर्मयोगी गृहस्थ होते. ऋणत्रयाचें अपाकरण करून, जगत् आनंदमय मानून, संसार नेटका करून जगांतील पुरुषार्थ समष्टीच्या दृष्टीनें साध्य करणारे पुरुषार्थी, महत्त्वाकांक्षी, उत्कर्षेच्छु, आक्रमणशील असे मनुकालीन आदर्श गृहस्थ आजही हवे आहेत.

समाज व राष्ट्र यांची उभारणी गृहस्थाश्रमाच्या पायावरच होते. सर्व संस्था, शास्त्रें, विद्या या गृहस्थाश्रमाच्या भोंवतींच भ्रमण करीत असतात. अर्थशास्त्र, सुप्रजाशास्त्र, आरोग्यशास्त्र, शिक्षणशास्त्र, मानसशास्त्र, विज्ञानशास्त्र यांची गरज परोपदीं गृहस्थाश्रमालाच लागते. स्त्रीजीवन, विद्यार्थिजीवन आणि नागरिक जीवन या त्रयीचा संबंध गृहस्थाश्रमाशींच आहे. ललितकला, ललितवाङ्मय, काव्य, नाटक, चित्रपटादींचाही संबंध याच आश्रमाशीं आहे. राष्ट्राची सुधारणा व उन्नति गृहस्थाश्रमावर अवलंबून आहे. ज्या देशांतील प्रापंचिक गृहस्थ सुखी असतात तो देश निःसंशय सुखी समजावा. गृहस्थाश्रम म्हणजे एक कौटुंबिक स्वराज्यच आहे. त्यांत दिवाणी, फौजदारी अशीं न्यायालयें असतात. तत्त्वज्ञानाचेंही एक दालन असतें. सुसंस्कृत गृहस्थ, सुगृहिणी व अर्थागम हीं या स्वराज्यांतील मुख्य तीन अंगें आहेत. ब्रह्मचारी, यति, संन्यासी यांना, समाजोपयुक्त विविध संस्थांना, आंधळे, मुके, बहिरे अशा विकलांगांना, पशुपक्ष्यांना, कृमिकीटकांना, थोडक्यांत सर्वांना आधार गृहस्थाश्रमाचाच आहे. पूर्वकालापेक्षां गृहस्थाश्रमांतील संसार नेटका चालविणें आज मोठें कौशल्याचें व शहाणपणाचें झालेलें आहे. गृहस्थाश्रमाची महती पुढील लोकप्रसिद्ध श्लोकांत आहेः—

मानुष्यं वरवंशजन्म विभवं दीर्घायुरारोग्यता ।
सन्मित्रं सुसुतः सती प्रियतमा भक्तिश्च नारायणे ॥
विद्वत्वं सुजनत्वमिन्द्रियजयः सत्पात्रदाने रतिः ।
ते पुण्येन विना त्रयोदश गुणाः संसारिणां दुर्लभाः ॥१॥ —सुभाषित

न्यायार्जितधनस्तत्त्वज्ञाननिष्ठोऽतिथिप्रियः ।
शास्त्रवित्सत्यवादी च गृहस्थोऽपि विमुच्यते ॥२॥

—सुभाषितरत्नभांडार.

सानन्दं सदनं सुताश्च सुधियः कान्ता न दुर्भाषिणी ।
सन्मित्रं सधनं स्वयोषिति रतिश्चाज्ञापराः सेवकाः ॥
आतिथ्यं शिवपूजनं प्रतिदिनं मिष्टान्नपानं गृहे ।
साधोः सङ्गमुपासते हि सततं धन्यो गृहस्थाश्रमः ॥३॥

—भर्तृहरि.

(२५६) **तृतीयाश्रमाचें विडंबनः**—सांप्रत ब्रह्मचारी, गृहस्थ व यति हे नांवाला तरी दिसतात. पण वानप्रस्थाश्रमी औषधालाही दिसत नाहींत. उज्ज्वल गृहस्थाश्रमी व वैदिक कर्मयोगी पुरुष हेच या वानप्रस्थाश्रमाला योग्य आहेत. आज समाजांत साठ पंचावन वर्षांचे, नोकरींतून निवृत्त झालेले, वैयक्तिक प्रपंच ज्यांचा व्यवस्थित झाला आहे असे लोक नाहींत असें नाहीं. पण निवृत्तीचे संस्कार बलवत्तर असल्यामुळें असो, किंवा कोणतेंही कार्य करण्याची या लोकांत पात्रता नाहीं म्हणून असो, या वर्गापासून समाजाला जो लाभ व्हावयास पाहिजे तो होत नाहीं. कित्येक पंचावन साठ वर्षांचे गृहस्थ पुनःपुन्हां आपल्या सुनांच्या, मुलींच्या व नातवंडांच्याही देखत कुमारिकांशीं अथवा विधवांशीं तृतीय किंवा चतुर्थ संबंध करून नव्या संसारांत रममाण झालेले आढळतात. कांहीं हरीचे लाल निपुत्रिक असले तरी इतरत्र कुठेंही पैसा न देतां ‘ देह तोचि देव ’ या न्यायानें जितकी कांहीं चैन करतां येईल तितकी करीत असतात ! वृद्ध स्त्रीपुरुषांनीं कांहीं मर्यादेपुढें प्रपंचाचीं बंधनें शिथिल करून परार्थाकडे वळलें पाहिजे. आज समाजामध्यें अनेक कार्यें योग्य माणसांच्या अभावीं थांबून राहिलेलीं आहेत. या कार्यांत जर नोकरीनिवृत्त लोक—कीं ज्यांना प्रापंचिक स्वास्थ्य आहे, दरमहा द्रव्य हातांत येत आहे—पडतील तर त्यायोगें त्यांचें आणि समाजाचेंही कल्याण होणार आहे.

**महत्त्वः**—मेल्यानंतर श्राद्ध करून पाणी देणारा, होणी तरी पाहिजे, त्याशिवाय पुढील जन्मीं सुख

लागत नाहीं, सद्गति मिळत नाहीं; अशा कल्पनेनें पुष्कळ निपुत्रिक सुखवस्तु माणसें दत्तक घेण्याच्या खटाटोपांत पडतात. जुन्या कल्पनेप्रमाणें दत्तक घेणें व श्राद्धाला अधिकारी उत्पन्न करणें हें ठीक आहे; पण जुन्या काळच्या पुष्कळ कल्पना आज सोडल्या आहेत, व तर्कशुद्ध दृष्टीनें कांहीं सोडणें अवश्यही आहे, असें वाटतें. जुन्या कल्पनेप्रमाणें विचार केल्यास विवाह हा पुत्राकरितां असतो. पुत्राला पित्याचा प्रतिनिधि समजतात. हिंदु संस्कृतींत पुत्रवान् होऊन पितरांचें ऋण फेडलें पाहिजे असें सांगितलेलें आहे. म्हणून बारा प्रकारच्या पुत्रांना मान्यता होती, असें गौतम, बौधायन, वसिष्ठ, मन्वादि धर्मशास्त्रकार म्हणतात—

**पुत्रा औरसक्षेत्रजदत्तकृत्रिमगूढोत्पन्नाविद्धा रिक्थभाजः ॥३०॥**
**कानीन–सहोढ–पौनर्भव–पुत्रिकापुत्र–स्वयंदत्त–क्रीता**
**गोत्रभाजः ॥३१॥ –गौतम ( अ. १० प्र. ३ )**

गौतम पुत्राचे बारा प्रकार सांगतो. त्यांतील औरस, क्षेत्रज, दत्त, कृत्रिम, गूढोत्पन्न व अपविद्ध हे सहा पित्याच्या मिळकतीचे वांटेकरी होतात. हे सहा आणि कानीन, सहोढ, पौनर्भव, पुत्रिकापुत्र, स्वयंद[illegible] क्रीत असे बारा पित्याच्या गोताचे भागीदार होतात. आज औरस व दत्तक एवढे दोनच पुत्र समाज मान्य करतो. इतर दहा प्रकार आज समाजांत नाहींत. स्वस्त्रीचे ठिकाणीं दुसऱ्यानें उत्पन्न केलेला तो क्षेत्रज पुत्र होय. दिलेला तो दत्तक, पुत्रगुणांनीं युक्त असलेला तो कृत्रिम, जो आपल्याच घरांत गूढपणानें उपपतीपासून उत्पन्न झाला तो गूढज, मातापितरांनीं किंवा मातेनेंच जन्मानंतर टाकलेला तो अपविद्ध पुत्र होय. कौमारावस्थेंत झालेला तो कानीन, विवाहकालीं वधु–उदरस्थ जो असेल तो सहोढ, विधवेनें विवाह करून उत्पन्न केलेला तो पौनर्भव, मुलगी जावयास देतांना तिला होणारा पहिला पुत्र माझा अशा करारानें घेतलेला पुत्र तो पुत्रिकापुत्र, आईबापानें टाकल्यामुळें जो एखाद्याला येऊन चिकटतो तो स्वयंदत्त, व जो पैसे देऊन घेतला जातो तो क्रीत पुत्र होय.

**(२५८) निपुत्रिकांना सूचनाः**–ऋग्वेदकालीन आर्यांना पुत्रप्राप्तीची फार इच्छा होती. तेजस्वी व चांगला मुलगा व्हावा अशी ते प्रार्थना करीत.

परंतु दत्तक घेण्याची कल्पना त्याकालीं नव्हती. दत्तकाची कल्पना खिस्तपूर्व तीनशें म्हणजे बरीच अर्वाचीन आहे. पण ऋग्वेद मंडल ७ सूक्त ४ मंत्र ७८ चा सारांश पुढीलप्रमाणें आहे. "स्वतः संपादन केलेला पैसा पुरा पडतो म्हणून आम्हांला स्वसंपादित संपत्तीचे मालक कर. हे अग्निनारायणा, दुसऱ्याचा मुलगा आपला होत नाहीं म्हणून खुळ्या लोकांचे मार्ग आम्हांला जाणण्याचा प्रसंग येऊं नये."

"दुसऱ्याकडे ओढा असलेला परक्याचा मुलगा आवडत असतांही मुलगा म्हणून मनानेंही मानवत नाहीं. कांहींही झालें तरी दुसऱ्याचा मुलगा मूलस्थानाकडेच जाणार म्हणून पराक्रमी आणि कर्तृत्ववान् असा नव्या जोमाचा आम्हाला पुत्र होऊं दे."

वरील सूक्तार्थावरून दत्तक घेण्याचा निषेधच दिसतो. नांव चालविणें, श्राद्ध करणें या दृष्टीनें दत्तक पुत्रासंबंधींच्या कल्पना पूर्वकालीं युक्त होत्या. पण पुत्राविषयींच्या आजच्या कल्पना बदलल्या असल्यामुळें आणि याही बाबतींत समाज पुढें गेला असल्यामुळें हिंदुसमाजोपयोगी व हिंदुराष्ट्रोपयोगी अशा संस्थांना निपुत्रिक धनवानांनीं आपलें द्रव्य अर्पण करून कार्यरूपानें अखंड नामसंकीर्तन चालू राहील अशी व्यवस्था करावी. रुग्णालयें, औषधालयें, शिक्षणसंस्था, अनाथाश्रम, सैनिकविद्यालयें, शारीरशिक्षणसंस्था हीं सर्व समाजाच्या अभ्युदयाला आवश्यक आहेत. निपुत्रिकांनीं श्राद्ध, तर्पण व नामसंकीर्तनार्थ दत्तक घेऊन तंटेबखेड्याचे त्रासांत आयुष्य घालविण्यापेक्षां समाजोपयुक्त अशा संस्थांना असेल तें सर्व देऊन, पोटापुरेंसें ठेवून पत्नीच्या पोटाची व्यवस्था चांगल्या तऱ्हेनें करून उत्साहानें व शांतपणें होईल तितकें समाजकार्य करीत राहणें, हेंच इहपरदृष्ट्या उचित आहे. धर्मनिर्णयमंडळाचा निर्णयही **"सांप्रतच्या परिस्थितींत दत्तक घेण्याची प्रथा अनवश्यक आहे,"** असाच आहे.

**(२५९) वानप्रस्थ, संन्यास व स्मृतिकार**:—आतां आपस्तंबादि सूत्रकार व मन्वादि स्मृतिकार वानप्रस्थ व संन्यास–आश्रमांबद्दल काय म्हणतात हें थोडक्यांत सांगून हें प्रकरण आटपतों.

**आपस्तंब:**—ब्रह्मचर्याश्रमांतून एकदम वानप्रस्थ किंवा संन्यास घेतां येतो. बायकोसह किंवा एकट्यानें अरण्यांत जावें. तपानें व कर्मक्षयानें कोणीही मनुष्य उत्तम लोकाप्रत जातो.

**गौतमः**—वानप्रस्थाला वैखानस असें म्हणतात. या आश्रमांत राहून मुळेंफळें खाऊन तपयुक्त असावें. लागवडीस आलेल्या जमिनीवर राहूं नये, तेथील धान्यें व फळें घेऊं नयेत व गांवांत येऊं नये.

**बौधायनः**—चौथा आश्रम परिव्राजक आहे. तिसरा आश्रम वैखानस शास्त्रानुसारी आहे. शालीन, यायावर व चक्रधर असे तीन प्रकारचे वानप्रस्थाश्रमी असतात. शालेचा (घराचा) आश्रय करीत म्हणून शालीन, उञ्च्छवृत्तीनें राहाणारे ते यायावर व क्रमानें मोजून पावलें टाकणारे ते चक्रधर होत. वानप्रस्थ्यांमध्येंही शिजविणारे व न शिजविणारे असे दोन वर्ग आहेत. सर्व अरण्य, वान्यें, कोंडा, कंदमुळें, फळें, नुसतीं फळें, नुसते शाक खाणारे असे पांच वर्ग व दुसरे पांच उन्मज्जक, प्रवृत्ताशी, तोयाहारी, मुखादायी, वायुभक्षी हे होत.

**वसिष्ठः**—तृतीयाश्रमी गृहस्थानें जटा अजिनें धारण करावीत. न नांगरलेल्या जमिनींतील मुळेंफळें खावींत. नांगरलेल्या जमिनीवर राहूं नये. ब्रह्मचर्य पाळावें व क्षमाशील असावें. मत्सर, अभिमान, दंभ, क्रोध, लोभ हे वर्ज्य करावेत. लोकैषणी व विषयलोलुप अशा संन्याशाला मोक्ष मिळत नाहीं.

**शंखः**—तृतीयाश्रमामध्यें स्त्रीसह वनांत जावें किंवा स्त्रीला मुलांच्या स्वाधीन करावें आणि अग्निसेवा व वन्य आहार करून दिवस काढावेत. जें अन्न उपलब्ध असेल त्यानेंच पितर, देवता व अतिथि यांचें पूजन करावें. संन्याशानें पवित्र ठिकाणीं पाऊल टाकावें, गाळलेलें पाणी प्यावें, सत्य बोलावें व मनाला अत्यंत पवित्र व अन्तःकरणाला प्रसन्न असें आचरण करावें. सर्वाभूतीं समदृष्टि, समलोष्टाश्मकांचन, ध्यानयोगरत असा जो भिक्षु असतो तोच परम गतीला जातो. प्राणायामानें दोष जाळावेत. धारणेनें पाप जाळावें, प्रत्याहारानें आसक्ति व ध्यानानें अनीश्वर गुणांचा नाश करावा.

**मनु**:—नातवंड पाहिलें म्हणजे तृतीयाश्रमांत जावें. वाटल्यास स्त्रीसह वनांत जावें किंवा स्त्रीला मुलांच्या स्वाधीन करावें. यतीनें हर्ष, सुख, दुःख यांविषयीं समवृत्ति ठेवावी. प्राणधारणेपुरतें अन्न मिळवावें.

**याज्ञवल्क्य**:—तृतीयाश्रम्यानें त्रिकाल स्नान करावें, प्रतिग्रह घेऊं नये, स्वाध्यायशील व दानशील असावें. ग्रीष्मऋतूमध्यें पंचाग्निसाधन करावें, वर्षाऋतूंत ओल्या भुईवर निजावें, कडक हिंवाळ्यांत ओलीं वस्त्रें अंगावर घेऊन तप करावें. जो कांट्यानें टोचील, अगर अंगाला चंदन लावील, त्या दोहोंबद्दलही समवृत्ति ठेवावी. गांवांतून भिक्षा आणून फक्त आठ ग्रास खावेत. वायुभक्षण करून उत्तर दिशेकडे शरीरक्षय होईपर्यंत राहावें. संन्याशानें त्रिदंड, कमंडलु इत्यादि धारण करून भिक्षेपुरतेंच गांवांत राहावें. स्वतःला ज्यामुळें वाईट वाटतें, असें आचरण इतरांशीं करूं नये. धर्माचरणाला आश्रमच पाहिजे असें नाहीं. चतुर्थाश्रमाशिवायही धर्माचरण, समवृत्ति, सर्वभूतहिततत्परता हे गुण आणतां येतात.

**दक्ष**:—ज्याच्या मनांतील विषयेच्छा नष्ट झालेली आहे त्यानेंच दंड धारण करावा. मनोदंड, वाग्दंड, कायदंड हे मुख्य होत. इंद्रियविजय नसेल तर अधःपात होतो. संन्याशांनीं एकत्र राहूं नये. तीन संन्याशी एकत्र झाले कीं ग्राम, व त्यापेक्षां अधिक एकत्र झाले कीं नगर होतें. मग कोणाला काय भिक्षा मिळाली, कुणाचें कोठें काय चाललें आहे, शिष्यसंग्रह, लाभ व पूजा यांच्या गोष्टी निघतात म्हणून यतीनें एकांत सेवन करावा.

वानप्रस्थाविषयीं स्मृतिकारांचीं मतें दिलीं, आतां याचें पुनरुज्जीवन निराळ्या स्वरूपांत कसें करतां येईल तें सांगतों.

वैदिक वाङ्मयामध्यें चार आश्रमांची कल्पना नाहीं. ती मागाहूनच आलेली आहे. छांदोग्यामध्यें तर तीन स्कंध म्हणजे तीनच आश्रम सांगितलेले आहेत. परिव्रज याचा अर्थ संसारांतून निघून जाणें, स्थित्यंतर करणें असाच आहे. बुद्धोत्तर कालांत भिक्षूंची नक्कल म्हणून चतुर्थाश्रम आला असावा. आजच्या कालांत पहिले दोन आश्रमच मुख्य समजले पाहिजेत. स्मृतिकारांनीं तिसरा व चौथा हे आश्रम सांगितले असले तरी बदललेल्या परिस्थितींत ते शक्य नाहींत! अरण्यांत राहणें आणि भिक्षेवर जगणें हें

अशक्य झालें आहे. दिवसेंदिवस भिक्षेवरही निर्बंध येतील. यास्तव गृहस्थाश्रमांतील मुख्य कर्तव्यें संपल्यानंतर तत्त्वचिंतन, ज्ञानप्राप्ति, परोपकार यासाठीं गृहस्थानें गृहिणीसह देशपर्यटन करावें. स्वसंपादित धनावर प्रवास व निर्वाह करून धंदेवाईक प्रवचनकारांच्या स्पर्धाक्षेत्रांत न पडतां संभाषण व चर्चा द्वारा लोकांना योग्य ज्ञान द्यावें व सन्मार्गाचा उपदेश करावा. सांप्रतच्या परिस्थितींत वानप्रस्थाचें परिवर्तन या पद्धतीनेंच करणें योग्य आहे. वृद्ध, अनुभवी, निःस्वार्थी आणि कार्येच्छु असे स्त्रीपुरुष समाजाला हवेच आहेत. अशांनीं गृहत्याग करून समाजसेवा केली किंवा गृहत्याग न करतां केली तरी ती हवीच आहे.

ज्यांना गृहत्याग शक्य नाहीं, अशांनासुद्धां गांवांतल्या गांवांत राहून वानप्रस्थी वृत्तीनें कोणकोणतीं कार्यें करतां येणें शक्य आहे त्याची कल्पना नोकरीनिवृत्त लोकांकरितां आतां देतों.

(२६०) **नोकरीनिवृत्तांचीं कर्तव्यें**:–केवळ स्वार्थाकरितां ज्यांचें सबंध आयुष्य सरकारी नोकऱ्यांत गेलें आहे, अशा नोकरी–निवृत्तांना लोकोपयुक्त अशीं अनेक कामें करतां येण्याजोगीं आहेत. नोकरी–निवृत्त वृद्धवेतन (पेन्शन्) घेत असतो म्हणून तो एक प्रकारें सरकारी नोकरच असतो, ही समजूत चुकीची आहे. कारण वृद्ध–वेतन मागील केलेल्या नोकरीचा मोबदला असतों. आज करीत असलेल्या कामाचा वृद्ध–वेतनाशीं कांहीं संबंध नसतो. थोडा स्वाभिमान, थोडा ताठरपणा आणि थोडी लोकसेवेची वृत्ति असेल तर पुष्कळ सार्वजनिक कामें नोकरीनिवृत्तांना करितां येतील. पोस्ट व तारखात्यांतून निवृत्त झालेल्यांना लोकांच्या पुष्कळ उपयोगीं पडतां येतें. या खात्याशीं अनेकांचा संबंध येतो. पण त्या खात्याची माहिती नसल्यामुळें ज्या अनेक अडचणी येतात, त्यांचा परिहार करण्याचें ज्ञान लोकांना नसतें म्हणून लोकांच्या गैरसोयी दूर करून या खात्यापासून कोणते लाभ लोकांना अधिकाधिक घेतां येतील, याची माहिती देतां येईल.

रेल्वे खातें हेंही आहे यापेक्षां लोकांना अधिक उपयुक्त झालें पाहिजे. त्या खात्यांतील अरेरावी आणि अंदाधुंदी हीं लोकांना इतकीं जाचक हो– आहेत कीं त्याचा प्रतिकार करण्याकरितां नोकरीनिवृत्तांची फार आव–

आहे. प्रत्यक्ष अनुभव, कायद्याचें ज्ञान यांमुळें अर्जदारां तक्रारी करण्याचें तंत्र लोकांना समजावून देण्याचें काम नोकरीनिवृत्तांनाच करतां येणें शक्य आहे. शिक्षणखातें, हिशेबखातें, करखातें, न्यायखातें, जमीनमहसूल खातें, आरोग्यखातें अशा विविध शेंकडों खात्यांत ज्यांनीं आपला सारा जन्म स्वार्थाकरितां घालविला, त्यांनीं नोकरींतून मोकळे झाल्यानंतर आपआपल्या खात्यांतील कांहीं गैरसोयी दूर करून समाजाचें पाऊल पुढें पडण्यास साह्य करणें हें त्यांचें कर्तव्य आहे. निरक्षर प्रौढांना त्यांच्या फुरसतीच्या वेळीं साक्षर करण्याचे वर्ग काढणें, स्वभाषेशिवाय हिंदी, इंग्रजी इत्यादि भाषा शिकविण्याचे वर्ग उघडणें, कातरकाम, भरतकाम, कलाकौशल्य आणि अन्य घरगुती धंदे यांचें ज्ञान असणाऱ्यांनीं ते धंदे शिकविणें, अशीं कामें करतां येतील.

कायद्याची माहिती असलेल्या नोकरीनिवृत्तांना कायद्याचें ज्ञान नसल्यामुळें व्यवहारांत जे लोक फसतात त्यांना योग्य मार्गदर्शन करणें हें काम करतां येईल. विशेषतः खेड्यांत गावगुंड लोकांची जी गुंडगिरी चालते, तिला आळा घालण्याचा यत्न करणें हा भाग खरोखर पुण्याईचा आहे. शाळामास्तर, पाटील, तलाठी, सावकार, व्यापारी आणि वकीलांचे दलाल यांच्या परस्पर सहकारानें लोकांना लुबाडण्याचे प्रयत्न खेड्यापाड्यांतील ग्रामकंटक करीत असतात. सामान्य अज्ञ माणसें यांच्या कारवायांना फसतात. व फसलीं तरी अनन्यगतिकत्वानें त्यांच्याच आश्रयानें राहातात ! या साध्या लोकांना गावगुंडांच्या कारवाईस बळी न पडण्याइतपत माहिती देणें, विशिष्ट प्रसंगीं थोडा धीर आणि योग्य सल्ला देऊन त्यांना साह्य करणें हें एका दृष्टीनें खरोखरच देशकार्य आहे. पदरमोड न करितां करतां येण्याजोगें हें कठिण आणि तापदायक काम असलें तरी तें तितकेंच पुण्यकारक आहे.

पण हे नोकरीनिवृत्त लोक "आम्ही काय करणार, आमच्या हातून काय होणार ?" असलीं दुबळीं बोलणीं बोलत बसतात. आणि जनतेचा व आपला जणु कांहीं संबंधच नाहीं, जनहिताच्या गोष्टींचें व आपलें कांहीं सोहेरसुतकही नाहीं, अशा मिजाशीनें दोन्ही सांज कोठें तरी घिरट्या घालीत बसतात, चकाट्या पिटतात आणि स्वतः कांहीं न करतां इतरांची टवाळी

करण्यांत मात्र आनंद मानतात! याहीपेक्षां दुर्दैव असें कीं, हीं अशीं माणसें कुणी बुवाच्या नादीं, तर कोणी पिराफकिराच्या नादीं लागतात! कोणी वेदांताचीं प्रवचनें ऐकण्याच्या मोहांत गुंग असतात, तर कोणी स्वतः वेदांताचा काथ्याकूट मोठ्या अट्टाहासानें करीत बसतात. 'मिळत नाहीं भीक तर पंतोजीपणा शीक' ही जशी एक म्हण आहे, तसाच म्हातारपणीं ज्याला कांहीं उद्योग नसतो तो वेदांत कुटीत बसतो! 'करून करून भागले व देवपूजेला लागले!' ही म्हण अशा लोकांना लागू होते. कोणी ब्रह्ममायेचा काथ्याकूट करतात, कोणी रहस्यकारांच्या चुका दाखवितात, कोणी ज्ञानेश्वरांचें मत पटत नाहीं म्हणतात, तर कोणी आचार्यांच्यावर टीका करीत बसतात! या सर्व मिथ्याचाऱ्यांना हें समजत नाहीं कीं स्वतःचा स्वार्थ सोडून थोडें तरी समाजहिताचें कार्य जो करूं लागतो त्यालाच अनासक्ति व अहंकारविरहित कर्म कसें करावें हें कळूं लागतें. परार्थाला प्रारंभ झाला म्हणजे वेदांत कळूं लागतो. वेदांत हा बोलण्याचा विषय नसून तो कृतींत आल्यावरच कळणारा विषय आहे. कांहीं सेवानिवृत्त माणसें अपवाद म्हणून आज विविध अशा सार्वजनिक कार्यांत पडलेलीं आढळतात, हें त्यांना भूषणास्पद आहे. हा वर्ग अधिक वाढला म्हणजे नव्या हिंदुधर्मांतील वानप्रस्थाश्रम रूढ होईल.

**(२६१) चौथ्या आश्रमाचा उद्देशः**—तत्त्वज्ञान हा हिंदुसंस्कृतीचा आत्मा आहे. तो अलंकार आहे. तें एक भूषण आहे. रागद्वेषातीत निर्विषय व पूर्ण सुखरूप असें स्थान गांठण्याकरितां चतुर्थाश्रम आहे. कांहीं अधिकारी माणसांनीं या ध्येयाच्या मार्गें अवश्य लागलें पाहिजे. एषणारहित होऊन अध्यात्माचे सिद्धांत कुशाग्रबुद्धीनें ग्रहण करून अखंड तदाकार होण्याचा अभ्यास करण्याकरितां हा चतुर्थाश्रम आहे. पण आज हिंदुसमाजांत ही अधिकारीपरंपरा नाहीं. जिकडे तिकडे अनधिकारी लोक ब्रह्मज्ञानाच्या नांवावर मिथ्याचार करीत असतांना आढळतात. ना वैराग्य, ना अमानित्वादि लक्षणें ना अध्यात्माचें बिनचुक ज्ञान! असलीं मिथ्याचारी आणि बुद्धिहीन माणसें या क्षेत्रांत गर्दी करीत असल्यामुळें या तत्त्वज्ञानाला काळीमा आलेली आहे. नवा हिंदुधर्म या असल्या प्रज्ञाहत करणाऱ्या बुवाशाहीचा नायनाट करा असें सांगतो. अध्यात्मशास्त्राचे सिद्धांत कसे

तर्कशुद्ध व उच्च आहेत, व त्यांवर मिथ्याचार कसा चालू आहे याचें विवेचन ' ब्रह्मज्ञान व बुवाशाही ' या ग्रंथांत आम्हीं सविस्तर केलें आहे. वाचकांनीं तो ग्रंथ अवश्य वाचावा.

चार आश्रमांत जो मुख्य आश्रम गृहस्थाश्रम त्याला स्त्रीशिवाय प्रारंभ होत नाहीं. म्हणून स्त्रीगौरव, विवाहसंस्था, विवाहसंस्कार, विधवाविवाह, घटस्फोट इत्यादि विषयांचा विचार यापुढील प्रकरणांत क्रमानें करतों.

—*—

# प्रकरण अठरावें

## विवाहसंस्था, स्त्रीगौरव व विवाहसंस्कार

आज हिंदुधर्माच्या प्रधान बाबी जात, जेवण, लग्न, व्यवसाय व शिवाशीव अशा पांच समजल्या जातात. पैकीं चार बाबींचा विचार गेल्या भागांत झाला. सर्वांत विवाह ही बाब फार महत्त्वाची आहे. तिचा व तदनुषंगिक इतर बाबींचा विचार प्रस्तुत प्रकरणांत करतों.

**(२६२) समाजाचा पाया विवाहः**—मानवी समाजाच्या धारणेला विवाहसंस्था ही अत्यावश्यक आहे. स्त्रीपुरुषांमध्यें शास्त्रशुद्ध रीतीनें पतिपत्नीत्वाचें नातें निर्माण करून त्यांच्यामधील शारीरिक, धार्मिक आणि नैतिक संबंध निश्चित करणें म्हणजेच विवाह होय. विवाहाचे प्रधान उद्देश पुत्रोत्पादन, रतिसुख, शुश्रूषा आणि कौटुंबिक सुख हे आहेत. विवाहसंस्थेचा कुटुंबपद्धतीशीं निकटसंबंध आहे. किंबहुना कुटुंबसंस्था, जातिसंस्था व समाज यांचा पाया विवाहसंस्था आहे.

**(२६३) विवाह म्हणजे काय?:**—स्त्रीपुरुषांची एकनिष्ठा आणि त्यांच्या संबंधाचा शाश्वतपणा हीं ज्यामध्यें प्रधान आहेत, तो विवाह होय. स्त्रीपुरुषांच्या पार्थिव जडदेहाला जशी परस्परांच्या शारीरिक समागमाची भूक असते, तशीच त्यांच्या मनालाही परस्परांच्या मानसिक समागमाची भूक असते. ही मनाची भूक अनन्यसामान्य प्रेमाविना शांत होऊं शकत नाहीं. त्याकरितां एकनिष्ठ प्रेम आणि नात्याचा शाश्वतपणा यांची आवश्यकता असते. यांतच विवाहसंस्थेचें बीज आहे. आपल्या दुःखाबरोबर दुःखित होणारी व सुखाबरोबर सुखी होणारी अशी अनन्य व्यक्ति स्त्रीला पुरुष आणि पुरुषाला स्त्री अशी हवी असते. त्यामुळेंच मानवाचें मन विशाल होण्याच्या मार्गांत असतें. मनाचा विशालपणा हा उभय व्यक्तींचें कुल, शील, आचार नि विचार हे जितके सम असतील त्यांवर अवलंबून असतो.

**(२६४) यूथावस्था नव्हती:**—मानवी प्रगतीच्या इतिहासांत केव्हां तरी यूथावस्था असावी, अनेक व्यक्तींचा समूह एकत्र राही, त्यांतील स्त्रीपुरुषांचें परस्परांशीं विवाह न होतां, हवे तसे संबंध होत असत; गायी, बैल वगैरे प्राण्यांत ही व्यवस्था दिसते. या यूथावस्थेंतूनच एकपत्नीकुटुंबाचा विकास झाला, असें कांहीं म्हणतात; पण वेस्टर्न मार्कसारखा मान्य ग्रंथकार अगदीं खडसावून सांगतो कीं, "मनुष्यप्राणी एका काळीं कुटुंबविरहित अनीतिमूलक यूथावस्थेचा उपभोग घेत होता, हें म्हणणें धाडसाचें आहे. अगदीं रानटी लोकांतसुद्धां विशिष्ट कुटुंबपद्धति असते. फक्त ती वरवर पहाणाऱ्यास दिसत नाहीं इतकेंच. माकडांमध्येंसुद्धां यूथावस्थाव्यवहार दिसून येत नाहीं. ( History of Human Marriage–Book I page 38.)

फार प्राचीन काळीं हिंदु समाजांत विवाहसंस्था नव्हती. श्वेतकेतूनें विवाहाची प्रथा घालून दिली असें महाभारतांत म्हटलेलें आहे—

अनावृताः किल पुरा स्त्रिय आसन्वरानने ।
कामाचारविहारिण्यः स्वतंत्रश्चारुहासिनि ॥
तदाप्रभृति मर्यादा स्थितेयमिति नः श्रुतम् ॥

—आदि प. अ. १२२

पूर्वी स्त्रिया अगदीं मोकळ्या असत. त्यामुळें होणारे अनर्थ पाहून श्वेतकतूनें विवाहाची प्रथा घालून दिली. एका स्त्रीला पांच पती असल्याचा उल्लेख महाभारतांत आहे. हिंदुस्थानच्या कित्येक भागांत अद्याप तशा चाली आहेत, हें जरी खरें असलें तरी ऋग्वेदकालापासून विवाहसंस्था अस्तित्वांत होती आणि तिचें स्वरूपही उदात्त होतें, असें म्हणतां येतें. *

(२६५) **तीन पुरुषार्थ व विवाह:**—वैदिक संस्कृतीप्रमाणें मनुष्यानें ज्ञानवान् होऊन ऋषींचें, कर्तव्यें करून देवांचें, प्रजावान् होऊन पितरांचें ऋण फेडावें अशी योग्य समजूत आहे. विवाह हा करार नसून तो एक उदात्त संस्कार आहे. तो यथाविधि झाला म्हणजे पतिपत्नीचें नातें चालू होतें व तें आमरण टिकतें. चतुर्विध पुरुषार्थांपैकीं मोक्ष सोडून धर्म, अर्थ व काम हे त्रिविध पुरुषार्थ परस्परांच्या सहकार्यानें साधण्याची शपथ पतिपत्नी घेत असतात.

(२६६) **वैयक्तिक बाब नाहीं:**—युरोपांत विवाह ही दोन व्यक्तींमधील अगदीं खाजगी बाब, त्यांत इतरांनीं लक्ष घालूं नये असें मत पूर्वी होतें. पण या स्वातंत्र्यामुळें रोगी व अनिष्ट अशा संततीची भर समाजांत पडूं लागलेली पाहातांच समाजशास्त्रज्ञांनीं दुष्ट व अनुवंशसंचारी अशा रोगी माणसांनीं संतति उत्पन्न करूं नये, सरकारनें यांना मना करावी, असें प्रतिपादन केलें! म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्याला आळा घालून विवाह हा समष्टीचा विषय ठरविला, यास्तव विवाह हा विषय वैयक्तिक नसून तो सामाजिक आहे. अपत्योत्पादन, संततीची जबाबदारी, शिक्षण व सामाजिक कर्तव्यें या दृष्टीनें विचार केल्यास विवाह ही बाब केवळ सामाजिक नसून राष्ट्रियही आहे, असें म्हणावें लागतें. विवाह म्हणजे संभोगाचा हक्क असा अर्थ समजला जातो.

---

* ऋग्वेद मंडल २ सूक्त १७ ऋचा ७ मं. ५ सू. २८ ऋ. ३; मं. ५ सू. ३१ ऋ. २; मं. ५ सू. १४ ऋ. ५ मं. ७ सू. ७६ ऋ. ३; मं. ८ सू. १ ऋ. ३४; मं. ८ सू. २ ऋ. १९ मं. ८ सू.८ ऋ. १०; मध्यें विवाहसंस्थेचा उल्लेख आहे. कांहीं मंत्रांतून कामुक व स्वैरिणींचा उल्लेख असला तरी तो श्वेतकेतूच्या कालापूर्वीचा असावा असें दिसतें. ऋग्वेदकालापासून विवाहसंस्था आहे, हें सिद्ध करण्यास वरील संदर्भ पुरेसे आहेत.

पण नवनीतीचा आचार्य रसेलसुद्धां विवाह म्हणजे संभोगसर्वस्व नव्हे असें म्हणतोः—

Marriage is something more serious than the pleasure of two people in each other's company. It is an institution which, through the fact that it gives rise to children, forms part of the intimate texture of society, and has an importance extending far beyond the personal feelings of the husband and the wife. —Marriage and Morals, p. 63.

रसेलच्या वरील उताऱ्यांत पतिपत्नींच्या वैयक्तिक सुखापेक्षां इतर पुष्कळ लाभ विवाहामध्यें आहेत असें दाखविलें आहे.

(२६७) **लैंगिक नवमतवादः**—आज हिंदुसमाजांतील पुढारलेल्या वर्गांत नव्या नीतीच्या नांवाखालीं लैंगिक नवमतवाद चर्चिला जात आहे. डॉ. फ्राइड, हॅवलॉक एलिस व रसेल यांच्या ग्रंथांच्या आधारानें हा वाद पुढें मांडण्यांत येत असतो. तो असा-'अनेक रोग कामुकतेनें उत्पन्न होतात. कामुकतेच्या भोंवतालचें ढोंगी आवरण तोडलें पाहिजे. विवाहपूर्व शरीरसंबंध आवश्यक आहेत. स्त्रिया स्वावलंबी झाल्या कीं स्वेच्छाचार अपरिहार्य आहे. प्रेमस्वातंत्र्याबद्दल मत्सर नसावा. सुसंस्कृत स्त्रीपुरुष आपल्या जोडीदाराबरोबर आजन्म सुखी राहूं शकत नाहींत. सुख हवें असल्यास जोड्या वरचेवर बदलाव्यात. विवाहबाह्य शरीरसंबंध इष्ट आहे. वेश्याव्यवसायाला स्वातंत्र्य असावें. कुटुंबसंस्था अनावश्यक आहे. मुलांचें संगोपन सरकारनें करावें. लैंगिकसंबंधाचें पूर्ण स्वातंत्र्य म्हणजे नव्या सुसंस्कृत जगतांतील सुधारणेचा कळस होय!'

हीं मतें इतकीं टाकाऊ आहेत कीं त्यांच्या खंडणाची आवश्यकता नाहीं. कारण जगांतील कोणत्याही राष्ट्रानें हीं मतें ग्रहण केल्याचें दिसत नाहीं. हिंदुसमाजांतील कांहीं मागसलेल्या आणि फार पुढारलेल्या गटांत हा नवमतवाद त्याचा पुरस्कार न करतांच स्वयंभूपणानें आहे. पण त्या गटांची स्थिति अत्यंत शोचनीय आहे. ज्या गटांत हा नवमतवाद नाहीं, तेच गट सापेक्षतया सुखी दिसतात.

विशेषतः मध्यमवर्गांत हा लैंगिक नवमतवाद निराशेनें सांप्रत उत्पन्न झालेला आहे. सामाजिक नवमतवाद वा राजकीय नवमतवाद

हाच खरा क्रांतीचा मार्ग आहे. तो ज्यांना पेलत नाहीं, ते लैंगिक नवमत-वादाचा पुरस्कार करतात. क्रांतिवाद पुढें आला कीं हा वाद मागें पडणारच आहे. कोणताही विचारी पुढारी लैंगिक नवमतवादाचें समर्थन करीत नाहीं. तो स्वैराचार व व्यभिचार यांची प्रवृत्ति कां वाढत आहे, याचें फार तर विवेचन करतो. पैशाच्या व अन्नाच्या अभावीं चोरी व विवाहाच्या अभावीं स्वैराचार होतो, हेंही समर्थन सयुक्तिक नाहीं. कारण संपन्न माणसेंही मोठ्या प्रमाणांत पैशाचा अपहार करतात; आणि विवाहित माणसेंही व्यभिचारी असतात. वासनांना इष्ट विषय मिळाले म्हणजे त्या शमतात असें नसून त्याला संयमाचीच आवश्यकता आहे. व्यक्ति व समाज यांच्या उन्नतीला संयम आवश्यक आहे. तोच कर्तृत्वाचा पाया आहे. विकारवशता व विचारयुक्तता यांतील अंतर विसरून चालणार नाहीं.

मध्यमवर्गांत शिक्षणाच्या वाढीमुळें आकांक्षा वाढल्या, म्हणून बेकारी जास्त भासूं लागली. बेकारीमुळें तरुणतरुणींना विवाहाशिवाय राहाण्याची सक्ति होऊं लागली. त्यामुळें विवाहाची वयोमर्यादा वाढली. अर्थात् हा लैंगिक नवमतवाद स्वैराचाराचें समर्थन करण्याकरितांच पुढें आला. इतर वर्गांत हा वाद नाहीं. सुतार, गवंडी, शिंपी, चांभार, लोहारादिकांना आपल्या मुलांच्या लग्नाची काळजी वाटत नाहीं व उद्योगाची तर नाहींच नाहीं. हे लोक आपल्या मुलांचीं लग्नें विसाव्या वर्षींच उरकतात. रोजचा रुपाया, आठ आणे मिळविणारा मुलगा झाला कीं त्यांत त्यांचें समाधान असतें व संसार चालू होतो. तात्पर्य, विवाह-संस्था ही निसर्गाला धरून आहे. अपत्यवात्सल्य, रतिसुख व स्ववंशाच्या वाढीची प्रबळ वासना यामुळेंच गृहसंस्था निर्माण झाली आहे. अपत्य-संगोपन हें आईच स्वत्वममत्वयुक्त करूं जाणे. दाईकडून तें कालत्रयीं शक्य नाहीं.

**(२६८) अनुदार विचारः**—विवाह म्हणजे खासगी मिळकतीला वारस करण्याचा उपाय आणि स्त्री म्हणजे तो वारस उत्पन्न करण्याचें साधन, असली भाषा नवनीतिवादी बोलतात. जुने वेदांतीही स्त्री ही उप-भोग्य आहे, रतिसुखाचें साधन आहे, ती एक विषय आहे, असें समजूनच स्त्रीची निंदा करीत. हे दोन्ही विचार अत्यंत अनुदार व निसर्गा-

विरुद्ध आहेत. विवाहसंबंध म्हणजे पतिपत्नीचें एकनिष्ठ नातें. त्याग शिकविण्याची ही शाळा आहे. पतिपत्नी हीं प्रथम एकमेकाकरितां नंतर अपत्याकरितां त्याग करितात; पुढें कुटुंबाकरितां व समाजाकरितां त्यागाची कल्पना विस्तृत होत जाते. विवाहसंस्थेचे मुख्य लाभ म्हटले म्हणजे व्यक्तीचा विकास व त्या द्वारानें मानव्याचा विकास हे होत.

**(२६९) स्त्रियांचें नैसर्गिक दौर्बल्यः**—निसर्गानेंच स्त्रीपुरुषांना परस्परांचें आकर्षण व आवश्यकता उत्पन्न केली आहे. स्त्रिया या निसर्गतः पुरुषांपेक्षां कांहीं गुणांनीं कमी असल्यामुळें परावलंबी आहेत. गर्भारपण व बाळंतपण हीं निसर्गानें त्यांच्या मागें लावलीं असल्यामुळें त्यांना परावलंबी राहणें भाग आहे. म्हणूनच कुटुंबव्यवस्थेमध्यें अखेरचा निर्णय ठरविण्याचा अधिकार त्यांना येत नाहीं. आजच्या हिंदुसमाजांत पितृप्रधान कुटुंबसंस्था रूढ आहे. स्त्री ही कुटुंबसंस्थेची भागीदारीण असून गृहाची ती गृहिणी व स्वामिनीही आहे.

हिंदुसमाजांत स्त्रियांचा दर्जा प्राचीन काळीं अत्यंत उच्च असा होता. स्त्रीजातीविषयीं उच्च कल्पना असणें हें एक उच्च संस्कृतीचें गमक आहे. स्त्रियांना उत्तमांगी, अर्धांगी अशीं विशेषणें प्राचीन वाङ्मयांत आढळतात. आतां त्या स्वतंत्रांगी होऊं पहात आहेत.

**(२७०) भावनांचें शुद्धीकरणः**—स्त्रिया या कोणत्याही समाजाच्या अर्ध्या घटक आहेत. स्त्रिया व पुरुष मिळूनच पूर्ण समाज होतो. स्त्री–पुरुषांच्या परस्पराविषयींच्या कल्पनांचा आणि समाजाच्या अभ्युदयाचा निकट संबंध आहे. पुरुषजात ही जुलमी, अनियंत्रित, अरेराव अशी स्त्रियांची समजूत असणें जसें योग्य नव्हे तसेंच स्त्रिया या लबाड, मूर्ख, अतिलोभी असतात, अशी पुरुषांची समजूत असणें हेंही अयोग्य होय. सांप्रत विचार व भावनांचें शुद्धीकरण होत आहे व स्त्रियासंबंधींच्या मध्यकालांतील हीन कल्पना जाऊन उच्च कल्पना येत आहेत. अशा वेळीं जुन्या हिंदुधर्मांतील स्त्रियांसंबंधाचे उच्च विचार सांगणें अप्रस्तुत होणार नाहीं.

**(२७१) दोघेही श्रेष्ठचः**—स्त्री व पुरुष यांत श्रेष्ठ कोण? विधात्यानें आधीं पुरुष उत्पन्न केला का आधीं स्त्री उत्पन्न केली, हे प्रश्न मोठे मजेदार

आहेत. खिस्ती धर्मांत पुरुषाच्या करमणुकीसाठीं त्याच्या बरगडीपासून स्त्री निर्माण केली असें म्हटलें आहे, पण वेदांमध्यें स्त्री व पुरुष हें जोडपें द्विदल धान्याप्रमाणें एकदम उत्पन्न केलें असें म्हटलें आहे.

" अर्धो वा एष आत्मनः यत्पत्नी "

–तैत्तिरीय संहिता ( ६, १, ८. )

अर्थः–पत्नी ही पुरुषाचें अर्धें शरीरच होय !

' अर्धो ह वा एष आत्मनस्तस्माद्यज्जायां न विंदते नैतावत् प्रजायते असर्वोहि तावद्भवति । अथ यदैव जायां विंदतेऽथ प्रजायते तर्हि सर्वो भवति । '

–वाजसनेय ब्राह्मण.

भावार्थः–स्त्री हा आत्म्याचा अर्धा भाग होय. मनुष्य जोंवर भार्यावान् व प्रजावान् नाहीं तोंवर तो अपूर्ण होय. पण जेव्हां तो भार्यायुक्त व प्रजायुक्त होतो तेव्हां तो पूर्णत्व पावतो.

येथें स्त्री व पुरुष हे दोन्ही घटक परस्परपूरक व सारख्या योग्यतेचे आहेत, संसाररथाचीं हीं दोन चाकें आहेत, एक नसेल तर दुसरें लुलें पडतें अशीच कल्पना आहे.

' स वै नैव रेमे तस्मादेकाकी न रमते स द्वितीयमैच्छत् स हैतावानास यथा स्त्रीपुमांसौ संपरिष्वक्तौ स इममेवात्मानं द्वेधाऽपातयत्ततः पतिश्च पत्नीचाभवतां तस्मादिदमर्धबृगलमिव । '

–बृ. आ. ( अ. १ ब्रा. ४ )

भावार्थः–प्रथमारंभीं एकट्या असलेल्या ब्रह्माला चैन पडेना म्हणून त्याला दुसरें कोणी हवें असें वाटलें. नंतर तें ब्रह्म स्वतः एका स्त्रीपुरुषाच्या जोडप्याच्या आकाराचें झालें. त्याचे त्यानें दोन भाग केले. तेच पति व पत्नी होत. पत्नी हा पतीचा अर्धा भाग आणि पति हा पत्नीचा अर्धा भाग होय.

स्त्री ही पतीला अपत्यरूपानें जन्म देते म्हणून तिला जाया. असें म्हणावें.

तज्जाया जाया भवति यदस्यां जायते पुनः ॥ –बव्हृच ब्राह्मणम्

स्त्रीविषयक उच्च कल्पना देण्यास वरील वचनें पुरेशीं आहेत.

(२७२) **वेदकालीन स्त्रियाः**—प्राचीन कालीं स्त्रिया विद्वान् व सुसंस्कृत होत्या. त्या वेदवेत्त्या, कर्त्या व उपनीतही होत्या. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलाच्या ३९ व ४० या सूक्तांची कर्ती घोषा नांवाची स्त्री आहे. ही घोषा काक्षीवताची कन्या होती. तिला श्वेतकुष्ठाचा विकार जडलेला होता. तिनें अश्विनीकुमारांचें स्तवन केलें. त्यांनीं संतुष्ट होऊन तिला रोगमुक्त करून चांगला पति दिला, असें वर्णन ऋग्वेद ( १–११७–७ )–मध्यें आहे. अपाला–आत्रेयी ही आणखी एक स्त्री ऋग्वेद ( ८–९१ ) या सूक्ताची द्रष्टी आहे. खेल राजाची विश्पला ही उत्कृष्ट रणधुरंधर होती. तिच्या लढाईचें वर्णन ( ऋ. १०,३९,८ ) मध्यें आलेलें आहे. मुद्गलानी नांवाची स्त्री सारथ्यकर्मांत मोठी निपुण होती असें वर्णन ऋग्वेद ( १०–१०२–२ ) मध्यें आढळतें.

(२७३) **उपनिषदें व स्त्रियाः**—बृहदारण्यक उपनिषदामध्यें कात्यायनी, गार्गी, यांचा याज्ञवल्क्याशीं संवाद झाला आहे. त्यावरून त्यांची विद्वत्ता व बुद्धिमत्ता प्रतीत होते. हारित धर्मसूत्रामध्यें लग्न करून संसारांत पडणाऱ्या व ब्रह्मवादिनी अशा दोन प्रकारच्या स्त्रिया सांगितल्या आहेत. ‘ ब्रह्मवादिनीनामुपनयनमग्नीन्धनं वेदाध्ययनं स्वगृहे च भिक्षाचर्या ’ असें म्हणून त्यांना उपनयन, अग्निकार्य, वेदाध्ययन वगैरे कर्तव्यें सांगितलीं आहेत. पाणिनीनें ( ४, १, १४ ) ‘ काशकृत्स्ना ’ ‘ आपिशला ’ असे दोन शब्द व्युत्पादिले आहेत. त्यांचा अर्थ मीमांसाशास्त्राचें अध्ययन करणारी काशकृत्स्ना नांवाची ब्राह्मणी व अपिशलाचें अध्ययन करणारी ती आपिशला नांवाची स्त्री असा आहे. कात्यायनानें उपाध्यायी व उपाध्याया आणि आचार्या अशीं स्त्रीलिंगी रूपें दाखवून जी स्वतः पढविते ती असा अर्थ सांगितला आहे.

(२७४) **स्त्रिया व वेदः**—वाल्मिकी रामायणांत स्त्रियांच्या वेदाध्ययनाचे कांहीं उल्लेख सांपडतात. मारुती सीताशुद्ध्यर्थ हिंडत असतां म्हणतो,

> **संध्याकालमनाः श्यामा ध्रुवमेष्यति जानकी ।**
> **नदीं चेमां शुभजलां संध्यार्थे वरवर्णिनी ॥** —५।१४।११

संध्या करावयाची वेळ झाली आहे, हें मनांत आणून ती श्रेष्ठ स्त्री जानकी संध्या करण्यासाठीं या निर्मळ पाण्यानें युक्त असलेल्या नदीवर खात्रीनें येईल.

वालिवधाचे वेळीं त्याची स्त्री तारा हिनें आपल्या पतीला जय मिळावा म्हणून वेदमंत्रांनीं प्रार्थना केली, असाही उल्लेख आढळतो.

**ततः स्वस्त्ययनं कृत्वा मंत्रवित् विजयैषिणी ।** —४।१६।१२

वरील उल्लेखावरून रामायणकालीं स्त्रियांचीं उपनयनें होत असत व त्या वेदही म्हणत असत असें म्हणण्यास हरकत नाहीं. भारतामध्यें द्रौपदीचें वर्णन वनपर्व अ. २७ मध्यें

**'प्रिया च दर्शनीया च पंडिता च पतिव्रता'**

असें आहे. यांतील पंडिता हें पद महत्त्वाचें आहे. वरील सर्व विवेचनावरून स्त्रियांचें समाजांत किती श्रेष्ठ स्थान होतें, याची कल्पना येते.

(२७५) **स्त्रिया व स्वातंत्र्यः**—स्त्रियांना पुरुषांप्रमाणें सर्व बाबतींत स्वातंत्र्य असावें असें आज मत पुढें येत आहे. त्यांतील बराचसा भाग ग्राह्य आहे. पण निसर्गतःच स्त्रियांच्या ठिकाणीं जें वैगुण्य आहे त्यामुळें त्यांना पुरुषाप्रमाणें सर्व बाबतींत स्वातंत्र्य असणें व देणें योग्य नाहीं. जुन्या हिंदुधर्मशास्त्रांत स्त्रियांना रक्षणाच्या दृष्टीनें व इतर दृष्टीनेंही स्वातंत्र्य नाहीं असें अनेक ठिकाणीं म्हटलेलें आहे; पण गृहिणी व भार्या या दृष्टीनें त्यांचा गौरव पुष्कळच केला आहे.

न स्त्रीस्वातंत्र्यं विद्यते ।
पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने ।
पुत्रस्तु स्थाविरे भावे न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ॥५२॥

—बौधायन अ. २

अस्वतन्त्रा स्त्री पुरुषप्रधाना ॥१॥
पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने ।
पुत्रश्च स्थाविरे भावे न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ॥४॥—वसिष्ठ अ.३
बालया वा युवत्या वा वृद्धया वापि योषिता ।
न स्वातन्त्र्येण कर्त्तव्यं किंचित्कार्यं गृहेष्वपि ॥१४७॥

बाल्ये पितुर्वशे तिष्ठेत्पाणिग्राहस्य यौवने ।
पुत्राणां भर्तरि प्रेते न भजेत्स्त्री स्वतंत्रताम् ॥१४८॥ मनु. अ. ५
पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने ।
रक्षन्ति स्थाविरे पुत्रा न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ॥ ३ ॥
सूक्ष्मेभ्योऽपि प्रसंगेभ्यः स्त्रियो रक्ष्या विशेषतः ।
द्वयोर्हि कुलयोः शोकमावहेयुररक्षिताः ॥ ५ ॥ —मनु अ. ९

वरील वचनांचा भावार्थ पहातां स्त्रियांना रक्षणाच्या दृष्टीनेंच स्वातंत्र्य नव्हतें असें नसून गृहकृत्यामध्यें सुद्धां त्या परतंत्रच होत्या. म्हणूनच त्यांची निंदाही पुष्कळ ठिकाणीं केलेली आहे. आमच्यामतें ही स्त्रीनिंदा गृहस्थाश्रमाला मालिन्य ज्या कालीं आलें त्या कालांतील असावी. तो काल म्हणजे भिक्षुभिक्षुणी, संन्यासी यांच्या चलचलाटीचा, अर्थात् बुद्धोत्तर काल होय. अशाही कालांत जे स्त्रीगौरवाचे विचार आढळतात ते ध्यानीं घेऊन सांप्रत त्यांना बरोबरीनें वागविलें पाहिजे.

(२७६) स्त्रीगौरवः–

यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः ।
यत्रैतास्तु न पूज्यन्ते सर्वास्तत्राफलाः क्रियाः ॥५६॥
शोचन्ति जामयो यत्र विनश्यत्याशु तत्कुलम् ।
न शोचन्ति तु यत्रैता वर्धते तद्धि सर्वदा ॥५७॥
तस्मादेताः सदा पूज्या भूषणाच्छादनाशनैः ।
भूतिकामैर्नरैर्नित्यं सत्कारेषूत्सवेषु च ॥५९॥
संतुष्टो भार्यया भर्ता भर्त्रा भार्या तथैव च ।
यस्मिन्नेव कुले नित्यं कल्याणं तत्र वै ध्रुवम् ॥६०॥
—मनु. अ. ३

प्रजनार्थं महाभागाः पूजार्हा गृहदीप्तयः ।
स्त्रियः श्रियश्च गेहेषु न विशेषोऽस्ति कश्चन ॥२६॥
—मनु. अ. ९

उत्पादनमपत्यस्य जातस्य परिपालनम् ।
प्रत्यहं लोकयात्रायाः प्रत्यक्षं स्त्रीनिबंधनम् ॥२७॥

अपत्यं धर्मकार्याणि शुश्रूषा रतिरुत्तमा ।
दाराधीनस्तथा स्वर्गः पितॄणामात्मनश्च ह ॥२८॥
विधाय वृत्तिं भार्यायाः प्रवसेत्कार्यवान्नरः ।
अवृत्तिकर्शिता हि स्त्री प्रदुष्येत्स्थितिमत्यपि ॥७४॥
प्रजनार्थं स्त्रियः सृष्टाः संतानार्थं च मानवाः ।
तस्मात्साधारणो धर्मः श्रुतौ पत्न्या सहोदितः ॥९६॥

—मनु. अ. ९

अर्धं भार्या मनुष्यस्य भार्या श्रेष्ठतमः सखा ।
भार्या मूलं त्रिवर्गस्य भार्या मूलं तरिष्यतः ॥

—महाभारत १।७४।४१

न गृहं गृहमित्याहुर्गृहिणी गृहमुच्यते ।
गृहं तु गृहिणीहीनमरण्यसदृशं मतम् ॥१२।१४४।६
नास्ति भार्यासमो बंधुर्नास्ति भार्यासमा गतिः ।
नास्ति भार्यासमो लोके सहायो धर्मसंग्रहे ॥१२।१४४।१६
पुत्र आत्मा मनुष्यस्य भार्या दैवकृतः सखा ॥३।३१३।७२
यस्य भार्या गृहे नास्ति साध्वी च प्रियवादिनी ।
अरण्यं तेन गंतव्यं यथारण्यं तथा गृहम् ॥१२।१४४।१७
वृक्षमूलेऽपि दयिता यस्य तिष्ठति तद् गृहम् ।
प्रासादोऽपि तया हीनः कांतार इति निश्चितम् ॥१२।१४४।१२

भावार्थः-जेथें स्त्रियांचा सत्कार केला जातो व त्यांचेविषयीं दाक्षिण्य दाखविलें जातें तेथें देवता रममाण होतात. जेथें याउलट स्थिति असेल तेथील सर्व क्रिया निष्फल होतात. ज्या घरांत स्त्रिया शोक करतात तें कुल नष्ट होतें व जेथें त्या आनंदित असतात तें कुल वाढतें. म्हणून उत्कर्षेच्छु पुरुषांनीं भूषण, आच्छादन व अन्न देऊन स्त्रियांना संतुष्ट करावें व उत्सवप्रसंगीं त्यांचा सत्कार करावा. ज्या कुलांत स्त्रीपुरुष परस्परसंतुष्ट व अनुरक्त असतात तेथें मूर्तिमंत कल्याण नांदतें. स्त्रिया या पूजार्ह, गृहांतील दीपिका असून संततीकरितां त्यांचा अवतार आहे. मुलांना

जन्म देणें, त्यांचें संरक्षण करणें, रोजचा संसार चालविणें हीं त्यांचीं मुख्य कामें होत. म्हणून धर्मकार्यें, अपत्यसंगोपन व संसारसुख हें सर्व स्त्रियांचें आधीन आहे. पितरांचा स्वर्गसुद्धां स्त्रियांचें आधीन असतो. दीर्घकाल प्रवास करणाऱ्यानें आपल्या बायकामुलांच्या पोटाची व्यवस्था करून मग बाहेर जावें. तसें न केल्यास त्यांची बुद्धि विपरीत होते. प्रजेकरितां स्त्रिया व संतानाकरितां पुरुष निर्माण केलेले आहेत.

स्त्री हा पुरुषाचा अर्धा भाग आहे. भार्या हा गृहस्थाचा श्रेष्ठ मित्र होय. त्रिवर्गाचें मूल भार्याच आहे. गृहिणी म्हणजेच घर होय. त्याशिवाय तें घरच नव्हे. गृहिणीहीन घर अरण्यासारखें समजावें. भार्येसारखा बंधु नाहीं, भार्येसारखा आश्रय नाहीं व धर्मकार्यांत साह्य करणाराही दुसरा कोणी नाहीं. आर्त व दुःखपीडित मनुष्याचें दुःख नाहींसें करणारें औषध म्हणजे भार्या होय. मनुष्याचा आत्मा पुत्र हा आहे. भार्या हा दैवानें दिलेला मित्र आहे. ज्याच्या घरीं साध्वी व प्रियवादिनी भार्या नाहीं त्यानें अरण्यांत जावें. कारण त्याचें घर अरण्यसदृशच असतें. झाडाखालींसुद्धां गृहस्थाचें घर होऊं शकतें, मात्र तेथें भार्या असली पाहिजे. तिच्याशिवाय राजवाडासुद्धां अरण्यासारखा वाटतो.

हिंदुधर्म हा गृहस्थप्रधान आहे. कारण त्याशिवाय पुरुषार्थ साध्य होत नाहींत. गृहस्थाश्रमाची मदार मुख्यतः गृहिणीवर असते म्हणून स्त्रियां-संबंधानें अनुदार विचार हिंदुधर्मामध्यें येणेंच शक्य नाहीं. कुठें कुठें अनुदार विचार आहेत पण ते बुद्धोत्तरकालीन असावेत. वैदिक वाङ्मय, भारत व रामायण यांमधील उच्च विचार वर सांगितले आहेत. वराह-मिहराचे विचार आतां सांगतों.

श्रुतं दृष्टं स्पृष्टं स्मृतमपि नृणां ल्हादजननं
न रत्नं स्त्रीभ्योऽन्यत्क्वचिदपि कृतं लोकपतिना ।
तदर्थं धर्मार्थौ सुतविषयसौख्यानि च ततो
गृहे लक्ष्म्यो मान्याः सततमबला मानविभवैः ॥४॥

येऽप्यंगनानां प्रवदन्ति दोषान् । वैराग्यमार्गेण गुणान् विहाय ॥
ते दुर्जना मे मनसो वितर्कः । सद्भाववाक्यानि न तानि तेषाम् ॥५॥

प्रब्रूत सत्यं कतरोऽङ्गनानां । दोषोऽस्ति यो नाचरितो मनुष्यैः ॥
धार्ष्टयेन पुंभिः प्रमदा निरस्ता । गुणाधिकास्ता मनुना च चोक्तम् ॥९॥
जाया वा स्याज्जनित्री वा संभवः स्त्रीकृतो नृणाम् ।
हे कृतघ्नास्तयोर्निन्दां कुर्वतां वः कुतः सुखम् ॥१०॥
न शतेनापि वर्षाणामपैति मदनाशयः ।
तत्राशक्त्या निवर्तन्ते नरा, धैर्येण योषितः ॥११॥
दंपत्योर्व्युत्क्रमे दोषः समः शास्त्रे प्रतिष्ठितः ।
नरा न तमवेक्षन्ते तेनात्र वरमङ्गनाः ॥१२॥

**भावार्थः**–ऐकण्यानें, पाहण्यानें, स्पर्शानें फार काय पण केवळ स्मरणानेंही आनंद देणारें स्त्रीहून दुसरें रत्न विधात्यानें निर्माण केलेलें नाहीं. स्त्रीमुळेंच धर्म, अर्थ, मुलेंबाळें आणि नानाविध भोग प्राप्त होत असल्यामुळें स्त्रियांचा घरामध्यें योग्य आदर केला पाहिजे. वैराग्यासाठीं का होईना पण जे अंगनांचे दोष दाखवितात, ते खरोखरी दुर्जन होत! स्त्रियांवर ठेवण्यांत येणाऱ्या दोषारोपांपैकीं कोणत्या दोषाचें आचरण पुरुष करीत नाहींत ? असें असून पुरुषांनीं स्त्रियांस अव्हेरिलें हें केवळ धाष्टर्य होय. कारण मनूनेंच स्त्रियांमध्यें गुणाधिक्य असल्याचें दाखविलें आहे. पुरुषांची उत्पत्ति स्त्रियांपासूनच होते मग त्यांची निंदा करणाऱ्यांना सुख कोठलें ? शंभर वर्षें भरत आलीं तरी पुरुषांचा कामविकार नष्ट होत नाहीं. अशक्तपणा प्राप्त झाल्यावरच पुरुष कामविकापासून दूर सरतात, पण स्त्रिया मात्र मनोधैर्यानें कामविकार जिंकतात. विवाहित जोडप्यानें परस्परांचा अतिक्रम केला असतां दोघांसही सारखाच दोष शास्त्रानें सांगितला आहे. पण त्याकडे पुरुष पहातच नाहींत.

**(२७७) स्त्रीनिंदेला उत्तरः**–गृहिणी व भार्या या दृष्टीनें स्त्रियांचें समाजांत स्थान कसें होतें, हें वरील मनु व महाभारत यांतील वचनांवरून चांगलें समजतें. मनुस्मृतींत स्त्रियांची बरीचशी निंदा केली आहे. त्या पुरुषांना बिघडवितात, विद्वानालाही भलत्या मार्गाला नेतात, त्या रूप, वय इत्यादीचा विचार न करतां कुणाशींही अनुरक्त होतात इत्यादि विधानें एकांतिक आहेत. लज्जा, धैर्याचा अभाव व मनाचा कोमलपणा

यांस स्त्रिया साहसाला प्रवृत्त होत नाहींत. म्हणून पुरुष त्यांच्या या वै ाचा फायदा घेतात. स्त्रियांना दुर्मार्गाला प्रवृत्त करण्याचे कामांत पुरुषच अधिक अपराधी असतात, असें सिद्ध करतां येतें. स्त्रियांना स्वातंत्र्य नाहीं, त्यांना विचार नाहीं, त्यांना डांबून ठेवाव्यात, असले बुद्धोत्तरकालांतील विचार मनुस्मृतींत आहेत. हींच विधानें उलट पुरुषांविषयीं करतां येतील. रिकामे पुरुष पाहिजे तो धिंगाणा घालतात, कूटकौटिल्यानें साध्वीला भ्रष्ट करितात आणि आपल्या सामर्थ्याचा सर्वथैव दुरुपयोग करतात अशीं उदाहरणें पुष्कळ आहेत. असो.

(२७८) **विवाहाचे आठ प्रकारः**- विवाहसंस्था ही व्यक्तीच्या विकासाकरितां, समाजस्वास्थ्याकरितां आणि सुप्रजा निर्माण करण्याकरितां आहे. आज हिंदुसमाजांत जो ब्राह्मविवाह रूढ आहे, तो प्रयोग करीत करीतच हिंदुसमाजानें गांठलेला आहे. पूर्वी विवाहाचे आठ प्रकार होते–

**ब्राह्मो दैवस्तथैवार्षः प्राजापत्यस्तथासुरः ।**
**गान्धर्वो राक्षसश्चैव पैशाचश्चाष्टमोऽधमः ॥२१॥** मनु. अ. ३

ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, आसुर, गांधर्व, राक्षस, पैशाच हे ते आठ प्रकार होत. जुन्या हिंदुधर्मशास्त्रांत यांचें विवेचन पुष्कळच आहे. कोणी आठापैकीं पांच धर्म्य होत, पैशाच व आसुर हे अधर्म्य होत असें म्हणतात. गांधर्व विवाहाला मनूनें गौणत्व दिलें आहे. विकत घेतलेली स्त्री ही पत्नी नव्हे असें बौधायन म्हणतो. वराला दक्षिणा देऊन कन्या देणें हाच ब्राह्मविवाह होय. यांतच सालंकृत कन्यादानाचा अंतर्भाव होतो. कन्येच्या पित्याला द्रव्य देऊन लग्न करणें हा आसुरविवाह होय. राक्षस व पैशाचविवाह हे आतां कायद्यानेंच बंद केलेले आहेत. कोठें कोठें या चालीचे अवशेष असले तरी ते बंद केले पाहिजेत. प्रौढ वधुवरांचा परस्परपरिचय होऊन एकमेकांच्या पसंतीनें आतां विवाह झाले पाहिजेत. यांत अनिष्ट नाहीं. शकुंतलेनें दुष्यंताला स्वयंदान केलें व कण्वानें तिच्या कृत्याला संमति दिली, हें आदिपर्वांतील उदाहरण चिंतनीय आहे. प्रयोग करीत करीत ब्राह्मविवाहाचा शुद्ध प्रकार समाजानें आतां अवलंबिलेला आहे. त्यांतच अधिक सुधारणा अवश्य तर कराव्या.

## विवाहसंस्कार

(२७९) **विवाहसंस्कारांतील साम्यः**—अखिल हिंदूंतील प्रमुख अशा सुमारें शंभर जातींच्या विवाहपद्धतींची आम्हीं तपासणी केली. त्यावरून ब्राह्मणापासून तों भंग्यापर्यंत अखिल हिंदूंमध्यें विवाहांतील हळदी, साखरपुडा, गणपतिपूजन, कन्यादान, मंगलाष्टकें, देवाला जाणें, शेज चढविणें, मुहूर्त पाहणें, मागणी घालणें, बोहलीं घालणें, वरपूजा, कंकण बांधणें, मंगळसूत्र बांधणें, सप्तपदी, गांठ देणें, देवक बसविणें, मंडोळ्या बांधणें, अक्षता टाकणें, सीमांतपूजन, कलशपूजा, वरात काढणें, ओटी भरणें वगैरे सर्व कृत्यें अगदीं सारखीं आढळतात.

(२८०) **मराठ्यांचें अनुकरणः**—हिंदुसमाजांतील पुष्कळ जातींचीं लग्नें ब्राह्मण लावतो. अनेक हिंदुजातींचीं लग्नें जंगमाकडून होतात. प्रत्येक जातींतील पुरोहित, अथवा तज्ज्ञ अथवा वृद्ध आपापल्या जातींतील लग्नें लावतात. विवाहांतील सर्व तंत्र सर्वत्र सारखें आहे. लिंगायतांचे मंत्र वेदोक्तप्रयोगांतीलच असतात. फक्त पंच—आचार्यांचें पूजन तेवढें निराळें असतें. जैनांचीं लग्नेंसुद्धां पुष्कळवेळां ब्राह्मणच लावतो. जैनांचे मंत्र वेदांतील नसले तरी मंत्रांचा आशय व तंत्र हे सर्व लिंगायत, ब्राह्मण व मराठा यांप्रमाणेंच आहे. महाराष्ट्रांत क्षत्रिय—मराठा हा बहुसंख्य समाज आहे. त्याच्या खालोखाल मराठा—कुणबी आहे. ब्राह्मण ज्या तंत्रानें व पद्धतीनें ब्राह्मणांतील लग्नें लावतो, त्याच तंत्रानें तो भंग्याकडेही लावतो. क्षत्रिय—मराठ्यांचा विवाह ब्राह्मणाप्रमाणें, कुणब्याचा विवाह मराठ्याप्रमाणें आणि इतर सर्व हिंदुजातींतील विवाहविधि जवळ जवळ मराठ्यांप्रमाणें होतो. मराठा—क्षत्रिय व मराठा—कुणबी हा महाराष्ट्रांतील हिंदुसमाजाचें गुरुत्वमध्य असल्यामुळें त्याचेंच अनुकरण विवाहाचें व इतर बाबतींत सर्व जाति करतात.

(२८१) **विवाहांतील विविध चालीः**—लग्नाच्या वेळीं कांहीं जातींत वधुवरांचे मामा हातांत तलवारी घेऊन उभे असतात ! कांहीं जातींत पंचपल्लवीसारखें जें देवक आणावयाचें तें सशस्त्र आणतात. मध्य प्रांतांतील माळ्यांमध्यें योग्य वर न मिळाल्यास मुलीला रानांतील कोणत्या-

तरी झाडास बांधून ठेवतात; पुढें जो कोणी तिला सोडवील तो तिचा नवरा होतो. कांहीं जातींत वरवंट्याभोंवतीं प्रदक्षिणा घालतात. लग्नाच्या शेवटीं एकमेकांना कांदे मारणें, वधूच्या घरांतील देव पळवून नेणें, अशा चाली आहेत. कातकऱ्यांमध्यें कमरेला तलवार लटकावूनच लग्न व्हावयाचें असतें. गृहप्रवेशानंतर नवरानवरीला कुंभारानें खांद्यावर घेऊन नाचण्याची चाल कांहीं जातींत आहे. ज्यांचें जें देवक असतें, तें फार पूज्य समजण्यांत येतें. सप्तपदीच्या ऐवजीं कांहीं जातींत वधुवरांभोंवतीं सुताचा दोरा सातदां गुंडाळतात. वराच्या आईनें ओवाळलें म्हणजे सप्तपदी झाली असें समजतात. देवकाशिवाय ज्यांच्या त्यांच्या कुलदेवता भिन्नभिन्न असतात. त्यांचे कुलधर्म विवाहापूर्वीं अगर नंतर करण्याची चाल आहे. राजपुतान्यांत व मारवाडांत लग्नामध्यें न्हाव्याचें प्रस्थ विशेष असतें. मुलगी पाहणें, ठरविणें व पुढें सर्व लग्न व्यवस्थित उरकणें हीं कामें प्रामुख्यानें न्हाव्यावर सोंपविलेलीं असतात. एवढ्या प्रचंड समाजांतील भिन्नभिन्न गटांत जरी अशा तऱ्हेनें कांहीं भिन्नभिन्न चाली दिसल्या व त्यांच्यामागें कांहीं इतिहास असला तथापि एकंदर हिंदुसमाजांत विवाहासंबंधानें एकरूपता आहे. अखिल हिंदूंमध्यें विवाहसंस्थेसंबंधाच्या कल्पना, भावना, संस्कार, चालीरीति व रूढी या सर्व जवळजवळ एकच आहेत. म्हणूनच धर्मनिर्णयमंडळानें सर्वांकरितां एकच संस्कारप्रयोग सिद्ध केला आहे.

(२८२) **प्रयोगांतील मुख्य विषयः**-प्रस्तुत प्रयोगांत पुण्याहवाचन, वाग्दान, कन्यादान, पाणिग्रहण, विवाहहोम, लाजाहोम, अश्मारोह, सप्तपदी, आशीर्वाद, अभिषेक, ध्रुवदर्शन आणि गृहप्रवेश इत्यादि सर्व महत्त्वाचे विधि दिले असून प्रयोगाचें सुबोध मराठी भाषांतरही दिलें आहे. या प्रयोगांत किचकट भाग नाहीं, कर्मांचा खटाटोप नाहीं, परंपरेचा उच्छेद नाहीं, उगाच विस्तार नाहीं; इतकेंच नव्हे, तर हा प्रयोग कोणत्याही समंजस, सुशिक्षित व सुबुद्ध हिंदूला त्यांतील उच्च व उदात्त आशयात्मक मंत्र पाहून सर्वस्वीं पसंत पडण्याजोगा आहे. हा प्रयोग अखिल हिंदूंनीं रूढ करावा.

(२८३) **कन्यादानः**-विवाहप्रयोगांतील कन्यादानाची कल्पना आज शिक्षणामुळें मुलींना व इतरांना कशीशीच वाटते. पण पिता कन्येचें

दान तिच्या कल्याणाकरितांच करीत असतो. कांहीं वधुवरें आम्ही उभयतां विवाहबद्ध होणार आहोंत अशा निमंत्रणपत्रिका काढतात. हा प्रकार स्वयंदानाचाच होय. अपत्याचें दान व विक्रय करण्याचा अधिकार मातापितरांना नाहीं, असें आपस्तंब म्हणतो—

**दानं क्रयधर्मश्च अपत्यस्य न विद्यते ।**

पण वसिष्ठ तो अधिकार आहे असें म्हणतो—

**तस्य प्रदानविक्रयत्यागेषु मातापितरौ प्रभवतः ॥२॥** वसिष्ठ अ. १५

स्मृतिकारांत यासंबंधीं भिन्न मत आहे. पुत्राचें दान दत्तकप्रसंगीं आणि कन्येचें दान विवाहप्रसंगीं त्यांच्या कल्याणाकरितांच पिता करीत असतो, म्हणून त्यांत आक्षेपार्ह असें कांहीं नाहीं.

**(२८४) सोयेरसुतक मानूं नयेः**—धर्मनिर्णयमंडळाच्या विवाहप्रयोगांत देवकप्रतिष्ठा नाहीं, त्यामुळें उपनयनविवाहादि कार्यांत सुतकसोहेरादि आल्यास त्याचा परिहार कसा करावयाचा अशी शंका कित्येकांना येते व ते मंडळाच्या प्रयोगाप्रमाणें इतर सर्व विधि करून देवकस्थापनाही करितात. त्यांनीं मंगलकार्याचा संकल्प करून पुण्याहवाचन केल्यानंतर तें कार्य संपेपर्यंत सुतकसोयेराचा दोष नाहीं असें शास्त्र आहे, हें ध्यानांत ठेवावें.

**विवाहोत्सवयज्ञेषु अन्तरा मृतसूतके ।**
**पूर्वसंकल्पितार्थस्य न दोषश्चात्रिरब्रवीत् ॥९८॥** —अत्रिसंहिता

विवाह ( उपनयन ), उत्सव, यज्ञ इत्यादि चालू झाल्यानंतर मध्येंच जर कोणी जवळचा नातलग मेल्याचें कळलें तर त्याचा दोष न मानतां पूर्वसंकल्पित कार्य तडीस न्यावें असें अत्रीचें म्हणणें आहे. हें ध्यानांत ठेवून ध. नि. मं. च्या प्रयोगाप्रमाणेंच विवाह व उपनयनादि संस्कार समंजस हिंदूंनीं करावेत.

**(२८५) कांहीं मंत्रांचें विवेचनः**—हिंदुसमाजांत विवाहसंस्कार हा उच्च व उदात्त असा समजतात. वधूवरांनीं अर्थ समजून घेऊन यावेळीं शपथ घ्यावयाची असते, ती सांप्रत उपाध्यायच म्हणत असतो! ‘धर्मे चार्थे च कामे च नातिचरितव्या त्वयेयं’ असा वराला उपदेश केल्यावर ‘नातिचरामि’ असें त्यानें म्हणावयाचें असतें. तीन पुरुषार्थ

साधण्यास एकमेकांची आवश्यकता आहे, असें या विधींत प्रतिपादन केलें आहे. विवाहसंस्कारांतील मंत्रांचा आशय किती उदात्त आहे, याची थोडी कल्पना पुढील मंत्रावरून येईल. अग्निप्रदक्षिणा करितांना वर म्हणतो,

'अमोहमस्मि सा त्वं सा त्वमस्यमोहं द्यौरहं पृथिवी त्वं तावेव विवहावहै प्रजां प्रजनयावहै सं प्रियौ रोचिष्णू सुमनस्यमानौ जीवेम शरदःशतम्'　—आश्व. गृ. सूत्र १, ७, ३-२२.

'आपण विवाहबद्ध होऊन प्रजा उत्पन्न करूं या, एकमेकांचें प्रिय करून एकमेकांना आवडतीं होऊं या, एकमेकांविषयीं शुद्ध मन ठेवून शंभर वर्षें राहूं या.'

वर पुढें म्हणतो, 'गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं मया पत्या जरदष्टिर्यथा सः। भगो अर्यमा सविता पुरंधिर्मह्यं त्वादुर्गार्हपत्याय देवाः ॥१४।१।५०॥　—अथर्ववेद.

'हे स्त्रिये, उत्तम भाग्याच्या प्राप्तीकरितां मी तुझें पाणिग्रहण करीत आहे. मज पतीबरोबर तूं पूर्ण वृद्धावस्थेपर्यंत राहा. भाग्यवान, श्रेष्ठ, उत्पादक अशा देवतांनीं तुला माझी गृहपतीचीं कर्तव्यें पार पाडण्याकरितां दिलेलें आहे.'

अथर्ववेदांतील गृहपत्नीला उद्देशून जे आशीर्वादात्मक मंत्र या प्रयोगांत म्हणण्यांत येतात त्यांतील दोन तीन असे आहेत—

शिवा भव पुरुषेभ्यो गोभ्यो अश्वेभ्यः शिवा ।
शिवास्मै सर्वस्मै क्षेत्राय शिवा न इहैधि ॥३।२८।३
इह प्रियं प्रजायै ते समृध्यतामस्मिन् गृहे ।
गार्हपत्याय जागृहि । एना पत्या तन्व ॥
सं स्पृशयस्वाथ जिव्रिर्विदथ मा वदासि ॥　अ. १४।१।२१
सम्राज्ञ्येधि श्वशुरेषु सम्राज्ञ्युत देवृषु ।
ननान्दुः सम्राज्ञ्येधि सम्राज्ञ्युत श्वश्र्वाः ॥ १४।१।४४

भावार्थः—हे स्त्रिये, तूं पुरुष, गाई, घोडे व गृहांतील इतर सर्व स्थानें यांना व आम्हाला कल्याणकारक अशी होऊन गृहांत ये. येथें तुझ्या संततीचें हितवर्धन होवो. घरांतील गार्हपत्य कर्मामध्यें तूं जागरूक

राहा. पतीच्या साह्यानें शरीरसौख्य प्राप्त करून घे. तूं पतीच्या घरीं जाऊन त्याची पट्टराणी हो. सासरा, दीर, नणंद, सासू यांच्यामध्यें राहून त्यांना सुख देणारी अशी तूं सम्राज्ञी हो.

शेवटच्या मंत्रांतील 'सम्राज्ञी' हें पद पण महत्त्वाचें आहे. त्यावरून सूनबाई सासूच्या हाताखालीं नांदण्याकरितां येत नसून तिजवर सत्ता गाजविण्याकरितां येते असा अर्थ निघतो. जर घर तिचें तर तिची सत्ता चालणार. म्हणून सून कर्ती झाली कीं सासूचें स्वातंत्र्य कमी होतें हें सास्वांनीं ध्यानांत ठेवावें.

**(२८६) विवाहांतील अनिष्ट चाली व भोजनसमारंभः—** विवाहसंस्कार हा एक पवित्र व उदात्त संस्कार आहे, पण त्याला आज शुद्ध समारंभाचें आणि कराराचेंही स्वरूप आलें आहे. समारंभाचे पायीं हजारों रुपयांचा चुराडा होतो. तर हुंडा, देणेंघेणें, मानपान या सबबीवर विवाहप्रसंगांतच दोन्ही पक्षांत जुतेपैजार होते. कांहीं पालक हुंड्याच्या जबर रकमेमुळें कर्जबाजारी होतात, तर कांहीं जमलेलें लग्न विसकटलें तर अपकीर्ति होईल म्हणून वाटेल तितका पैसा अडल्यामुळें देतात व कफल्लक होतात. गरीब आईबापांना हुंडा देण्याची शक्ति नसते; हुंड्याशिवाय तर लग्न होत नाहीं, म्हणून कित्येक मुलींनीं आत्महत्याही केल्याचीं उदाहरणें आहेत! हिंदुसमाजांतील कांहीं जातींत मुली संख्येनें जास्त म्हणून हुंड्याचा भाव वाढतो. तर कांहीं जातींत मुली फारच कमी म्हणून मुलींचे पालक वर-पक्षाकडून पुष्कळ द्रव्य हबकतात! त्यामुळें विवाह हा एक आर्थिक-व्यवहार होऊन बसला आहे. हुंड्यासंबंधानें कितीही लिहिलें तरी आर्थिक पेचामुळें दिवसेंदिवस तो वाढूंच लागलेला आहे. त्याला आळा घालण्याचा मार्ग म्हणजे प्रौढ वधुवरांनीं आपापलीं लग्नें जमविणें आणि तीं आपल्या जातींतील कोणत्याही पोटजातीच्या अनुरूप वधुवरांशीं जमविणें हा एकच आहे. पोटजातींत लग्नें भराभर होऊं लागलीं म्हणजे हुंड्याचें मान तेव्हांच उतरेल. असो.

विवाहसंस्कारांत रुसणें, भांडणें, अडविणें, नाचरंग या सर्व अनवश्यक गोष्टी आहेत. लौकिक व हौस या दृष्टीनें मंडपशोभा, रोषणाई, मिरवणुकी इत्यादि गोष्टी आहाराबाहेर खर्च न होईल अशा बेतानें अवश्य कराव्या.

लग्नादि कार्यांत वरचेवर ओट्या भरण्याचा जो प्रकार आहे त्यांत तारतम्य ठेवावें. गुजराथी लोकांत लग्नांतील जेवणावळीनिमित्त अतिशय खर्च होतो. कर्नाटकाकडे बिसलऊट–भिसलोटाच्या निमित्तानें अन्नाची अतिशय नासाडी होते! लग्नकार्यानिमित्त येणाऱ्यांना अहेराचें एक संकटच वाटतें. हौसेनें अहेर करणें निराळें व केलाच पाहिजे म्हणून तो करणें निराळें. गुजाराथेंत एक दोन रुपयांपेक्षां अधिक अहेर कोणी देत नाहींत व घेत नाहींत. तो वहीला टिपलेला असतो; व तोच ज्याचा त्याच्याकडे लग्न-कार्याचे निमित्तानें परत केला जातो, असें समजतें. ही रूढी अनुकरणीय वाटते.

(२८७) **भोजनसमारंभांची आवश्यकताः**—उपनयनविवाहादि संस्कार, उत्सवसमारंभादि प्रसंग साधून आप्तइष्ट, नातलग, स्नेही, विद्वान् अशांना अवश्य सग्रास भोजन द्यावें. अलीकडे ब्राह्मणभोजनें, जेवणावळी यांवर बरेच आक्षेप घेण्यांत येतात. अतिरेक झाला तर तो आक्षेपार्ह आहेच. आतां पूर्वीप्रमाणें सहस्रभोजनें, अन्नसंतर्पणें वगैरे होत नाहींत. पण बड्या-बड्या अधिकाऱ्यांना ज्या चहाच्या व भोजनाच्या पार्ट्या देण्यांत येतात, त्यानिमित्त पैशाचा किती चुराडा होतो, व त्या मानानें आमच्या जेव-णावळींचा खर्च किती कमी होतो हें हिशेब करून आक्षेपकांनींच सांगावें. खानावळी व फराळांचीं दुकानें यांमुळें लोकांच्या सोयीही झालेल्या आहेत. तथापि कार्यप्रस्थ, संस्कारसमारंभ अशा निमित्तानें एकमेकांनीं एकमेकांकडे भोजनास जाणें अवश्य आहे. त्यामुळें संभाषण, सहवास व विशेष परिचय इत्यादि गोष्टी घडतात. विवाह–उपनयनादि संस्कारांनिमित्त एखाद्या संस्थेला द्रव्य पाठवून मोठी सुधारणा केली असें दाखविण्याचा प्रघात अलीकडे पडत आहे. कांहीं तर अंत्यसंस्कार, श्राद्ध याही निमित्तानें द्रव्य पाठवून घरांत कोणाचाही हात ओला होऊं देत नाहींत! ज्याला अनुकूलता नसेल व जो सर्व दृष्टीनें दुर्बल असेल अशा माणसानें अपवाद म्हणून द्रव्यद्वारां सर्व केलें तर क्षम्य आहे. पण ज्यांना सर्व तऱ्हेची अनुकूता आहे, त्यांनीं श्रम, कष्ट, खर्च व खटाटोप करण्याचे टाळण्याकरितां हा असला अंगचोरपणा करावा, हें सर्वस्वीं अयोग्य होय. *

* माणसाचें जीवन अन्नावर आहे. भोजनामुळें माणसाची जी तृप्ति होते ती कितीही द्रव्य दिल्यानें होत नाहीं. अन्न हें परब्रह्म. यांतील

मंगलकार्यें, उत्सवसमारंभ हे गरीबापासून श्रीमंतापर्यंत सर्वांना दुसऱ्याकरितां तन, मन व धन कारणीं लावण्याचे प्रसंग असतात. परंपरेनें यांत लौकिक व स्वार्थही असतोच. सबंध आयुष्यांत असे दहाबारा प्रसंगच घडावयाचे. ते जर नतद्रष्टपणानें व अंगचोरपणानें चुकवावयाचे असतील तर मग आयुष्यांत एवढी उरसफोड तरी कशाला करावी? मनुष्यप्राणी उत्सवप्रिय आहे. घरांत असे प्रसंग वर्षांतून एकदोन तरी होत असले म्हणजे मनामध्यें दिलदारपणा, वृत्तींत साळढाळपणा आणि अंतःकरणांत उदारता उत्पन्न होते. या निमित्तानें घरच्या माणसांना दुसऱ्यांचें आदरातिथ्य कसें व्यवस्थित करावें हेंही समजतें. "लग्न करून पहावें, घर बांधून पहावें व मळा करून पहावा," अशा जुन्या म्हणी आहेत, त्यांचा अर्थ हीं कार्यें करूं लागलें म्हणजे त्यांत किती लोकांची गरज लागते, सर्वांचीं तंत्रें संभाळून कार्य कसें पार पाडावें लागतें, हें समजतें, असा आहे. अशा कार्यांमुळें घरांतील माणसांत कर्तृत्व वाढतें. घर सारविणें, रंगविणें, रोषणाई करणें, त्याला शोभा आणणें आणि इतर अशाच प्रकारचीं कामें केल्यामुळें आत्मविश्वासही वाढतो. गोरगरिबांनींसुद्धां लग्नमुंजीमध्यें आपापल्या शक्ती-प्रमाणें अगदीं साधें व कमी खर्चाचें प्रयोजन अवश्य द्यावें. सबंध जन्मभर डब्यांतले तांदूळ व बुटकुलींतील तूप यांची गांठ असतेच. केव्हांतरी आयुष्यामध्यें तांदळाचीं व गव्हाचीं पोतीं, गुळाच्या ढेपा, तुपाचे डबे आणून साळढाळपणें त्यांचा उपयोग करण्याचा प्रसंग नसावा काय?

अर्थवाद सोडून दिला तरी अन्न हें जीवनाला आवश्यकच आहे, म्हणून गरीब, श्रीमंत, अतिथी, पाहुणा, इष्टमित्र, व्याही, इत्यादींना विशिष्ट प्रसंगीं भोजन देणें अवश्य आहे. चार माणसें आपणाकडे भोजनास यावींत आणि आपण चार ठिकाणीं भोजनास जावें ही एक सामाजिक समत्वाची भावना आहे. अलीकडे माणसाचें मन फारच क्षुद्र बनलेलें आहे. दुसऱ्याकरितां तन आणि धन खर्च करण्यास प्रथम मनाची तयारी लागते. तें मनच जर क्षुद्र बनलें तर काय होणार? सुहृद्जन, आप्तइष्ट, देव, पितर आणि सेवक व अतिथि या सर्वांना अन्नदानानें तृप्त करावें. तसें न केल्यास त्याचें तें मिष्टान्नभक्षण म्हणजे विषभक्षण होय, असें बौधायन धर्मसूत्रांत (११–३–६८) म्हटलें आहे.

अन्ने श्रितानि भूतानि अन्नं प्राणमिति श्रुतिः। तस्मादन्नं प्रदातव्यमन्नं हि परमं हविः। न त्वेव कदाचिददत्त्वा भुञ्जीत। अथाप्यत्रान्नगीतौ श्लोकावुदाहरन्ति। यो मामदत्त्वा पितृदेवताभ्यो भृत्यातिथीनां च सुहृज्जनस्य। संपन्नमश्नन्विषमत्ति मोहात्तमद्यहं तस्य च मृत्युरस्मि।

बौधायनाच्या या मताप्रमाणें जे लोक सांप्रत कोणच्या तरी सबबीवर गरीबापासून तों संस्थानिकापर्यंत अन्नदानास टाळा देतात ते दोषार्ह ठरतात. शिक्षणाधिकाऱ्यानें शिक्षकांना, वरिष्ठ पोलिस अधिकाऱ्यानें पोलिसांना, वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं शिपाईपट्टेवाल्यांना, आणि राजे महाराजे यांनीं आपल्या सर्व श्रेष्ठकनिष्ठ नोकरांना मंगलकार्यप्रसंगीं यथेच्छ ताबलून घेऊन बाकी कांहीं नाहीं तरी निदान 'मिष्टान्नमितरेजनाः' ही म्हण चांगलें भोजन देऊन सार्थ केली पाहिजे. तशी न केली तर 'कष्टमेवेतरेजनाः' असें समजून लग्नकार्यप्रसंगीं यापुढें कोणीच कोणाच्या उपयोगीं पडणार नाहीं. म्हणून एक तर असलीं कार्यें ज्यांचीं मनें क्षुद्र आहेत त्यांनीं अगदीं चट श्राद्धाप्रमाणें उरकावीं. पण डामडौल, थाटमाट, मिरवणुका व दरबार करून भोजनास मात्र रेशनिंगच्या सबबीवर आंगठा दाखविणें हें अनुचित होय.

—*—

# प्रकरण एकोणिसावें

## कांहीं विवाहसंबद्ध विषय

गेल्या प्रकरणांत विवाहसंस्थेची आवश्यकता, स्त्रियांचें हिंदुसमाजांतील स्थान आणि विवाहसंस्कार यांची चर्चा केली. प्रस्तुत विवाहसंबद्ध विषयांपैकीं वधूवरवयोमर्यादा, वधूवरपरीक्षा, मुहूर्त, पत्रिका, पोटजातींतील विवाह, भिन्न जातींतील विवाह इत्यादि विषयांचा विचार करावयाचा आहे.

आपस्तंबादि धर्मसूत्रकारांनीं व मन्वादि स्मृतिकारांनीं वधूवरांच्या वयोमर्यादेचा विचार पुष्कळच केला आहे. कल्पनेकरितां थोडा देतों.

(२८८) **प्रौढविवाह व स्मृतिकारः**—ऋतुकालापूर्वी कन्यादान करावें, तसें न केल्यास पित्याला दोष लागतो असें गौतम (अ. ९ प्र. २ २२ ) म्हणतो. गुणवानाला नग्निका कन्येचें दान करावें. गुणवान् न मिळाला तर गुणहीनालासुद्धां ऋतुप्राप्तीनंतर मुलीला देऊन टाकावी. ऋतुमती कन्येचें तीन वर्षांचें आंत जो दान न करील तो पापी होय ! ( बौधायन अ. २ प्र. २।११।१३ ) बलानें कन्येचें हरण केलें तर तिचें यथाविधि पुन्हां लग्न करावें, असेंही बौधायन म्हणतो. वसिष्ठानें बौधायनाचाच अनुवाद केला आहे. ( वसिष्ठ अ. ५–६२ ) ऋतुप्राप्तीनंतर तीन पाळ्यांपर्यंत विवाह न झाल्यास कन्येनें स्वयंवर करावें. पितृगृहीं जी कन्या ऋतुस्नात असते ती वृषली समजावी. ( विष्णु अ. २४ श्लो. २१ )

**उत्कृष्टायाभिरूपाय वराय सदृशाय च ।**
**अप्राप्तामपि तां तस्मै कन्यां दद्याद्यथाविधि ॥८८॥**
**काममामरणात्तिष्ठेद्गृहे कन्यर्तुमत्यपि ।**
**नचैवैनां प्रयच्छेत्तु गुणहीनाय कर्हिचित् ॥८९॥**
**त्रीणि वर्षाण्युदीक्षेत कुमार्यृतुमती सती ।**
**ऊर्ध्वं तु कालादेतस्माद्विन्देत सदृशं पतिम् ॥९०॥**
**अदीयमाना भर्तारमधिगच्छेद्यदि स्वयम् ।**
**नैनः किंचिदवाप्नोति न चायं साधिगच्छति ॥९१॥** मनु अ. ९

भावार्थः-उत्कृष्ट, सुस्वरूप असा वर मिळाला तर कन्येचें ऋतुकालापूर्वी सुद्धां लग्न करावें. पण योग्य वराच्या अभावीं तिला गुणहीनाला देऊं नये, त्यापेक्षां कन्या आजन्म ब्रह्मचारी राहिली तरी चालेल. ऋतुस्नात कन्येनें विवाहाची तीन वर्षें वाट पाहून स्वयंवर करावें. यावरून प्रौढविवाहाचें समर्थन मनु करतो असें दिसतें.

(२८९) **स्मृतिकार व बालविवाहः**—मनूनंतरच्या स्मृतिकारांनीं बालविवाहाचें समर्थन केलें आहे. त्यांचें मत पुढील वचनांवरून समजून येईल:—

अष्टवर्षा भवेद्गौरी नववर्षा तु रोहिणी ।
दशवर्षा भवेत् कन्या अत ऊर्ध्वं रजस्वला ॥६॥
प्राप्ते तु द्वादशे वर्षे यः कन्यां न प्रयच्छति ।
मासि मासि रजस्तस्याः पिबन्ति पितरोऽनिशम् ॥७॥
माता चैव पिता चैव ज्येष्ठो भ्राता तथैव च ।
त्रयस्ते नरकं यान्ति दृष्ट्वा कन्यां रजस्वलाम् ॥८॥
यस्तां समुद्वहेत्कन्यां ब्राह्मणो मदमोहितः ।
असंभाष्यो ह्यपांक्तेयः स विप्रो वृषलीपतिः ॥९॥ –पराशर अ.७.
सर्वेषामेव दानानामेकजन्मानुगं फलम् ।
हाटकक्षितिगौरीणां सप्तजन्मानुगं फलम् ॥७९॥　　–संवर्त

भावार्थः–आठ वर्षांची मुलगी गौरी, नऊ वर्षांची रोहिणी, दहा वर्षांची कन्या व त्यानंतर ती रजस्वला समजावी. बारा वर्षांच्या मुलीचें जो दान करीत नाहीं तो पतित होतो. आई, बाप, भाऊ असे तिघे रजस्वला कन्येला पाहून नरकाला जातात. जो अशा ऋतु प्राप्त झालेल्या कन्येशीं मोहानें लग्न करतो तो वृषलीपति समजावा. अर्थात् तो अपंक्त व असंभाष्य समजावा. सर्व दानांचें फल फक्त एक जन्मापुरतें असतें, पण सुवर्ण, भूमि व गौरी ( आठ वर्षांची मुलगी ) यांच्या दानाचें फल सात जन्मांपर्यंत पुरत असतें, म्हणून गौरीचें दान करावें.

(२९०) गृह्यसूत्रें व प्रौढविवाहः–बालविवाहसमर्थनपर अशीं वचनें अलीकडील स्मृतिग्रंथांत फार आढळतात, याचें कारण बुद्धोत्तर कालांत बालविवाह रूढ झाला हें असावें. कारण गृह्यसूत्रामध्यें विवाहानंतर जो चतुर्थीकर्म या नांवाचा संस्कार सांगितला आहे, व जो विवाहोत्तर च्वथ्या रात्रींच करावयाचा असतो, त्यावरून सूत्रकाळीं प्रौढविवाह होत असें सिद्ध होतें.

त्रिरात्रमुभयोरधः शय्या ब्रह्मचर्यं क्षारलवणवर्जनं च ॥८॥
तयोः शय्यामंतरेण दंडो गंधलिप्तो वाससा सूत्रेण वा परिवीतस्तिष्ठति ॥९॥　　–आपस्तंब खंड ८

त्रिरात्रं क्षारलवणे दुग्धमिति वर्जयानौ सहशयानौ ब्रह्मचारिणौ ॥९॥ –खादिर १।४

त्रिरात्रमक्षारालवणाशिनौ स्यातामधः शयीयाताम् संवत्सरं न मिथुनमुपेयाताम् द्वादशरात्रं षड्रात्रं त्रिरात्रमंततः ॥२१॥ पारस्कर१।८

त्रिरात्रमक्षारालवणाशिनौ ब्रह्मचारिणावधः संवेशिनावसंवर्तमानौ सहशयातामूर्ध्वं त्रिरात्रात्संभवो निशायाम् ॥ जैमिनी १।२२

वरील सर्व वचनांचा सारांश:–तीन दिवस ( रात्रीं ) पर्यंत वधूवरांनीं सहशयन करावें, ब्रह्मचर्य धारण करावें, क्षारयुक्त पदार्थ, दूध व मीठ वर्ज करावें.

उभयतां वधूवरांच्या शय्यांमध्यें चंदनलिप्त दंड ठेवावा. तो दंड वस्त्रानें किंवा सुतानें गुंडाळिलेला असावा. वधूवरांनीं ब्रह्मचारी राहून जमिनीवर निजावें, एक वर्ष उभयतांनीं संबंध करूं नये. निदान बारा, सहा अगर तीन रात्रीं तरी संबंध न करावा. अधोभागीं भूमीवर शयन करावें. एकमेकांकडे आपलें अंग न वळवितां सहशयन करावें. तीन रात्री लोटल्यानंतर चौथ्या रात्रीं संबंध करावा.

कांहीं गृह्यसूत्रांत गर्भाधान व चतुर्थीकर्म यांचा विचार एकत्वानेंच केला आहे. कांहीं सूत्रकारांनीं तर चतुर्थीकर्मातच गर्भाधानसंस्काराचा अन्तर्भाव केला आहे. भट्टगोपिनाथ दीक्षितकृत 'संस्काररत्नमाला' नामक ग्रंथामध्यें ( आनंदाश्रम पा. ५८४ ) विवाहांतर्गत चतुर्थीकर्म सांगितलें आहे. त्यांत योनिस्पर्श, संगम, पर्यालिंगन, मुखचुंबन इत्यादि कृत्यें असून गर्भाधानाच्या प्रयोगांतीलच मंत्र ( पृ. ६९४ ) दिलेले आहेत, व शेवटीं 'इदमुपगमनं आवश्यकं' हा संयोग आवश्यक ( स्त्रीसंस्कारत्वात् ) असें म्हटलें आहे. मुलगी जर बाला–आठ–वर्षांची असेल तर सूत्रांतील हा विधि अप्रयोजकपणाचा नाहीं काय ? हा विधि जर शास्त्रोक्त आहे, तर बालविवाहाचें समर्थन म्हणजे आग्रह नव्हे काय ? सबंध हिंदुस्थानांत नंबुरी ब्राह्मण हे जुन्या विचाराचे व कट्टर सनातनी आहेत. पण ते आपल्या मुलींचे विवाह प्रौढपणींच करतात. योग्य वराचे अभावीं त्यांच्या मुली मरेपर्यंत कुमारिकाच राहतात !

(२९१) प्रौढविवाहच श्रेयस्करः–बुद्धोत्तर कालांत स्त्रियांनीं भिक्षुणी होण्याचा मार्ग पत्करला व तरुण मुलें भिक्षु होऊं लागलीं. त्याला प्रतिबंधक म्हणून हा बालविवाहाचा प्रचार पडला. पुढें हूणयवनादि विधर्मीय लोकांच्या जाचामुळें कशीं तरी लौकर लग्नें उरकून घेण्याचें चालू ठेवावें लागलें. आजच्या काळांत बालविवाह त्याज्य असून प्रौढ विवाहच योग्य आहे. शारदाकायदा त्याचकरितां झाला आहे. त्या कायद्यांतील दोष हळुहळू नष्ट करण्याचा यत्न केला पाहिजे. हिंदुसमाजांतील पुढारलेल्या वर्गांत आज अन्य कारणांमुळें प्रौढविवाह चालू आहे. पण इतर वर्गांमध्यें फार मोठ्या प्रमाणावर बालविवाह चालू होता, त्याला या कायद्यानें आळा बसलेला आहे. १९२१ च्या शिरगणतीचा विचार करतां, त्यावेळीं एक वर्ष वयाच्या आंतील ६१२ मुली विवाहबद्ध होऊन विधवा झालेल्या होत्या. पांच वर्षांच्या आंतील विधवा मुली २०२४ होत्या, दहा वर्षांच्या आंतील ९७१५७ होत्या आणि पंधरा वर्षांपर्यंतच्या विधवा मुलींची संख्या ३३२०२४ होती. ही स्थिति प्रौढविवाहामुळें खास पालटेल. गरोदरपणीं पोटाला कुंकूं लावून लग्नें ठरविणें, पाळण्यांत असलेल्या मुलांचा वाङ्निश्चय करणें आणि बाहुलाबाहुलीसारखीं मुलांमुलांचीं लग्नें करणें हा असला मूर्खपणाचा प्रकार सर्वथैव त्याज्यच होय! यास्तव नवा हिंदुधर्म प्रौढविवाहाचा पुरस्कार करतो.

(२९२) योग्य विवाहकालः–जुन्या धर्मशास्त्रांत मुलीच्या लग्नाची वयोमर्यादा चार वर्षांपासून सांगितली आहे. पण मुलाचा विवाहकाल कोठेंच सांगितलेला नाहीं. वाग्भटामध्यें 'पूर्णषोडशवर्षा स्त्री पूर्णविंशेन संगता' असें म्हटलें आहे. त्या दृष्टीनें चौदा ते चोवीसपर्यंत मुलीचें लग्न व अठरा ते अठ्ठावीसपर्यंत मुलाचें लग्न व्हावें. या वयापर्यंत मुलांमुलींचें अवश्य तें शिक्षण होतें. शारीरिक, मानसिक, बौद्धिक विकास होतो आणि जगाची बरोबर कल्पना येते. अशीं प्रौढपणीं झालेलीं लग्नें सर्व दृष्टीनें सुखावह होतील. आज कित्येक तरुण चाळीस पंचेचाळीस वर्षांपर्यंत अविवाहित असतात. तर कांहीं तरुणीही तीस, बत्तीस, पसतीस वर्षांपर्यंत कुमारिकाच राहातात. हा अतिप्रौढ विवाह निसर्गदृष्ट्या घातक आहे. ज्या वयांत जी निसर्गाची भूक असते ती राजमार्गानें शमविली पाहिजे. अनुरूप जोडीदार

मिळावा म्हणून कालमर्यादा घालून अवश्य यत्न करावा. प्रत्येक तरुण-तरुणीनें रूप, विद्या, गुण, द्रव्य अशा सर्व दृष्टीनें आत्मनिरीक्षण करावें, व तें कल्पनेच्या भराऱ्या न मारतां पाय भुईवर टेकून करावें. निवडीच्या नादानें तारुण्यांतील दीर्घ काल वायां घालवूं नये. योग्य वेळींच विवाह-बंधन पत्करावें. बेकारी व वाढत्या आकांक्षा यांमुळें अविवाहितपणाचें वय वाढत आहे. पण विवाह कर्तव्य असल्यास हें निमित्त बाजूस सारून योग्य वेळीं विवाह करावा. आईबापांच्या वयाला उतार लागतो न लागतो अशा वेळीं पहिला मुलगा अठरावीस वर्षांचा होऊन मातापितरांना साह्य करणारा झाला पाहिजे. पित्याचें वय पन्नास आहे अशा वेळीं वीस वर्षांचा मुलगा असला पाहिजे व पित्यानें त्याला पुढें तीस वर्षांपर्यंत आपला अनुभव, आपले विचार व आपले संस्कार दिले तर ही परंपरा सर्व दृष्टीनें हितकारक होते. फाजील प्रौढ विवाहांचा दुष्परिणाम म्हणजे मुलें कर्ती होण्याच्या आंत आईबापांनीं इहलोकाची यात्रा संपविणें हा होय! मातापितरांचें परलोकीं गमन, मुलांचा पोरकेपणा याचा परिणाम कुटुंबावर तर होतोच, पण समाजावर व राष्ट्रावरही होतो. तो टाळण्याकरितां वरील वयोमर्यादेच्या धोरणानें प्रौढ तरुणतरुणींनीं विवाहबद्ध व्हावें हें श्रेयस्कर होय.

(२९३) **पालक व प्रौढ मुली:**—आईबापांचें कर्तव्य मुलांना शिक्षण देणें, विचार देणें, संस्कार देणें व अनुभव देणें हें आहे. मुला-इतकीच मुलीचीही काळजी मातापितरांनीं घेतली पाहिजे. कारण मुलगी ही दुसऱ्या कुळांत जाणारी, गृहिणी होऊन दुसऱ्याचें घर उभारणारी, तेथें माता होऊन सुप्रजा निर्माण करणारी अशी ब्रह्मदेवानें दिलेली दुस-ऱ्याची ठेवच असते. तिची जोपासना नीट करून, तिची मनःस्थिति, संस्कृति, तिचें आरोग्य, तिचें गृहशिक्षण यांची योग्य काळजी घेऊन तिला पतिगृहीं पाठविणें हें सर्व मातापितरांच्या कर्तव्यांत येतें. शरीरानें दणकट, मनानें सुसंस्कृत अशा प्रौढ मुलांमुलींचे विवाह योग्य वेळीं झाले तर प्रजा चांगली होते, व आईबापांना त्यापासून सुख होतें. विषम विवाहामुळें आईबाप मुलांचे शत्रु होतात व मुलें आईबापांना शत्रूसारखीं वाटूं लाग-तात. बालविवाहाप्रमाणेंच अतिप्रौढ विवाहही अनिष्टच होत. कौटुंबिक

सुख, समाजस्वास्थ्य व सुप्रजा हें विवाहसंस्थेचें ध्येय योग्य वेळीं विवाह केल्यानेंच साध्य होतें. कांहीं पालक प्रौढ मुलींना फाजील स्वातंत्र्य देतात तें अत्यंत अयोग्य होय. फाजील लाडाप्रमाणें फाजील स्वातंत्र्याचे दुष्परिणाम आतां दिसूं लागले आहेत. लग्न जमत नाहीं म्हणून शिक्षण द्यावयाचें व शिक्षण चालू आहे म्हणून विवाहाची खटपट करावयाची नाहीं अशा अन्योन्याश्रयानें कांहीं पालक वागतात! त्यामुळें मुलींच्या आरोग्यावर आणि मनावर विपरीत परिणाम होतो. उपवर प्रौढ मुलींच्या प्रवृत्ति, मनःस्थिति व प्रकृति ध्यानांत घेऊन त्यांच्या विवाहाचा योग्य यत्न पालकांनीं योग्य वेळीं करणें हें अत्यंत श्रेयस्कर आहे.

* **(२९४) वधूवरपरीक्षाः–** 'कुलमग्रे परीक्षेत' (आश्वलायन गृ. सू. १, ५, १) वधूचें कुल व शील हें प्रथम पहावें. तिचे आईबाप व त्यांची मागची परंपराही लक्षांत घ्यावी. आनुवंशिक गुण व शिक्षण या दोहोंचा विचार करावा. बुद्धि, रूप, अन्य सुलक्षणें व आरोग्य अशा सर्व गोष्टी पहाव्या, असें सर्व सूत्रकार म्हणतात. आपस्तंब म्हणतो, 'यस्यां मनश्चक्षुषोर्निबंधस्तस्यामृद्धिर्नेतरदाद्रियेत' (१।३।२१) जिच्या ठिकाणीं मन व डोळे खिळून रहातील तीच चांगली, इतर गोष्टींचा विचार करूं नये. जीवर मन रमतें, नेत्राला सुख होतें, जी सद्गुणी आहे, सुदृढ आहे, सुसंस्कृत आहे तीच पसंत करावी. 'यस्यां मनोऽनुरमते चक्षुश्च प्रतिपद्यते। तां विद्यात्पुण्यलक्ष्मीकां किं ज्ञानेन करिष्यति ?'

---

* वधूवर पसंतीसंबंधानें पुढील शास्त्रवचनें मार्गदर्शक आहेत—

**कुलं च शीलं च वपुर्यशश्च विद्यां च वित्तं च सनाथतां च।**
**एतान् गुणान् सप्त परीक्ष्य देया कन्या बुधैः शेषमचिन्तनीयम् ॥**
–यमस्मृति. पृ. ७८

**चत्वारि विवाहकारणानि वित्तं रूपं प्रज्ञा बान्धवमिति।**
**तानि चेत्सर्वाणि न शक्नुयाद्वित्त मुदस्येत्ततो रूपं प्रज्ञायां च तु बान्धवे च विवन्दते।**
**बान्धव-मुदस्येदित्येके आहुरप्रज्ञेन हि कः संवासः।** भारद्वाज गृह्य १–२

पान २६४ पहा.]

वरासंबंधानेंही तो गुणवान असावा, बुद्धिमान् असावा, पुरुष गुणांनीं युक्त असावा, 'बुद्धिमते कन्यां प्रयच्छेत्' 'दद्याद् गुणवते कन्याम्' असें आश्वलायन, बौधायन यांनीं सांगितलें आहे. आपस्तंब (गृह्य १।३।२०) 'बन्धुशीललक्षणसंपन्नः श्रुतवानरोग इति वरसंपत्' म्हणजे बंधु, शील, सद्गुण, विद्या, आरोग्य ही वराची संपत्ति आहे, असें म्हणतो. ज्याच्या पुरुषत्वाची परीक्षा यत्नानें केली आहे, (यत्नात्परीक्षितः पुंस्त्वे) असा वर असावा, असें याज्ञवल्क्य म्हणतो. नारदानें पुंस्त्वपरीक्षेचे नियमही दिले आहेत.

(२९५) **कुंडलीचें काम नाहीं**:-वधूवरें प्रौढ, अनुरूप, निरोगी, शिक्षित, एकमेकांला शोभणारीं व परस्परांनीं पसंत केलेलीं अशीं असावीत. पण आज कांहीं पालक कुंडल्याच जुळवीत बसतात! मंगळ, नाडी, वर्ण, गण इत्यादि पहातात. विवाहांत कुंडलीचें, राशीचें व पत्रिकेचें बंड हें अर्वाचीन आहे. गृह्यसूत्रांत त्याचा कोठेंही उल्लेख नाहीं. ना नाडी, ना राशी, ना मंगळ! यास्तव पत्रिका, गण, नाडी यांना मुळींच महत्त्व न देतां वरील मुख्य लक्षणें वधूवरांचीं जमत असल्यास तो विवाह अवश्य जमवावा.

---

पान २६३ वरून पुढें चालू ]

**तस्मात्कन्यामभिजनोपेतां मातापितृमतीं त्रिवर्षात्प्रभृतिन्यून वयसंश्लाघ्याचारे धनवति पक्षवति कुले संबन्धिप्रिये संबन्धिभिराकुले प्रसूतां प्रभूतमातापितृपक्षां रूपशीललक्षणसंपन्नामन्यूनाधिका विनष्टदन्तनखकर्णकेशाक्षिस्तनीमरोगिप्रकृतिशरीरां तथाविध एव श्रुतवान् शीलयेत्।** **-कामसूत्र अ. ३-१-२**

भावार्थः-कुल, शील, आरोग्य, कीर्ति, विद्या, वित्त व वराची समाजांतील प्रतिष्ठा या सात गुणांकडे लक्ष्य देऊन वराला कन्या द्यावी. निदान वित्त, रूप, विद्या आणि घरंदाजपणा तरी पहावा; प्रसंगीं वित्ताकडे दुर्लक्ष्य करावें तर प्रसंगीं घरंदाजपणाकडे दुर्लक्ष्य करावें असें कोणी म्हणतात. आईबाप असलेली, घरंदाज, कुलशीलसंपन्न, वरापेक्षां निदान तीन वर्षांनीं लहान, रूप व इतर लक्षणांनीं युक्त, जिचे सर्व अवयव जेथल्या तेथें आहेत अशी कन्या पसंत करावी.

**(२९६) वधूपरीक्षेंत सुधारणाः**—सांप्रत वधूपरीक्षा फारच त्रासाची झालेली आहे. मुलीच्या बापाला यानिमित्त मुलीला बरोबर घेऊन इतकें हिंडावें लागतें कीं, त्यामुळें त्या बिचाऱ्याला मुलीचा बाप झाल्याबद्दल पश्चात्ताप होतो! मुलीचे बाप ८।१० वर्षें स्वाभिमानशून्यतेनें मुलीला दाखवीत हिंडतच असतात. कांहीं मुलींना पंधरा वेळां तर कांहींना एकवीस वेळां दाखविल्याची माहिती मिळते. याचा परिणाम प्रौढ कुमारिकांचे मनावर अत्यंत विपरीत होतो. प्रौढपणामुळें मुलींचा स्वाभिमान आतां वाढत आहे. दुसऱ्याच्या घरीं जाऊन त्यांची मानखंडना झाली, त्यांच्याकडे पाहून कोणी कपाळाला आठ्या चढविल्या, नाकें मुरडलीं तर तें त्यांना दुःसह होतें. स्त्रियांच्या ठिकाणीं संकोच, भीड, लाजाळूपणा या नाजुक मनोवृत्ति असतात हें मनांत वागवून वधूपरीक्षा स्वाभिमानास पोषक अशीच व्हावी. मुलीला जर पाहावयाचें असेल तर प्रथम एखाद्या पोक्त बाईला मुलीच्या घरीं एकदोन दिवस पाठवावी. तेथें एकदोन दिवसांच्या सहवासानें मुलीच्या स्वभावाची व वागणुकीची कल्पना येते. ती आल्यावर मग वधूवरांचा परिचय करून द्यावा. चार पुरुषांमध्यें मुलीला आणून परीक्षकाप्रमाणें प्रश्न विचारून तिची खरी परीक्षा होत नाहीं. मुलगी प्रकृतीनें सुदृढ, स्वभावानें सुशील व चालीरीतीनें कुलीन अशी असली व शिकलेली असली म्हणजे हुंडा, करणी इत्यादीचा विचार न करतां ती अवश्य पत्करावी. 'स्त्रीरत्नं दुष्कुलादपि' या न्यायानें चांगल्या मुलीला मागणी घालणें हें खरोखरी योग्य आहे. दुसऱ्याची मुलगी सून होऊन आपल्या घरांत यावयाची असते, ती घर चालविणारी गृहलक्ष्मी असते, म्हणून अशा सुकन्येला अवश्य मागणी घालावी. सांप्रत मुली सांगून याव्या, त्यांची मागणी करणें कमीपणाचें आहे, अशी समजूत आहे. त्यामुळें ज्या चार दोन मुली सांगून येतात, त्यांतीलच एखादी पत्करावी लागते. मुलींच्या मागणीच्या संकोचामुळें परस्पर स्नेह्यांमध्यें व परिचितांमध्यें जे संबंध व्हावयास पाहिजेत ते होत नाहींत. पूर्वी स्नातक विद्या पुरी झाल्यावर वधूची याचना करीत असे. स्त्रीदाक्षिण्य, स्त्रियांविषयीं आदर या दृष्टीनें आणि वधूपरीक्षेचा त्रास वांचावा म्हणूनही मुलीची मागणी करण्याची प्रथा पाडली पाहिजे.

(२९७) **सदोष वरपरीक्षाः**—सांप्रतची वरपरीक्षाही सदोष आहे. वधूप्रमाणें वराचीही परीक्षा त्याच्या घरीं एक दोन माणसें पाठवून एक दोन दिवस त्याच्या सहवासांत राहून तो वागतो कसा, कपडे काढल्यावर दिसतो कसा, तो बोलतो कसा, तो कोणाच्या संगतींत असतो, त्याचे स्वैरालाप काय निघतात, आपल्या मुलीशीं त्याचें समानशील आहे काय, ही सोयरीक अनुरूप व योग्य होईल काय, असें सर्व पाहिलें पाहिजे. आकाशांत उडणारा पक्षी जसा दुरून पाहातात तशी वरपरीक्षा विशेषतः प्रौढ वरांची परीक्षा करतां कामा नये.

(२९८) **पालकांचें मतः**—सांप्रत वधूवरें प्रौढ असतात. त्यांना पालकांनीं योग्य मर्यादेपर्यंत पसंतीच्या बाबतींत स्वातंत्र्य दिलें पाहिजे. मुलांमुलींनीं आपापले जोडीदार योग्य तऱ्हेनें पसंत करणें हें इष्टच आहे. पण त्या कामीं त्यांनीं जन्मदात्या मातापितरांना मुळींच न विचारणें, किंबहुना त्यांच्या इच्छेविरुद्ध विवाह जमविणें हेंही अगदीं गैर आहे. मातापितरें व मुलेंमुली यांच्या विचारांत जमीन अस्मानाचें अंतर क्वचितच असतें. मातापितरांनींही आजची परिस्थिति लक्षांत घेऊन मुलांमुलींना या बाबतींत मर्यादित स्वातंत्र देणें हेंच योग्य आहे. आज जगांत पैसा दिला कीं, मताचा अधिकार मिळतो. सभासदत्व व मतदानाचा अधिकार हा जर वर्गणीवर आहे तर जे मातापितर स्वकष्टार्जित संपत्ति वर्गणीच्या रूपानें मुलांच्या स्वाधीन करतात त्यांना मुलांच्या लग्नाच्या बाबतींत मुळींच मत नसणें हा मोठा अन्याय आहे, हें मुलांनीं लक्षांत ठेवलें पाहिजे. तसेंच मुलींनींही ज्या मातापितरांनीं वा पालकांनीं आपल्याकरितां इतक्या खस्ता खाल्या, ज्यांनीं आपणास लहानाचे मोठे केले, त्यांना आपलें अकल्याण व्हावें असें कधींही वाटत नसतें हें विसरूं नये.

(२९९) **मुहूर्ताची अडचणः**—विवाहाचे बाबतींत पत्रिकेची अडचण जशी काढून टाकली पाहिजे तशीच मुहूर्ताचीही अडचण आतां नाहींशी केली पाहिजे. पुष्कळ वेळां आतां विवाहाचे मुहूर्त नाहींत अशा समजुतीनें जमलेले विवाह लांबणीवर पडतात व तेवढ्या अवधींत कांहीं अडचण आली कीं ते विवाह फिसकटतात. वधूवरांनीं परस्पर विवाह जम-

विला, किंवा पालकांनीं एखादा विवाह जमविला म्हणजे मुहूर्त नाहीं म्हणून कोणी व्यंकोबाच्या गिरीपर्यंत धांव घेतो, कोणी कल्लोळीला पळतो, निदान नरसोबाची वाडी तरी गांठतोच! कोणी मुसळधार पाऊस डोक्यावर घेऊन मिथुन-आषाढांत मुहूर्त काढून जमलेला विवाह लावतो. अशा वेळीं केलेल्या विवाहाचे परिणाम पुढें एक दोन महिने कित्येकांना आरोग्यदृष्ट्या भोगावेही लागतात. वासरूं गाईच्या उजवीकडून गेलें कीं घनगर तो मुहूर्त समजतात! व वासराला उजवीकडून जाईपर्यंत सारखें पिटाळतात! इतका हा त्रास, खर्च आणि यातायात करण्याचें खरोखरी कांहीं कारण नाहीं. लग्न जमलें कीं तें पुण्य नक्षत्रावर पितृपक्ष आणि कुयोग सोडून पाहिजे तेव्हां आपल्या घरीं करावें. पितृपक्ष हा तर्पण, पिंडप्रदान, महालयाकरितां राखीव आहे, म्हणून त्यावेळीं मंगलकार्यें करूं नयेत. यासंबंधीं धर्मनिर्णयमंडळानें पंचांगकर्त्यांना आग्रहाची विनंति करून पुढीलप्रमाणें निर्णय दिलेला आहे.

'उदगयने आपूर्यमाणपक्षे पुण्ये नक्षत्रे' या धोरणानें उपनयनाचा मुहूर्त ठरवावा. तसेंच 'पुण्ये नक्षत्रे सार्वकालमेके **विवाहम्**' या धोरणानें विवाहाचा मुहूर्त ठरवावा.

(३००) **सर्व महिने विवाहास योग्यः**—या निर्णयास जुन्या धर्मशास्त्रांतील आधार आहेत. शांखायन गृह्यसूत्रांत 'उदगयने आपूर्यमाणपक्षे पुण्याहे कुमार्यै पाणिं गृह्णीयात्' असें सांगितलें असून (१, ५) पारस्करगृह्यसूत्रांत त्यांत नक्षत्राची भर घातली आहे. 'सर्वे मासा विवाहस्य। शुचितपस्तपस्यवर्जमित्येके।' बो. गृ. सू. १,१,१९; सर्वे ऋतवो विवाहस्य शैशिरौ मासौ परिहाप्योत्तमं च नैदाघम्। आप. गृ. सू. १, २, १२. सर्व ऋतु विवाहाला युक्त म्हणून सांगितलेले आहेत. शिशिर ऋतूचे दोन मास व उन्हाळ्याचा पुढचा मास वर्ज्य करावेत.

विवाहाला सर्व ऋतु योग्यच होत. हिंवाळा व पावसाळा हे पाहुणे मंडळीस जाण्यायेण्यास त्रासदायक असतात. म्हणून उन्हाळा सर्व दृष्टीनें सोयिस्कर असतो. त्यांतही उन्हाळ्यांतील शेवटचे दिवस हे वळीव पावसाचे असल्यामुळें त्रास होण्याचा संभव असतो. ते वर्ज करून उन्हाळ्यांत लग्नकार्यें करणें सर्व दृष्टीनें सोयीचें असतें. विशेषतः त्यावेळीं

दळणवळण सोयीचें असतें, नवे धान्यादि पदार्थ आलेले असतात आणि शिक्षणसंस्थांना उन्हाळ्याची सुटी झालेली असते. तथापि चित्ताची, प्रकृतीची व परिस्थितीची अनुकूलता असल्यास ज्यावेळीं लग्नें जमतील त्यावेळीं तीं अवश्य आपल्याच घरीं अथवा इष्ट स्थळीं अवश्य उरकावींत. ' सार्वकालमेके विवाहम् ' ( आ. गृ. सू. १–४–२ ) असें आश्वलायनाच्या वरील सूत्रावरून स्पष्ट होतें. सिंध, मारवाड, राजपुताना भागांत जन्माष्टमी व दसरा या दोन मुहूर्तांवर हजारों विवाह होतात.

सांप्रत होणारे विवाह खरोखरी मुहूर्तावर होतच नाहींत. कारण वर घरीं आला म्हणजे त्याचें आतिथ्य करून वधु त्याच्या समोर उभी करून मुहूर्तावर मंगलाष्टकें म्हणून अक्षता टाकण्यांत येतात. यावेळीं वास्तविक लग्न झालेलेंच नसतें. कन्यादान व स्वीकार, विवाहहोम व सप्तपदी हें सर्व व्हावयाचेंच असतें. लग्न होण्यापूर्वींच शुभाशीर्वाद दिला जातो ! मंगलाष्टकानंतर पानसुपारी व शिष्टाचार यांत कन्यादान करणारा अर्धा तास तरी गुंतलेला असतो. तेवढ्या वेळांत खरा मुहूर्त निघून जातो ! ज्या विधीनें विवाह सिद्ध होतो तो मुख्य विधि मुहूर्तावर न करणें हें अशास्त्रीयही आहे.

**(३०१) पोटजाति मोडाः**–अखिल हिंदुजाति ही भविष्यकालीं अखंड व एकजिनसी होईल असें स्पष्ट दिसतें. आज अनेक कारणांमुळें आर्थिक, सामाजिक, धार्मिक क्षेत्रांत हिंदुसमाजांतील निरनिराळ्या थरांमध्यें सांस्कृतिक दृष्ट्या अंतर आहे, तें तुटत आहे. तें तोडलें पाहिजे आणि सांस्कृतिक समता उत्पन्न केली पाहिजे असें नवा हिंदुधर्म अट्टाहासानें सांगतो, परंतु प्राप्त परिस्थितींत सुधारणेची पहिली पायरी म्हणून अखिल हिंदूंना प्रथम आपापल्या पोटजातींत सर्रास विवाह करून त्या पोटजाती नष्ट करा, असा नव्या हिंदुधर्माचा आदेश आहे.

**(३०२) पोटजातींचें जंजालः**–आजच्या हिंदुसमाजांत एका जातींत अनेक पोटजाति आहेत, त्यांत परस्पर उच्चनीचपणाच्या कल्पना आहेत; म्हणून या सर्व मोडणें अत्यावश्य आहे. आपल्या जातीबाहेर मुलगी करणें व आपली मुलगी जातीबाहेर देणें, हें पुष्कळांना कमीपणाचें

वाटतें. पण हा त्यांचा भ्रम आहे. पोटजातींमुळें समाजाचे असंख्य तुकडे पडले असून तो दुर्बल झाला आहे. या सर्व जाति ईश्वरानें केल्या आहेत ही समजूत सर्वस्वी असत्य आहे. या असंख्य जाति देशभेद, आचारभेद, आहारभेद, व्यवसायभेद, उपासनाभेद, क्रांति व उत्पात यांमुळें झाल्या आहेत.

बृहन्महाराष्ट्रांतील दशविध ब्राह्मणांत देशस्थ, चित्तपावन, कऱ्हाडे, सहवासी, पद्ये, भट्टप्रभु, देवरुखे, खोत, क्रमवंत, तिरगुळ, गोवर्धन, मैत्रायणी, चरक, कण्व, जंबुकण्व, माध्यंदिन, वाजमाध्यंदिन, माध्यंदिन ( उत्तर कोंकणप्रांत ) किस्ती, कात्यायन, पल्लेवाळ, सामवेदी, अथर्ववेदी, सारस्वत, शणै, शणैपैकीं आद्यगौड, झुझोतिया, बारदेसकर, लोटलीकर इत्यादि अनेक जाति आहेत. प्रत्येक जातींत अन्य जातीसंबंधीं अनुदार कल्पना आहेत आणि परस्पर विवाहसंबंध नि:संकोचपणें होत नाहींत.

कर्नाटकांतही वैष्णव, श्रीवैष्णव असे मुख्य दोन भेद असून त्यांतही प्रत्येकीं आठदहा प्रादेशिक भेद आहेत. त्या परस्परांत विवाहसंबंध होत नाहींत.

गुजराथी ब्राह्मणांत नागर, औदीच्य हे मुख्य भेद असून विसानागर, वडनागर, बाविसे, चोविसे इत्यादि सुमारें नव्वद पोटजाति आहेत. शहरी ब्राह्मण, खेडवळ ब्राह्मण असले भेद असून आपआपल्या विशिष्ट समूहाबाहेर मुलगी न देण्याची चाल असल्यामुळें क्षेत्रसंकोच फारच होतो.

क्षत्रियांमध्यें मराठाक्षत्रिय, सूर्यवंशी, सोमवंशी, अग्निवंशी असे भेद आहेत. शिवाय भावसारक्षत्रिय, सहस्रार्जुनक्षत्रिय, स्वकुळसाळीक्षत्रिय इत्यादि अनेक भेद असून त्यांतही परस्पर विवाहसंबंध होत नाहींत.

अहिर गवळ्यांमध्यें सहा, वडारांमध्यें चार, कातकऱ्यांमध्यें पांच, कुणब्यांमध्यें सात, कुंभारांमध्यें तेवीस, कैकाड्यांमध्यें नऊ, कोरव्यांमध्यें नऊ, कोळ्यांमध्यें बारा, खत्रीमध्यें अकरा अशा पोटजाति आहेत. गवंडी समाजांत पांच, गवळी समाजांत आठ, गोल्लांमध्यें सहा, गोंधळी समाजांत सहा, चांभारांमध्यें सहा अशा पोटजाति असून जैनवाण्यांमध्यें एकतीस पोटभेद आहेत. ढोरांमध्यें सात पोटजाति, तेल्यांमध्यें आठ, धनगरांत बावीस, न्हाव्यांमध्यें आठ, माळ्यांमध्यें अकरा अशा पोटजाति

आहेत. माळ्यांमध्यें फुलमाळी, जिरेमाळी, हळदमाळी; कुंभारांमध्यें थोरचाके, लहान चाके, बैले कुंभार, गाढवे कुंभार; तेल्यांमध्यें एकबैले, दुबैले, एरंडे, कुसुंबे अशा क्षुद्र कारणानें बनलेल्या पोटजाति आहेत. मिठे, लांकडे, चुनखडे अशा लोणाऱ्यांत; शिंगारिया, टाकीवाला, धुरिया अशा धीवरांत; महिषे, मेंढे, बकरे अशा धनगरांत क्षुद्र निमित्तानें पोटजाति झालेल्या आहेत. कोळ्यांमध्यें मच्छीमारीच्या विविध प्रकारांवरून जाति पडल्या आहेत. मराठ्यांत मुख्य भेद ४ असून त्यांत अनेक पोटभेद आहेत. भंग्यांमध्यें सहा पोटभेद आहेत. भंडाऱ्यांमध्यें आठ, भोयांमध्यें पांच, महारांमध्यें त्रेपन्न पोटभेद असून मांगांमध्यें चोवीस पोटभेद आहेत. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ब्राह्मणांपासून भंग्यापर्यंत प्रत्येक जात लहानलहान पोटजातींनीं बुजबुजली असून प्रत्येक पोटजात दुसऱ्या पोटजातीशीं अन्नव्यवहारही करीत नाहीं आणि लग्नव्यहार तर नाहींच नाहीं. कांहीं जातींची संख्या बावीस कुटुंबें तर कांहींची २४ कुटुंबें इतकी अल्प आहे. क्षेत्रसंकोचामुळें या जातींमधील वधूवरांची विवाहाच्या बाबतींत किती कुचंबणा होत असेल याची कल्पनाच करणें बरें. म्हणून या सर्व पोटजाति अवश्य मोडाव्या. समान संस्कृतीच्या वधूवरांमध्यें विवाह घडून यावेत. सर्व पोटजाति समान योग्यतेच्या मानाव्यात.

(३०३) धर्मनिर्णयमंडळाचा निर्णयः–

ययोरेव समं वित्तं ययोरेव समं श्रुतम् ।
तयोर्मैत्री विवाहश्च न तु पुष्टविपुष्टयोः ॥–महाभारत

आर्थिक स्थिति, विद्या, व्यवसाय, शील हीं ज्यामध्यें सदृश आहेत, अशा पोटजातींत अवश्य विवाह व्हावेत. सांस्कृतिक दृष्ट्या सादृश्य म्हणजे भाषा, नैतिक कल्पना, पारमार्थिक मतें, आचार, नीतितत्त्वें, संस्कार, व्यवहार, उत्सव, सण, व्रतें, अशा सर्व बाबींत एकरूपता असणें होय. यास्तव अशी एकरूपता ज्या पोटजातींत असेल त्यांमध्यें निःसंकोचपणें विवाह व्हावेत. पोटजाति या विवाहसंबंधानें जितक्या लवकर मोडतील तितकें इष्ट आहे. पोटजाति मोडण्यांत अधर्म नाहीं, कारण तो सवर्ण विवाह आहे व तो प्रशस्त आहे. यांत ईश्वरी अवकृपेचा संबंध नाहीं.

कारण ईश्वर या इतक्या जातींचा मुळींच निर्माता नाहीं. पोटजाति मोडणें हें धर्मशास्त्राविरुद्ध नाहीं, असा निर्णय महाराष्ट्रांतील परिवर्तनवादी पंडितांनीं दिला आहेः—

'सांप्रतचा हिंदुसमाज वर्णबद्ध नसून जातिबद्ध आहे. वेदांत उल्लेखिलेल्या मूळ पंचजनांच्या म्हणजे पांच जातींच्या पोटांत अनेक जाति अनेक कारणांनीं आलेल्या आहेत. म्हणून ज्या ज्या पोटजाति आचार, आहार, व संस्कार या दृष्टीनें तुल्यबल किंवा सदृश आहेत त्यांचें एकीकरण विवाहदृष्ट्या हिंदुसमाजसंघटनेकरितां आवश्यक आहे.'

(२०४) **विवाहाची कुचंबणाः**—हिंदुसमाजांतील कांहीं जातींत पसतीस ते शंभरपर्यंत अवघीं माणसें आहेत. गुजराथमध्यें पन्नास पन्नास साठ साठ घरांची एक एक जात असून गोळाबाहेर मुलगी देऊं नये अशी समजूत आहे. बऱ्हाणपूर भागांतील कांहीं वैश्य—हिंदु अन्य धर्मांत जातात. त्याचें कारण त्यांना आपल्या जातींतील मुली मिळत नाहींत व त्यांनीं इतर हिंदु जातींतील मुली केल्यास त्यांना बहिष्कृत करण्यांत येतें हें होय! खानदेशांत चोपडे धरणगांव भागांत भाट्या नांवाची अंदाजें सहाशें आठशें माणसांची जात आहे. पण त्यांतील अविवाहित तरुणांची संख्या दीडशेपेक्षां अधिक आहे. मुंबईकडील श्रीमान भाटे रगड पैसा देऊन तिकडच्या मुली नेतात व हे लोक कन्याविक्रय करून जरठकुमारीविवाह लावून मोकळे होतात! कात्यायन, पल्लेवाळ अशा अत्यल्पसंख्य जातींतील तरुणांचीं लग्नेंच होत नाहींत. तंजावर प्रांतांत व्यंकोजी राजांचे बरोबर कांहीं ब्राह्मण व क्षत्रिय कुटुंबें गेलीं, त्यामुळें त्यांच्या वेगवेगळ्या जाति पडल्या आहेत. मद्रास प्रांतांतील मूळ महाराष्ट्रिय ब्राह्मणांची स्थिति ना इकडे ना तिकडे अशी आहे. कोमटी वैश्यांत ७२ गोत्री निराळे व तदन्य निराळे, असे गट असून त्यांतही अल्पसंख्य जाति आहेत. भट्टप्रभु, कायस्थ, सहवासी, पल्लेवाळ, जंबुकण्व, खिस्ती इत्यादि अल्पसंख्य जातींची क्षेत्रसंकोचामुळें फार कुचंबणा होत आहे. चांद्रसेनीय, पाताणे व दुवणे असे प्रभुज्ञातींतील मुख्य भेद असून क्षेत्रसंकोचामुळें गोरगरिबांना फार अडचण होत आहे. मुलीला नवरा व मुलाला बायको आरोग्य, शिक्षण

व रूप या दृष्टीनें पात्रता असतांना केवळ जातीच्या निमित्तावर मिळत नसेल तर तो खरोखरी अन्याय होय! पुष्कळ तरुण व तरुणी, बायका व नवरे मिळविण्याकरितां हिंदुधर्म सोडतात, ही स्थिति अत्यंत लाजिरवाणी आहे. यास्तव पोटजातींत लग्नें करून क्षेत्रविस्तार केला पाहिजे. त्यामुळें कुचंबणा थांबेल, निवडीचें क्षेत्र वाढेल व हुंड्याचा दर कमी होईल.

(३०५) **असवर्ण विवाहः**–सुधारणेची पहिली पायरी म्हणून पोटजाति मोडण्याचा उपक्रम अवश्य केला पाहिजे. पोटजातींतील विवाह हे शास्त्रदृष्ट्या सवर्णच होत. तथापि शिक्षणाची वाढ, दळणवळणाची वाढ, प्रौढ वधूवरांचें एकत्रित येणें यामुळें असवर्ण विवाहही प्रसंगीं होणार! ते तसे झाले म्हणून ते निंद्यही नव्हेत व निषेधार्हही नव्हेत. अशा विवाहांचा तिरस्कार वा पुरस्कार न करतां विवाहितांना व त्यांच्या संततीलाही संभावितपणाचा मान यथायोग्य दिला पाहिजे. हिंदूंतील ब्राह्मण, मराठे, प्रभु, क्षत्रिय, वैश्य, शिंपी, धनगर इत्यादि शेंकडों जातींत असे मिश्रविवाह होत आहेत. त्यांचा तिरस्कार करतां कामा नये. यासंबंधीं धर्मनिर्णय मंडळाचा निर्णय आहे तो असा ‘ हिंदुहिंदूंतील भिन्नजातिविवाहजन्य संतति पित्याच्या जातीची समजावी. ’ या विषयाबद्दल अनुकूल असा कायदा विधिमंडळाकडून मान्य करून घेणें अवश्य आहे.

(३०६) **भिन्नधर्मीय विवाहः**–ज्या कारणामुळें आज असवर्ण विहाह होणें अपरिहार्य आहे, त्याच कारणामुळें आज विधर्मी व विदेशी अशा तरुणतरुणींशीं हिंदूंतील तरुणतरुणींचे विवाह होणेंही अपरिहार्य आहे. अशा विवाहांमुळें पुढें जे अनर्थ ओढवतात त्याची जाणीव या विवाहितांना आणि समाजालाही चांगल्या तऱ्हेनें द्यावी. पण याही बाबतींत हिंदु तरुणानें मुसलमान, ख्रिश्चन, युरोपियन अगर कोणत्याही विदेशी तरुणीशीं विवाहबद्ध होण्याचे वेळीं तिला हिंदु करण्याचा आग्रह धरला पाहिजे. हिंदु तरुणानें कोणत्याही अहिंदु तरुणीला हिंदु करूनच मग तिजबरोबर लग्न लावावें.

तसेंच एखादी हिंदु तरुणी जेव्हां अहिंदूशीं विवाहबद्ध होण्याच्या मोहांत पडेल, त्यावेळीं तिनेंही त्या तरुणाला व्रात्यस्तोम विधीनें हिंदु करून मगच

त्याच्याशीं विवाहबद्ध व्हावें. धर्मनिर्णयमंडळाचा निर्णय यासंबंधीं आहे तो असाः–'अहिंदूचा किंवा धर्मान्तरित हिंदूचा हिंदूकरणविधि झाल्यानंतर त्याचे अन्नव्यवहारादि व्यवहार ज्या जातींच्या लोकांशीं होतील त्या जातीचा तो समजावा.' अहिंदूंना हिंदु करून अहिंदूंतील सुसंस्कृत व कर्तृत्ववान् स्त्रीपुरुषांना प्राचीन काळीं हिंदुसमाजानें पचविल्याचीं उदाहरणें पुष्कळच आहेत. मनु. अ. १० श्लोक ४३।४४ मध्यें पौंड्रक, चौंड्र, द्रविड, यवन, शक, किरात, दरद, खश वगैरेंचा उल्लेख आहे. या जाति ब्राह्मणांच्या अदर्शनामुळें शूद्रत्वाप्रत पोंचल्या होत्या. पण त्या मूळच्या क्षत्रिय होत्या असें दिसतें. कांबोज म्हणजे अफगाण, यवन म्हणजे ग्रीक, पारद म्हणजे पर्शियन, शक व खश अशा लोकांना क्रियाशुद्ध करून आर्यांनीं आत्मसात् केल्याचीं उदाहरणें आहेत.

(३०७) ऐतिहासिक उदाहरणें:–इ. सन १५० च्या सुमारास रुद्रदामन् हा मोठा क्षत्रप होऊन गेला. त्याचा आजा चष्टन हा पर्शियन होता. रुद्रदामनचा सरदार सुविशाख पल्लव जातीचा असून कुलैपाचा पुत्र होता. नाशीक येथील कोरीव लेण्यांतील लेखांत अग्निवर्म नामक शकाची मुलगी गणपरेभिलाची पत्नी होती असें म्हटलें आहे. नाहपान क्षत्रपाचा जांवई वृषभदत्त हा अनार्य होता. कनिष्क व हविष्क हेही शक होते. ग्रीक राजा जो मिनांदर तो यवन होता. तो नागसेनाच्या उपदेशावरून बौद्ध झाला व मिलिंदप्रश्न नांवाचा बौद्ध ग्रंथ त्यानें लिहिला.

मिश्रविवाहाचीं उदाहरणें ऐतिहासिक कालांतही आढळतात. समुद्रगुप्तानें दिग्विजय करून सम्राट्पद मिळविलें. त्यावेळीं त्यानें ज्या शहानुशाही, शक, मुरुंड इत्यादि राजांना जिंकलें, त्यांनीं आपल्या कन्या समुद्रगुप्ताला दिल्या; त्यानें त्यांच्याशीं विवाह लावले. हे राजे परधर्मी होते. शिरसीजवळ वनवासी येथें कदंबांचें राज्य होतें. हे कदंब राजे ब्राह्मण होते. हे पुढें क्षत्रिय झाले व त्यांनीं क्षत्रिय घराण्यांत आपल्या मुली दिल्या. कनोजच्या प्रतिहार घराण्यांतील राजांनीं ब्राह्मण व क्षत्रिय अशा दोन्ही वर्णांतील मुली केल्या होत्या. (एपिग्राफिका इंदिका व्हॉ. १८ पृ. ८७)

गुहिल घराण्याचा गुहदत्त हा ब्राह्मण असून त्याचा मुलगा खुम्माण यानें क्षत्रिय कन्येशीं विवाह केला होता.*

**(३०८) सावधानः**—इतिहासकालांतील हे मिश्रविवाह अपवाद म्हणूनच होत असत, पण ते पचत असत, एवढें यावरून स्पष्ट होतें. प्राचीन काळीं त्रैवर्णिकांमध्यें अनुलोम व प्रतिलोम विवाह होत असत. त्यासंबंधीं बौधायन (१, ८, २), विष्णुधर्मसूत्र (२४, १), मनु, (अ. ३–१२) असे पुष्कळ उल्लेख आहेत. आजच्या परिस्थितींत मिश्रविवाह होणें अपरिहार्य आहे. पूर्वी हे विवाह कलिवर्ज्यांत घातल्यामुळें बंद झाले असले तथापि ते आतां बंद न होतां वाढतच जातील. या विवाहांमुळें हिंदुराष्ट्राचें, हिंदुसंस्कृतीचें व हिंदुसमाजाचें जर बल वाढत असेल तर ते अवश्य करावेत. पण अशा विवाहामुळें आधींच दुर्बल झालेल्या हिंदु समाजांत जर संतति व मिळकत यासंबंधीं अधिक भानगडी उत्पन्न होत असतील तर असे विवाह न होणें हेंच श्रेयस्कर होय. विधर्मी, विदेशी समाजांतील कर्तृत्ववान्, बुद्धिमान्, शोधक, शास्त्रज्ञ अशा स्त्रिया व पुरुष हिंदु समाजांत येतील आणि जर तीं पचतील तर तो मोठाच लाभ आहे. परंतु केवळ गोऱ्या कातडीवर भाळून शीलानें, संस्कृतीनें हीन अशा स्त्रीपुरुषांची विवाहसंबंधानें भरती जर हिंदु समाजांत होऊं लागेल तर तें फारच घातक आहे.

**(३०९) जात्युच्छेद व राष्ट्रोत्कर्षः**—हिंदु समाजांतील सर्व जाति सुसंस्कृत होऊन सर्व दृष्टीनें एकरूप झाल्या तर त्यांत लाभच आहे. परंतु जाति मोडण्याचा आणि राष्ट्रोत्कर्षाचा जो संबंध वेळीं अवेळीं जोडला जातो, तो चुकीचा आहे. आजच्या हिंदु समाजांत जन्मजात उच्चता, नीचता व अस्पृश्यता आहे. त्यामुळेंच हिंदु समाजांतील जातींत बोंचकपणा आला आहे हें कांहीं खोटें नाहीं. हा बोंचकपणा नष्ट केलाच पाहिजे व जन्मजात उच्चनीचता घालविलीच पाहिजे. जातीच्या या बोंचकपणामुळें हिंदूंतील एखाद्या माणसानें एखादें महत्कार्य केलें तरी त्याचा

---

* वरील मिश्रविवाहाची माहिती पं. काणे यांच्या धर्मशास्त्रविचार या ग्रंथांतून पान ९५ व १२४–१२५ वरून घेतली आहे.

गौरव न होतां प्रथम त्याच्या जातीची व सद्धेतूची चिकित्सा होते. जणुं कांहीं एका जातीचे दुसऱ्या जातीशीं कांहीं हितसंबंध लागतच नाहींत. आपण सर्व वेगळे व तुटक आहों, अशा भावनेनें हिंदु समाज वागतो! ती भावना नष्ट करून अखिल हिंदूंमध्यें संस्कृति, परंपरा, देवता, सभ्यता अशा सर्व बाबतींत एकरूपता आणून हा हिंदु समाज, ही हिंदु जाति अखंड एकजिनसी बनविली पाहिजे; पण एवढें झालें कीं राष्ट्रोत्कर्ष होईलच असें मात्र नाहीं.

राष्ट्रांतील सर्व माणसांचा धर्म आणि जाति जर एक असेल तर परस्परांची सहानुभूति लाभून राष्ट्राचा उत्कर्ष होण्यास फारच उपयोग होतो. राष्ट्रांतील सर्व लोकांची भाषा व लिपि एक असणें हेंही राष्ट्रोत्कर्षाला आवश्यक आहे.

(३१०) अन्वयव्यतिरेकाचीं उदाहरणें:–हिंदु समाजाप्रमाणें ख्रिश्चन व मुसलमान समाजांतही जाति आहेत. पण तेथें जातिसंस्थेंतील जन्मजात बोंचकपणा व तज्जन्य मत्सर मुळींच नाहीं. जपान्यांमध्यें जाति असल्या तरी त्या बोंचक नाहींत. सर्व जपान्यांची एक भाषा व एक लिपि आहे. जपानमध्यें कन्फ्यूशिअस्, टाओ व शिंटो असे भिन्न भिन्न धर्म आहेत. असें असतांनाही जपान हें राष्ट्र आज प्रबल झालें आहे, याचें कारण त्या लोकांत उच्च कोटीचा देशाभिमान, शिस्त, संघटना व भौतिक शास्त्रज्ञानसंपन्नता इत्यादि आहेत हें होय. चिनी लोकांत हिंदूंप्रमाणें जाति नाहींत असें म्हणतात. पण एवढ्या प्रचंड चीनला जपाननें पादाक्रांत केलें याचें कारण जाति असणें वा नसणें हें नाहीं. युरोप खंडांत सर्व लोक एका ख्रिश्चन धर्माचे अनुयायी आहेत. भोजन व लग्न या बाबतींत तेथें कोणतेंही निर्बंध नाहींत. कोणत्याही देशांतील स्त्री कोणत्याही देशांतील पुरुषाशीं विवाहबद्ध होऊं शकते. तथापि राष्ट्रिय हितसंबंध भिन्न झाले कीं त्यामध्यें युद्धाचा वणवा पेटतो.

महाराष्ट्रांत अस्पृश्यता व जाति असतांना श्रीशिवाजी महाराजांनीं स्वराज्यसंस्थापना केली. त्याच वेळीं उत्तरेकडे हीं बंधनें शिथिल असतांनाही स्वराज्य स्थापन होऊं शकलें नाहीं. हीं उलटसुलट उदाहरणें

पाहिलीं म्हणजे जाति नष्ट करणें हें राष्ट्रिय उत्कर्षाचें एकमेव साधन आहे असें अन्वयव्यतिरेकानें सिद्ध होऊं शकत नाहीं. तरी पण जातींतील बोंचकपणा, मत्सर, मारकता हीं घालविलींच पाहिजेत; आणि जातीजातींत सांस्कृतिक एकरूपताही उत्पन्न केली पाहिजे. पण ती उत्पन्न होऊन सर्व जातींत सरास विवाह होऊं लागले म्हणजे राष्ट्राचा उत्कर्ष होईल असें नसून हिंदु राष्ट्राच्या उत्कर्षास जपानप्रमाणें जाज्वल्य देशाभिमान, भौतिकशास्त्रज्ञानसंपन्नता, शिस्त, संघटना व समष्टिधर्म यांची अत्यंत आवश्यकता आहे, हें जात्युच्छेदकांनीं अवश्य ध्यानांत ठेवावें.



# प्रकरण विसावें

## गोत्रप्रवरविचार

**(३११) गोत्रांची अडचणः**—हिंदु समाजांत विवाह जमवितांना पत्रिका, मुहूर्त, जाति, यांची जशी अडचण आहे, तशीच गोत्रप्रवरांचीही मोठी अडचण आहे. गोत्रप्रवरांचा व रक्ताचा संबंध आहे, अशा कल्पनेमुळें ही अडचण उत्पन्न झालेली आहे. ही अडचण केवळ वरच्या वर्गापुरतीच आहे असें नसून ती अखिल हिंदु समाजांतील सर्व जातींमध्यें आहे. ब्राह्मण, मराठे, क्षत्रिय, वैश्य, कुणबी, न्हावी, माळी, साळी, धोबी, धनगर, महार व चांभार अशा सर्व जातींमध्यें गोत्रप्रवराप्रमाणें देवकांची व बळीची अडचण आहे. समान गोत्र व समान प्रवर यांचें विवाह जसे निषिद्ध समजतात, तसे ज्यांचे देवक नि बळी समान आहेत त्यांचे परस्पर विवाहही निषिद्ध समजण्यांत येतात. महाराष्ट्रांतील मराठ्यांमध्यें, कुणब्यांमध्यें आणि इतरांमध्यें मिळून जवळ जवळ चौऱ्याऐंशी देवकें आहेत. त्यामध्यें वेळू,

वड, उंबर, आंबा, तरवड, आपटा, बेल इत्यादि वृक्ष आहेत. सुरी, कुऱ्हाड, कोयता, तरवार इत्यादि शस्त्रें आहेत. डुक्कर, घोडा, हरीण, हत्ती इत्यादि पशू असून साळुंकी, मोर, गरुड इत्यादि पक्षीही आहेत. देवकांत कांहीं फळें आहेत, कांहीं फुलें आहेत; वड, आंबा, कळंब, वासनवेल, सूर्यफूल इत्यादि देवकें भंडारी, महार, चांभार, बुरुड, न्हावी, माळी, तेली, रामोशी धनगर, ठाकूर, ढोर, वाणी, गोंधळी, सुतार, भोई अशा कितीतरी जातीं-मध्यें आहेत. त्या सर्वांचा एकरक्तसंबंध जोडणें चुकीचें आहे.

कर्नाटकामध्यें देवकस्थानीं बळी मानतात. त्यांत हत्ती, हळद, नाग-चाफा, मासा अशांचा समावेश होतो. ज्यामध्यें समान बळी आहेत त्यांच्याशीं शरीरसंबंध होत नाहींत; याचें कारण त्या बळीचा व वंशाचा संबंध जोडण्याची चुकीची कल्पना हें होय. अखिल हिंदु समाजांत ही जी गोत्रप्रवर, बळी व देवक यांची विवाहाच्या बाबतींत अडचण आहे ती नष्ट करणें अवश्य आहे. आतां गोत्र म्हणजे काय याचा विचार करूं.

**(३१२) गोत्राचा रूढ अर्थः**– ‘ गोत्र ’ शब्दाचा प्रचलित अर्थ ‘ सप्तानां ऋषीणां अगस्त्याष्टमानां यदपत्यं तद् गोत्रम् ’

म्हणजे विश्वामित्र, जमदग्नि, भरद्वाज, गोतम, अत्रि, वसिष्ठ, कश्यप हे सात व आठवा अगस्त्य या ऋषींचीं अपत्यें म्हणजे गोत्र असा आहे. हीं गोत्रें वाढत जाऊन पुढें अनंत झालीं, असें समजतात. ऋषींचीं अपत्यें म्हणजे गोत्र असें म्हटलें तर ‘ गोत्रें ’ ब्राह्मणांनाच असतात आणि क्षत्रिय वैश्यादिकांना नसतात असें म्हणावें लागतें. परंतु सांप्रत क्षत्रिय-वैश्यांनाही गोत्रें आहेत.

**(३१३) पुराणें व गोत्रेंः**–पुराणें व धर्मशास्त्रग्रंथ यांमध्यें गोत्र-कल्पनेंत अंतर दिसतें. धर्मशास्त्रग्रंथांत ऋषींचीं अपत्यें म्हणजे गोत्रें असें सांगितलें आहे. पण पुराणांत क्षत्रिय राजेही गोत्रकार होते, त्या गोत्रकार क्षत्रिय राजांच्या वंशांत पुढें ब्राह्मणही समाविष्ट झाल्याचें वर्णन आहे. श्रीकृष्ण व पांडव ज्या सोमवंशांत झाले त्याच सोमवंशाच्या एका शाखेंत पुढ मधु, यदु, वृष्णि इत्यादि कुलप्रवर्तक थोर पुरुष होऊन गेले. मधूचा पुत्र जो वृष्णि त्याच्या नांवावरून वृष्णि गोत्र उत्पन्न झालें ( विष्णुपुराण ४–११–५ ). याचप्रमाणें रथीतर व मांधाता यांचीं उदाहरणें आहेत.

'क्षत्रियवैश्यौ तु पुरोहित–गोत्रप्रवरौ।'

हें धर्मशास्त्र अर्वाचीन आहे. याचा अर्थ क्षत्रियवैश्यांनीं नेहमींच पुरोहिताचे गोत्रप्रवर स्वीकारावेत असा नसून ज्या वेळेला त्यांना स्वगोत्राचें विस्मरण होतें, त्यावेळीं त्यांनीं पुरोहिताचें गोत्र स्वीकारावें असा आहे.

**(३१४) गोत्र व विद्या यांचा संबंधः**—ऋषींचें अपत्य म्हणजे गोत्र व तें रक्तसंबंधाचेंच हवें ही कल्पना चुकीची आहे. ज्ञानसंबंध, विद्यासंबंध व अध्ययनसंबंधानेंही अपत्यत्व येतें. ऋषींकडे अध्ययनार्थ गेल्यानंतर प्रथम उपनयन होई; नंतर अध्ययनास प्रारंभ होत असे. दीर्घ काल गुरुगृहवासामुळें विद्येच्या द्वारानें शिष्याला ऋषीच्या अपत्याचा मान सहजच मिळत होता. मातापित्यांच्या संयोगापासून झालेल्या जन्माला संभूति म्हणतात. अशा संभूतीला धर्मशास्त्रांत महत्त्वाचें स्थान नाहीं. हा जन्म गौण असून उपनयनानंतर जो दुसरा जन्म होतो त्यावेळीं त्याला आचार्य गोत्र देतो. मुलाला गुरुगृहीं अध्ययनार्थ ठेवण्याची चाल पूर्वी होती. उपनयनपूर्वक बारा ते चोवीस वर्षेंपर्यंत मुलगा गुरुगृहीं असे. त्यामुळें गुरूचें गोत्र व गुरूची परंपरा यांनीं तो संबद्ध होई. हल्लींचे पदवीधर जसे आपल्या विद्यापीठांची पदवी धारण करतात, त्याप्रमाणें पूर्वींचे स्नातक अध्ययनानंतर गुरुगोत्रें स्वीकारून "मी अमक्या गुरूचा शिष्य आहे," असें सांगत. तात्पर्य उपनयनानंतर शिष्याला गोत्र मिळे * म्हणूनच मनु म्हणतो,

आचार्यस्त्वस्य यां जातिं विधिवद्वेदपारगः।
उत्पादयति सावित्र्या सा सत्या साजरामरा ॥

—मनु. अ. २ श्लो. १४८

वेदज्ञ आचार्य विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं गायत्री–मंत्रोपदेशपूर्वक वेदाध्ययनानें जी जाति उत्पन्न करतो तीच सत्य व अजर होय.

---

* उपनयनानंतरच मुलाला पित्याच्या मिळकतीचा वांटा मिळतो. जन्मांध, बधिर, इत्यादींचें उपनयन होत नाहीं व त्यांना मिळकतींतील भागही मिळत नाहीं. उपनयनापूर्वी मूल मेलें तर तें सगोत्रीय झालें नस- ल्यामुळें त्याचें सोयेरसुतक नसतें.

सांप्रत वेदविद्या पढविणारीं गुरुकुलें व ऋषी नसल्यामुळें बापच गुरु होऊन आपल्या मुलाचें उपनयन करतो. अलीकडील प्रयोगकार पित्यावांचून अन्याला गुरु म्हणून ओळखीतच नाहींत. पूर्वीं घरीं मुलगा फक्त आठच वर्षें असे. पुढें तो गुरुगृहांत अध्ययन संपेपर्यंत राही. त्यामुळें गुरुपरंपरा व गोत्र यांची समव्याप्ति होती; परंतु अलीकडे ती परंपरा तुटली, गुरुगोत्राचा लोप झाला आणि पितृगोत्र तेवढें अवशिष्ट राहिलें. जुन्या दानपत्रांत नांवाबरोबर गोत्राचा उल्लेख असतो.

(३१५) **द्व्यामुष्यायणः**–प्रवरमंजरीसारख्या ग्रंथावरून कित्येक लोक द्विगोत्री असल्याचें दिसतें.

**दिवा वसिष्ठा इत्येके नक्तं ज्ञेयाश्च कश्यपाः ।** —मत्स्यपुराण
**लोगाक्षिः कश्यपसुतो वसिष्ठेनोपनीतवान् ।**
**अहर्वसिष्ठो रात्रौ तु कश्यपस्तेन सः स्मृतः ॥**

या वरील व्याख्याही बोधप्रद आहेत.

**'उपनयनं द्वितीयं जन्म । उपनयनस्य दिवाविहितत्वात् अहर्वसिष्ठत्वम् । निषेकस्य प्रथमजन्मनः रात्रौ जातत्वात् च रात्रौ कश्यपत्वम्... अत एव भिन्नगोत्रे उपनीतस्य द्व्यामुष्यायणत्वम् । अहः उपदेष्टुः रात्रौ निषेक्तुः इति ।'**

उपनयन (हा दुसरा जन्म असतो) दिवसा होतें म्हणून कश्यपाचा मुलगा लोगाक्षी दिवसा वसिष्ठगोत्री आणि निषेकाचा संबंध रात्रीं असल्यामुळें रात्रीं कश्यपगोत्री समजावा. उपनेत्याचें एक गोत्र व निषेक्त्याचें दुसरें गोत्र असें ज्यांना असतें, त्यांना द्व्यामुष्यायणी म्हणतात. पिता जेव्हांपासून उपनयन करूं लागला व गुरुगृहवास बंद पडला तेव्हां-पासून गुरुगोत्र लावण्याचें कारण उरलें नाहीं. शिष्य, अनुयायी आणि मुलगा अशीं तिन्हीं नातीं एकत्र झालीं. तात्पर्य गोत्र हें वंशवाचक नसून विद्यासंबंधवाचक आहे. ब्रह्मांडपुराणांत योनिसंबंध व गोत्रसंबंध असा भेद केला आहे व त्यावरून योनिसंबंध म्हणजे रक्तसंबंध आणि गोत्रसंबंध म्हणजे विद्यासंबंध होय असें स्पष्ट होतें.

**न भोज्या योनिसंबद्धा गोत्रसंबंधिनस्तथा ।** —ब्रह्मांडपुराण.

सांप्रत एका गोत्रांतील लोक म्हणजे एका वंशांतील लोक अशी समजूत आहे. धार्मिक विधींत गोत्रांचा उच्चार ब्राह्मणाकडून व्यक्तिनिर्देश करतांना होतो. आज सगोत्रविवाह रूढ नाहीं, प्राचीन इतिहास पाहातां गोत्र म्हणजे वंश हीही कल्पना खरी नाहीं. ब्राह्मणांच्या गोत्रांशीं प्रवर संयुक्त झाले आणि ते गोत्रसंस्थापकांचेही ऋषी असावेत अशी समजूत होऊन विवाह करतांना गोत्राबरोबर प्रवरही टाळूं लागले.

**(३१६) वेद व गोत्रेंः**—गोत्र शब्दाचा अर्थ गोठा, कळप, दुर्ग असा ऋग्वेदांत आलेला आहे. छांदोग्योपनिषदामध्यें ( ४।४।१ ) कुटुंब या अर्थी गोत्र हा शब्द आलेला आहे. गोत्रऋषी म्हणजे आद्यपूर्वज व त्यांचे वंशज अशा अर्थानें गोत्र शब्द ऋग्वेदांत वापरलेला दिसत नाहीं.

गो म्हणजे भूमि व त्र म्हणजे संरक्षक यावरून भूमिसंरक्षक वर्ग असा गोत्र शब्दाचा अर्थ कोणी करतात. त्यावरून आपल्या भूमीच्या बाहेरची म्हणजे दुसऱ्या गोत्रांतील मुलगी करणें, पळवून आणणें हाच पुरुषार्थ, अशा कल्पनेमुळें गोत्राबाहेर लग्न करण्याची रीत उत्पन्न झाली असावी.

**(३१७) प्राचीन स्मृतिकार व सगोत्र विवाहः**—बौधायना-सारख्या जुन्या स्मृतींत सगोत्र विवाह निषिद्ध नाहीं. वसिष्ठधर्मसूत्रांत सगोत्र विवाह करणें प्रशस्त नाहीं, असें म्हटलें असलें तरी बापाच्या बाजूनें पांच पिढ्या सोडून लग्न करावें असें सांगितलें आहे. अनेक स्मृतींत सगोत्र व सप्रवर विवाहाचा निषेध आहे. पण त्याबरोबर बापाकडच्या सात व आई-कडच्या पांच पिढ्या टाळाव्या असाही उल्लेख करण्यांत येतो. मनुस्मृती-मध्यें तर 'असपिंडा च या मातुः असपिंडा च या पितुः।' म्हणजे सपिंडा-बाहेरचे सगोत्र विवाह करण्यास अनुमती दिली आहे. त्यावरून गोत्र शब्दाची अलीकडील समजूतच चुकलेली आहे असें म्हणावें लागतें.

संस्कृत ग्रंथकार विश्वामित्र, जमदग्नि, भारद्वाज, गोतम, अत्रि, वसिष्ठ, कश्यप व आठवा अगस्त्य या ऋषींना गोत्रकार म्हणतात. या आठांच्या वंशजांपैकीं कुणीतरी एकच गोत्राचा ऋषी असला पाहिजे हें उघड आहे. गोत्रांतील लोकांनीं आपसांत विवाह करूं नयेत, हा आजचा नियम आठ ऋषींच्या वेळीं अस्तित्वांत नव्हता असें दिसतें. कारण कश्यप,

वसिष्ठ, अगस्त्य हे मरीचीचे वंशज असून काश्यप व वसिष्ठ यांमध्यें विवाह होतात. हें ध्यानांत घेतलें म्हणजे वंश, कुल आणि तीवर अधिष्ठिलेली सगोत्र विवाह–निषेधाची कल्पना अलीकडील आहे, ती मूळ तत्त्वाविरुद्ध आहे, असें म्हणणें प्राप्त होतें.

**(३१८) धर्मसिंधूंतील गोत्रगणः**—धर्मसिंधूमध्यें गोत्रांच्या विविध गणांचें, उपगणांचें आणि त्यांच्या प्रवरांचें कथन केलेलें आहे. मूळ ऋषी आठ व नंतरचे दोन असे मुख्य दहा गोत्रगण सांगितले असून त्यांचे उपगण एकूणपन्नास केलेले आहेत. भृगु सात, आंगिरस सतरा, अत्रि चार, विश्वामित्र दहा, कश्यप तीन, वसिष्ठ चार व अगस्त्य चार असे हे एकूणपन्नास उपगण असून त्यांचे आणखीही पोटगण आहेत.

**(३१९) प्रवर म्हणजे काय ?**:—आतां प्रवर म्हणजे काय हें पाहूं. वेदांत प्रवरांचा उल्लेख तैत्तिरीय संहितेंत आढळतो. त्यावरून असें दिसतें कीं, त्यावेळचे आचार्य श्रौतकर्म करणाऱ्या कोणत्याना कोणत्यातरी संप्रदायामध्यें समाविष्ट होते. 'वृ' धातूचा अर्थ 'निवडणें, स्वीकारणें' असा आहे. आर्षेयवरण म्हणजे जे कर्मसंप्रदाय त्यावेळीं होते, त्यांपैकीं एकाचा स्वीकार करणें होय. त्यावरून प्रवर हा शब्द संप्रदायप्रवर्तक ऋषीच्य नांवाचा वाचक आहे आणि ते संप्रदाय श्रौतकर्मासंबंधाचे होते असें उघड होतें. गोत्र हा जसा विद्यावाचक शब्द आहे तसा प्रवर हा शब्द कर्मसंप्रदाय वाचक ठरतो.

'**ऋषिभिः आर्षेयं प्रवृणीते**' अशीं वचनें श्रौतसूत्रांत येतात, त्यावरून वरील अर्थाला बळकटी येते. यज्ञांत प्रवरांचें अस्तित्व प्रथम दृश्यमान होतें. उदाहरणार्थ,

'**प्रव्रियन्ते होत्रध्वर्युभ्याम् इति प्रवराः ।**'

म्हणजे होता आणि अध्वर्यु यांकडून यज्ञामध्यें वर्णिले जातात म्हणून त्यांस प्रवर म्हणतात. वसिष्ठांचा प्रवर 'वासिष्ठेंद्रप्रमदाभरद्वसु' असा आहे. ह्याच्यापुढें प्रवरमंजरीकार 'वसिष्ठवत्, इंद्रप्रमदावत्, भरद्वसुवत्,' असें लिहितात. ह्याचा अर्थ वसिष्ठाप्रमाणें, इंद्रप्रमदाप्रमाणें, भरद्वसूप्रमाणें मी हें कर्म करतों असा आहे, त्यावरून प्रवरसंस्था एकवंश कल्पनेवर उभारलेली नाहीं हें सिद्ध आहे.

(३२०) **भिन्न भिन्न व्याख्याः**–प्रवराच्या व्याख्येसंबंधानेंही भिन्न भिन्न मतें आहेत. 'गोत्रवंशप्रवर्तकर्षीणां व्यावर्तका ऋषिविशेषाः प्रवराः' अशी प्रवराची व्याख्या धर्मसिंधूकार देतात. याचा अर्थ गोत्रांतील वंशांना आरंभ करणाऱ्या ऋषींहून भिन्नता दाखविणारे ऋषी म्हणजे प्रवर होत असा आहे. निर्णयसिंधुकार म्हणतात,

'कल्पकारा हि वासिष्ठेति होता वसिष्ठवदित्यध्वर्युरित्यादिना येषां प्रवरणमामनन्ति ते प्रवराः। तत्त्वं तु गोत्रभूतस्य पितृपितामहप्रपितामहा एव प्रवराः।'

'वासिष्ठ,' इत्यादि संबोधन–विभक्तीनें होता आणि 'वसिष्ठवत्,' इत्यादि शब्दांनीं अध्वर्यु ज्यांचा उल्लेख करितात ते ऋषी म्हणजे प्रवर होत. गोत्रभूत जो ऋषि त्याचा पिता, आजा व पणजा हे त्या गोत्राचे प्रवर समजावे. गोत्रें अनंत असलीं तरी प्रवरभूत ऋषी एकूणपन्नासच असल्यामुळें प्रवरसंख्या तेवढीच आहे, असें बौधायनानें सांगितलें आहे.

'गोत्राणां तु सहस्राणि प्रयुतान्यर्बुदानि च।
ऊनपंचाशदेवैषां प्रवरा ऋषिदर्शनात्॥'

निर्णयसिंधुकारांची वरील व्याख्या खरी धरल्यास गोत्र संख्येच्या तिप्पट प्रवर संख्या व्हावयास पाहिजे. यजमानाच्या गोत्रभूत ऋषीचे पितृ-पितामह प्रपितामह हे त्या गोत्राचे प्रवर होतात. अर्थात् प्रवर संख्या एकूणपन्नास राहाणे शक्य नाहीं.

अग्नीचें आवाहन करून आपण देवांना अर्पण करीत असलेले हवि त्याला पोंचावे म्हणून यजमानाच्या पूर्वज ऋषींचीं जीं नांवें निवडीत त्यांना प्रवर म्हणत, असें श्रौतग्रंथावरून दिसतें. प्रत्येक गोत्राला एक, दोन, तीन व पांचपर्यंत प्रवर आहेत. चार प्रवर कोठेंही नाहींत.

(३२१) **एकवाक्यता नाहीं**:–प्रवर शब्दाच्या वरील व्याख्येमध्यें मेळ नाहीं. याचें कारण अलीकडे यज्ञसंस्थेचा लोप झाला आणि प्रवर-संस्था ही एकवंश कल्पनेवर उभारली गेली, अशी समजूत झाली हें होय! प्राचीन काळीं प्रवर शब्दाचा अर्थ होता आणि अध्वर्यु यांकडून यज्ञामध्यें वर्णिले जातात म्हणून त्यांस प्रवर म्हणतात असा आहे. त्यावरून प्रवरांचा

आणि रक्ताचा कसलाही संबंध नाहीं. अलीकडेच गोत्रें व प्रवर हीं एकवंश-कल्पनेशीं अज्ञानानें निगडित झालीं. गोत्राचा अध्ययनाशीं व विद्येशीं संबंध आहे, आणि प्रवराचा यज्ञकर्माशीं संबंध आहे, म्हणून सगोत्र व सप्रवर विवाह होण्यास वास्तविक अडचण नाहीं.

**(३२२) गोत्रप्रवर व विवाहनिर्बंधः**–' असमानप्रवरैर्विवाहः ' ज्या कुलांचे समान प्रवर नाहींत, त्या कुलामध्यें विवाह व्हावा असें गौतमधर्मसूत्रांत म्हटलें आहे. ' सगोत्राय दुहितरं न प्रयच्छेत् ' म्हणजे समान गोत्रांतील पुरुषांना कन्या देऊं नये, असें आपस्तंब म्हणतो. या दोन्हीं वचनांच्या आणि या. व. स्मृति अ. १ श्लो. ५२।५३ च्या आधारानें प्रस्तुतचा गोत्रप्रवरनिर्बंध प्रवृत्त झालेला आहे. गोत्रप्रवरांचे हे विवाहविषयक निर्बंध कां पाळावेत असा प्रश्न केल्यास, सगोत्र विवाह हे संततिदृष्ट्या अनिष्ट आहेत असें उत्तर देण्यांत येतें. मनु. अ. ३ श्लो. ५ मधील वचन जर ' असपिण्डा च या मातुः ' व ' असपिण्डा च या पितुः ' असें असेल तर त्यांत गोत्रप्रवरांचा संबंधही नाहीं. ' असपिण्डा च या पितुः ' याच्या जागीं ' असगोत्रा च या पितुः ' असा पाठ कांहीं प्रतींत आढळतो; पण मिताक्षराकारानें " असपिण्डा च " हाच पाठ घेतला आहे. एककुलत्वाचा निर्बंध सापिण्ड्यपालनानेंच अधिक पाळला जातो. मग सापिण्ड्याचा निर्बंध पाळल्यावर सगोत्रत्व व सप्रवरत्व यांच्या निर्बंधाची आवश्यकता ती काय राहिली ? मनुस्मृतींतील वरील श्लोकांत ' असपिण्डा च या पितुः ' या पदानें पितृसपिंड विवाहाचा निषेध सांगितला असावा; कारण मनूनें तो अन्यत्र सांगितलेला नाहीं. टीकाकार कुल्लूकभट्टासही ' चकारात् पितृसपिण्डाऽपि ' असें म्हणावें लागलें.

**(३२३) सगोत्र विवाह होतातः**–गोत्र म्हणजे कुल वा वंश, अर्थात् एकरक्ताचा संबंध टाळण्यासाठीं गोत्रभेद पाळणें अवश्य आहे, अशी प्रचलित समजूत आहे. परंतु चालू परिस्थितींत या समजुतीला कांहीं महत्त्व आहे असें वाटत नाहीं. कपि व भारद्वाज या गोत्रांत विवाह होऊं नये असा आज नियम आहे. पण धर्मसिंधुकारांनीं " कपिभारद्वाजयोर्विवाहोबह्वृचपरिशिष्टे उक्तः " कपिभारद्वाजगोत्रांतील विवाह ऋक्शाखेच्या परिशिष्टांत उक्त आहेत असें म्हटलें आहे. भृगुगणाचे जे

वत्स, बिद, यस्क, वगैरे उपगण आहेत त्यांमध्यें वस्तुत: विवाह होऊं नयेत. परंतु यस्कापासूनच्या पुढील उपगणांत स्वगण सोडून विवाहाला प्रतिबंध नाहीं असें सांगितलें आहे.

‘ यस्कादीनां स्वगणं त्यक्त्वा सर्वैर्विवाहः । ’

गुजराथमध्यें अनाविल ब्राह्मण म्हणून जी एक ब्राह्मण पोटजात आहे तींत एका गोत्रांत परस्पर विवाह आज प्रत्यक्ष घडत आहेत. आणि संततीही सर्व दृष्टीनें संपन्न आहे. आंगिरस व भृगु या गणावांचून इतरांत एक प्रवरसाम्यानें सगोत्रत्व सिद्ध होतें. पण गुजराथेंतील आंगिरस व भारद्वाज या गणांतील गोत्रांत तें प्रवरसाम्य असूनही विवाह होत आहेत. काश्यप व शांडिल्य हे उपगण काश्यपगणांतील असल्यानें कांहीं गोष्टी भिन्न असतांही विवाह होऊं नयेत असा आपल्याकडील परिपाठ आहे. पण गुजराथेंत एका ब्राह्मण पोटजातींत काश्यप, शांडिल्य, पौलस्त्य या गोत्रांमध्यें काश्यप गोत्रांतील कन्या शांडिल्य गोत्रीयास, शांडिल्य गोत्रीय कन्या पौलस्त्य गौत्रीयास, आणि पौलस्त्य गोत्रीय कन्या काश्यप गोत्रीयास दिली जाते. हा क्रम उलट असा नाहीं. गुजराथेप्रमाणें नेपाळांत सगोत्र विवाहाची चाल आहे. सिंध प्रांतांत आणि राजपुतान्यांत सापिंड्य निवृत्तिनंतर सगोत्र विवाह अधिक उत्साहानें करतात. आपल्या पूर्वगोत्रांतील माणसाशीं पुनःश्च जवळचा संबंध आणण्याची भावना यांत असते. यावरून गोत्रप्रवरनिर्बंधाचा आणि एकरक्ताचा संबंध काल्पनिक आहे असें दिसतें.

साधारणपणें समानगोत्रत्व व सप्रवरत्व हे एकच होत. सगोत्रत्वाची व्याख्या बौधायनानें

‘ एक एव ऋषिर्यावत्प्रवरेष्वनुवर्तते ।
तावत्समानगोत्रत्वं विना भृग्वंगिरोगणात् ॥ ’

अशी केली आहे. भृगु व आंगिरस या गणाव्यतिरिक्त दुसऱ्या सर्व गणांच्या गोत्रांतील ज्या गोत्रामध्यें प्रवरभूत ऋषींत एक तरी समान आहे, त्या गोत्रांत सगोत्रत्व आहे, असें समजावें. हा नियम भृगु व आंगिरस या गणांतील गोत्रांना लागू नाहीं. या गणांचा अपवाद कां केला हें समजणें कठीण आहे. गार्ग्य, भारद्वाज, कपि, विष्णुवर्धन व नित्युंदन या गोत्रांच्या प्रवरांत आंगिरस हा प्रवर समान असतांही गार्ग्य, भारद्वाज

व कपि या तीन गोत्रांतील कोणत्याही गोत्राचें विष्णुवर्धन व नित्युंदन यांतील कोणाशींही पटेल. कारण हीं गोत्रें आंगिरस गणांतील आहेत. बौधायनाचें हें विवेचन कितपत तर्कशुद्ध आहे याचा विचार वाचकांनीं करावा.

(३२४) **सगोत्र विवाहास प्रायश्चित्तः**—सगोत्र विवाह हा अज्ञानतः झाला तर प्रायश्चित्तानें तज्जन्य संततीचीही शुद्धि होते व त्या संततीला आपला गोत्रप्रवरविषयक व्यवहार काश्यप गोत्र स्वीकारून करतां येतो; पण यामुळें दुसरी एक अडचण येते कीं, स्वतंत्र दुसरीं जीं काश्यपगोत्री कुटुंबें असतील (तीं कांहीं सर्व सगोत्र विवाहापासून अज्ञानतः झालेली संतती नव्हे;) त्यांच्याशीं या नूतन काश्यपगोत्रीयांचा (अज्ञानतः सगोत्र विवाहजन्य संततीचा) विवाहसंबंध होणार नाहीं; कारण या दोघांचें गोत्र एक. पण या नवकाश्यप गोत्रीयांचा भिन्न गोत्रत्वाच्या आधारावर मूळ गोत्रीयांशीं सगोत्र विवाह होणार, म्हणजे एकरक्तत्वाचा दोष या संबंधामुळें बुद्धयाच घडवून आणला असें होणार!

(३२५) **गोत्रप्रवर्तक क्षत्रियः**—क्षत्रियांना अध्ययनपरंपरेशीं सदासर्वकाळ दक्ष व निकट असणें शक्य नसतें, म्हणून स्वगोत्रांचें विस्मरण होणें स्वाभाविक आहे. उदाहरणार्थ उदेपूर, जोधपूर, जयपूर, बुंदिकोटा, भावनगर इत्यादि रजपूत घराण्यांचीं गोत्रें पाहिलीं तर तीं अनुक्रमें बैजबाप, गौतम, मानव, वत्स, वसिष्ठ अशीं आढळतात. यांतील कांहीं गोत्रें त्यांचीं स्वतःचीं आहेत व कांहीं पुरोहितांचीं आहेत. प्रवराध्यायाचें परीक्षण केल्यास वैदिक कालांत पुष्कळ क्षत्रिय गोत्रप्रवर्तक होते असें दिसतें. गर्ग्य, आंगिरस हीं क्षत्रियांचीं गोत्रें असल्याचें वायुपुराणावरून सिद्ध होतें. (वायु पु. अ. ९९ श्लो. १९१) प्राचीन काळीं क्षत्रियही गोत्रप्रवर्तक होते, हें जरी खरें आहे तरी अर्वाचीन कालीं अध्ययनपरंपरेच्या लोपामुळें पुष्कळ क्षत्रियांना स्वगोत्र विस्मृति झाली व त्यांनीं पुरोहितांचीं गोत्रें स्वीकारलीं हेंही तितकेंच खरें आहे. जेथें क्षत्रियांनीं विस्मृतीमुळें पुरोहिताचे गोत्रप्रवर स्वीकारले तेथें पुरोहित आपल्या शाखेप्रमाणेंच संस्कार व इतर कर्में करणार आणि अध्यापनाचा प्रसंग आल्यास तो आपलीच शाखा त्यांना पढवणार, अशा स्थितींत गोत्रप्रवरांचा आणि एकवंशकल्पनेचा संबंध जोडणें हास्यास्पद आहे. गोत्राचा वंशाशीं किंवा रक्ताशीं संबंध नसून अध्ययनाशीं

व प्रवराचा कर्माशीं संबंध आहे हें उघड होतें. म्हणून क्षत्रिय घराण्यांनीं सगोत्र विवाह निषिद्ध समजणें चुकीचें आहे. महाराष्ट्रांतील कांहीं क्षत्रिय जाति सगोत्र–विवाह आजपर्यंत निषिद्ध मानीत होत्या. पण अलीकडे त्यांनीं ज्ञाति–सभा भरवून असे विवाह निषिद्ध मानूं नयेत असें ठरविलें आहे.

**(३२६) पुराणांतील सगोत्र विवाह:**–प्राणिशास्त्रदृष्ट्या विचार केल्यास सगोत्र विवाहनिषेधापेक्षां सापिण्डय विवाहनिषेधाची अधिक गरज आहे असें दिसतें. मुलांमुलींचें प्रेम घरांतल्या घरांत आतसंबंधांत जडण्याचे प्रकार घडूं नयेत म्हणून सापिंड्यविवाहाचा निषेध अवश्य आहे. फार पुरातन काळीं सगोत्र विवाह निषिद्ध नव्हता. पुराणांमध्यें सगोत्र विवाहाचीं उदाहरणें आहेत. श्रीकृष्णाचीं मातापितरें जीं वसुदेव व देवकी तीं यदु-वंशांतील होतीं. दोघांचा मूळपुरुष चित्ररथ हा होय ! त्याच्यापासून वसुदेव अकरावा व देवकी बारावी असें भागवतांतील वंशावळीवरून दिसून येतें. तसेंच पृथा, पांडु, सुभद्रा व अर्जुन यांचे विवाह एकाच गोत्रांतील होते. सूर्यवंशांतील राम व सीता, तसेंच लक्ष्मणादि बंधु व उर्मिलादि बहिणी यांचे विवाहही सगोत्रच होते. या आणि अशा तऱ्हेच्या उदाहरणांवरून गोत्राचा आणि रक्ताचा जो संबंध जोडला आहे तो अली-कडील आहे; प्राचीन काळीं अशी समजूत नव्हती हें सिद्ध होतें.

**(३२७) सगोत्रता व एकरक्तसंबंध:**–गोत्र हा शब्द रक्तसंबंध दाखवितो म्हणून सगोत्र विवाह अनिष्ट असें गृहीत धरल्यास मूळ गोत्र-प्रवर्तक ऋषीपासून आतांपर्यंत अगणित पिढ्या झाल्या असल्या पाहिजेत. अर्थात् इतक्या पिढ्या झाल्यानंतर मूळ गोत्रप्रवर्तक ऋषींतील रक्ताचा बिंदु आजच्या गोत्रांतील स्त्रीपुरुषांमध्यें शिल्लक असेल असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. कारण त्या गोत्रांत अनेक परगोत्रांतील स्त्रिया आजपर्यंत आलेल्या असतात. भिन्नभिन्न क्षेत्रांतील स्त्रिया आल्यानंतर त्या क्षेत्राचा म्हणून एक परिणाम बीजावर होतोच. तसा परिणाम झाला असल्यामुळें एकरक्तसंबंधाचा प्रश्न उरतच नाहीं. म्हणून अशा विवाहापासून संततीवर कांहीं अनिष्ट परिणाम होण्याचेंही कारण नाहीं.

**(३२८) रक्तसंबंधाची कसोटी:**–समजा, वसिष्ठ गोत्रांतील एक मुलगा दत्तक गेला व तो विश्वामित्र कुलोत्पन्न झाला. आतां पहिल्या

पिढींत स्मरण आहे म्हणून तो वसिष्ठ गोत्रज वधूशीं संबंध करणार नाहीं. पण चार पांच पिढ्या गेल्यानंतर तसा विवाह होणें असंभाव्य नाहीं; आणि तसे विवाह झाले असल्यामुळें रक्तसंबंधाची कसोटी लावणें समुचित दिसत नाहीं. अलीकडे सगोत्र विवाह जमले म्हणजे मुलीला दत्तक * देऊन गोत्रांतर करितात आणि लग्नें रजिस्टर करतात याला तरी आधार कोठें आहे? म्हणून एक गोत्र असलेल्या खास नागपुरी ब्राह्मणानें खास पुणेरी ब्राह्मणांशीं जरी शरीरसंबंध केला, तरी तो संबंध एकगोत्रत्वामुळें निकटचा होतो, असें म्हणतां येणार नाहीं.

(३२९) **ब्राह्मण व सगोत्र विवाह**:—ब्राह्मणांमध्यें पंचगौड व पंचद्राविड असे मुख्य दोन भेद आहेत. या दोन्ही गटांत मिळून सुमारें चाळीस पोटजाति आहेत. भिन्न स्थळीं, भिन्न शाखेमुळें, भिन्न परिस्थितींत ज्या इतक्या पोटजाति झाल्या, त्यांमध्यें अनेक घराण्यांत जरी एकगोत्र असलें तथापि त्या घराण्यांत विवाह होण्यास अडचण नाहीं. दमोसागराकडील कऱ्हाडे ब्राह्मण आणि दक्षिण महाराष्ट्रांतील कोंकणस्थ, देशस्थादि ब्राह्मण यांच्यामध्यें १०।१२ पिढ्या आतांपर्यंत झालेल्या आहेत. शिवाय या पोटजातींत भिन्न कुलांतील अनेक स्त्रिया आल्यानें मूळ गोत्रप्रवर्तक ऋषीच्या रक्ताचा प्रवाह जवळजवळ नष्टच झाला आहे; म्हणून दशविध ब्राह्मणांमध्यें ब्राह्मणांतील पोटजातींच्या विवाहांत सगोत्रता आड येतां कामा नये. भिन्न शाखीय विवाह करतांना दोन घराण्यांचें गोत्र एक असलें तरी ती सगोत्रता यापुढें पहाण्याचें कारण नाहीं. एकाच पोटजातींत सगोत्र विवाह करणेंही अशास्त्रीय नाहीं. चोळकर हे भारद्वाज गोत्री आहेत, तसेंच आचवल, गांगल, आसवे हेही भारद्वाज गोत्री आहेत. यांचीं आडनांवें भिन्न भिन्न असून गेल्या कित्येक शतकांत त्यांच्यामध्यें विवाहसंबंध झालेले नाहींत. पण आज त्यामध्यें परस्पर विवाह झाले तर मूळ गोत्रप्रवर्तक ऋषीपासून कित्येक शतकें लोटलीं असल्यामुळें एकरक्तत्वाचा संबंध राहिलेला नाहीं.

(३३०) **सप्रवरविवाह सशास्त्र**:—आडनांवें भिन्न, गोत्रें भिन्न पण प्रवर समान असल्यामुळें विवाह होत नाहींत. उदाहरणार्थ केळकर—करमरकर, टिळक—ओगले, डोंगरे—ठोसर हीं घराणीं होत. यांचीं गोत्रें

* पान २८८ वरील तळ टीप पहा.

शांडिल्य व काश्यप अशीं भिन्न असलीं तरी प्रवर समान आहेत म्हणून ही अडचण येते. पण प्रवर शब्दाचा रक्ताशीं संबंध नसून यज्ञकर्माशीं संबंध असल्यामुळें या सप्रवर विवाहालाही अडचण नाहीं.

(३३१) **सापिंड्य मर्यादा पाळा:**—काणे व केळकर यांचीं आडनांवें भिन्न आहेत, पण गोत्र शांडिल्य एकच आहे. दोघांचा गोत्रप्रवर्तक ऋषि एकच असला तरी या दोन्ही घराण्यांमध्यें आतां अनेक पिढ्या होऊन गेल्या आहेत. प्रत्येक घराण्यांत भिन्न गोत्रांतील स्त्रियांनीं येऊन, तसेंच दोन्ही घराण्यांतील मुलांनीं दुसऱ्या घराण्यांत दत्तक जाऊन मूळ ऋषीच्या रक्ताचा प्रभाव इतका कमी केला आहे कीं या दोन्ही घराण्यांतील वधूवरांना विवाहबद्ध होण्यास मुळींच अडचण नाहीं. गोत्र भिन्न असलें म्हणजे भिन्नरक्तत्व असतें, आणि तें एक असलें कीं एकरक्तता येते असें नाहीं. सप्रवर विवाह म्हणजे एकरक्तसंबंध असें जर असेल तर आज तीन प्रवर समान असतांही जे विवाह रूढ आहेत त्याला उत्तर काय? सर्व विवेचनाचा निष्कर्ष थोडक्यांत असा कीं गोत्रप्रवरांचा आणि रक्ताचा संबंध मुळींच नाहीं. एक. रक्ताचा दोष टाळावयाचा असेल तर तो सापिंड्याच्या मर्यादेनें टळतो. म्हणूनच धर्मनिर्णयमंडळानें नव्या हिंदु धर्माला अनुरूप जो निर्णय दिला आहे तो योग्य आहे. त्याचें थोडें विवेचन करून हें प्रकरण संपवितों.

(३३२) **धर्ममंडळाचा निर्णयः**—(अ) सगोत्र व सप्रवर विवाह निषिद्ध मानूं नयेत. मात्र असे विवाह करतांना सापिंड्याचे निर्बंध पाळणें अत्यावश्यक आहे.

(आ) सध्यां अशा विवाहांच्या कायदेशीरपणाबद्दल शंका आहे, ही गोष्ट जनतेनें असे विवाह करतांना लक्षांत ठेवावी. *

* पुण्याच्या सरदार पुरंदरे प्रकरणीं, मुंबई हायकोर्टानें नुकताच दिलेला निकाल, पुरंदरे घराण्यापुरताच नसून, एकंदर दक्षिणी ब्राह्मणांना लागू पडतो. यांत, सगोत्र मुलगी परगोत्रांत दत्तक देऊन नंतर तिच्याशीं विवाह झाला आहे; व मुलीला दत्तक देण्याची वहिवाट custom ही पुराव्यानें सिद्ध झाली आहे. एकंदरींत सगोत्र विवाह, पर्यायानें, कायदेशीर मानण्याकडेच कोर्टाचा कल दिसतो.

(इ) 'पंचमात्सप्तमादूर्ध्वं मातृतः पितृतस्तथा' या वचनांत सांगितलेली सापिंड्यमर्यादा पाळावी.

(ई) मातुलकन्या–परिणय आणि तत्सदृश इतरही विवाह सापिंड्य-मर्यादेचा भंग करणारे असल्यामुळें ज्या जातींत असले विवाह आज रूढ असतील त्या जातींनीं यापुढें ते वर्ज करावेत.

(३३३) सापिंड्यमर्यादाः—सगोत्र व सप्रवर विवाह करतांना आईकडून पांच पिढ्या आणि बापाकडून सात पिढ्यांचे निर्बंध अवश्य पाळावेत. त्यापुढें दोन्ही घराण्यांत विवाह होण्यास हरकत नाहीं. सिव्हिल मॅरेज ॲक्टमध्यें बाप, आजा, पणजा आणि आई, आजी, पणजी अशा तीन पिढ्यांत विवाह होऊं नयेत असें सांगितलें आहे. पैठीनसी स्मृती-मध्यें आईकडील तीन पिढ्या व बापाकडील पांच पिढ्या वर्ज करून 'त्रीनतीत्यमातृतः पञ्चातीत्य च पितृतः।' पुढें विवाह झाले तरी चालतील असें म्हटलें असलें तरी तें वचन अर्वाक्निषेधार्थ म्हणजे कमींत कमी इतक्या पिढ्या पाळल्याच पाहिजेत असें सांगण्याकरितां आहे. तात्पर्य, सापिंड्यमर्यादा पाळणें वंशशास्त्रदृष्ट्या अवश्य आहे. तें न पाळल्यास क्षेत्र–संकोच होऊन संततीवर अनिष्ट परिणाम झाल्याविना राहणार नाहीं.

(३३४) कायदा बदलला पाहिजेः—सगोत्रविवाह अज्ञानतः झाला तर त्याची शुद्धि चांद्रायणानें होते व पुरुष पुन्हां दुसरा विवाह करण्यास मोकळा होतो. पण स्त्री केवळ अन्नोदकाची भागीदारीण होते. पण ज्ञानतः सगोत्र विवाह झाल्यास त्या संततीला यम व व्यासस्मृतीच्या आधारें अधर्म्य समजण्यांत येतें. हा कायदा बदलण्याची चळवळ केली पाहिजे. दत्तक, सती, विवाहवयोमर्यादा, विवाहनोंदणी यांमध्यें कायद्यानें आज जसें परिवर्तन केलेलें आहे, तसेंच सगोत्र व सप्रवर विवाहजन्य संततीच्या कायद्यांतही परिवर्तन करणें भाग आहे. हिंदु कायदा हा रूढीवरच भर देतो. कायद्याचा अर्थ करणारे चतुर भेटले कीं कायदा राहूनसुद्धां भाष्याच्या योगानें तो बदलूं शकतो. हिंदू लॉ हा कोडिफाइड लॉ नसून रूढीला म्हणजे यूसेज आणि कस्टमला महत्त्व देतो. आज अनेक रूढी बदलत आहेत त्याप्रमाणें गोत्रप्रवरांचे मूळचे अर्थ दाखवून ते कोर्टाकडून मान्य करून घेणें हें तज्ज्ञांचें व कायदेपंडितांचें काम आहे.

(३३५) **परिस्थिति व विवाहनिर्बंधः**—हिंदुसमाजांतील विवाहांच्या चालींचें परीक्षण केलें तर असें दिसतें कीं परिस्थितीप्रमाणें मुलें व मुली यांचें सम अगर व्यस्त जसें प्रमाण असेल त्याप्रमाणें या चाली पडलेल्या आहेत. कांहीं जातींत मातुलकन्या—परिणय म्हणजे मामाच्या मुलीशीं लग्न करणें विहित समजतात. कांहीं जातींत आतेबहीण व मामेभाऊ यांचेही विवाह होतात. कांहीं जातींत मामाचें गोत्रही वर्ज करण्याचा प्रघात आहे. पितृगोत्र व मातुलगोत्र वर्ज करून लग्न करणें अतिशय त्रासदायक होतें. दक्षिण महाराष्ट्रांत मामा आणि भाची यांचीं लग्नें होतात. म्हणजे बहीण आपली मुलगी सख्या भावाला देते. नंबुद्रि ब्राह्मणांत फक्त वडील मुलाचाच विवाह होतो व इतरांचे संबंधम् होतात. कांहीं जातींत वैवाहिक संततीला मामाचें आडनांव लागतें. त्यामुळें मातुलगोत्र व मातुल घराणें यांचें वर्चस्व राहातें. या सर्व प्रकारांवरून वैवाहिक चालीरीति परिस्थितिसापेक्ष उत्पन्न झाल्या आहेत असें म्हणतां येतें.

(३३६) **मातुलकन्यापरिणयः**—मातुलकन्या—परिणयाला मयूखकारासारखे निबंधकार अनाचार म्हणतात. सापिंड्याच्या दृष्टीनें हा क्षेत्रसंकोच होतो. अशा विवाहाला प्रायश्चित्त सांगितलें आहे. पूर्वीं दळणवळणाचीं साधनें कमी व इतर सामाजिक अडचणी, त्यामुळें ही चाल पडली होती. पण आतां ती ठेवण्याचें कारण नाहीं. केवळ ही रूढि आहे म्हणून तिचें समर्थनही योग्य नाहीं. अनेक अनिष्ट रूढी ( उदाहरणार्थ शिवाशीव, विधवावपन वगैरे ) जशा आज मोडत आहेत आणि त्या मोडल्या पाहिजेत, असें समाजांतील विचारवंत म्हणतात, तशीच मातुलकन्या—परिणयाची रूढि मोडून सापिंड्यमर्यादा पाळून सगोत्र व सप्रवर विवाह अवश्य करावेत. तसेंच एक देवक, एक बळी यांच्यामुळें एक रक्तसंबंधाच्या कल्पनेवर जे विवाह होत नसतील तेही अवश्य घडवावेत. कारण बळी, बेडगु आणि देवक यांचा आणि एकरक्तत्वाचा संबंध मुळींच नाहीं. तात्पर्य नवा हिंदुधर्म पत्रिका, मुहूर्त, पोटजाति, गोत्रप्रवर इत्यादि विवाहकार्यांत ज्या उगाच अचडणी येऊन बसल्या आहेत, त्यांना न जुमानतां प्रौढ व अनुरूप अशा वधूवरांना सापिंड्यमर्यादा पाळून व इतर जे नियम सांगितले आहेत ते लक्षांत ठेवून विवाह करण्याची अनुज्ञा देतो.

(३३७) **विवाहनोंदणी**:—महाराष्ट्रांतील पुढारलेल्या वर्गांतील तरुण व तरुणी अलीकडे धार्मिक विधि न करतां विवाह नोंदवूं लागलेल्या आहेत. याचीं कारणें (१) स्त्रीस पोटगीशिवाय पतीच्या मिळकतींतील कांहीं भाग मिळतो व पतीचे संयुक्त कुटुंबांतील हक्क वेगळे होतात, (२) घटस्फोट मागतां येतो, आणि (३) द्वितीय पत्नी करितां येत नाहीं, हीं होत. सगोत्र विवाह करण्यास तर नोंदणीशिवाय गत्यंतरच नसतें. विवाह नोंदण्यास मुहूर्त लागत नाहीं, लग्न वाटेल तेव्हां व थोडया वेळांत होतें. खर्च व खटाटोप यांचा तर प्रश्नच नसतो. ही प्रवृत्ति अशीच वाढत गेल्यास आपल्या विवाहसंस्थेचा नाश होईल कीं काय अशी भीति वाटते. कारण विवाह हा धार्मिक संस्कार आहे. तो न झाला तर पुढील संततीलाही धार्मिक संस्कार करण्यास कोणताच अधिकार पोंचत नाहीं. विवाहनोंदणीनंतर कांहीं वधूवरें आईबापांच्या इच्छेस्तव धार्मिक संस्कार करून घेतात! कांहींना तर तो अडगळीसारखा वाटतो! परंपरा राखण्याचे दृष्टीनें नोंदणीनंतर धार्मिक संस्कार केला तरी हरकत नाहीं. विवाहसंस्कार करून नंतर विवाह नोंदला तरीही बिघडत नाहीं. वास्तविक हा नोंदणीचा कायदाच बदलून घेतला पाहिजे. ही जी पौराहित्यवृत्ति सरकारनें बळकाविली आहे, ती पुन्हां हिंदु समाजाला दिली पाहिजे. कारण हा वृत्तीचा प्रश्न आहे. हिंदु समाजांतील विशिष्ट संस्थांना विवाहानंतर तेथेंच तो नोंद करण्याचा अधिकार सरकारकडून मिळवला पाहिजे. पौरोहित्यवृत्तीचा विच्छेद नोंदणीमुळें सरकारनें केला आहे, त्यास प्रतिबंध करावयास नको काय?

ज्या कारणांकरितां विवाहनोंदणी होते तीं वर दिलेलीं तीन कारणें नष्ट करून कायद्यानें सगोत्र विवाहास संमति मिळविली पाहिजे. धर्मनिर्णय मंडळाचा विवाहसंस्कार हा अत्यंत सुटसुटीत, थोडक्या वेळांत, थोडक्या खर्चांत होणारा आहे, तेव्हां त्या सोयीकरितां विवाह नोंदण्याचें मुळींच प्रयोजन नाहीं.

# प्रकरण एकविसावें

## विधवाविवाह *

(३३८) **विधवांचा प्रश्नः**–हिंदु समाजांतील सर्व जातींतील विधवांची विशेषतः वरच्या वर्गातील विधवांची स्थिति फारच शोचनीय आहे. मनुष्याला अन्न, अपत्य व आप्त हे लागतात. पोटाला अन्न पाहिजे, प्रेमाची पांखर घालण्याला अपत्य पाहिजे व अन्तःकरण उघडें करण्याकरितां आप्त पाहिजे. या नियमाला विधवा अपवाद होऊं शकत नाहींत. तरुण विधवांचे नैसर्गिक मनोधर्म प्रबल असल्यामुळें त्यावर जुलमानें वैराग्य लादल्यास त्याचा दुरुपयोग होतो. विधवांनीं विवेकानें व वैराग्यानें वागावें असें कितीही जीव तोडून सांगितलें तरी आजची गृहस्थिति व बाह्यस्थिति विवेक नि वैराग्यपोषक नसल्यामुळें त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. तरुणांचे अकालीं मृत्यु, एकत्र कुटुंबपद्धतीचा अभाव, वाढतें दारिद्र्य, समाजाचें पालटलेलें स्वरूप आणि विधर्मीयांचीं विधवांवर होत असलेलीं आक्रमणें यांमुळें विधवांचा प्रश्न फारच गंभीर झालेला आहे.

शारदा कायदा रूढ झाल्यापासून चौदा वर्षांच्या आंतल्या विधवा यापुढें कमी सांपडतील, म्हणून त्यांचा विचार सोडून देऊं. तथापि पंधरा ते वीस वर्षें वयाच्या विधवा ३९६१७२, वीस ते पंचवीस वर्षें वयाच्या ७४२८२० व पंचवीस ते चाळीस वर्षें वयाच्या हजारों विधवांची भर यांत घातली तर १९२० च्या शिरगणतींतील हा विधवांचा आंकडा फारच भय उत्पन्न करतो.

(३३९) **विधवाविवाह आवश्यकः**–हिंदु समाजांतील पुष्कळ जातींत विधवाविवाह हा गंधर्व, पाट या नांवानें रूढ आहे. कांहीं पुढारलेल्या वर्गांत विधवाविवाह नाहीं. पण त्यामुळें त्यांची स्थिति चांगली असेल अशी कल्पना करणें चुकीचें आहे. पुणें, मुंबई, नागपूर आणि इत-

---

* या विषयावर पं. दप्तरींचा 'धर्मविवादस्वरूप' व पं. काणे यांचा 'धर्मशास्त्रविचार' ग्रंथ पहा.

रत्र जे महिलाश्रम आहेत तेथें जाऊन आश्रयार्थ आलेल्या विधवांचे वृत्तांत वाचले म्हणजे पुढारलेल्या वर्गांमध्यें चाललेल्या भल्याबुऱ्या व्यवहारांचें यथातथ्य ज्ञान होतें. पुढारलेल्या वर्गांतील विधवांची जी ही अनुकंपनीय व अनिष्ट स्थिति आहे ती घालविण्याकरितां विधवाविवाहाची आवश्यकता फारच भासते.

(३४०) **वेदांतील आधारः**-प्राचीन कालीं विधवाविवाह रूढ होता कीं नाहीं हें नीटसें समजत नाहीं. ( ऋग्वेद १०, ४०, २ ) 'को वां शयुत्रा विधवेव देवरम्' या वचनांत विधवेचा दिराशीं संबंध दर्शविला आहे. पण या वचनांत नियोगच उद्दिष्ट असला पाहिजे असें दिसतें. विधवा-विवाहासंबंधीं तैत्तिरीय ब्राह्मणांतील ( ३४, ४, १ ) 'दिधिषूपति' या शब्दांत एक गमक सांपडतें. याचा अर्थ पुन्हां लग्न केलेल्या स्त्रीचा पति असा आहे. ( पुनर्भूर्दिधिषूरूढा द्विस्तस्यां दिधिषूः पतिः ) एक पत्नी मृत झाल्यास दुसरी करावी, यासंबंधाचीं वचनें मनु. अ. ५ श्लो. १६८ व इतरत्रही पुष्कळ आहेत. पण एक पति मृत झाल्यावर अवश्य तर तिनें दुसरा पति करावा, यासंबंधाचीं वचनें क्वचितच आढळतात.

(३४१) **सूत्रें व नियोगः**-विधवाविवाहाला नाकें मुरडणाऱ्यांनीं पूर्वी एका कालीं समाजांत नियोग रूढ होता हें लक्षांत घ्यावें. नियोगा-संबंधाचीं वचनें जुन्या हिंदुधर्मशास्त्रांत पुष्कळच आहेत. त्याचें बीज पुत्राच्या विशिष्ट धार्मिक महत्त्वामध्यें आहे. इहपर-लोकजयार्थ पुत्र पाहिजे; पुत्राशिवाय गति नाहीं, अशा कल्पनेमुळें पुत्राचे द्वादश प्रकार पूर्वकालीं मानले गेले. निपुत्रिक विधवेनें आपल्या कुलांतीलच पुरुषा-पासून पुत्र उत्पन्न करून घ्यावा, असें मत गौतम, बौधायन, वसिष्ठ, मनु इत्यादींचें आहे. त्याचा सारांश असा—

"पत्नी ही पतीची बायको नसून ती कुलाची बायको होते, म्हणून तिनें वडील दिराशीं समागम करून पतीचें नांव चालविण्याकरितां पुत्रोत्पादन करून घेण्यांत दोष नाहीं. विधवेनें वडील दिरापासून, तो नसेल तर सपिंड, सगोत्र किंवा ऋषि यांपासून पुत्र संपादन करून घ्यावा. नियोगजन्य संतति ही विधवेच्या पतीचीच होते." बौधायन असें म्हणतो कीं "एखाद्या स्त्रीचा

नवरा पांच वर्षेपर्यंत जर बेपत्ता झाला असेल तर तिनें आपल्या कुलांतील पुरुषाशीं संभोग करावा. ”

आपस्तंब सूत्रकार मात्र नियोगाचा कडकडून निषेध करतो. “ पत्नी जर पतीच्या पश्चात् अशी बेइमान होईल तर त्यापासून दोघांना नरक-प्राप्ति होते. पूर्वींच्या लोकांनीं आपल्या प्रभावामुळें जरी धर्मविरुद्ध गोष्टी केल्या असल्या तरी इतरांनीं त्यांचें अनुकरण केल्यास त्यांत मोठा अधः-पात आहे, ” असेंही तो म्हणतो.

मनूनें पूर्वकालीन नियोगाची चाल सांगितली आहे. “ विधवेनें सपिंड अगर दीर यांपासून फक्त एकच पुत्र उत्पन्न करून घ्यावा. नियोग-विधि संपल्यावर उभयतांनीं गुरु व स्नुषा या नात्यानें वागावें. वेन राजापासून वर्णसंकरकालीं उत्पन्न झालेला नियोगविधि एकंदरींत निंद्यच होय, ” असें मत शेवटीं मनूनें दिलें आहे.

अपुत्रां गुर्वनुज्ञातो देवरः पुत्रकाम्यया ।
सपिण्डो वा सगोत्रो वा घृताभ्यक्त ऋतावियात् ॥६८॥
आगर्भसंभवाद्गच्छेत्पतितस्त्वन्यथा भवेत् ।
अनेन विधिना जातः क्षेत्रजोऽस्य भवेत्सुतः ॥६९॥

—याज्ञवल्क्य अ. १

“ वडिलांचे आज्ञेनें पुत्रेच्छेनें विधवेनें दिराशीं किंवा सपिंड, सगोत्र पुरुषाशीं नियोग करावा. त्याकरितां तिनें शुचिर्भूत व व्रतस्थ असावें. गरोदर होईपर्यंत नियोग करावा. अशा पद्धतीनें उत्पन्न झालेला पुत्र हा क्षेत्रज सम-जावा, ” असें याज्ञवल्क्यानें म्हटलें आहे. आज आपल्या पुत्रविषयक कल्पना व परलोकसंबद्ध कल्पना पालटल्या आहेत. म्हणून नियोगसंस्थेविषयीं आपल्याला तिरस्कार वाटतो. पण प्रजननाची नैसर्गिक इच्छा व रतिसुख य वृत्ति दुर्दमनीय आहेत, हें ध्यानीं घेऊन पुनर्विवाहाला नाकें न मुरडतां प्राप्त परिस्थितींत सर्व दृष्टीनें अवश्य म्हणून त्याला मान्यता देणें हेंच श्रेयस्कर आहे.

**(३४२) वादवचन:**—विधवाविवाहासंबंधींच्या वादांत पुढील श्रुति-वचन आधार समजण्यांत येत असे—

एकस्मिन् यूपे द्वे रशने परिव्ययति तस्मादेको द्वे भार्ये विन्दते ।
तस्मादेकस्य बह्व्यो जाया भवन्ति नैकस्या बह्वः सहपतयः ॥
यन्नैकां रशनां द्वयोर्यूपयोः परिव्ययति तस्मान्नैका द्वौ पती विन्देत ॥ '

एका यूपाला दोन दोऱ्या गुंडाळतात म्हणून एक पुरुष दोन बायका करूं शकतो. अर्थात् पुरुषाला अनेक स्त्रिया करतां येतात; परंतु एक स्त्री बहु पति करूं शकत नाहीं.

ज्या अर्थी एक दोरी दोन यूपांना गुंडाळीत नाहींत त्या अर्थी एका स्त्रीला दोन पती करतां येत नाहींत.

वरील वचनामध्यें उलटसुलट पद्धतीनें पुरुषाला अनेक स्त्रिया करतां येतात व स्त्रियांना अनेक नवरे करतां येत नाहींत हें दाखविलें आहे. श्रुतिवचनें न मिळालीं आणि स्मृतिकारही विधवाविवाहाविरुद्ध असले तथापि सर्व दृष्टीनें विचार केल्यास आजच्या परिस्थितींत विधवाविवाहाला मान्यता अवश्य दिली पाहिजे, असें नवा हिंदुधर्म सांगतो.

**(३४३) अनुकूल आधारः**—विधवाविवाहाला पुष्कळ स्मृतिकार विरुद्ध असले तरी वसिष्ठ, बौधायन, पराशर व नारद हे स्मृतिकार अनुकूल आहेत. हे स्मृतिकार चारच जरी असले तथापि त्यांचें प्रामाण्य प्रबल आहे हें ध्यानांत ठेवावें.

पाणिग्राहे मृते बाला केवलं मंत्रसंस्कृता ।
सा चेदक्षतयोनिः स्यात्पुनः संस्कारमर्हति ॥६६॥ —वसिष्ठ अ.५

**भावार्थः**—मंत्रसंस्कार झाल्यावर जर पति मृत्यु पावला तर त्या अक्षतयोनि विधवेचा पुन्हां विवाहसंस्कार करावा. याच वचनाला पोषक असें बौधायनाचें वचन आहेः—

निसृष्टायां हुते वाऽपि यस्यै भर्ता म्रियेत सः ।
सा चेदक्षतयोनिः स्याद्गतप्रत्यागता सती ॥१७॥
पौनर्भवेन विधिना पुनः संस्कारमर्हति ॥१८॥ —प्र. ४ अ. १

ब्रह्मपुराणांतही याचा अनुवाद आहे. त्यावरून सप्तपदी होतांच जर नवरा वारला तर पुन्हां विवाहसंस्कार करण्यास वसिष्ठ, बौधायनादींची मान्यता आहे.

नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ ।
पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥३०॥ –पराशर अ.४

हें पराशरवचन तर चांगलेंच गाजलेलें आहे. या वचनानें धर्म-निबंधकारांची मोठी तारंबळ उडविली आहे. 'पतिते पतौ' 'पतितेऽपतौ' इत्यादि निरनिराळीं पदें पाडून पति म्हणजे नवरा, पति म्हणजे पालनकर्ता, पति म्हणजे आश्रयदाता असे अर्थ अनेक निबंधकारांनीं दिलेले आहेत. पतौ हें रूप शुद्ध कां पत्यौ हें रूप शुद्ध अशी व्याकरणाच्या रूपांवरून लग्नें ठरविण्याची मल्लीनाथी सुरू झाली. पति नष्ट झाला, मेला, त्यानें संन्यास घेतला, त्याला षंढत्व आलें, त्यानें धर्मांतर केलें, तर अशा पांच प्रसंगीं स्त्रीनें दुसरा पति करावा असा सरळ या श्लोकाचा अर्थ आहे. परंतु विधवाविवाहाला प्रतिकूल असणाऱ्या निबंधकारांनीं या वचनाची फारच ओढाताण केली आहे.

ज्या वचनांची ओढाताण निबंधकारांना मुळींच करतां येणें शक्य नव्हतें, अशीं जोरदार वचनें नारदस्मृतींत पुढीलप्रमाणें आहेतः—

अष्टौ वर्षाण्युदीक्षेत ब्राह्मणी प्रोषितं पतिम् ।
अप्रसूता तु चत्वारि परतोऽन्यं समाश्रयेत् ॥९८॥
क्षत्रिया षट्समास्तिष्ठेत् अप्रसूता समात्रयम् ।
वैश्या प्रसूता चत्वारि द्वे वर्षे त्वितरा वसेत् ॥९९॥
न शूद्रायाः स्मृतः काल एष प्रोषित योषिताम् ।
जीवति श्रूयमाणे तु स्यादेव द्विगुणो विधिः ॥१००॥
प्रजाप्रवृत्तौ भूतानां दृष्टिरेषा प्रजापतेः ।
अतोऽन्यगमने स्त्रीणामेष दोषो न विद्यते ॥१०१॥ –नारद अ.१२.

भावार्थः—जिला अपत्य असेल अशा ब्राह्मणीनें पति परागंदा झाला असेल तर पतीची आठ वर्षें वाट पाहून दुसरा पति करावा. पण जिला अपत्य नसेल अशा स्त्रीनें चारच वर्षें वाट पाहून दुसरा पतिं करावा. प्रसूता क्षत्रिय स्त्रीनें परागंदा पतीची सहा वर्षें वाट पहावी व अपत्य नसल्यास तीन वर्षें वाट पाहून दुसरा पति करावा. वैश्य स्त्रीनें अपत्य असल्यास चार वर्षें व अपत्य नसल्यास दोन वर्षें वाट पाहून पुन्हां

विवाहबद्ध व्हावें. ज्यांचे पती दूर गेले आहेत, अशा शूद्र स्त्रियांना कालाचें बंधन नाहीं. तथापि नवरा जिवंत आहे, असें जर कळेल तर सर्व वर्णांच्या स्त्रियांनीं वर निर्दिष्ट केलेल्या कालापेक्षां दुप्पट कालापर्यंत पतीची वाट पहावी. प्रजेची प्रवृत्ति व्हावी म्हणून भूतमात्राचे ठिकाणीं ही सृजनाची इच्छा आहे. म्हणून विधवांनीं अन्य पति केल्यास दोष नाहीं.

नारदाच्या वरील स्पष्ट विधायक वचनामुळें निबंधकार भांबावून गेले असल्यास नवल नाहीं. त्यांनीं ' अन्यं समाश्रयेत् ' या पदाचा अर्थ दुसऱ्याचें साह्य घेऊन पति शोधून काढावा, येथपर्यंत केलेलें आहे.

धर्मशास्त्रापेक्षां व्यवहारांत अर्थशास्त्राला मान अधिक आहे. कारण तें शास्त्र व्यवहारसंबद्ध आहे. म्हणून कौटिलीय अर्थशास्त्रांतील यासंबंधाचीं एकदोन वचनें देतों:—

' दीर्घप्रवासिनः प्रव्रजितस्य प्रेतस्य वा भार्या सप्त तीर्थान्याकांक्षेत । संवत्सरं प्रजाता । ततः पतिसोदर्यं गच्छेत् । बहुषु प्रत्यासन्नं धार्मिकं भर्मसमर्थं वा कनिष्ठमभार्यं वा । तद्भावेप्यथ सोदर्यं सपिण्डं तुल्यं वा । '

दीर्घकाळ प्रवास करणाऱ्या, संन्यास घेतलेल्या किंवा मरण पावलेल्याच्या स्त्रीनें सामान्यतः सात महिने वाट पहावी. तिला जर पुत्र झालेला असेल तर तिनें वर्षभर थांबावें. नंतर पतीच्या भावाशीं लग्न करावें. त्याचे पुष्कळ भाऊ असतील तर त्यांत जो धर्मिष्ठ असेल त्याकडे जावें किंवा जो भरणसमर्थ असेल किंवा विवाह न झालेला कनिष्ठ असेल त्याकडे जावें. दीर मुळीं नसेलच तर दुसरा कोणी दिरासारखा सपिण्ड असेल तर त्याचा आश्रय करावा. कौटिल्यानें पुनर्विवाहाची येथपर्यंत मर्यादा नेली आहे. इतकेंच नव्हे, तर कांहीं प्रसंगीं स्त्रीनें पतीचा त्याग करूनही पुनर्विवाह करण्यास हरकत नाहीं असें म्हटलें आहे. ' नीचत्वं परदेशं वा प्रस्थितो राजकिल्बिषी । प्राणाभिहन्ता पतितस्त्याज्यः । ' ( ३, २ ) असेंही तो म्हणतो. पति नीच झाला, परदेशीं राहावयास गेला, राजाचा अपराधी झाला, खून करणारा झाला, किंवा त्यानें कांहीं महापातक केलें, तर स्त्रीनें त्याचा त्याग करावा.

अर्थशास्त्रकर्ता हा ध्येयवादी स्मृतिकार नव्हता, तर समाजांत स्वास्थ्य नांदावें म्हणून व्यवस्था लावणारा, प्रत्यक्ष राज्यकारभारांत भाग घेणारा व सत्तेनें समाजाचें नियंत्रण करणारा व्यवहारज्ञ होता, एवढें लक्षांत ठेवलें म्हणजे त्याचें म्हणणें नीट समजेल.

**(३४४) धर्ममंडळाचा निर्णयः**–वसिष्ठ, बौधायन, पराशर व नारद या स्मृतिकारांच्या वरील वचनाधारें महाराष्ट्रांतील नव्या हिंदुधर्माचा पुरस्कार करणाऱ्या परिवर्तनवादी पंडितांनीं पुढीलप्रमाणें निर्णय दिला आहेः—

"स्त्रीपुनर्विवाहास कांहीं स्मृतिकारांचीं वचनें प्रतिकूल असलीं तरी नारद, वसिष्ठ, पराशरादि कांहीं स्मृतिकारांचीं वचनें अनुकूलही आहेत. म्हणून स्त्रीपुनर्विवाह मान्य करावा, मात्र विधवेचा पुनर्विवाह विधुराशींच व्हावा."

हा निर्णय ज्या विधवेला आपला तोल संभाळून समाजांत वावरणें शक्य आहे असें वाटेल, व जी संतति, संपत्ति, आप्त व ऋणानुबंध यांच्या योगानें दुसऱ्या कुळाशीं पूर्ण तादात्म्य पावली असेल तिजकरतां नाहीं. ज्या अभागी विधवेला ना संतति ! ना संपत्ति ! ना आप्त ! अशा तापत्रयांत जी बिचारी सांपडली असेल, अशा विधवेकरतांच हा निर्णय आहे. हिंदु समाजांतील ज्या जातींत आज विधवाविवाह नाहीं त्या जातींत तो रूढ होणें आवश्यक आहे. पिता आपल्या कुमारिकेच्या प्रथम विवाहाचा विचार जितक्या काळजीनें करतो, तसाच त्यानें आपल्या विधवा मुलीच्या अथवा सुनेच्या पुनर्विवाहाचा विचार आस्थेनें व उघडपणें केला पाहिजे. असा विवाह करण्यांत कोणताही गौणपणा नाहीं. अशा संततीला कोणताही पातित्यदोष नाहीं, असें समाजाला वाटलें पाहिजे.

**(३४५) विधुरविधवा-विवाहः**–विधवांचे विवाह विधुराशींच व्हावेत, हें सर्व दृष्टीनें इष्ट आहे. हे विवाह शक्य तों सांस्कृतिक दृष्ट्या ज्यामध्यें समता आहे अशा विधुरांशीं व्हावेत. तरुणांचीं लग्नें कुमारिकांशीं होणें हें जसें इष्ट, तसेंच विधुरांचीं लग्नेंही विधवांशीं होणें इष्ट आहे. विधुरांनीं द्वितीय संबंधामुळें जर कांहीं कुमारिका अडविल्या तर प्रथमवरांना मुली मिळण्यास अडचण पडेल. याच्या उलट जर तरुणांनीं

विधवांशीं लग्नें लावलीं तर तरुण कुमारिकांना विधुरांशीं लग्नें लावण्याचा प्रसंग येईल. या दोन्ही अनिष्ट गोष्टी टाळून तारतम्यानें विधवाविवाह केले पाहिजेत. सुप्रजावृद्धि, कामतृप्ति व समाजस्वास्थ्य हें जें विवाह-संस्थेचें ध्येय त्यापासून च्युत होतां कामा नये.

**(३४६) पुनर्विवाहितांची संतति**:—पुनर्विवाहितांच्या संततीला गौण समजणें चुकीचें आहे. जुने धर्मशास्त्रकार हे पतिताबद्दल तर उदार आहेतच पण पतितसंततीबद्दल फारच उदार आहेत. बौधायन, आपस्तंबादि धर्मसूत्रकार म्हणतात कीं कोणत्याही कारणानें पतित समजलेल्या स्त्रीपुरुषांच्या संततीच्या प्रत्येक पिढीस दोष न वाढतां तो कमी होत जातो. विशेषतः पतितांच्या मुलींना मुळींच दोष नाहीं व मुलांना असला तर तो फार अल्प आहे. जुन्या धर्मशास्त्रकारांचें हें धोरण लक्षांत घेतलें तर पुनर्विवाहित जोडपें हें मुळीं पतित ठरतच नाहीं, आणि त्याची संतति कोणत्याही दृष्टीनें गौण नसल्यामुळें त्या संततीशीं इतरांनीं विवाह करण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं.

**(३४७) विधुरांची दैना**:—पुनर्विवाह सशास्त्र असला व पुष्कळ जातींमध्यें आज तो रूढ असला तरी त्याला थोडें गौणच समजतात. तो गौणपणा घालविण्याचा मार्ग म्हणजे बुद्धिवादानें या विषयाचें महत्त्व पटविणें हाच होय. खेडोपाडीं पुढारलेल्या वर्गांत पुनर्विवाहित जोडपीं दिसूं लागलीं म्हणजे हें गौणत्व नष्ट होईल. विधवाविवाह हा इच्छेवर आहे. जी विधवा वयानें पस्तीसच्या आंतील असून अपत्य व अर्थविहीन आहे, तिनें अवश्य विवाह करावा. एखादी मुलगी असली तरी तिच्या शिक्षणाची व्यवस्था करून व इतरही काळजी घेऊन विधवेनें विवाहबद्ध व्हावें. विधवेला जितकी विवाहाची गरज असते त्यापेक्षां विधुर पुरुषाला ती अधिक असते. तो संसार मांडून बसलेला असतो. पत्नी मृत झाल्यामुळें त्याला संसार चालविण्यास व मुलेंबाळें संभाळण्यास कोणीतरी हक्काचें मनुष्य हवें असतें. नवरा मेल्यावर बायको उघडी पडते असें म्हणतात. पण खरी स्थिति बायको मेल्यावर नवराच उघडा पडतो! तो अन्नाला महाग होतो व त्याचे हाल कुत्रा खात नाहीं. मध्यम वर्गांतील विधुरांना प्रपंच व घर संभाळणारी विधवा लाभत नाहीं. विधवांना केवळ पोटावारी ही एवढी

उसाभर करणें नको असतें. दुर्दैवी विधवांचें म्हणणें असें पडतें कीं पुन्हां प्रपंचांत जर पडावयाचें तर सर्व दृष्टीनें अधिक सुख लाभेल असें स्थळ पहावें. विधवांनीं सुस्थळ मिळविण्याचा अवश्य यत्न करावा. पण सर्व परिस्थिति ध्यानीं घेऊन कांहीं कालानंतर त्वरित विवाहबद्ध होणें हाच उत्तम मार्ग आहे. योगक्षेमाची व्यवस्था असली म्हणजे विधवा मुलांचें संगोपन चांगल्या तऱ्हेनें करतात. पण विधुर मनुष्य संपन्न असला तरी त्याला तें जमत नाहीं. अशा विधुरानें विवाह कर्तव्य असेल तर पहिल्या मुलांची व्यवस्था सर्व दृष्टीनें चांगली करावी व नव्या संबंधापासून एकदोनच अपत्यें होतील अशीही काळजी घ्यावी, तरच तो विवाह सुखद होईल.

**(३४८) पोटजातींत विवाह करा:**–समाजांत विवाह होऊन मूलबाळ न होतां ज्याची पत्नी वारते व मूलबाळ न होतां एक वर्षांतच जिचा पति वारतो असे स्त्रीपुरुष पुष्कळ आढळतात. अशांनीं विशेषतः विधवांनीं अधिक धीट होऊन न लाजतां व संकोच न करतां आपले विवाह जमविले पाहिजेत. पुढारलेल्या वर्गांत विधवाविवाह अधिक रूढ व्हावेत म्हणून ते आपल्यांतील कोणत्याही पोटजातींमध्यें करावेत. पोटजातींचा उच्छेद झालाच पाहिजे. निदान विधुरविधवा–विवाहामध्यें तरी पोटजाति मुळींच पाळू नयेत. त्यामुळें स्थलसंकोचाची ही अडचण राहणार नाहीं.

**(३४९) सहानुभूतीनें वागा:**–गांवोगांवीं ज्या अपत्य व द्रव्यविहीन विधवा आहेत, त्यांनीं निःसंकोचपणें विधवा–दुःख–निवारक मंडळें स्थापून एकत्र जमणें, बोलणें, बसणें, विधवांच्या अडचणींचा विचार करणें, विधवाविवाहास उत्तेजन देणें, विधवेनें विवाह केल्यास तिला नांवें न ठेवणें, तिच्याशीं सहानुभूतीनें वागणें, अशीं कार्यें करावींत.

**(३५०) सकेशा विधवा:**–हिंदुसमाजांतील कांहीं जातींत वपन न केलेल्या विधवांना अशुचि मानतात. त्यांच्या हातचें स्वैपाकपाणी चालत नाहीं. नैवेद्य, वैश्वदेव, श्राद्ध या धर्मकृत्यांत आणि लग्नमुंज इत्यादि मंगलकार्यांतही त्यांना अनधिकारी, अशुभ, अपवित्र व हीन समजण्यांत येतें, तें चुकीचें आहे.

**(३५१) सकेशा विधवा व देवदर्शन:**–वपनाची रूढि असली तरी तें बौद्ध संस्कृतीचें अनुकरण आहे, तिला श्रुति–स्मृतींचा आधार

नाहीं; फार तर उलटसुलट स्मृतिवचनांवरून वपनाचा विकल्प सिद्ध होतो, असें प्रस्तुत ग्रंथकार गेलीं कित्येक वर्षे सांगत आहे. कांहीं दिवसांपूर्वी पंढरपूर येथील सबजज्ज कोर्टांत एका ब्राह्मण सकेशा विधवेनें इतर स्पृश्य-हिंदूंप्रमाणें पंढरपूर येथील विठोबाचे देवालयाचे गाभाऱ्यांत प्रवेश करून पादस्पर्शपूर्वक दर्शन घेण्याचा आपला हक्क आहे, म्हणून समस्त बडवे लोकांना या कृत्यास हरकत न करण्याची निरंतरची ताकीद मिळावी, असा दावा आणला होता. या दाव्यांत रूढी, धर्मशास्त्र व धर्मभावना अशा सर्व दृष्टीनें विचार करण्यांत आला व कोर्टानें विधवांच्या बाजूनें निकाल दिला. कोर्टापुढें विधवावपनाला पोषक असे जे ऋग्वेद (१०, ४०, २), अथर्ववेद (१४, २, ६०) इत्यादि ग्रंथांतील आधार दाखविले गेले, त्यांची छाननी करून ते प्रस्तुत विषयाशीं लागू नाहींत, असें सिद्ध झालें. मनु, याज्ञवल्क्यादि स्मृतींमध्यें वपनसमर्थनपर वचन नाहीं. फक्त वेदव्यासस्मृतींत पुढील वचन आढळतें.—

(३५२) एक आधारः—

मृतं भर्तारमादाय ब्राह्मणीवह्निमाविशेत् ।
जीवन्ती चेत् त्यक्तकेशा तपसा शोधयेत् वपुः ।।५३।।

—व्यास अ. ३

या श्लोकामागील विषय पति परगांवीं गेला असतां स्त्रीनें कसें वागावें, असा आहे. येथें पहिल्या ओळींत सती जाण्याचा उपदेश आहे व दुसऱ्या ओळींत 'तपसा शोधयेत वपुः' हा मुख्य विधि सांगितला आहे. 'त्यक्त-केशा' हें 'जीवन्ती'चें विशेषण आहे. त्यक्तकेशा म्हणजे केशसंस्कारवर्जिता असा अर्थ करणें योग्य आहे व त्याला हारितस्मृतींतील आधार आहे.—

गर्भिणी नानुगन्तव्या मृतं भर्तारमव्ययम् ।
ब्रह्मचर्यव्रतं कुर्याद्यावज्जीवमतन्द्रिता ।।२०५।।
केशरंजनतांबूलगंधपुष्पादिसेवनम् ।
भूषणं रंगवस्त्रं च कांस्यपात्रेषु भोजनम् ।।२०६।।
द्विवारभोजनं चाक्ष्णोरंजनं वर्जयेत्सदा ।
स्नात्वा शुक्लाम्बरधरा जितक्रोधा जितेंद्रिया ।।२०७।।

सुनिर्मला शुभाचारा नित्यं संपूजयेद्धरिम् ॥२०८॥
क्षितिशायी भवेद्रात्रौ शुचौ देशे कुशोत्तरे ।
ध्यानयोगपरा नित्यं सतां संगे व्यवस्थिता ॥२०९॥ –हारितस्मृति

भावार्थः–गरोदर स्त्रीनें मृत भर्त्याशीं सहगमन करूं नये. केशरंजन, तांबूलभक्षण, पुष्पादिसेवन, नेत्ररंजन इत्यादि वर्ज करून शुभ्र वस्त्र परिधान करून काशाच्या भांड्यांत दोन वेळां जेवून सुनिर्मल, जितक्रोध, जितेंद्रिय अशा तऱ्हेनें श्रीहरीचें ध्यान करीत राहावें; भुईवर निजावें व सज्जनांचा सहवास करावा.

(३५३) **विधवा याच पतीच्या प्रतिनिधिः**–पतीच्या पश्चात् कुलधर्म, परंपरा, धार्मिक आणि सामाजिक कृत्यें पार पाडणें हें विधवेचें कर्तव्य आहे. पति विद्यमान असतांना तिला धार्मिक, सामाजिक, आर्थिक क्षेत्रांत पतीशीं सहकार्य करावें लागतें. क्वचित् पति परगांवीं गेला तर सर्वच कार्यभार पत्नीवर पडतो. पतीच्या निधनानंतर, त्याचें स्थान योग्य तऱ्हेनें घेण्यास पुत्र नसेल तर पत्नीनें आपल्या घराण्यासंबंधाचीं सर्व धर्मकृत्यें प्रतिनिधि म्हणून अवश्य करावींत. सकेशा विधवेनें त्या बाबतींत स्वतःस अनधिकारी, अशुभ मुळींच समजूं नये, आणि समाजानेंही विधवांना अशुभ न समजतां मानानें वागवावें. वरील हारितवचन वपन-विरोधक आहे. यास्तव शुद्धाचारसंपन्न सकेशा विधवेच्या हातचें पाणी देव-पूजेस व स्वैपाक नैवेद्य–वैश्वदेवास आणि श्राद्धपक्षासही अवश्य चालला पाहिजे. अर्थात् हिंदूंच्या कोणत्याही देवालयांत सकेशा विधवांना इतरांप्रमाणें प्रवेश व पूजा यांचे अधिकार मिळाले पाहिजेत. ध. नि. मं. चा यासंबंधीं निर्णय पुढीलप्रमाणें आहे. —"सकेशा विधवांना विवाहादि मंगलकार्यांत आणि धार्मिक कृत्यांत कोणत्याही प्रकारें अनधिकारी, अशुभ, अपवित्र किंवा हीन समजण्यांत येऊं नये. तीर्थें, क्षेत्रें, मंदिरें, देवालयें अशा सर्व ठिकाणीं त्यांना इतर हिंदु स्त्रियांप्रमाणें सर्व अधिकार असावेत."

(३५४) **विधवा व व्यवसायः**–ज्या सकेशा विधवांना पुन्हां विवाहबद्ध व्हावयाचें नसेल त्यांनीं वपन न करतां, भोंदु गुरूंच्या नादीं न लागतां, पंडे, बडवे यांच्या कचाट्यांत यात्रेच्या निमित्तानें न सांपडतां,

शुद्ध आचरणानें राहून स्वाभिमानानें पोट भरून शक्य तें समाजकार्य करावें. विधवांच्या वृत्तीला साजेसे व्यवसाय त्यांना मिळाले म्हणजे त्या निर्भय वृत्तीनें राहूं लागतील. ज्या शिक्षणसंस्थांमध्यें मातृस्थानांतर्गत कार्याची जबाबदारी आहे, त्यांत ती घेण्यास जर कुलीन विधवा प्रवृत्त होतील तर फारच उपयोग होईल.

**(३५५) विधवांनीं कुंकूं लावावें:**—सकेशा विधवांनीं पातिव्रत्याचें कवच म्हणून कुंकू अवश्य लावावें. कुंकवाचा व सौभाग्याचा कांहीं संबंध नाहीं. विवाहाबरोबर मंगलसूत्र येतें. कुंकू हें भूषण म्हणून कौमारावस्थेंतच लावण्यांत येतें. कुंकू याचा मूळ अर्थ केशर असा आहे. विवाह होतांच पूर्वी केशराचा टिळा लावण्याची पद्धत असावी. विधवांना आगगाड्या, आगबोटी, मोटारी वगैरेंतून प्रवास करतांना कपाळावर जर कुंकू नसेल तर फारच त्रास होतो. याचें कारण पुरुषांचा नैतिक ऱ्हास हें होय! पुरुषांची सकेशा ( कुंकूविहीन ) विधवांकडे पाहाण्याची दृष्टि सापवाद पापीच असते. कपाळावर कुंकू दिसलें कीं पाहणारा जरा मनांत जिरतो! पण कुंकू नसलेलें पांढरें फटफटीत कपाळ दिसलें कीं खटरपट्टी करणारा कोणी नाहीं अशा समजुतीनें निरखून पाहाण्याची वृत्ति वाढते!! पुरुषांच्या खालावलेल्या नीतीला सकेशा विधवांनीं कुंकू लावणें हें चोख उत्तर आहे. सुवासिनी व विधवा यांतील भेद मंगलसूत्रावरून अवश्य तेव्हां समजूं शकतो, म्हणून अनवस्थेचा प्रसंग येणार नाहीं. शिवाय सर्वांना प्रत्येक स्त्री ही विधवा, कां कुमारी, कां सुवासिनी हें समजलेंच पाहिजे असें नाहीं.

—*—

# प्रकरण बाविसावें

## घटस्फोट

**(३५६) घटस्फोटाची** आवश्यकताः–हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें लग्न हें अविच्छेद्य आहे. कारण 'धर्मे च अर्थे च कामे च नातिचरामि' अशी शपथ घेऊन वधूवरें विवाहबद्ध होतात. असा हा विवाह आजन्म व अखंड कायम राहातो. त्यांतून मुक्त होणें निदान स्त्रीला तरी कधींच शक्य नाहीं असा समज आहे. पण आजच्या परिस्थितींत हा समज बदलला पाहिजे, कारण लग्नविच्छेदाची आवश्यकता फारच भासत आहे.

**(३५७) प्राचीन आधारः**–विधवापुनर्विवाहाला पुष्कळ स्मृतिकार प्रतिकूल असले तरी वसिष्ठ, पराशर व नारद हे स्मृतिकार अनुकूल दिसतात. तशीं ठसठशीत वचनें विवाहविच्छेदाबद्दल सांपडत नसलीं तरी एखाद्या माणसाचा संबंध तोडण्याचा विधि जुन्या धर्मशास्त्रांत आहे. किंबहुना घटस्फोट हा शब्द अनिष्ट माणसाचा संबंध तोडण्याकरितांच आहे. त्यांत परस्परदंपतीचाही समावेश करण्यास हरकत नाहीं. हिंदुसमाज हा फार जुनाट, फार प्राचीन समाज असल्यामुळें घटस्फोटाची संस्था केव्हां तरी असली पाहिजे असें दिसतें. वसिष्ठधर्मसूत्रांत पुढीलप्रमाणें आधार मिळतो.—

**या कौमारं भर्तारमुत्सृज्यान्यैः सह चरित्वा तस्यैव कुटुंबमाश्रयति सा पुनर्भूर्भवति ॥२०॥ या च क्लीबं पतितमुन्मत्तं वा भर्तारमुत्सृज्यान्यं पतिं विन्दते मृते वा सा पुनर्भूर्भवति ॥२१॥**

—वसिष्ठ अ. १७

**भावार्थः**–जी कौमार–अवस्थेंतील नवऱ्याला टाकून, दुसऱ्या पुरुषाच्या सहवासांत राहून त्याच्याच कुटुंबाचा आश्रय करते, ती पुनर्भू होय. तसेंच जी क्लीब, पतित, उन्मत्त अशा नवऱ्याला टाकून दुसरा नवरा करते ती पुनर्भू होय.

वरील दोन्ही सूत्रांत ' उत्सृज्य ' या पदावरून स्त्री नवऱ्याला टाकीत होती हें स्पष्ट आहे. त्यावरून त्या काळीं लग्नविच्छेद होता असें दिसतें.

कौटिलीय अर्थशास्त्रांत लग्नविमोक्ष असा शब्द आहे. तो म्हणतो, "अमोक्ष्या भर्तुरकामस्य द्विषती भार्या। भार्यायाश्च भर्ता। परस्परं द्वेषान्मोक्षः।' पत्नीच केवळ पतीचा द्वेष करील तर त्याच्या इच्छेविरुद्ध तिला पतीपासून सोडचिठी मिळूं नये. तशी ती स्त्रीच्या इच्छेविरुद्ध पतीलाही मिळूं नये. एकमेक जर एकमेकांचा द्वेष करतील तर मग त्यांना मोकळीक द्यावी. कौटिल्यानें पुढें धनाच्या बाबतींतही व्यवस्था केली आहे. कौटिलीयकालीं धर्म्यविवाह व काम्यविवाह असे प्रकार होते. म्हणून तो म्हणतो कीं, "लग्नविमोक्ष धर्म्यविवाहाला मान्य नाहीं. राक्षस, पैशाचादि जे विवाह ते अधर्म्य विवाह होत. ब्राह्म, प्राजापत्यादि विवाह हे धर्म्य विवाह होत."

**(३५८) विवाहविच्छेदाच्या चालीः**—आज हिंदुसमाजांतील निरनिराळ्या प्रांतांत आणि विविध जातींमध्यें लग्नविच्छेद आहे. आसाममधील हिंदु शेतकरीवर्गांत नवऱ्यानें जर पुष्कळ दिवस गर्भाधान न करतां स्त्रीला टाकलें तर तिला दुसरा नवरा करतां येतो. संताळ लोकांत नवऱ्याच्या भाऊबंदाची परवानगी असेल तरच स्त्रीला घटस्फोट मिळतो. छोटा नागपूर प्रांत, मलबार, दक्षिण हिंदुस्थान अशा भागांतील कांहीं हिंदु लोकांमध्यें नवऱ्याची संमति नसतांनासुद्धां स्त्रीला घटस्फोट करतां येतो. गोसावी लोकांत घटस्फोटाची चाल आहे. महाराष्ट्रांतील मराठ्यांमध्यें सोडचिठीची व गुजराथ्यांमध्यें 'नत्राची' चाल आहे. कांहीं पुढारलेले वर्ग सोडल्यास हिंदुसमाजांतील सर्व जातींत घटस्फोट आहे असें म्हणावें लागतें.

**(३५९) घटस्फोटाचे प्रकारः**—कायद्याच्या दृष्टीनें विचार केला तर नवराबायकोची संमति असल्यास किंवा दोहोपैकीं एक शीलभ्रष्ट असल्यास रोमन कायद्याप्रमाणें घटस्फोट मिळतो. मुसलमानी कायद्यांत उभयतांची संमती असली तर ठीक; नसल्यास एकट्या नवऱ्याच्या इच्छेनें लग्नविच्छेद होतो! नेपोलियन कोडाप्रमाणें अत्यंत छळ, अश्लाघ्य शिक्षा अशा कारणांनींसुद्धां घटस्फोट मिळतो. स्कॉटलंडच्या कायद्याप्रमाणें

नवऱ्यानें बायकोचा त्याग केला तर घटस्फोट मिळतो. इंग्लिश कायदा व इंडियन् डायव्होर्स ॲक्ट याप्रमाणें बायको शीलभ्रष्ट असेल तर नवऱ्यास घटस्फोट मागण्याचा अधिकार आहे. नवरा शीलभ्रष्ट असेल, निष्ठुर व दुष्ट असेल, त्यानें धर्मांतर केलें असेल तर स्त्रीला घटस्फोट मागतां येतो. हे सर्व कायदे बायकोपेक्षां नवऱ्यासच अधिकार जास्त देतात असें दिसतें.

**(३६०) घटस्फोटाची आवश्यकताः**–आजपर्यंत स्त्रीपुरुषांच्या मनावर धर्माचे, परलोकाचे, विवाहसंस्थेच्या पवित्र बंधनाचे जे संस्कार होते, ते आतां बहुतांशीं नाहींसे झाले आहेत. धर्मबंधनहीन अशा स्थितीमध्यें स्त्रीपुरुष हे दोघांचे स्वभाव व मनोधर्म परस्पर जुळण्याजोगे असतील तरच एकत्र नांदतील. धार्मिक संस्कारामुळें पूर्वी जशी समाजाची घडी बसली होती, तशी ती आज बसणें शक्य नाहीं. आज कामशांति, प्रजोत्पादन, वैय्यक्तिक व कौटुंबिक सौख्य याकरितांच विवाह आहे, अशा समजुतीनेंच स्त्रीपुरुष शक्य तों समाधानानें राहतील. पण स्वभावधर्म भिन्न असल्यास आणि इतर बाबींमध्यें साम्य नसल्यास दोघांच्या आयुष्याची हानि होण्यापेक्षां लग्नविच्छेद होणें चांगलें, हें कोणाही समंजस माणसाला पटेल.

ज्यांना संयमानें, इंद्रियनिग्रहानें, त्यागानें रहावयाचें असेल, अशा स्त्रिया वंदनीयच होत. त्यांची दुसऱ्याकरितां उच्च भावनेनें त्याग करण्याची वृत्ति व त्यामुळें मिळणारें धार्मिक समाधान हीं खरोखर अनुकरणीय होत. पण हें ज्यांना शक्य नाहीं, ज्यांना सांसारिक सुख मिळालेलें नाहीं, ज्यांची सर्व प्रकारें गांजणूक होत आहे, अशा हतभागिनी स्त्रियांकरितां घटस्फोटाची आवश्यकता आहे. अनेक सत्प्रवृत्त अशा स्त्रीपुरुषांचा जो कोंडमारा परस्पर सहवासामुळें होत आहे, तो घटस्फोटामुळें थांबेल. स्त्रियांनीं व्रतस्थ राहावें, ईशचिंतनांत आयुष्य कंठावें, वगैरे म्हणणें पुरुषवर्गाकडून जोंवर त्या प्रकारची वागणूक होत नाहीं, तोंवर निरर्थक आहे. आजची परिस्थितिही या वृत्तीला पोषक नाहीं.

**(३६१) दुर्दैवी महिलांचीं वक्तव्यें:**–हिंदुसंघटनाच्या चळवळीमुळें **अनाथ महिलाश्रम** या संस्था ठिकठिकाणीं सुस्थिर होत आहेत.

त्या संस्थांत आलेल्या स्त्रियांचीं वक्तव्यें पाहिलीं म्हणजे समाजांत काय चाललें आहे व घटस्फोटाची किती तीव्र आवश्यकता आहे, याची कल्पना येते. दारिद्र्यामुळें नवरे बायकोला पोटभर अन्नही घालीत नाहींत, मारहाण करतात व शेवटीं घालवून देतात! लग्न जमवितांना सोयऱ्यांमध्यें देण्याघेण्याचे विषय मोघम ठरलेले असतात. ते व्यवस्थितपणें न संपले कीं, सासरचीं माणसें सुनेला कायमची माहेरीं पाठवितात! कांहीं वांझ स्त्रियांना अपत्याभावीं सवत पत्करावी लागते. तिच्या असह्य जुलमामुळें पुष्कळ स्त्रिया नवऱ्यांना सोडून निघून जातात! शिक्षित नवरेसुद्धां क्रियाविहीन, आळशी, व्यसनी व चैनी असले आणि बायकोचें माहेर संपन्न असलें म्हणजे तिनें पैसा आणावा म्हणून तिला फार छळतात, निर्दयतेनें वागवितात, अंगांतून रक्त फुटेल इतकें जनावराप्रमाणें मारतात! कोणी परस्त्रीच्या नादानें धर्मपत्नीला छळतो तर कोणी ती मांस व अंडीं शिजवून घालीत नाहीं म्हणून तिला बुटानें ठोकरतो!

कांहीं दुर्दैवी अबलांना घरांत नवरा, सासरा, दीर, सासू यांच्यांकडून इतका त्रास होतो कीं तो असह्य होऊन असहाय स्थितींत त्या अहिंदूंच्या आश्रयास जातात! कांहीं नीच पती द्रव्याकरितां आपल्या स्त्रियांना वेश्याव्यवसाय करण्यास भाग पाडतात! कांहींना देण्यानिमित्त पठाणाकडे राहावें लागतें! पतिमरणोत्तर कांहीं विधवांना आप्तेष्टांचा आश्रय घ्यावा लागतो. त्यांना दीर, मामा अगर कोणी तरी भेटतो व त्यांचें सर्वस्व लुबाडतो! विधवा तरुण असल्यास तिला जवळचे नातलगही शीलभ्रष्ट करतात व तिचा गरोदरपणा उघडा झाला कीं तिला हांकलून देतात! कॉलेजांतील उल्लू विद्यार्थी तरुण विद्यार्थिनींशीं असाच अतिप्रसंग करतात, व कुमारिका गरोदर राहिली कीं, हे तरुण माणुसकी सोडून सर्पासारखे उलटतात! कांहीं स्त्रिया भोळेपणानें साधूंच्या नादीं लागून फसतात, तर कांहीं तीर्थयात्रेस गेल्यावर तेथेंही पंड्यांच्या अत्याचारास बळी पडतात!

(३६२) कजाग बायका:—पुरुषांकडून जसा स्त्रियांचा छळ होतो, त्याचप्रमाणें कांहीं कजाग बायकाही नवऱ्यांना कांहीं कमी छळतात असें नाहीं. कांहीं स्त्रिया जहांबाज असतात. त्यांचे नवरे थंड्या स्वभावाचे असले म्हणजे त्या पतीला मरण बरें पण संसार नको असें करून

सोडतात! २०।२५ वर्षें संसार व मुलेंबाळें होऊनसुद्धां स्वभावभेदामुळें उभयतांना सुख होत नाहीं. अशा स्थितींत लग्नविच्छेद योग्य नाहीं काय?

(३६३) **घटस्फोट व समाजस्वास्थ्य:**—घटस्फोटाला मान्यता दिली म्हणजे स्त्रिया अनियंत्रित होतील व समाजांतील स्वास्थ्य नष्ट होईल असें नाहीं. कारण आज हिंदुसमाजांतील पुष्कळ जातींत घटस्फोट रूढ आहे; आणि इतर समाजांतही तो रूढ असतांना समाजांत जें स्वास्थ्य व सुख हवें तें मिळतच आहे. हिंदुसमाजांतील कांहीं वरच्या वर्गांना ही गोष्ट नवीन आहे, पण इतर वर्गांच्या ती पचनीं पडली आहे. मनुष्य-स्वभाव हा जात्या स्थैर्य व स्वास्थ्यप्रिय आहे. वरचेवर धंदे बदलणें, शाळा बदलणें, जागा बदलणें, हें सुद्धां जेथें माणसाला नको असतें, तेथें स्त्रीपुरुष आपापले जोडीदार घटस्फोटामुळें सारखे बदलून घेण्याचा यत्न करतील असें म्हणणें मनुष्यस्वभावाविरुद्ध आहे. अपरिहार्य म्हणून, अपवाद म्हणून, जीवन दुःसह होत असेल तेव्हांच घटस्फोट मागितला जाईल. विधवाविवाहाचा कायदा होऊनही विधवाविवाह वाढलेले नाहींत, तसाच घटस्फोटाचा कायदा होऊनही घटस्फोट वाढणार नाहींत.

(३६४) **नवरेशाहीला आळा:**—आज हिंदुसमाजांतील ज्या वर्गांत घटस्फोट रूढ आहे तेथेंसुद्धां बायकोस सोडचिठी देणें हें आपल्या घराण्यास व लौकिकास कमीपणा आणणारें आहे असें समजलें जातें. 'दुसरा नवरा कर' म्हणून तोंडीं सांगतात. कांहीं जातींत एखाद्यानें पुष्कळ दिवस बायको टाकली म्हणजे जातपंच येतात व विचारतात कीं, 'बायको नांदवून तरी घे नाहीं तर तिला सोडचिठी दे.' रूढीनें, कायद्यानें आणि जातगंगेनें जर असा आग्रह धरला, कीं बायकोला नीट नांदव नाहीं तर सोडचिठी दे, तर त्याचा परिणाम नवऱ्यावरही चांगला होईल. आजपर्यंत कसेंही वागलें तरी खपे, पण यापुढें स्त्री घटस्फोट मागण्यास समर्थ आहे, असें समजलें कीं अगदीं निसुग व निर्लज्ज बनलेले नवरे स्त्रियांना चांगल्या तऱ्हेनें वागविण्यास प्रवृत्त होतील.

पुरुषाकडून स्त्रियांवर होणाऱ्या अन्यायावर घटस्फोट हा एक चांगला तोडगा आहे. आजपर्यंत पति हें दैवत मानून स्त्रियांनीं सर्व सहन केलें, तें

तसेंच त्यांनीं अखंड सहन करावें, अशी ज्यांची इच्छा त्यांच्या नवरेशाहीला आणि जुलमाला प्रतिबंध करणारा उपाय म्हणजे घटस्फोट होय. घटस्फोटामुळें कित्येक अयंत्रित नवरे सुयंत्रित होण्याचा संभव आहे.

स्त्रीशिक्षण वाढत आहे, त्यामुळें स्त्रियांचा स्वाभिमान जागृत होत आहे. जगांतील नव्या नव्या विचारांशीं स्त्रियांचा परिचय होत आहे. त्यामुळें पुरुषवर्गाकडून स्त्रीवर्गावर होणारे अन्याय ( पुरुषांनीं पाहिजे तितक्या बायका कराव्या, त्यांना पाहिजे तसें छळावें; कारण त्या उपभोग्य आहेत इत्यादि ) यापुढें सहन केले जाणार नाहींत.

**(३६५) अडचणींचा परिहारः**–स्त्रिया या आर्थिक दृष्ट्या जर स्वावलंबी नसतील तर या घटस्फोटामुळें त्यांचे फार हाल होतील हें म्हणणें मध्यमवर्गीय स्त्रियांच्या बाबतींत खरें आहे. आज बहुजनसमाजांत जी सोडचिठी रूढ आहे, त्या वर्गांतील स्त्रिया खरोखरीच स्वावलंबी असतात. त्या घरकाम करून शेतकाम करतात, मोलमजुरी करून चारसहा आणे मिळवितात, एखादें जनावर बाळगून त्याच्या दुभत्यावर थोडी कमाई करून संसाराला हातभार लावतात. कामकरी व शेतकरी वर्गांतील स्त्रिया या स्वावलंबनानें जगण्यास समर्थ असतात. परंतु मास्तरीण, नर्स, शिंपीकाम अशा धंद्यांवर पोट भरणाऱ्या स्त्रिया सोडल्या तर मध्यमवर्गांतील इतर स्त्रियांना या घटस्फोटामुळें फारच कष्ट होण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ समजा, एक मध्यमवर्गांतील अपत्यवती घटस्फोट केलेली स्त्री आहे. तिच्याशीं विवाहबद्ध होण्यास प्रौढ वयस्क असा वर क्वचित्‌च तयार होईल. तो जर संपन्न असेल तर तो पंचवीस ते तीस वर्षें वयाच्या प्रौढ कुमारीशीं लग्न करील, किंवा विधवेशीं विवाहसंबद्ध होईल. कारण समाजांत प्रौढ कुमारिका व विधवा यांची संख्या पुष्कळ आहे. आज त्यांच्या विवाहाचाच प्रश्न बिकट होऊन बसलेला आहे; त्यांत जर घटस्फोट केलेल्या स्त्रियांची भर पडेल तर त्या स्त्रियांना ना लग्न, ना पोटगी अशा आपत्तींत पडावें लागेल ! पति दुराचारी, मद्यपी असला व स्त्रीला जर त्याचा सहवास दुःसह असला तर कायद्यानें तिला पोटगी मिळते, या पोटगीवर ती आप्तेष्टांकडे सुखानें राहाते किंवा विद्या शिकून स्वतंत्र धंदाही करूं शकते. पण अशा स्त्रीनें घटस्फोट जर केला तर अनेक अडचणी येण्याचा संभव आहे

हें सर्व संभाव्य असलें तरी घटस्फोटाच्या कायद्यामध्येंच पहिल्या बायकोची पोटगी, पहिल्या संबंधाच्या मुलांचें संरक्षण, शिक्षण व इतर सर्व बाबींची स्पष्टता असली म्हणजे वरील सर्व अडचणींचा परिहार सहजच होणार आहे. घटस्फोटानंतर स्त्रियांचें जीवन अडचणीचें, आपत्तीचें, हालाचें न होईल असा निर्दोष कायदा केला म्हणजे झालें.

**(३६६) धर्ममंडळाचा निर्णयः**—हा सर्व विचार करून धर्म-निर्णयमंडळानें घटस्फोटासंबंधीं पुढील निर्णय दिलेला आहे.

( अ ) हिंदु समाजांतील कांहीं पुढारलेल्या जातींत आज घटस्फोट रूढ नसला तरी त्याची आवश्यकता भासत आहे. हिंदुसमाजांतील पुष्कळ जातींत आज घटस्फोट रूढ आहे. जेथें तो रूढ आहे, तेथें स्त्री आणि पुरुष या दोघांना घटस्फोट मागण्याचा अधिकार असावा.

( आ ) हिंदु समाजांतील ज्या जातींत आज घटस्फोट होऊं शकत नाहीं त्या जातींतील स्त्री–पुरुषांना खालील परिस्थितींत घटस्फोट मिळावा असें या परिषदेचें मत आहेः—

(१) असाध्य नपुंसकत्व, (२) धर्मांतर, (३) कायमचा त्याग, (४) नष्टता, (५) संन्यास, (६) महारोग, (७) कायमचें वेड, (८) असह्य छळ.

( इ ) लग्न झाल्यापासून पंधरा वर्षांनंतर कोणत्याही परिस्थितींत घटस्फोट मिळू नये.

**(३६७) द्विभार्याप्रतिबंधः**–हिंदु समाजांतील पुढारलेल्या वर्गांत आज नोंदणीपद्धतीचे विवाह वाढत आहेत. त्याचें एक कारण पहिली पत्नी जिवंत असतांना दुसरी करतां येऊं नये हें आहे. घटस्फोटाच्या कायद्याप्रमाणेंच व्यभिचार व अनपत्यतादि कारणांशिवाय पूर्वपत्नी जिवंत असतांना द्वितीय भार्या करण्यास प्रतिबंधक असाही निर्बंध असावयास पाहिजे. आज म्हैसूर व बडोदें संस्थानांत घटस्फोटाचा कायदा आहे. तो तेथें चालू झाल्यामुळें समाजस्वास्थ्य बिघडलें आहे असें नाहीं, कांहीं दुर्दैवी माणसांची कुचंबणा यामुळें थांबली आहे इतकेंच !

**(३६८) ही रूढी अवश्य पाडाः**—घटस्फोटाची आवश्यकता सर्व दृष्टीनें भासत असली तरी जोंवर कायदा होत नाहीं तोंवर हें सर्व

अरण्यरुदनच आहे; पण कायदा होण्यास रूढीचें साह्य होतें व तशा समाजाला पाडतां येतात. काडीमोड व सोडचिठी या घटस्फोटाच्या जातींतील रूढीच आहेत. ज्या वर्गांत या रूढी नाहींत त्यांनीं शास्त्रशुद्ध मार्गानें घटस्फोटाच्या नव्या रूढीचा अवलंब करावा.

कुलांगार मुलें, कजाग स्त्रिया, व्यसनासक्त बाप, पतित, भ्रष्ट, दुष्ट, व्यसनी असे सपिंड नातलग अशांच्या हातून होणाऱ्या पापकृत्यांचा संपर्क आपल्या कुलाला पोचूं नये व आपणास निरयगति प्राप्त होऊं नये म्हणून त्यांचा संबंध सर्वस्वी टाळण्याकरितां घटस्फोटविधि सांगितला आहे. विहित धर्मानें न वागणें, निंद्य कर्मांचें सेवन करणें आणि इंद्रियनिग्रहाचा अभाव यामुळें मनुष्याला पातित्य येतें. जो धर्मांतर करतो तोही पतित होय. अशा पतितांचा उद्धार प्रायश्चित्तानें करतां येतो. शास्त्रोक्त प्रायश्चित्त आत्मशुद्धीकरतां न घेणाऱ्याचा त्याग करण्याकरतां घटस्फोटविधि आहे.

विहितस्याननुष्ठानान्निन्दितस्य च सेवनात् ।
अनिग्रहाच्चेन्द्रियाणां नरः पतनमृच्छति ॥२१९॥
तस्मात्तेनेह कर्तव्यं प्रायश्चित्तं विशुद्धये ।
एवमस्यांतरात्मा च लोकश्चैव प्रसीदति ॥२२०॥ —याज्ञवल्क्य.

सरकारनें १८५० सालीं मिशनऱ्यांच्या बाटवेगिरीच्या सोईसाठीं एक कायदा केला. त्यामुळें धर्मांतर केलेल्या अविभक्त कुटुंबांतील माणसाचा वारसा हक्क नष्ट होत नाहीं. परंतु याला शह देण्याचा मार्ग म्हणजे धर्मभ्रष्ट पतिताचा घटस्फोटविधीनें त्याग करणें हा होय. धर्मभ्रष्ट पतिताचा आप्तेष्टांनीं घटस्फोटविधीनें त्याग करावा व तो मेला असें समजून त्याची उत्तरक्रियाही करावी, म्हणजे एकत्र कुटुंबांतील मिळकतीवर त्याचा वारसा-हक्क पोंचणार नाहीं.

परित्यक्ता स्त्रियांनीं पतीची वागणूक लग्नाच्या वेळीं घेतलेल्या शपथेच्या विरुद्ध सतत पांच वर्षें चालू असल्यास अवश्य घटस्फोट करावा. पतित पतीचा त्याग करण्याचा अधिकार पत्नीला आहे. दुष्ट, व्यसनी, पापी अशा पतित पतीचा विधिपूर्वक त्याग केल्यावर नारदवचनाप्रमाणें त्या स्त्रीला दुसरें लग्न करतां येतें. परित्यक्ता स्त्रियांनीं दुसऱ्या योग्य पुरुषाशीं

विवाहबद्ध होण्याची पूर्वसिद्धता करून मग घटस्फोट करावा. पतित पती-कडून सामोपचारानें अथवा दंडनीतीनें मान्यता मिळविल्यास फार उत्तम.

नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ ।
पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥

या नारदवचनांतील पतित हा शब्द महत्त्वाचा आहे. विधवेला दुसरें लग्न करतां येतें. परित्यक्तेनें घटस्फोट केला तरी तिला नवरा मेल्या-सारखा होतो. तो मेलेला नसतो ! तथापि नारदानें पतिताच्या त्यागानंतर अन्य पतीचा स्वीकार करण्याचें विधान केलेलें आहे.

पतितस्योदकं कार्यं सपिण्डैर्बान्धवैर्बहिः ।
निन्दितेऽहनि सायाह्ने ज्ञात्यृत्विग्गुरुसंनिधौ ॥१८२॥
दासी घटमपां पूर्ण पर्यस्येत्प्रेतवत्पदा ।
अहोरात्रमुपासीरन्नशौचं बान्धवैः सह ॥१८३॥–मनु. अ.११

भावार्थः–ज्यांचा संबंध नको असेल, अशा स्त्रीपुरुषांची ते मेले आहेत असें समजून त्यांच्या आप्तेष्टांनीं गांवाबाहेर जाऊन उत्तरक्रिया करावी. एका दासीजवळ एक पाण्यानें भरलेला घट द्यावा. तिनें तें प्रेत आहे असें समजून तो न्यावा व दक्षिणेकडे तोंड करून पायानें लवंडावा. नंतर सपिंड व समानोदक अशा आप्तेष्टांनीं आपल्याला अनिष्ट असा मनुष्य मेला असें समजून त्याचें अशौच पाळावें आणि उत्तरक्रिया करून मोकळें व्हावें.

गौतमधर्मसूत्रामध्यें तृतीय प्रश्नाच्या दुसऱ्या अध्यायांत १ ते ४ पर्यंत हाच विषय सांगितलेला आहे. या शास्त्रोक्त विधीचें (प्रयोगविधी मध्यें योग्य तो फेरफार करून) अवलंबन जर समाजांत होऊं लागेल तर घटस्फोटाला फार लौकर मान्यता मिळेल. घटस्फोट हा स्त्री व पुरुष अशा दोघांना करावयाचा असतो. त्याला परस्परांची मान्यता मिळाल्यावर नवऱ्याकडील व बायकोकडील जी आप्तेष्टमंडळी असतील त्यांच्या संमतीनें व त्यांच्या समक्ष ( ज्ञाति, ऋत्विक्, गुरु ) हा विधि उरकावा. काडीमोड किंवा सोडचिठी यानें जें कार्य होतें तें या विधीनें होईल असें वाटतें. वास्तव कायदा होईपर्यंत, कायदा व्हावा म्हणून किंवा कायदा करणें भाग पडावें म्हणून या विधीचा जोरानें प्रचार करावा.

## प्रकरण तेविसावें

## एकपत्नीत्व व स्त्रियांचे अधिकार

(३६९) **बहुपत्नीत्वाची चाल:**—पुरुषानें एकपत्नीव्रत पाळणें आणि स्त्रीनें पतिव्रताधर्मानें राहाणें या दोन्ही गोष्टी परस्परसापेक्ष, परस्परसंबद्ध असून त्या समाजस्वास्थ्याकरितां आवश्यक आहेत. निसर्गतः पुरुष हा समर्थ आहे, त्यामुळेंच पुरुषांनीं अनेक स्त्रिया करणें व स्त्रियांनीं एकच पति करून राहाणें असा आचार रूढ झाला. प्राचीन वैदिक वाङ्मयांत पूर्वी अनेक स्त्रिया करीत असत; त्या तशा करणें श्रीमंतीचें व मोठेपणाचें लक्षण आहे, असें ( तैत्तिरीय ब्राह्मण ३, ९, ४ ) ( ऐतरेय ब्राह्मण १२ ११ ) इत्यादि ठिकाणीं म्हटलें आहे. महाभारत व स्मृतिग्रंथांतही तशीं वचनें आहेत. अनेक पत्नी करण्याचे वेळीं कांहीं बंधनेंही शास्त्रकारांनीं घातलीं आहेत. 'धर्मप्रजासंपन्ने दारे नान्यां कुर्वीत' (आपस्तंब, २, ५, ११, १२) एक पत्नी धर्मशील व प्रजासंपन्न असेल, तर दुसरी करूं नये. विशिष्ट कारणाशिवाय स्त्रीचा त्याग करूं नये, असेंही याज्ञवल्क्य म्हणतो.

सुरापी व्याधिता धूर्ता वन्ध्याऽर्थघ्न्यप्रियंवदा ।
स्त्रीप्रसूश्चाधिवेत्तव्या पुरुषद्वेषिणी तथा ॥

—याज्ञवल्क्य अ. १ श्लो. ७३

स्त्री मद्यपान करणारी, व्याधिग्रस्त, लबाड, वांझ, द्रव्यनाश करणारी, कर्कशा, जिला सर्व मुलीच होतात अशी असेल तर तिचा त्याग करून दुसरी पत्नी करावी.

विशिष्ट परिस्थितींत अपवाद म्हणूनच एक पत्नी जिवंत असतांना तिच्या अनुमतीनें दुसरी पत्नी करण्याची अनुज्ञा दिलेली आहे, इतकेंच

(३७०) **आजची अनिष्ट प्रथा:**—आज सुशिक्षित व सुसंस्कृत असे म्हटले जाणारे पुरुष प्रथम पत्नी मुलांबाळांसह नांदत असतांना तिचा

त्याग करून दुसरी पत्नी स्वीकारीत आहेत. शिक्षणखात्याचा मुख्याधिकारी अथवा जिल्हा मंडळाचा प्रमुख एखाद्या अध्यापिकेला द्वितीय पत्नी बनवितो! एखादा डॉक्टर पूर्वपत्नीचें व अपत्यांचें प्रेम झुगारून एखाद्या नर्सला गृहिणीपदाचा मान देतो. एखादा गृहस्थ मोलकरणीला पहिल्या पत्नीच्या देखत मालकीण बनवितो तर एखादा संपादक पहिली पत्नी असतांना द्वितीय संबंध करितो. विद्यार्थिनी व शिक्षक, गायक व गायनवर्गांतील विद्यार्थिनी यांचेही असे पहिली पत्नी असतांना संबंध जुळलेले ऐकूं येतात! हा प्रकार स्त्रीपुरुषांना अनुचित आहे. विशषतः सुशिक्षित स्त्रिया प्रौढ विवाहितांशीं यशवंती विवाह लावून आपल्या एका भगिनीच्या संसारसुखांत, विषयेच्छेला बळी पडून, माती कालवितात. यासारखी लाजिरवाणी, निंद्य व निषेधार्ह गोष्ट कोणती? पूर्वी बापानें मुलीला सवतीवर दिलें तर द्रव्यलोभानें "कन्याविक्रय केला" असा अपवाद येत असे. पण आतां शिक्षित स्त्रिया सवती पत्करून स्वतःच स्वतःच्या शत्रु होत आहेत, हें आश्चर्य नव्हे काय? पूर्वींपेक्षां प्रौढ स्त्रीपुरुषांचें एकत्र येणें, परिचय वाढणें हें अपरिहार्य असलें तरी, त्याचें पर्यवसान विवाहांत होणें हें फारच अनिष्ट आहे. तसें होऊं लागल्यास घरीं आलेल्या पाहुण्यावर, मित्रावर, जांवयावर आणि घरच्या तरुण अविवाहित मुलीवर सक्तीचा पहाराच ठेवावा लागेल!

प्रथमपत्नीच्या त्यागाला अनपत्यता हें कारण देतां येणार नाहीं. कारण त्याचा दोष पतीकडेही येईल. व्यभिचार, दुर्धर रोग इत्यादि कारणें सयुक्तिक आहेत. पण वंध्या, मृतप्रजा, अप्रियवादिनी, कमी शिकलेली, अशा कारणांमुळें पूर्वपत्नीचा त्याग करणें अनुचित आहे. या कृत्याचा निषेधच करून भागणार नाहीं, तर अशा स्त्रियांकरितां घटस्फोटाप्रमाणें एकपत्नीत्वाचा निर्बंधही पाहिजे.

(३७१) **वचनभंगाचें पातकः**—बलवत्तर कारणें असल्यास आणि प्रथमपत्नीनें द्वितीय पत्नी स्वीकारण्यास आपल्या पतीला संमति दिली तरचें तो विवाह योग्य होय. पण प्रथम दुसऱ्या स्त्रीशीं प्रेमबद्ध होणें व मग प्रथम पत्नीची मारून मुटकून संमति घेणें हा प्रकार निंद्य होय! धर्म, अर्थ व काम अशा तीन पुरुषार्थांत मी तुझें अतिक्रमण करणार नाहीं;

अशी शपथ पति घेतो व वचनबद्ध होतो, त्याविरुद्ध त्यानें वागणें, यांत वचनभंग तर आहेच पण नैतिकदृष्ट्या अधःपातही आहे.

**(३७२) एकपत्नीत्व व पातिव्रत्यः**—कांहीं लोकांना उद्योगाच्या दृष्टीनें दोन बायका लागतात. कोष्टी लोकांना ताणावाणा करण्याकरितां दोन्ही बाजूला दोन माणसें लागतात. तीं घरचींच असलीं आणि विशेषतः बायका असल्या म्हणजे तें काम उत्तम होतें असें म्हणतात. शेतकऱ्यांना-सुद्धां दोन बायका असल्या तर बऱ्याच असें ते म्हणतात. पण हें समर्थनीय नाहीं. कारण उद्यां एखादा सुशिक्षित प्रवासी दलालही म्हणेल कीं बरोबर मदतनीस म्हणून एक पत्नी असावी. चांगला पगारवाला नोकरही घरांत एक, ऑफिसांत एक अशी स्त्री असल्यास बरें असें म्हणूं लागेल. पण या-उलट सुशिक्षित स्त्रियांकडूनही प्रतिक्रियात्मक भाषा येऊं लागली म्हणजे समाजस्वास्थ्य राहाणार नाहीं आणि विवाहाचें पावित्र्यही नष्ट होईल! वास्तव पुरुषानें एकपत्नीत्व आणि स्त्रीनें पातिव्रत्य पाळण्यामध्येंच वैयक्तिक सुख, समाधान आणि समाजस्वास्थ्य यांचा लाभ आहे.

**(३७३) व्यावहारिक शिक्षणः**—आतां स्त्रियांना व्यवहारांत जो मान व अधिकार हवा आहे, तसेंच त्यांची जी आर्थिक उन्नति व्हावयास हवी आहे त्या दृष्टीनें त्यांना कोणकोणतें शिक्षण अवश्य आहे, माता या दृष्टीनें त्यांची योग्यता कशी मोठी आहे याचा थोडा विचार करूं.

गृहिणी व माता या दोन्ही दृष्टीनें स्त्रियांचें महत्त्व विशेष आहे. स्त्री व पुरुष हे दोघे बरोबरीचे घटक असें समजून आज त्यांच्यांशीं वागलें पाहिजे. स्त्रियांना उत्तम गृहिणी व्हावयाचें आहे म्हणून त्यांना गृहशिक्षण व त्याबरोबरच रेल्वे, पोस्ट, बँका, संमेलनें, सभा, कोर्टें, कचेऱ्या वगैरेंचें व्यावहारिक शिक्षण देऊन तसेंच त्यांना त्यांच्या हक्काचें शिक्षण देऊन बरोबरीनें वागविलें पाहिजे. स्त्रियांना शारीरिक शिक्षणही स्वसंरक्षणार्थ दिलें पाहिजे. केवळ गृहकृत्याबाहेर त्यांनीं कांहीं पाहूं नये, बालसंगोपन व पति-शुश्रूषा यांतच त्यांनीं सदैव गुरफटून राहावें, असें म्हणून भागणार नाहीं.

हिंदु स्त्रिया या हिंदु राष्ट्रगृहाच्या स्वामिनी आहेत. त्यांना आपल्या या घरांत कोठें कोठें काय आहे, उंदीर कोठें कुरतडत आहेत, घुशी कोठें बिळें

करीत आहेत, सर्प नि विंचू कुठें उद्भवत आहेत, हें सर्व समजलें पाहिजे. हिंदुस्थान हें हिंदूंचें घर असतांना तेथें अहिंदूंचें वर्चस्व, अहिंदूंकडून हिंदूंना त्रास, व्यावसायिक क्षेत्रांत अहिंदूंची मुजोरी जर चालत असेल, तर त्याला आळा घालण्याचेंही शिक्षण आजच्या हिंदु गृहिणींना व मातांना अवश्य आहे. आजचा हिंदु नागरिक हिंदुत्वनिष्ठ, प्रतिकारक्षम, स्वाभिमानी, अखिल हिंदूशीं समाजबंधुत्वानें वागणारा, विज्ञानसंपन्न, देशाभिमानी, व्यवहारदक्ष असा हवा आहे; त्याची गृहिणीही तशीच असेल तरच उभयतांचा संसार सुखावह होईल. हिंदु गृहिणीमध्यें शिवाशिव, शुभाशुभ, विटाळ, शकुन, भुतेंखेतें यांच्या कल्पना, अवजड दागिन्यांचा सोस, कुंकूं, बांगड्या, मणि, देवादींचे फोटो यांसंबंधीं धर्मभावनेनें बिनहिशेबी वागणूक, ऐदीपणा आणि विश्वबंधुत्वाच्या व धर्माच्या आचरट कल्पना असल्या तर ती हिंदु गृहिणी आजच्या कालाला अयोग्यच समजावी. यास्तव वरील दोषांनीं विरहित असें शिक्षण हिंदु स्त्रियांना देऊन त्यांना कौसल्या, कुंती, विदुला, सुनीति, जिजाई, अहिल्या, संग्रामदेवता लक्ष्मीबाई यांचीं उज्ज्वल चरित्रें जशीं शिकवावींत, तसेंच त्यांना आजच्या जगांतील कर्तृत्ववान् व पराक्रमी स्त्रियांचेही इतिहास सांगावेत.

(३७४) **गृहिणी सचिवः**—हिंदु समाजांतील गृहिणी ' गृहिणी सचिवः सखी मिथः ' या उक्तीप्रमाणें खरोखरीच गृहमंत्री हव्या आहेत. आज राज्यकारभारांत जें गृहमंत्र्याचें स्थान आहे, तेंच घरांत गृहिणीचें आहे. महाभारतांतील द्रौपदीचें उदाहरण मोठें अनुकरणीय आहे. द्रौपदी व सत्यभामा यांचें संभाषण चाललें असतां द्रौपदी सांगते कीं मी माझ्या पतींच्या आरोग्याची, आहाराची काळजी घेतें, आयव्यय पहातें, नोकरावर लक्ष ठेवतें.

' आगोपालाविपालेभ्यः सर्वं वेद्मि कृताकृतम् '

—वनपर्व, महाभारत.

गृहिणीचें लक्ष घरांतील प्रत्येक व्यवहारावर असलें पाहिजे. आपली मिळकत किती, व्यय किती या एकंदर आर्थिक परिस्थितीची माहिती गृहिणीला नीट असली म्हणजे उंची वस्त्रें, दागिने आणि इतर हव्यास यांना आपोआप मर्यादा येते. हिंदु समाजांतील मागसलेल्या वर्गात स्त्रियाच

खरोखरी कारभारणी असतात. घरकामें करून शेतकामासही त्या साह्य करतात. बाजारहाट, धडूतपांघरूण, मीठमिरची वगैरे सर्व त्याच पाहातात. त्यांना शिक्षण नसल्यामुळें त्याचें चीज नाहीं; पण एखाद्या मोठ्या कामगाराची बायको दुकानांत जाऊन वस्तु विकत घेऊं लागली म्हणजे तिचें मात्र समाज कौतुक करतो.

चूल व मूल या दोन्हीबाहेर गृहिणीचें काम फारसें नाहीं, असें कांहीं म्हणतात. पण चूल व मूल या दोन शब्दांतच अर्थशास्त्र, आहारशास्त्र, जीवनशास्त्र, सौंदर्यशास्त्र, सुप्रजाजननशास्त्र, आरोग्यशास्त्र, रुग्णशुश्रूषा, बालमानसशास्त्र, प्रसूतिशास्त्र इत्यादि अनेक शास्त्रें अन्तर्भूत झालेलीं आहेत. त्यांचें अद्यावत् शिक्षण गृहिणींना पाहिजे. मातृभाषेशिवाय एकदोन भाषाही याव्या, वृत्तपत्रांतील प्रचलित विषय त्यांना समजावेत, देशांतील पैसा, राष्ट्रिय धन, स्वदेशी–परदेशी, राष्ट्रियता–अराष्ट्रियता म्हणजे काय हें सर्व त्यांना चांगलें समजलें तरच गृहिणी गृहमंत्र्यांचें काम उत्तम करतील.

आजच्या या धकाधकीच्या मामल्यांत घरोघरच्या पुरुषांना स्वातंत्र्याच्या लढ्यांत पडावें लागतें. तसेंच व्यापार, उद्योगधंदे, कारखाने, सैन्याचीं विविध क्षेत्रें पुरुषांना हस्तगत करावयाचीं आहेत. पुरुषांना महत्त्वाकांक्षेनें आपल्या क्षेत्रांत निःशंकपणें पडतां यावें म्हणून अपत्यसंगोपन, देवकार्य, पितृकार्य, अतिथिसत्कार, धर्मकृत्यें थोडक्यांत घरांतील प्रपंच हा सर्व स्त्रियांनींच संभाळला पाहिजे. घरांत सर्वस्वीं पूर्ण अधिकार स्त्रीचा आणि घराबाहेर पुरुषाचा, अशी परिस्थिति स्त्रियांनीं निर्माण केली तर त्या खऱ्या ' गृहिणी सचिवः ' या पदास योग्य होतील.

(३७५) **स्त्रिया, सौंदर्य व कलाः**–हिंदु गृहिणींना विविध कला व सौंदर्यवर्धन यांचें शिक्षण अद्याप चांगलेंसें मिळत नाहीं. चित्रकला, शिवणकला, कशिदा, भरतकाम या कलांमध्यें कांहीं स्त्रियांची प्रगति आज दिसत आहे. तथापि दारिद्य व शिक्षणाचा अभाव यांमुळें गृहरचना, गृहसौंदर्य, वस्तूंची मांडणावळ, वस्त्रें, पात्रें अशा बाबतींत जितकी सुबकता आणि टापटीप दिसावयास पाहिजे तितकी दिसत नाहीं. स्वच्छता, सौंदर्य, नैसर्गिक प्रसन्नता यांची अभिरुची स्त्रियांमध्यें वाढविली म्हणजे त्यांचें कंटाळवाणें जीवन सुखाचें होईल.

(३७६) **शुभाशुभ–कल्पना**:–स्त्रियांमध्यें शुभाशुभाच्या ज्या खुळ-चट कल्पना असतात, त्यांचेंही निराकरण स्वच्छता व सौंदर्य यांच्या अभि-रुचीनें होईल. अस्वच्छ, घाणेरडे, कुजणारे पदार्थ अशुभ; कांटेरी झाडें-झुडपें अशुभ; मोर, पोपट, मैना, शुभ; आंबा, वड, पिंपळही शुभ; सांचलेलें पाण्याचें डबकें अशुभ; पण झुळझुळ वाहाणाऱ्या नद्या प्रसन्न नि पुण्यसलिला म्हणूनच त्या अत्यंत पवित्र होत. ही विचारसरणी स्त्रियांत रूढ झाली म्हणजे त्यांना, तुळशी तोडल्या, नारळ व भोपळा फोडला, बांगडी वाढली, कुंकू विसकटलें तर त्यांत कांहीं अशुभ वाटणार नाहीं.

(३७७) **बरोबरीनें हिस्सा मिळावा**:–जुन्या हिंदुधर्माप्रमाणें पत्नीच्या पोषणाचा भार पतीवर आहे. आज स्त्रिया अर्थोत्पादन करतात. शिकलेल्यापेक्षां न शिकलेल्या कामकरी व शेतकरी लोकांच्या स्त्रिया नवऱ्याच्या बरोबरीनें राबून रोजचें थोडेंबहुत तरी द्रव्य मिळवितात. उभयतांनीं अर्थोत्पादन केलें तरी गर्भधारणा व प्रसव अशा वेळीं स्त्री ही असहायच असते; म्हणून पतीनें तिला संभाळली पाहिजे यांत वादच नाहीं. पण पतीच्या पश्चात् पत्नी केवळ अन्नवस्त्राची अधिकारी असावी हा अन्याय होय. अविभक्त कुटुंबांत पतीच्या मागें पत्नीचे हाल पोटगीच्या पायीं पुष्कळ होत असतात. स्त्री पतीला सर्व दृष्टीनें साह्य करते. त्या साह्यामुळें पति जें अर्थोत्पादन करूं शकतो, त्यांत स्त्रीचा भाग पोटगीशिवाय नाहीं काय ? यास्तव पतीच्या कष्टार्जित मिळकतीचा भाग मुलांच्या बरोबरीनें पत्नीला मिळणें युक्त आहे. प्रत्यक्ष भाऊ वारला कीं विधवा भावजयीला तिचा दीर अनुदारतेनें वागवितो! स्त्रियांच्या हातीं पैसा पडला कीं त्यांना त्याच्या संरक्षणाचें व्यावहारिक ज्ञान नसल्यामुळें तो कोणी तरी भाऊ, मामा, चुलता अगर नातेवाईक लाटतो, हें खरेंच आहे; पण ही आपत्ति टाळण्याकरितां पतिमरणोत्तर ती अन्नवस्त्रालाही महाग होईल, असें वागविणें चुकीचें आहे. पति असतांना ज्या राहणीनें पत्नी राहात असे त्या राहणीनें तिला पतीच्या पश्चात् राहातां येईल; एवढें द्रव्य तिला अवश्य दिलें पाहिजे. ती आपल्या मर्जीप्रमाणें प्रसंगीं मुलांना, मुलींना, नातवंडांना जें द्यावयाचें तें देईल व कोणाच्या तरी साह्यानें त्याचें संरक्षण करील!

स्त्रियांचे धार्मिक आणि सामाजिक क्षेत्रांतील अधिकार पुरुषांच्या बरोबरीचे आहेत. त्यांची आर्थिक उन्नति होणें अवश्य आहे. या दृष्टीनें वारसा, वांटप इत्यादि विषयांत त्यांच्या अधिकाराची वाढ व्हावी, असा धर्मनिर्णयमंडळाचा निर्णय आहे.

सांप्रत कायद्यांत मुलीला वडिलाच्या मिळकतींत भाग नाहीं. कन्येला पित्याच्या मिळकतींतील पुत्राच्या ¼ भाग मिळावा. तिच्या शिक्षणाचा व विवाहाच्या खर्चाचा भार तिच्या भागावर ठेवावा. निपुत्रिक विधवा कन्येलाही वारसाहक्क असावा. विधवा सून व कन्या अशा दोन एखाद्या माणसाच्या मृत्यूनंतर असतील तर कन्येस त्याच्या मिळकतीपैकीं ¼ व विधवा सुनेस ¾ असा भाग असावा. एखाद्याच्या मृत्यूनंतर त्याची पत्नी व कन्या त्याचे मागें असल्यास पत्नीस ¾ व कन्येस ¼ भाग द्यावा. एखाद्याच्या मृत्यूनंतर त्याची आई व विधवा सून मागें राहिल्यास दोघींचा भाग निम्मा निम्मा असावा.

पतीच्या मिळकतींतील कांहीं भागावर पत्नीचा कायदेशीर हक्क आज नाहीं तो मिळाला पाहिजे. कायद्यांतील श्लेष आणि इतर किचकट विषय पुष्कळच आहेत. हिंदु कायदा बराच गुंतागुंतीचा व स्त्रियांना जाचक असा आहे. इंडियन सक्सेशन ॲक्टान्वयें नमूद केलेले वारसाचे नियम जास्त योग्य, न्याय्य व सरळ आहेत असें कांहीं तज्ज्ञ म्हणतात. आजचा हिंदु कायदा दत्तक, विवाह व वारसा यांसंबंधीं प्राचीन स्मृतिशास्त्रांना अनुसरून थोडासा आहे; पण तो गुंतागुंतीचा असल्यामुळें अवश्य सुधारला पाहिजे.

**(३७८) मातेची योग्यताः**—माता या दृष्टीनें स्त्रियांची योग्यता जुन्या हिंदु धर्मांत पुष्कळच सांगितलेली आहे. तैत्तिरीय उपनिषदामध्यें 'मातृदेवो भव' 'मातेला देव मानून वागत जा' असा उपदेश आहे. गौतम, बौधायन, आपस्तंबादि धर्मसूत्रकारांनीं मातेचा गौरव पुष्कळच केला आहे. मनु हा उपाध्याय, आचार्य व पिता यांहून माता श्रेष्ठ होय असें म्हणतो.

उपाध्यायान्दशाचार्य आचार्याणां शतं पिता ।
सहस्रं तु पितॄन्माता गौरवेणातिरिच्यते ॥ —मनु. २,

याज्ञवल्क्य ऋत्विक्, उपाध्याय, आचार्य व गुरु या सर्वांपेक्षां माता श्रेष्ठ होय, असें म्हणतो.

**एते मान्या यथापूर्वमेभ्यो माता गरीयसी ।**

—याज्ञवल्क्य १, ३५.

मातेची योग्यता खरोखरीच फार मोठी आहे. हिंदु समाजांतील अप्रबुद्ध मातांना 'रांधा, वाढा आणि उष्टीं काढा' या पलीकडे आपलें कर्तव्य नाहीं, असें वाटतें. परंतु माता जितकी सुबुद्ध, उदात्त विचारांची, सुसंस्कृत, हिंदुत्वनिष्ठ, देशभक्त आणि धाडसी असेल तितकी ती आपल्या मुलांची वृत्ति वरील गुणांनीं सुसमृद्ध करते असा न्याय आहे. राष्ट्रांत वीरपुत्र वीरमाताच उत्पन्न करतात. हिंदु राष्ट्रांतील मातांमध्यें ज्या धार्मिक, सामाजिक आणि ईश्वरविषयक वेडगळ, आचरट व तर्कदुष्ट कल्पना असतील, त्या सर्व आतां गेल्याच पाहिजेत. जगांतील अभ्युदयसंपन्न राष्ट्रांत मातांचें शरीरसामर्थ्य, बुद्धिसामर्थ्य, संघटना, शक्ति, युक्ति, भक्ति इत्यादि जे गुण दिसतात, ते हिंदु मातांमध्यें उद्भूत होणें अवश्य आहे. 'जिचे हातीं पाळण्याची दोरी ती जगावर राज्य करी' या म्हणीप्रमाणें जगावर आक्रमण करणारे, हिंदुराष्ट्राला स्वातंत्र्य मिळवून देणारे असे सुपुत्र हिंदुमातांनीं राष्ट्राला दिले तर त्यांतच त्यांच्या आयुष्याची इतिकर्तव्यता आणि धन्यता आहे.

(३७९) **स्त्रीपावित्र्यः**—आतां स्त्रियांच्या शुद्धतेसंबंधाच्या जुन्या हिंदुधर्मांतील उच्च कल्पना कशा होत्या, तें सांगून हें प्रकरण संपवितों.

स्त्रियांच्या शुद्धतेसंबंधानें आजच्या आपल्या कल्पना अशा कीं परपुरुष स्पर्श तर वर्ज्य करावाच, परंतु मनानेंही परपुरुषाचें चिंतन करूं नये. अव्यभिचारी निष्ठेच्या दृष्टीनें ध्येय म्हणून हें अत्यंत योग्य आहे. पण समाजदंड, राजदंड यांच्या दौर्बल्यामुळें पिता, पति व स्वत: स्त्री यांच्या दुबळेपणामुळें स्त्रियांवर त्यांच्या इच्छेविरुद्ध दुष्टदुर्जनांचीं आक्रमणें होतात, अशा प्रसंगीं स्त्रियांविषयीं जी सहानुभूति हिंदु समाजानें दाखविणें इष्ट आहे, ती तो दाखवीत नाहीं! उलट अत्यंत अनुदार दृष्टीनें पहातो! पण धर्मशास्त्रकारांची दृष्टि किती उदार होती हें पुढील वचनांवरून दिसून येईल:—

**स्त्रियः पवित्रमतुलं नैता दुष्यन्ति कर्हिचित् ।**

**मासि मासि रजो ह्यासां दुरितान्यपकर्षति ॥६३॥**—बौधायन

न स्त्री दुष्यति जारेण न विप्रो वेदकर्मणा ।
नाऽऽपो मूत्रपुरीषेण नाग्निर्दहनकर्मणा ॥१॥
स्वयं विप्रतिपन्ना वा यदि वा विप्रवासिता ।
बलात्कारोपभुक्ता वा चौरहस्तगताऽपि वा ॥२॥
न त्याज्या दूषिता नारी नास्यास्त्यागो विधीयते ।
पुष्पकालमुपासीत ऋतुकालेन शुध्यति ॥३॥
पतितानां च विप्राणां तथा स्त्रीणां विगर्हितम् ।
कथं शुद्धिर्भवेत्तासां तेषां चैव विशेषतः ॥३५॥
व्यभिचारादृतौ शुद्धिः स्त्रीणां चैव न संशयः ।
गर्भे जाते परित्यागो नान्यथा मम भाषितम् ॥३६॥

—बृ. य. अ. ३

अत्रिस्मृतींतही वरील वसिष्ठ व बृहत् यमस्मृतींतील श्लोक आलेले आहेत.

असवर्णेन यो गर्भः स्त्रीणां योनौ निषिच्यते ।
अशुद्धा सा भवेन्नारी यावत्च्छल्यं न मुञ्चति ॥५०॥
विनिःसृते ततः शल्ये रजसो वाऽपि दर्शने ।
तदा सा शुध्यते नारी विमलं काञ्चनं यथा ॥५१॥
स गर्भो दीयतेऽन्यस्मै स्वयं ग्राह्यो न कर्हिचित् । —देवल. ॥

भावार्थः—स्त्रिया या अत्यंत पवित्र होत. प्रत्येक महिन्याचा रजस्राव त्यांचीं सर्व पातकें नष्ट करतो. अग्नि दहनकर्मानें, पाणी मलमूत्रानें व ब्राह्मण वैदिक कर्मानें जसा दूषित होत नाहीं, तशा स्त्रियाही जारकर्मानें दूषित होत नाहींत. आपत्ति, दूरचा प्रवास, बलात्कार, गुंडांनीं पळवून नेणें इत्यादि कारणांनीं दूषित झालेली स्त्री त्याज्य ठरत नाहीं. कारण मासिक विटाळानें तिची शुद्धि होते. बृहत् यमानें “स्त्रीनें व्यभिचार केल्यास तिची शुद्धि ऋतुकालीं होते व गरोदर असल्यास गर्भत्यागानें शुद्धि होते” असें म्हटलें आहे. आंगिरस, अत्रि व देवल इत्यादींचे विचार यासारखेच आहेत. असवर्ण पुरुषानें स्त्रीवर बलात्कार केल्यामुळें ती जर गरोदर राहिली तर बाळंतीण होतांच तो गर्भ टाकावा. बाळंतपणानंत

पुन्हां ती विटाळशी झाली म्हणजे ती कांचनाप्रमाणें शुद्ध समजावी. बलात्कारानें स्त्रीचा उपभोग घेतला तर तेवढ्यामुळें ती त्याज्य ठरत नाहीं. कारण—

बलाद्दत्तं बलाद्भुक्तं बलाद्यच्चापि लेखितम् ।
सर्वान्बलकृतानर्थानकृतान्मनुरब्रवीत् ॥१६८॥–मनु. अ. ८

बलानें दिलेलें, जुलुमानें भोगलेलें व छलबलानें लिहून घेतलेलें हें सर्व अकृत म्हणजे झालेलेंच नाहीं असें समजावें.

येथवर विवाह व त्या विषयाशीं संबद्ध असलेल्या मुख्य मुख्य विषयांचा उहापोह करून ग्रंथाचा हा तिसरा भाग समाप्त केला. या पुढच्या भागांत अखिल हिंदूंच्या संस्कारांचा व समष्टिधर्मांचा विचार करावयाचा आहे. ‘ नवा हिंदुधर्म ’ अखिल हिंदूंकरितांच आहे, तथापि व्यष्टि व समष्टि असे दोन भाग होणें अपरिहार्य आहे. समष्टीची घटक व्यष्टि आहे आणि अनेक व्यष्टि मिळून समष्टि होते. हे अनोन्य संबंध ध्यानांत घेऊन पुढील भाग वाचावा.

—*—

# भाग चौथा

# समष्टिविचार



## प्रकरण चोविसावें

## संस्कार व वेदाधिकार

(३८०) **सोळा संस्कारः**—जगांतील प्रत्येक धर्माच्या अनुयायांमध्यें कांहीं विशिष्ट धार्मिक संस्कार आहेत. प्राचीन काळीं हिंदुधर्मांत अठ्ठेचाळीस संस्कार होते असें गौतमधर्मसूत्रांत सांगितलें आहे. पुढें परिस्थितीमुळें हे अठ्ठेचाळीस संस्कार कमी झाले व सोळा संस्कार करण्याची प्रथा पडली. या सोळा संस्कारांचीं नांवें पुढीलप्रमाणें आहेतः—

गर्भाधानं पुंसवनं सीमन्तो जातकर्म च ।
नामक्रिया निष्क्रमोऽन्नप्राशनं वपनक्रिया ॥
कर्णवेधो व्रतादेशो वेदारंभक्रियाविधिः ।
केशान्तः स्नानमुद्वाहो विवाहाग्निपरिग्रहः ॥
त्रेताग्निसंग्रहश्चेति संस्काराः षोडश स्मृताः ॥

—व्यासस्मृति ( १, १४–१६ )

हेही संस्कार आतां लुप्त झालेले आहेत. हे सर्व अखिल हिंदूंकरितां होते असें जुन्या धर्मशास्त्रांवरून सिद्ध होत नाहीं. यास्तव अखिल हिंदूंचे उपनयन, विवाह, अंत्येष्टि हे संस्कार अवश्य व्हावेत, ते वेद-मंत्रांनींच व्हावेत, ते स्वतः वा कोणाहि आचारसंपन्न हिंदु तज्ज्ञां-कडून करावेत, असें नवा हिंदुधर्म प्रतिपादतो. कारण हिंदुत्व हें संस्कारांकित आहे.

(३८१) **हिंदुत्व व संस्कारः**—अनादिकालापासून हिंदुत्व हें संस्कारांकित आहे व तें तसें असलेंच पाहिजे. संस्कारानें मनुष्याच्या मनावर सुपरिणाम होतो. मी अमुक एका संप्रदायांतील आहे, माझा अमुक एक धर्म आहे, माझीं विशिष्ट कर्तव्यें आहेत अशी जाणीव संस्कारांमुळेंच होते. * सं (सम्यक्) + करणम् = संस्करणम् । संस्करणमेव संस्कारः असा ' संस्कार ' शब्दाचा विग्रह करतां येईल. चांगलें करणें, शुद्ध करणें, कोणत्याही वस्तूंतील वैगुण्य दूर करून तिला नवीन व शास्त्रशुद्ध स्वरूप देणें हाच संस्करण किंवा संस्कार शब्दाचा मूळ अर्थ आहे. अर्थात्, ज्या क्रियेच्या किंवा क्रियांच्या योगानें मनुष्याच्या ठिकाणीं सद्गुणांचें अधिकतेनें उद्भवन, विकसन व संवर्धन होतें, त्या क्रियेला किंवा क्रियांना ' संस्कार ' असें म्हणतां येईल.

**संस्कारो नाम स भवति यस्मिञ्जाते पदार्थो भवति योग्यः कस्यचिदर्थस्य ।** शबर भाष्य (जै. न्या. ३—१—३ पा. ६६० )
**योग्यतां चादधानाः क्रियाः संस्कारा इत्युच्यन्ते ।** तंत्रवार्तिक पा.१०७८
**संस्कारो हि नाम गुणाधानेन वा स्याद् दोषापनयनेन वा ।**
शां. भा. १।१।४
**योग्यता च सर्वत्र द्विप्रकारा दोषापनयनेन गुणान्तरोपजननेन च भवति ।** तंत्रवार्तिक पृ. १११५.

**भावार्थः**—जो केला असतां पदार्थाला कांहीं विशिष्ट योग्यता येते त्याला संस्कार म्हणतात. योग्यता उत्पन्न करणाऱ्या क्रियांना संस्कार म्हणतात. दोष नष्ट करून गुण उत्पन्न करणें म्हणजेच संस्कार होय. दोष घालवणें व गुण वाढविणें अशी दोन प्रकारची योग्यता आणावी लागते. संस्कारांचें महत्त्व दृष्ट व अदृष्टार्थ-जनक दोन्ही कर्मांमध्यें आहे.

(३८२) **संस्कारांचे लाभः**—पश्वाचारापेक्षां मनुष्याचाराची थोरवी व्यक्त करणें हा संस्कारांचा उद्देश आहे. माणसांत स्वभावतः कांहीं दोष नि वैगुण्यें असतात. यास्तव प्राकृतिक दोषांचें अपनयन व सद्-

* ' आर्यांचे संस्कार, ' हा श्रौताचार्य बापट दीक्षित यांचा ग्रंथ वाचकांनीं पहावा.

गुणांचें उपजनन करण्याकरितां संस्कारांची आवश्यकता आहे. संस्कारां-मुळें मनाचें सामर्थ्य वाढतें, चित्तास प्रसन्नता येते, व परंपरेचा अभिमान उत्पन्न होतो. मात्र हे संस्कार अर्थ समजून घेऊन गांभीर्यानें, पवित्र व उच्च भावनेनेंच केले पाहिजेत.

संस्कारांच्या योगानें अन्तःकरणाचा विकास होतो व जीवनाला प्रोत्साहन मिळतें. शरीरांत जी चित्‌शक्ति आहे ती अशीं आंदोलनें उत्पन्न करते कीं, त्यांमुळें माणसांची प्रवृत्ति, सद्विचार, सद्वासना व सत्कर्म यांना पोषक व्हावी. रंग दिला कीं चित्र खुलतें, निघर्षणछेदनादि संस्कारांमुळें सुवर्णही उठावदार दिसतें, स्वच्छ, निर्मल, ताज्या पाण्यांत वाळा टाकला आणि बर्फही टाकलें तर जसें त्याचें गुणाधिक्य वाढतें; तसेंच संस्कारांमुळें विचार, वासना व आचरण यांवर नियंत्रण येऊन सत्क्रिया करणें सुलभ जातें. माणसावर इष्ट असे संस्कार वरचेवर केल्यास त्याच्या बुद्धीची, मनाची आणि शीलाचीही वाढ होते. पायीं प्रवास करणाऱ्याला जर अनुकूल वारा मिळाला तर त्याची गति वाढते व प्रवासाचा शिणवटाही येत नाहीं. जीवनाची नदी जे ओलांडीत असतात, त्यांना संस्कारांचा अनुकूल वारा मिळाला म्हणजे त्यांच्या जिवित–यात्रेची नौका सुखरूपपणें परतीराला लागते*

(३८३) आक्षेपाला उत्तरः–आज एक पक्ष असें म्हणतो कीं संस्कार इत्यादि सर्व थोतांड आहे, त्याची कांहीं आवश्यकता नाहीं. पण हेच आक्षेपक आपल्या पक्षाच्या मतप्रचाराचे वेळीं त्या उलट वागतात! आपल्या पक्षांत येणाऱ्या माणसानें विशिष्ट प्रतिज्ञा, विशिष्ट विचारसरणी, विशिष्ट वर्गणी मान्य केल्यावरच मग त्याला ते सभासदत्वाची दीक्षा देतात. मी पक्षाची शिस्त पाळीन, अमुक वर्गणी देईन, गणवेष धारण करीन,

---

* ' चित्रकर्म यथाऽनेकैरङ्गैरुन्मील्यते शनैः ।
ब्राह्मण्यमपि तद्वत्स्यात्संस्कारैर्विधिपूर्वकैः ॥ ' –पराशर
' सर्वेषु अदृष्टार्थेषु योग्यतातिशयं कुर्वन्ति ।
फलातिशयो योग्यतातिशये च । यथा पानीयस्य गन्धादि ॥ '
–रुद्रस्कन्द ( पं. काणेकृत धर्मशास्त्रविचार पा. ६७)

अशी प्रतिज्ञा तोंडी वा लेखी घेणें म्हणजे संस्कार नव्हे काय ? कायदेमंडळांत जाऊन शपथ घेणें, एखाद्या पक्षांत जाऊन प्रतिज्ञापत्रकावर स्वाक्षरी करणें, गणवेष धारण करणें, हे एक तऱ्हेचे संस्कारच होत. कारण त्यामुळें वृत्तींत बदल होतो. मुलाला दत्तक दिलें वा घेतलें कीं त्या संस्कारामुळें एकदम त्याच्या आयुष्यांतच क्रांति होते. शाळेंत नांव घालण्याचा संस्कार केला कीं लहान मुलांना मोठा उत्साह वाटतो. नोकरीवर रुजू होण्याचा हूकूम आला कीं सबंध आयुष्याला निराळें वळण लागतें. दोघां स्त्रीपुरुषामध्यें विवाह-संस्कारामुळेंच विशिष्ट तऱ्हेचे संबंध उत्पन्न होतात व तीं दोन कुलेंही एक-मेकांशीं संलग्न होतात. या दृष्टीनें विचार केल्यास जगांत जोंवर मानव-समाज आहे, जोंवर विविध धर्मपंथ आहेत, तोंवर हिंदुत्वदृढीकरणार्थ तीन संस्कार अवश्य पाहिजेत. बाप्तिस्मा, सुंता हे जसे अहिंदूंचे संस्कार आहेत, तसेच उपनयन, विवाह व अंत्येष्टि हे तीन संस्कार हिंदुमात्राला आवश्यक आहेत.

(३८४) **उपनयन संस्कार:–** हिंदुत्वदृढीकरणार्थ उपनयन हा संस्कार अवश्य आहे. त्यामुळें माणसाचा दुसरा जन्म होतो, त्याला वेदाचा अधिकार प्राप्त होतो व संस्कृतीच्या सर्व क्षेत्रांत त्याला प्रवेश मिळतो. उपनयन म्हणजे विशिष्ट व्रत पाळून विद्या ग्रहण करून सुसंस्कृत होण्याचा संस्कार होय. '**उपनयनं नाम येन कर्मणा यस्मिन्वा कर्मणि आचार्येण विद्यार्थं सुमुहूर्ते कुमारस्य स्वसमीपे नयनम्**' ( उपनयन म्हणजे ज्या कर्मानें किंवा ज्या कर्मांत आचार्य वेदविद्या शिकविण्यासाठीं सुमुहूर्तावर कुमाराला स्वतः जवळ आणतो किंवा बोलावतो, तें कर्म. ) उपनयन म्हणजे ज्ञानमंदिराच्या क्षेत्रांत पदार्पण करण्याचें द्वार होय. आई व बाप शरीररूपानें जन्म देतात; पण आचार्य ज्ञानरूपानें दुसरा जन्म देतो. 'मातृमान्, पितृमान्, व आचार्यवान्, वेद,' अशी परिभाषा आहे. म्हणजे माता, पिता व आचार्य यांच्या द्वारानें ज्याला शिक्षण मिळतें तोच चांगला जाणकार होतो.

जैमिनीचे मतें उपनयन हें दृष्टार्थक आहे. शबरानेंही भाष्यांत त्याच मताचा अनुवाद केलेला आहे.

**वसन्ते ब्राह्मणमुपनयीत उपनयस्य संस्कारस्य तदर्थत्वात् । विद्यार्थमुपाध्यायस्य समीपमानीयते ना दृष्टार्थं नापि कटं कुड्यं वा कर्तुम् ।**

**दृष्टार्थमेव सैषा विद्यायां पुरुषश्रुतिः ।** शबरभाष्य.

**भावार्थः**—वसंत ऋतूंत ब्राह्मण पुत्रांचें उपनयन करावें. कारण उपनयन संस्कार हा त्याकरतांच आहे. विद्येकरितां उपाध्यायाकडे बटूला न्यावयाचें असतें, त्यावरून हा संस्कार दृष्टार्थक आहे. अदृष्टाकरितां नाहीं.

**(३८५) अखिल हिंदूंना वेदाधिकारः**—आज हिंदुमात्राला वेदाधिकाराची आकांक्षा उत्पन्न झालेली आहे. प्रत्येक गट स्वतःस त्रैवर्णिकांपैकीं एखादें नांव लावूं इच्छित आहे. प्रत्येकजण वेद हे जगांतील उत्कृष्ठ वाङ्मय आहे, तें मी वाचणार, शिकणार, वैदिक मंत्रांनीं मी संस्कार करून घेणार, मी द्विज होणार, मी असंस्कृत राहाणार नाहीं असें म्हणत आहे. हिंदुसमाजांतील पुष्कळ जाति आज उपनयनें करीत आहेत. श्रावण्याही ते करतात. वैदिक पद्धतीनें त्यांचे विवाहही होत आहेत. जेथें वेदोक्त कर्माला त्यांना ब्राह्मण पुरोहित मिळत नाहीं, तेथें ते स्वतःचे पुरोहित उत्पन्न करीत आहेत. ही सर्व परिस्थिति अखिल हिंदु जातीच्या एकजिनसीपणाच्या दृष्टीनें अत्यंत स्पृहणीय आहे. हिंदूंचे प्राचीन व पूज्य धर्मग्रंथ म्हणजे वेद होत. ते वेद सर्व हिंदू वाचूं लागले, त्यांतील तत्त्वें विचार करून आचरूं लागले तर ऐहिकदृष्टया त्यांचें कल्याणच आहे, फार काय पण पारलौकिकदृष्ट्याही त्यांत अकल्याण नाहीं. म्हणूनच नवा हिंदुधर्म प्रत्येक हिंदूला द्विजत्वाचा अधिकार आहे, वेदाचा अधिकार आहे, द्विजत्वसिध्यर्थ वैदिक पद्धतीनें उपनयनसंस्कार प्रत्येक हिंदूनें स्वतः वा तज्ज्ञाच्या साह्यानें करावा, असें सांगतो.

पूर्वी वेदाधिकार ब्राह्मणांनाच होता, पण आज तो सर्वांना दिला पाहिजे. चातुर्वर्ण्याबाहेरचा "निषादपंचम इति" जो निषाद म्हणजे कोळी तो जर राजा असेल तर वैदिक मंत्रांनीं त्याचा यज्ञ करावा. "निषादस्थपतिं याजयेत्" असें वेदांत विधान आहे. आज लोकशाहीच्या तत्त्वानुसार अखिल हिंदुसमाजाचे घटक राज्यांशभाक् होत आहेत, यास्तव प्राचीन परंपरेस धरून अखिल हिंदूंना वेदाधिकार अवश्य दिला पाहिजे.

श्रीशंकराचार्यांचे पूर्वी ब्राह्मणांनाच मोक्ष मिळतो, अशी समजूत होती; परंतु श्रीशंकराचार्यांनीं तो शूद्रालाही मिळतो असें सिद्ध केलें. साधुसंतांनीं मोक्षाचें द्वार जसें सर्वांना मोकळें केलें तसें संस्कृतीचें द्वार वेदाधिकारपूर्वक अखिल हिंदूंना आतां मोकळें करणें अवश्य आहे.

**(३८६) स्त्रिया व उपनयनः**–प्राचीन काळीं मुलांप्रमाणें मुलींचेंही उपनयन होत असे. मुंज शब्दाचा अर्थ जानवें व लंगोटी घालणें असा संकुचित नसून ज्ञान प्राप्त्यर्थ गुरूकडे मुलाला किंवा मुलीला नेणें असा आहे. या दृष्टीनें हा संस्कार सर्व हिंदुमुलांना व मुलींना आवश्यक आहे. संस्कारप्रकाशांत यमस्मृतींतील म्हणून पृष्ट ४०२ वर यासंबंधीं फार महत्त्वाचे श्लोक आहेत.

**पुरा कल्पे कुमारीणां मौञ्जीबंधनमिष्यते ।**
**अध्यापनं च वेदानां सावित्री वाचनं तथा ॥**
**पिता पितृव्यो भ्राता वा नैनामध्यापयेत्परः ।**
**स्वगृहे चैव कन्याया भैक्षचर्या विधीयते ॥**
**वर्जयेदजिनं चीरं जटाधारणमेव च ॥**
**यत्तु हारीतेनोक्तं द्विविधाः स्त्रियो ब्रह्मवादिन्यः सद्यो वध्वश्च ।**
**तत्र ब्रह्मवादिनीनामुपनयनमग्नीन्धनं वेदायध्यनं स्वगृहेच भिक्षाचर्येति ।**
**सद्यो वधूनां तु उपस्थिते विवाहे कथंचिदुपनयनमात्रं कृत्वा विवाहः कार्यः ।**

**भावार्थः**–प्राचीन काळीं कुमारींचें मौंजी बंधन, गायत्री मंत्र व वेदाध्ययन हीं होत असत. बाप, चुलता अथवा भाऊ हेच त्यांना शिकवीत. त्यांचा परक्यांशीं शिक्षणाचे निमित्तानें संबंध येत नसे. अजिन व जटाधारण हीं वर्ज्य असत. घरांतच कन्येची भिक्षा होई. हारित वचनावरूनही ब्रह्मवादिनी आणि विवाहेच्छु कुमारींचें उपनयन होत असे. विवाहापूर्वी उपनयन संस्कार करावा असेंही तो म्हणतो.

**(३८७) संकल्पावर आक्षेप व उत्तरः**–उपनयन संस्काराचा संकल्प– ' द्विजत्व–सिद्धिपूर्वक–वेदाध्ययनाधिकारसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वर-

प्रीत्यर्थं उपनयनाख्यं कर्मकरिष्ये '—द्विजत्वाची सिद्धि करून वेदाध्ययनाचा अधिकार मिळविण्याकरितां आहे. या संकल्पाची व्यापकता लक्षांत न घेतां कांहीं आक्षेपक म्हणतात कीं अहो, वेदाध्ययनच जर कर्तव्य नाहीं तर उपनयन कशाला ? ना वेदाध्ययन, ना गुरुगृहवास, ना व्रतपरिपालन अशा स्थितींत या संस्कारांचा खटाटोप विनाकारण नाहीं काय ?

**उत्तरः**—आक्षेपकांचें हें म्हणणें वरवर विचार करणाऱ्याला खरें वाटतें; पण वेद म्हणजे केवळ चार वेदांचीं पुस्तकें असा अर्थ नाहीं. वेद म्हणजे ज्ञान, जें जें जाणण्यास योग्य तें तें ज्ञान म्हणजे वेदच होत. म्हणून 'अनंता वै वेदाः' अशी परिभाषा आहे. पूर्वी भारद्वाज ऋषींनीं वृद्ध होईपर्यंत वेदाभ्यास केला. तीन वेळां तपश्चर्या करून इंद्राकडून तीनशें वर्षें आयुष्य मागून घेतलें व सारखें वेदाध्ययन केलें. तरीही वेद संपले नाहींत. शेवटीं इंद्रानें त्यांना दिव्यदृष्टि दिली व दाखविलें कीं वेदांचे (म्हणजे विद्येचे व ज्ञानाचे) अग्नीसारखे तेजस्वी असे कित्येक पर्वत आहेत. केवळ ऋग्वेदादि चार वेद व सहा शास्त्रें यांतच सर्व ज्ञान गुरफटलेलें आहे असें नव्हे. प्राचीनकाळींसुद्धां ज्ञानाची इयत्ता अशी संकुचित नव्हती. छांदोग्योपनिषदामध्यें नारदानें चार वेदांव्यतिरिक्त भूतविद्या, क्षत्रविद्या, नक्षत्रविद्या, सर्पविद्या, देवविद्या, जनविद्या, इतिहास, पुराणें, न्यायशास्त्र, तर्कशास्त्र इत्यादि अनेक विद्यांचें व शास्त्रांचें अध्ययन केल्याचें सांगितलें आहे. आजच्या या भौतिकशास्त्रसंपन्नतेच्या काळांत सर्व बाजूंनीं इतर संस्कृतींचें आणि सत्तांचें हिंदु संस्कृतीवर आक्रमण होत असतांना त्याच्या प्रतिकारार्थ या सर्व ज्ञानाची व विद्यांची आवश्यकता फारच आहे. यास्तव आजच्या जगांतील ज्ञान, आजच्या विद्या, आजचीं शास्त्रें, शस्त्रें, शिस्त, संघटना हीं सर्व हस्तगत केलीं पाहिजेत. केवळ वेदाध्ययनांत गुरफटून भागणार नाहीं, असेंच नवा हिंदुधर्म सांगतो. पण त्याकरितां उपनयन संस्कार अनवश्यक आहे, असें नव्हे.

**(३८८) संस्कृतीचीं द्वारें मोकळीं कराः**—अखिल हिंदूंना द्विजत्वाचा अधिकार आणि वेदाधिकार देऊन नवा हिंदुधर्म असें घोषित करतो कीं, यापुढें हिंदु संस्कृतीचीं सर्व द्वारें अखिल हिंदूंना पूर्ण मोकळीं आहेत.

हिंदु संस्कृतीच्या क्षेत्रांत जें जें मानाचें, वैभवाचें, कर्तृत्वाचें स्थान असेल तें तें मिळविण्यास नवा हिंदुधर्म प्रत्येक हिंदूला पूर्ण स्वातंत्र्य देतो. त्यामुळें पात्रता असलेल्या कोणत्याही हिंदूला शंकराचार्य होतां येईल, जगद्गुरूचा मानही पटकवितां येईल, संस्थानिक होतां येईल नि पराक्रमानें राजाही होतां येईल. सत्ता, संपदा, व संस्कृति हीं समाजाचीं पुरुषार्थ केंद्रें होत. आज सत्तेकरितां विग्रह चाललेला आहे. संपत्तीच्या विषम वांटणीची पुनर्घटना झाली पाहिजे असेंही आंदोलन सुरू आहे. अशावेळीं हिंदु संस्कृति ही विशिष्ट वर्गांच्या मालकीची राहाणार नाहीं. हिंदुसंस्कृतीचे प्रणेते, तिचे वर्धक, रक्षक, पुरस्कर्ते, कर्मवीर आणि धर्मवीर हे सर्व अखिल हिंदूंचे अभिमानास्पद आदर्श होत. व्यास, वाल्मिकी, पाणिनी, पतंजली, गौतम, कणाद, जैमिनी, शंकराचार्य, महावीर, पार्श्वनाथ, गौतमबुद्ध, बसवेश्वर, गुरूनानक, गुरुगोविंद, चैतन्य, ज्ञानेश्वर, रामदास, तुकाराम, चंद्रगुप्त, आर्यचाणक्य, विक्रमादित्य, राणा प्रताप, शिवाजी, धनाजी, संताजी, महर्षी दयानंद, महात्मा फुले इत्यादि सर्व अखिल हिंदूंच्या अभिमानाचीं स्थानें आहेत. त्याविषयीं अखिल हिंदूंना कडकडून अभिमान वाटला पाहिजे. अखिल हिंदूंचा धर्म एक, ग्रंथ एक, संस्कृति एक, वंश एक, अशा एकतत्वांनी हिंदुसमाज बद्ध झालेला आहे, म्हणूनच सांस्कृतिक क्षेत्रांत उच्चांत उच्च स्थान मिळविण्याला प्रत्येक हिंदूला पूर्ण वाव आहे. नवा हिंदुधर्म कोणाही हिंदूच्या उत्कर्षाच्या मार्गांत जातीची वा जन्माची आडकाठी ठेवीत नाहीं.

( ३८९ ) **सुटसुटीत संस्कार**:—उपनयनादि संस्कार वेदोक्त पध्दतीनें करण्याचा अखिल हिंदूंना अधिकार आहे. उपनयन संस्कार हा बहुतेक पिताच करतो. पिता अतज्ज्ञ असल्यास त्यानें तो तज्ज्ञाकडून करवावा. तज्ज्ञांनीं कोणाही हिंदूकडे त्यानें बोलाविल्यास संस्काराकरितां अवश्य जावें, व वेदमंत्रांनीं संस्कार करावेत. आज ज्यांना वेदोक्त पद्धतीनें संस्कार करून घ्यावयाचे आहेत त्यांना तज्ज्ञ मिळत नाहींत अशी अडचण आहे. कारण जे तज्ज्ञ आहेत त्यांना संकुचित विचारामुळें अखिल हिंदूंचे संस्कार वेदमंत्रांनीं करण्यास उत्साह वाटत नाहीं. ही आपत्ति टाळण्याकरितां धर्मनिर्णयमंडळानें नव्या परिस्थितीला इष्ट असा अखिल हिंदूंकरितां सोपा, सुटसुटीत, वेदमंत्र व भाषांतर यांनीं युक्त असा संस्कार प्रयोग तयार केलेला आहे.

त्याच्या आधारें अखिल हिंदूंनीं उपनयन संस्कार अवश्य करावा व आपली धर्मवृत्ति वाढवावी.

(३९०) **पौरोहित्यः**—उपनयनादि संस्कार करण्यास भट अगर ब्राह्मण अवश्य लागतो. तो देव व मनुष्य यांमधील मध्यस्थ आहे, इत्यादि कल्पना जुन्या हिंदुधर्मांतही नाहींत आणि नव्या हिंदुधर्मालाही त्या मुळींच मान्य नाहींत. या कल्पना अहिंदु संप्रदायांत आहेत व त्याचें अनुकरण म्हणून 'भटांचें बंड', 'ब्राह्मणांचें बंड' असे शब्दप्रयोग रूढ झाले आहेत. जसा आपण तज्ज्ञ म्हणून घर बांधण्यास गवंडी, दार करण्यास सुतार व इजामतीस न्हावी बोलावतों, त्याचप्रमाणेंच तज्ज्ञ म्हणून ब्राह्मणाला बोलवावयाचें असतें. दक्षिणा हें पुण्यकर्म नसून त्याच्या कामाची मजुरी आहे, असें यज्ञप्रसंगींही सांगितलेलें आहे. यज्ञाचें फळ यजमानाला मिळतें कां ब्राह्मणाला मिळतें असा प्रश्न मीमांसाशास्त्रांत (अ. २, पाद. ७–८) उपस्थित केला आहे. त्याचें उत्तर यज्ञाचें फल यजमानालाच मिळतें; कारण त्यानें दक्षिणा देऊन ब्राह्मण विकत आणलेले असतात, 'दक्षिणादानेन ऋत्विजः कर्मकराः परिक्रेतव्याः', 'यजमानेन क्रीताः कर्तारः' असें दिलेलें आहे. यावरून मध्यस्थ नि दलाल ही कल्पना अहिंदु समाजांतील आहे, हें वाचकांच्या ध्यानीं येईल.

उपनयन संस्कारामुळें उपनीताची व त्याचें उपनयन करणाऱ्याची पात्रता व जबाबदारी वाढते. उपनयनांगभूत व्रतादेश असतो तोही आजच्या परिस्थितीच्या दृष्टीनें आचरणीय आहे. उपनयनसंस्कारामध्यें वैदिक व लौकिक अशा दोन्ही गोष्टींची भेसळ झालेली आहे. यास्तव धर्मनिर्णयमंडळाच्या प्रयोगाप्रमाणें शास्त्रोक्त, सूत्रोक्त अवश्य तेवढा विधि सर्व हिंदूंनीं करावा व इतर विधीला फांटा द्यावा.

(३९१) **द्विजत्व व विशिष्ट अधिकारः**—उपनयनामुळें द्विजत्व प्राप्त होतें व द्विजत्वामुळें कांहीं विशिष्ट अधिकारही प्राप्त होतो. आजच्या हिंदु-समाजांत द्विज व अद्विज असे भेद आहेत. द्विजांना जे धार्मिक व व्यावहारिक अधिकार आहेत ते अद्विजांना नाहींत. द्विजाच्या मुलाचें जर उपनयन न झालें तर तो पित्याच्या मिळकतीचा वारसही न ठरण्याचा संभव आहे!

एखाद्या अनुपनीत द्विजपुत्रानें जर वेदोक्त पद्धतीनें आपलें लग्न करून घेतलें, तर तें लग्न असिद्ध होण्याचाही संभव आहे! तसाच अनुपनीत द्विजानें वेदोक्त पद्धतीनें जर एखादा मुलगा दत्तक घेतला तर तोही वारस ठरण्यास अडचण येऊं शकेल. कारण तो अनुपनीत आहे, तो अद्विज आहे, अतएव त्याला वेदाधिकार नाहीं. म्हणून वेदोक्त पद्धतीनें केलेला विवाह अगर दत्तविधान या अधर्म्य गोष्टीच ठरतील. कारण उपनयनाविना वेदाधिकारच नाहीं. कायद्याच्या दृष्टीनें मुद्दाम उकरून काढतां येतील अशा अडचणी पुष्कळ आहेत. यास्तव जे उपनयनादि संस्कार करून घेत नसतील त्यांनीं हें संकट अवश्य ध्यानांत ठेवावें. अखिल हिंदु स्त्रीपुरुषांचे उपनयन, विवाह व अंत्येष्टि असे तिन्ही संस्कार वेदोक्त मंत्रांनीं होऊं लागले म्हणजे द्विज व अद्विज असा भेद राहाणार नाहीं, आणि व्यवहारांत विवाह, दत्तक, वारसा यांच्या अडचणीही उत्पन्न होणार नाहींत.

अखिल हिंदु स्त्रीपुरुषांनीं उपनयनाप्रमाणें विवाह हा एक संस्कार ज्यांना विवाहबद्ध व्हावयाचें असेल त्यांनीं करून घ्यावा. वैवाहिक जीवनांत ज्यांना पडावयाचेंच नसेल त्यांची गोष्ट वेगळी. विवाहसंस्काराचें महत्त्व, पद्धति, प्रयोग आणि इतर अवांतर विषयांचें विवेचन मागें अठराव्या प्रकरणांत केलेलेंच आहे.

उपनयन व विवाहसंस्काराप्रमाणें पतितांना शुद्ध करून व अहिंदूंना हिंदु करून घेण्याकरितां शुद्धि व व्रात्यस्तोम संस्कारांची आवश्यकता आहे. कारण हे संस्कार होतांच त्यांना वेदाधिकार व उपनयनाधिकारही प्राप्त होतो. यास्तव प्रथम त्यांचें स्वरूप दाखवून नंतर हिंदुमात्राचा जो शेवटचा अंत्येष्टि संस्कार त्याचा विचार करूं.

—*—

# प्रकरण पंचविसावें

## * शुद्धि नि व्रात्यस्तोम संस्कार

(३९२) **संख्या व समाजः**–गेल्या प्रकरणांत हिंदुमात्राला जे आवश्यक संस्कार त्यांचें विवेचन केलें. प्रस्तुत प्रकरणांत हिंदूंतून अज्ञानानें, छलबलानें, स्खलनशीलपणानें व अन्य कारणांनें जे अन्य धर्मांत जातात, त्यांच्या शुद्धिसंस्काराचा, आणि जे अन्यधर्मीय (हिंद्वेतर) आहेत अशांना हिंदु-समाजांत घेतांना जो व्रात्यस्तोम संस्कार करावा लागतो, त्याचाही विचार कर्तव्य आहे. कोणताही समाज स्थिर राहाण्यास त्याची संख्या वाढली पाहिजे, निदान जी असेल ती स्थिर असली पाहिजे. विविध कारणांनीं समाजाची संख्या जर घटत जाईल तर त्या समाजाचें अस्तित्व फारच लौकर संपुष्टांत येईल. एका काळीं हिंदुसमाजाची संख्या शंभर कोटी होती. पैकीं छपन्न कोटी यादवच होते, असें वर्णन पुराणांत आढळतें. ती संख्या घटत घटत हल्लीं तीस कोटीवर आलेली आहे. हिंदुसमाजाची ही संख्या छल, बल, छद्म, अपकृत्य इत्यादि कारणांनीं इतःपर घटूं नये आणि तिची भर अहिंदु समाजामध्यें होऊं नये, याकरितां अवश्य यत्न केला पाहिज, असा नव्या हिंदुधर्माचा आदेश आहे.

(३९३) **धर्माचें स्थानः**–कारणें कोणतींही असोत, पण मध्यकालीं अशी एक दुर्बल विचारसरणी आली कीं तीमुळें हिंदुसमाजाची संख्या घटली ! मनुष्य खाऊनपिऊन बाटतो, व तो एकदां हिंदुधर्मांतून गेला कीं कायमचा जातो, या समजुतीचा लाभ अहिंदु समाजानें घेतला. हिंदु होण्याला हिंदूच्या पोटीं जन्मच घ्यावा लागे, पण हिंदूंतून अन्यधर्मांत जाण्याला मात्र खाण्या-पिण्याचें निमित्तही पुरेसें झालें ! अर्थात् **धर्माचें स्थान पोट नसून, डोकें आहे,** हें तत्त्व विसरलें गेलें ! एकदां मनुष्य हिंदु समाजांत जन्माला आला तर तो संस्कारबलानें या जन्मीं तर हिंदु राहातोच, पण तो जन्मोजन्मीं संस्कारानें

---

* शुद्धिसंबंधीं तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचें ' शुद्धिसर्वस्व,' आणि विद्यानिधि चित्रावशास्त्रीकृत ' शुद्धिसंस्कार ' हीं पुस्तकें पहा.

हिंदूच राहातो. तो खाण्यापिण्यानें वा अन्यधर्मीयांशीं विवाह करूनही बाटत नाहीं. जो बाटतो तो हिंदु नव्हे, असें नव्या हिंदुधर्मांचें तत्त्व आहे.

**(३९४) पतननिमित्तेंः**—जुन्या धर्मशास्त्रांत अध्यापन, सहासन, संभाषण, सहयान, सहपान, सहभोजन इत्यादि कारणांनीं पातित्य येतें, असें म्हटलेलें आहे. जुन्या धर्मशास्त्रांत जीं पतननिमित्तें सांगितलेलीं आहेत तीं त्या कालाला योग्य होतीं. आजचा काल बदलला आहे. पूर्वीपेक्षां समाजांची व राष्ट्रांची गुंतागुंत अधिक झालेली आहे, म्हणून ते जुने विधिनिषेध पाळणें कठीण आहे. उदाहरणार्थ—

संवत्सरेण पतति पतितेन सहाचरन् ।
याजनाध्यापनाद्यौनादेकशय्यैकभोजनात् ॥ —हारित
अज्ञानादथवा मोहात् कुर्यादध्यापनं द्विजः ।
संवत्सरेण पतति सहाध्ययनमेव च ॥
संवत्सरं तु पतितैः संसर्गं कुरुते तु यः ।
यानशय्यासनैर्नित्यं जानन्वै पतितो भवेत् ॥ —कूर्मपुराण
संवत्सरेण पतति पतितेन सहाचरन् ।
भोजनासनशय्याभिः कुर्वाणः सार्वकालिकम् ॥ —देवल

ज्यामुळें प्रत्येक हिंदूला पातित्य येईल अशीं अनेक निमित्तें आहार, शिक्षण, व्यवसाय, दळणवळण यांमुळें आज उत्पन्न झालेलीं आहेत. त्यांतून अमुक एक व्यक्ति सुटूं शकेल अशी स्थिति नाहीं. यास्तव जागतिक परिस्थिति, आणि अहिंदूंचे स्वसमाजाची संख्या वाढविण्याचे चाललेले भगीरथ प्रयत्न ध्यानीं घेऊन हिंदुसमाजानें शुद्धीचा धडाका उडवावा, अशी नव्या हिंदुधर्मांची आज्ञा आहे.

**(३९५) शुद्धि ही अमरवल्लीः**—शुद्धि ही समाजाची संख्या स्थिर ठेवणारी अमरवल्ली आहे. समाजाचे इच्छित मनोरथ परिपूर्ण करणारी ती कामधेनु आहे. किंबहुना शुद्धि हा एक कल्पवृक्ष आहे, असें म्हटल्यास चालेल. कारण यामुळें असलेली संख्या स्थिर ठेवतां तर येतेच, शिवाय अहिंदूंतून जे चांगले घटक हवे असतील तेही पचवितां येतात. शुद्धि म्हणजे

मोठा बाऊ नसून अगदीं साधी गोष्ट आहे. समजा, एखाद्याच्या खिशाला छिद्र असल्यामुळें एक रुपया त्यांतून वाटेवरील शेणांत पडला! शेणांत पडलेला तो रुपया त्यानें तसाच पडूं द्यावा काय? मुळींच नाहीं. तो हातांत घेऊन, धुवून किंवा हातरुमालानें पुसून, म्हणजे त्या रुपयाची शुद्धि करून त्याला खिशांत ढकलावें! हिंदु समाजाच्या खिशांतून जे असे रुपये बाहेर कर्दमांत पडलेले आहेत, त्यांना हिंदुसमाजांत अल्पप्रायश्चित्तानें पुन्हां समाविष्ट करणें म्हणजे शुद्धि होय.

(३९६) जशास तसें वागाः—हिंदुसमाजांतून जे लोक स्वेच्छेनें, विचारपूर्वक अहिंदुसंप्रदायांत गेले असतील किंवा जातील त्यांच्या वाटेस मुळींच जाऊं नये. पण जे छलबलानें, अज्ञानानें, अपकृत्यानें अहिंदुसमाजांत गेले असतील व ज्यांची परत हिंदुसमाजांत येण्याची इच्छा असेल त्यांना अतित्वरेनें हिंदु समाजांत समाविष्ट करून घ्यावें. छलबलानें जे स्वतःच काय पण ज्यांचे पूर्वजही बाटले असतील अशांनासुद्धां हिंदुसमाजांत स्थान देण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. कारण **छलबलानें दिलेलें दान, घेतलेला भोग व केलेला व्यवहार हा वस्तुतः असिद्ध असतो** असें शास्त्र आहे; (मनु. अ. ८ श्लो. १६८) व कायदाही हें तत्त्व मान्य करितो.

जुलमानें एखाद्याच्या तोंडांत जर कोणीं गोमांस घातलें तर त्याच्या मुखांत पुन्हां गोरस घालून, बाप्तिस्म्याचें पाणी अंगावर पडलें म्हणून जर एखादा मनुष्य अहिंदु होत असेल तर लगेच गंगोदक त्याच्या अंगावर शिंपडून, जुलमानें कुराण किंवा बायबलावर हात ठेवला म्हणून जर एखादा हिंदु अहिंदु समजला जात असेल तर लगेच त्याचे हातांत गीता देऊन, छलानें सुंता केली म्हणून जर कोणी अहिंदु होत असेल तर लगेच त्याचे कान टोंचून त्याला हिंदु करून घेण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. छलबलादि ज्या ज्या उपायांनीं अहिंदुसमाज हिंदूंची संख्या घटवीत असेल त्या त्या उपायांचा 'जशास तसें,' या न्यायानें अवलंब करून हिंदुसमाजाची संख्या स्थिर ठेवलीच पाहिजे.

(३९७) संख्या घटत आहेः—हिंदुसमाजाच्या औदासीन्याचा लाभ घेऊन अहिंदुसमाजांनीं हिंदु समाजाची संख्या कशी घटविली याचें

एक ठळक उदाहरण बंगाल हें होय! कै. यू. एन्. मुकर्जी म्हणतातः "१८७२ ते १९०१ सालापर्यंत बंगाल्यांतील हिंदूंची लोकसंख्या १७१ लक्षांची १९४ लक्षापर्यंत गेली. पण तेवढ्याच काळांत अहिंदूंची संख्या १६७ लक्षांची २२० लक्षापर्यंत गेली!" मॉडर्न रिव्ह्यूचे संपादक कै. श्री. रामानंद चतर्जी यांनीं सुरतेस महासभेच्या अध्यक्षपीठावरून असें घोषित केलें कीं, १८८१ ते १९२१ पर्यंत म्हणजे चाळीस वर्षांत हिंदूंची संख्या १७७ लक्षांनीं घटली, अर्थात् अहिंदूंची संख्या त्या मानानें तिकडे वाढली. दर हजारीं कमींत कमी साठ या प्रमाणांत हिंदूंची संख्या दर दहा वर्षांत घटते, असें तज्ज्ञ म्हणतात. पंजाब प्रांताचा शिरगणतीचा अधिकारी १९२१ च्या वृत्तान्तांत म्हणतो कीं, गेल्या दहा वर्षांत एक लक्ष साठ हजार हिंदु अहिंदु समाजांत गेले. कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजचे प्रिन्सिपाल कै. डॉ. बालकृष्ण यांनीं औंधच्या 'वैदिकधर्म' मासिकांत परिश्रमपूर्वक जी माहिती दिली आहे तीवरून हिंदुसमाजाची संख्या सारखी घटत आहे, असें सिद्ध होतें. डॉ. बाळकृष्ण शर्मा लिहितातः—( आंकडे लक्षांचे आहेत. )

(३९८) बोलके आंकडेः—

| इ. सन | १८८१ | १८९१ | १९०१ | १९११ | १९२१ |
|---|---|---|---|---|---|
| हिंदु | १८७९ | २०७१ | २०७१ | २१७५ | २१६२ |
| मुसलमान | ५०७ | ५७३ | ६२४ | ६६६ | ६८७ |
| ख्रिस्ती | १८ | २२ | २९ | ३८ | ४७ |

या आंकड्यांवरून पहिल्या दहा वर्षांत १०० चे ११० हिंदु, ११४ मुसलमान व १२२ ख्रिस्ती अशी वाढ झाली. दुसऱ्या दहा वर्षांत १०० चे १०० च हिंदु, १०८ मुसलमान व १२७ ख्रिस्ती अशी वाढ झाली. तिसऱ्या दहा वर्षांत १०० चें १०५ हिंदु, १०६॥ मुसलमान व १३२॥ ख्रिस्ती अशी वाढ झाली, आणि शेवटच्या दहा वर्षांत १०० चें ९९॥ हिंदु, १०५ मुसलमान व १२२॥ ख्रिस्ती अशी स्थिति झाली!!

सरकारी शिरगणतीच्या प्रतिवृत्तावरूनही असें अनुमान निघतें कीं, १९११ ते १९२१ या दहा वर्षांत हिंदुसमाजाची संख्या ११२ लक्षांनीं कमी झाली असून तितकीच वाढ अहिंदुसमाजाची झालेली आहे. हिंदु-

समाजांत ज्या पुढारलेल्या प्रमुख अशा ८५ जाति आहेत, त्यांतील ५२ जातींचा ऱ्हास मोठ्या वेगानें होत आहे असेंही तज्ज्ञ म्हणतात. अन्य-जातिविषयीं बोलावयास नको.

**(३९९) अहिंदूंचे भगीरथ प्रयत्नः**–हिंदुसमाजाची संख्या घटविण्याकरितां अहिंदूंचे कसकसे यत्न चालले आहेत, हें हिंदूंनीं विशेष ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. सबंध हिंदुस्थानांत इंग्लंड, अमेरिका, जर्मनी, स्वीडन, नॉर्वे व कानडा येथील मिशनें असून त्यांच्या ख्रिस्ती धर्मप्रसाराच्या सुमारें ७०० संस्थांवर त्यांचे अंदाजीं दरसाल ५०।६० कोट रुपये खर्च होत आहेत. उभ्या हिंदुस्थानांत ७०१० नेटिव्ह लोक ख्रिस्ती धर्माचा प्रसार करतात. सुमारें १९००० पाद्री बाहेरचे असून त्यांत २१३१ युरोपियन पुरुष आहेत. १४८१ विवाहित युरोपियन स्त्रिया आहेत, २४०८ कुमारिका आहेत व इतर दुसरे लोक आहेत. खिस्ती धर्मोपदेशक तयार करण्याच्या शाळा ६१ असून १४१ अनाथालयें आहेत. हातकाम शिकविणारीं १७० शिल्प-विद्यालयें, माध्यमिक शिक्षण देणारीं ६१७ हायस्कुलें, मोठ्या लोकांना साक्षर करणाऱ्या रविवारच्या शाळा १५८२०, व शेतकी शिक्षण देणाऱ्या शाळा ९८ आहेत. ५० कॉलेजें, ९४ ट्रेनिंग विद्यालयें, ४३ छापखाने, ९९ वृत्तपत्रें, ४०८ दवाखाने अशा संस्था त्यांनीं चालविल्या असून सुमारें दीड हजार डॉक्टर्स व नर्सेस आणि पांच हजार शिक्षक व शिक्षकिणी काम करीत आहेत. कॉलेजें व शाळा यांतील हिंदु विद्यार्थ्यांची संख्या जवळ जवळ साडेपांच लक्ष असून त्यांमध्यें दोन लाखापर्यंत नुसत्या मुलीच आहेत. सर्व संस्थांच्या सभासदांची संख्या ८ लक्ष असून वर्गणी सुमारें २९ लक्ष रुपये गोळा होते. खिश्चनांचे हे प्रयत्न हृदयविदारण करण्यासारखे नाहींत काय ?

खिस्ती मिशनऱ्यांप्रमाणें मुसलमानांचेही यत्न चालू आहेत. मुसलमान पुढारी, मौलवी, संस्थानिक, गुंड व फकीर हे सर्व हिंदूंची संख्या घटविण्याचा उद्योग तनमनधनेंकरून करीत आहेत. दिल्लीच्या हसन-निजामींनीं एक कोट हिंदूंना अहिंदु करण्याचे यत्न चालविले आहेत. त्या कामीं त्यांना निजामसाहेबांचें साह्य आहे, असा लोकांत समज आहे. आगाखानी पंथ, पीरजादे पंथ, सुफी पंथ झपाट्यानें वाढत असून

त्यांचें हिंदु समाजावर आक्रमण चाललेलें आहे. निजाम सरकार या प्रीत्यर्थ म्हणे दरसाल तेरा लक्ष रुपये खर्च करते, तर भोपाळची बेगम तीन लक्ष रुपये खर्च करून अहिंदूंना हिंदु करणें हा कायद्यानें गुन्हा आहे असें ठरविते. मुसलमान संस्थानिक, मुसलमान पुढारी, व्यापारी वगैरे सर्व हिंदूंच्या बरोबरीनें आपली संख्या व्हावी म्हणून अट्टाहासानें यत्न करीत आहेत. मुसलमानांतील तबलीघ चळवळीचे पुरस्कर्ते बॅ. अमीन हे सबंध आयुष्यांत निदान तीन तरी हिंदु बाटवावे असें सांगत आहेत. पन्ना, बुंदेलखंड, जामनगर, काठेवाड, भावनगर, लायलपूर अशा भागांत मुसलमानांची संख्या वाढत आहे, व हिंदूंची घटत आहे.

(४००) **सरकारचें धोरणः**—इंग्रज सरकारही हिंदु समाजाचा ऱ्हास करण्यास टपून बसलेलें आहे. शिरगणतीचे अधिकारी अलिप्तपणा न ठेवतां मुसलमानांचे पक्षपाती होतात व कांहीं हिंदु जातींना अनेक कारणें दाखवून ' अहिंदु ' सदरांत ढकलीत असतात. ब्राह्मणांचें वर्चस्व नाकबूल करणें, ब्राह्मणादि जातींकडून मंत्रोपदेश न घेणें, वेदप्रामाण्य नाकबूल करणें, मोठमोठ्या हिंदु देवतांना न भजणें, ब्राह्मणांकडून पौरोहित्य करवून न घेणें, स्पृश्य हिंदूंनीं कांहींचा विटाळ न मानणें, असल्या सबबींवर कांहीं हिंदूंना सरकारी अधिकारी अहिंदु सदरांत घालतात.

(४०१) **निसर्ग व वृद्धिः**—वरील तीन प्रकारांनीं हिंदूंची संख्या घटत असतांना ती उघड्या डोळ्यांनीं पहाणें, हें हिंदूंना लांछनास्पद आहे. आजचा काल लोकशाहीचा आहे. ना राजशाही, ना झोटिंगशाही अशी ही सुबुद्ध माणसांच्या मतावर आधारलेली लोकशाही आहे. लोकशाहींत संख्येला महत्त्व आहे. संख्या टिकविणें व वाढविणें हें सृष्टिसंकल्पाविरुद्ध नाहीं. 'एकोऽहं बहुःस्याम्' हा मुळीं सृष्टीचाच संकल्प आहे. एकाचे पांच, पांचाचे पन्नास, पन्नासाचे पांचशें व्हावें अशी इच्छा मनुष्यप्राणि करतो. पसा पेरून पायली धान्य यावें, पायलीभर पेरून खंडीभर यावें, बागेंत केळी वाढाव्या, गोठ्यांत गायी म्हशींचीं वासरें बागडावींत, घरांत मुलांबाळांची म्हणजे गृहरत्नांची शोभा असावी, अशी इच्छा प्रत्येक मनुष्य करतो. हें निसर्गाला धरून आहे. श्रीरामचंद्रांना रावणहननार्थ वानरगणांची संख्या अवश्य होतीच ना ? श्रीकृष्णाला गोपाळगण, शिवाजी महाराजांना

मावळे, लोकमान्य टिळकांना स्वराज्यवादी, यांची संख्या सहाय्य करीत होती. तात्पर्य संख्येलाही या जगांत महत्त्व आहे. अहिंदूंची संख्या वाढत असतांना मी एकटा एक सनातनधर्मी जगाच्या अंतापर्यंत राहिलों तरी पुरे अशी वृत्ति धारण करणें आत्मघातकीपणाचें आहे. संख्यावृद्धि ही जगाची नैसर्गिक प्रवृत्ति आहे, म्हणून हिंदु समाजानें अहिंदूंना हिंदु करून '**विश्वाला आर्य करण्याची**' कृति केली पाहिजे. विश्वाला आर्य करणें म्हणजे मनुष्यमात्राला उच्च संस्कृति देऊन सुसंस्कृत करणें होय.

**(४०२) हिंदूकरण म्हणजे काय?**:—अहिंदु संप्रदाय हे अन्यधर्मीयांविषयीं अनुदार आहेत, असहिष्णु आहेत, पंथ, देवता, साधु यांसंबंधीं दुराग्रह धरून ते मानवी बुद्धिस्वातंत्र्य हरण करणारे आहेत. अहिंदु समाजांतील ही वृत्ति मानवी कल्याणाच्या दृष्टीनें अनिष्ट आहे. मनुष्यमात्रांत उच्च ध्येय, उच्च विचार, समत्वबुद्धि यावी, बुद्धिस्वातंत्र्य मिळून मानव्याचा विकास व्हावा, म्हणूनच अहिंदु समाजांना हिंदु बनविलें पाहिजे. हिंदूकरण म्हणजे अल्पाला मोठें करणें होय. ज्याला अध्यात्म तत्त्वज्ञान माहित नाहीं त्याला तें सांगून मनःशांतीचा मार्ग दाखविणें, म्हणजे हिंदूकरण होय.

**(४०३) आर्यसमाजाचें कार्य**:—हें कार्य आज सबंध हिंदुस्थानांत आर्यसमाजाचे अनुयायी सर्वांपेक्षां मोठ्या उत्साहानें, त्यागानें व प्राण पणाला लावून करीत आहेत. कॅस्पियन समुद्रकांठीं कश्यप ऋषीनें पूर्वी आर्यीकरण केलेलें आढळतें. तसेंच देवल ऋषीनें अरबी समुद्रावर आर्यीकरणाचा आखाडाही स्थापिला होता, हें ८ व्या शतकांतील देवल स्मृतीवरून उघड होते. त्याप्रमाणें आज आर्यसमाज शुद्धिकार्य करीत आहे. महाराष्ट्रांत कोल्हापूर आर्यसमाज, मसुराश्रम, खानदेशांत हिंदुत्व–निष्ठांनीं चालविलेला आश्रम व अनेक स्थानिक हिंदुसभा शुद्धिकार्य करीत आहेत. यामुळेंच अहिंदु समाजांचा आर्यसमाजावर फार राग आहे. म्हणून त्यांनीं आजपर्यंत अनेक आर्यवीर ठार केलेले आहेत. हिंदुसमाजरूपी गुबगुबीत शेळी हें आपलें भक्ष्य आहे, असें अहिंदु समाजांना पूर्वी वाटत असे. पण स्वामी श्रद्धानंद आणि इतर कर्ते वीर यांनीं तो समज घालवून केलेलें शुद्धिकार्य अहिंदु समाजाला चांगलें झोंबलें, म्हणूनच पुण्यश्लोक स्वामी

श्रद्धानंदांची हत्त्या झाली, आणि त्यानंतर अनेक आर्यवीरांचे बळी अहिंदु समाजानें घेतले. यावरून अहिंदु समाजाला शुद्धीचें किती भय वाटतें, त्यांच्या अस्तित्वाला शुद्धि किती जाचक आहे, याची स्पष्ट कल्पना येते.

(४०४) **काळा पहाडः**—पूर्वी शुद्धीच्या अभावीं पूर्वबंगालमध्यें अहिंदु समाजाची संख्या कालीप्रसादसेनासारख्या काळ्या पहाडांनीं निर्माण केली. त्यानें म्लेंच्छ तरुणीशीं विवाह केला म्हणून हिंदुसमाजानें त्याला देहांत प्रायश्चित्त सांगितलें. त्यानें स्वसमाजाचा अनुग्रहार्थ अनुनय केला, परंतु समाजाच्या निर्घृणपणामुळें त्याला धर्मांतर करावें लागलें! अर्थात् त्यानें त्या त्वेषानें अहिंदूंची संख्या वाढविली! काश्मिरांतही पूर्वी ह्याच प्रकार झाला. मलबारांतील मोपल्यांची वाढ याच संकुचितपणामुळें झाली. हिंदुसमाजानें मध्यकालांतील सर्व दुबळ्या कल्पना टाकून सर्वांना पचविण्याचें सामर्थ्य आतां अंगीं आणलें पाहिजे.

**सर्वं बलवतां पथ्यं सर्वं बलवतां शुचि ।**
**सर्वं बलवतां धर्मः सर्वं बलवतां स्वकम् ॥**

—महाभारत १५।३०।२४.

बलवानाला सर्व पथ्यकर, धर्म्य, पवित्र असतें. त्याप्रमाणें समाज बलवान् झाला म्हणजे तो सर्व कांहीं पचवितो.

(४०५) **शुद्धि कशी पचवावी?**:—शुद्धिकार्याविषयीं साशंकता ठेवण्याचें मुळींच कारण नाहीं. वेदकालीं व युद्धोत्तरकालीं हा प्रचार होता. देवलस्मृतींत शुद्धीला भक्कम आधार आहे. लोकपरिचित भक्तिविजय ग्रंथांत बहिरंभटाच्या शुद्धीचा उल्लेख आहे. पंडितप्रकांड विद्यारण्यांच्या पंचदशींत पतितपरावर्तनास मान्यता आहे. श्रीछत्रपती शिवाजी महाराजांनीं बजाजी निंबाळकरांची शुद्धि केली इतकेंच नव्हे तर त्यांच्या थोरल्या मुलास आपली मुलगी देऊन सोयरीकही केली. महाराजांनीं नेताजी पालकराला शुद्ध करून घेतल्याचें इतिहासप्रसिद्ध आहे. वसई भागांत पाद्र्यांनीं जेव्हां भ्रष्टीकरणाचा कहर केला तेव्हां त्याचाही प्रतिकार तत्रस्थ यजुर्वेदी ब्राह्मणांनीं प्राण पणाला लावून केलेला आहे. तेथील यजुर्वेदी ब्राह्मणांनीं शेंकडों लोकांची शुद्धि केल्याचे उल्लेख पेशवेकालीन अधिकृत कागदपत्रांत आढळ-

तात. मूळचे हिंदु समाजांतील लोक जे पतित होऊन अन्य धर्मांच्या कर्द-मांत कित्येक पिढ्या रुतलेले आहेत, अशा सर्वांना देशकाल ध्यानांत घेऊन अल्प प्रायश्चित्तानें शुद्ध करून घेण्यास मुळींच अडचण नाहीं. पतितांना शुद्ध करून घेऊन त्यांना हिंदु समाजांतील व हिंदु धर्मांतील सर्व अधिकार दिले पाहिजेत. त्यांच्यांशीं जेवणें, विवाह करणें, त्यांच्या स्मशानयात्रेस जाणें, त्यांना आपल्या देवळांत आपल्या बरोबरीनें येऊं देणें इतकें केलें म्हणजे शुद्धि पूर्ण पचते, असें समजावें.

(४०६) पतितसंततिविचार:–जुनें धर्मशास्त्रही पतिताबद्दल व पतितसंततीबद्दल फारच उदार आहे. पतितकन्येविषयीं शास्त्र असें आहे:—

**कन्यां समुद्वहेदेषां सोपवासामकिञ्चनाम् ।२६१।** याज्ञवल्क्य.

या श्लोकावर विज्ञानेश्वरांनीं टीका करितांना वृद्धहारितांचें खालील वचन स्पष्टीकरणार्थ दिलेलें आहे.

**पतितस्य तु कुमारीं विवस्त्रामहोरात्रोपोषितां प्रातः शुक्लेनाहतेन वाससाऽच्छादितां नाहमेतेषां न ममैते त्रिरुच्चैरभिदधानां स्वगृहे वोद्वहेत ॥**

तसेंच वसिष्ठाचेंही एक वचन आहे.

**पतितपुत्रः पतितो भवत्यन्यत्र स्त्रियाः**
**सा हि परगामिनी तामरिक्थामुपेयात् ।**

या दोन्हीं वचनांचा आशय असा आहे कीं, पतिताची कन्या ही पतित नाहीं. ती दुसऱ्याच्या घरीं नांदावयास जाण्याची असल्यामुळें तिच्याशीं तीर्थावर अगर घरींही लग्न लावावें. मात्र बापाकडून कांहीं द्रव्य घेऊं नये किंवा तिजजवळ बापाकडील वस्त्रपात्र, द्रव्य कांहीं असतां कामा नये. तिनें उपास करावा. दुसऱ्यानें दिलेलें शुभ्रवस्त्र नेसावें आणि माझा व पतित बापाचा कांहीं संबंध नाहीं असें त्रिवार म्हणावें, म्हणजे ती स्वीकारण्यास योग्य होते.

पतितसंततीबद्दल शास्त्रप्रमाणें पुढील आहेतः—

अथ पतिताः समवसाय धर्मांश्चरेयुरितरेतरयाजका इतरेतराध्यापका मिथो विवहमानाः पुत्रान्संनिष्पाद्य ब्रूयुर्विप्रव्रजतास्मभ्यमेवमार्यान् संप्रतिपत्स्यथेति ॥ —बौधायन धर्मसूत्र.

ज्यांनीं प्रायश्चित् घेतलेलें नाहीं, अशा पतितांनीं आपला संघ करून पतितांना विहित अशा धर्मांचें आचरण करावें. त्यांनीं परस्परांत यजन, अध्यापन व विवाह करावेत. पुत्र निर्माण करून त्यांना असें सांगावें कीं, आमच्यापासून वेगळे व्हा. अशा रीतीनें शुद्ध होऊन तुम्हीं आर्यांत जाऊन मिसळूं शकाल.

हेंच वचन आपस्तंब धर्मसूत्रांतही आहे. वृद्धहारित धर्मसूत्रांतही असेंच म्हटलें आहे. वसिष्ठ व हारित यांच्या मतानें पतितपुत्र पतित होतो. बौधायनानें पतितपुत्राचा शुद्ध जातींत समावेश करण्याच्या वेळीं पुढील प्रायश्चित्त सांगितलें आहे.

अशुचिशुक्रोत्पन्नानां तेषामिच्छतां
प्रायश्चित्तिः पतनीयानां तृतीयोंऽशः ।

पतिताच्या शुक्रापासून उत्पन्न झालेल्या पुत्रांना इच्छा असल्यास त्रैवार्षिक व्रताच्या तृतीयांश प्रायश्चित्त द्यावें. तसेंच आपस्तंब धर्मसूत्रांत पतितास द्वादशवार्षिक व्रतरूप प्रायश्चित्त सांगितल्यानंतर असें म्हटलें आहेः—

ततः शुद्धिः अथसंप्रयोगः स्यादार्यैः ।

हें प्रायश्चित्त केल्यानंतर पूर्ण शुद्धि होते, आणि पुढें शुद्ध आर्यांशीं व्यवहार्यता पूर्णपणें येते. हें सूत्रकारांचें धोरण लक्षांत ठेवून तदनुसारी प्रायश्चित्तें देश, काल, वय, शक्ति हीं पाहून द्यावींत व शुद्धिकार्याचा पुरस्कार करावा.

(४०७) **धर्मनिर्णयमंडळाचा निर्णयः**—महाराष्ट्रांतील परिवर्तनवादी पंडितांनीं नव्या हिंदुधर्माला पोषक असे यासंबंधीं दिलेले पुढील निर्णय समुचित आहेतः—

(१) छल–बल–दौर्बल्यादि कारणांनीं ( अर्थात् अनिच्छेनें ) धर्मांतर झाल्यास अत्यल्प प्रायश्चित्तानें शुद्धि होते.

(२) स्वेच्छेनें धर्मान्तर झाल्यास अल्प प्रायश्चित्तानें शुद्धि होते.

(३) अनेक वर्षे अन्यधर्मीयांशीं भोजनादि व्यवहार झाल्यास पातित्याच्या प्रायश्चित्तानें शुद्धि होते.

(४) पतितसंततीची योग्य प्रायश्चित्तानें शुद्धि होते.

(५) अन्यधर्मीय संघांचा किंवा व्यक्तींचा व्रात्यस्तोमविधीनें वैदिकधर्मांत समावेश होऊं शकतो.

शुद्धिसंस्काराचें अवडंबर व खर्चाचा मोठा बाऊ करण्याचें कारण नाहीं. पतिताची इच्छा, शक्ति, बुद्धि व पश्चात्ताप हे ध्यानांत घेऊन स्नान, होम, उपास, जप अशा अल्प प्रायश्चित्तानें आणि

**प्रायश्चित्तं यथोद्दिष्टमशक्यं दुर्बलादिभिः ।**
**कार्योह्यनुग्रहस्तेषां लोकसंग्रहकारणात् ॥** –देवल

या देवलोक्त धोरणानें शुध्दिकार्य करावें.

**(४०८) अहिंदूंना पचविलें:**–जे लोक मूळचे हिंदु नाहींत, त्यांनाही त्यांची इच्छा असल्यास हिंदुसमाजांत व्रात्यस्तोम संस्कारानें घेतां येतें. पूर्वी अहिंदूंना हिंदुसमाजांत पचविल्याचीं उदाहरणें भविष्यपुराण–प्रतिसर्गपर्व, खंड १ अध्याय ६–७ मध्यें आढळतात. मनुस्मृति अ. १० श्लो. ४३–४४–४५ मध्यें पौंड्रक, द्रविड, कांबोज, शक, यवन, पारद, चीन, किरात, दर्द, खश इत्यादि क्रियालोपामुळें पतित झालेल्या नि वृषलतुल्य झालेल्या जातींचा उल्लेख आहे. त्यांना शुध्द करून हिंदुसमाजांत घेतां येईल, असें दर्शविण्याइतका मनु उदार दिसतो. वसिष्ठ स्मृतींतील पुढील वचन पतित हिंदु व अहिंदु या उभयतांच्या शुद्धीकरणाला लागू पडणारें आहे.

**पतितानां तु चरितव्रतानां प्रत्युद्धारः ॥ अथाप्युदाहरन्ति ।**
**अग्रेभ्युद्धरतां गच्छेत् क्रीडन्निव हसन्निव ।**
**पश्चात्पातयतां गच्छेत् शोचन्निव रुदन्निव ॥१४॥** –वसिष्ठ

पण यापेक्षां मोठा आधार अथर्ववेदांत आहे. प्राचीन काळीं हिंदुसमाज अहिंदुसमाजांतील चांगल्या स्त्रीपुरुषांना स्वतःमध्यें घेण्यास उत्सुक असे. त्यावेळीं व्रात्यस्तोम विधीनें त्यांचें समावेशन होई. व्रात्य म्हणजे हलके, सावित्रीपतित, भ्रष्ट, अशी समजूत बुद्धोत्तर कालांत झाली.

द्विजातयः सवर्णासु जनयन्त्यव्रतांस्तु यान्।
तान्सावित्रिपरिभ्रष्टान् व्रात्यानिति विनिर्दिशेत् ॥

(४०९) व्रात्य म्हणजे काय?:—मूळ व्रात्य शब्द 'व्राते भवः व्रात्यः,' 'संघ करून राहाणारे, वेदानुयायी लोकांहून भिन्न समाज' असा होता; पण पुढें 'व्रतमर्हति इति व्रात्यः,' असा अर्थ रूढ झाला. अथर्ववेदाच्या पंधराव्या कांडाच्या प्रस्तावनेंत सायण्णाचार्यांची म्हणून जी प्रस्तावना आहे, तीवरून व्रात्याची कल्पना येते.

अत्र काण्डे व्रात्यमहिमा प्रतिपाद्यते। व्रात्यो नाम उपनयनादिसंस्कारहीनः पुरुषः। सोऽर्थात् यज्ञादिवेदविहिताः क्रियाः कर्तुं नाधिकारी। न स व्यवहारयोग्यश्चेत्यादि जनमतं मनसिकृत्य व्रात्योधिकारी, व्रात्यो महानुभावो, व्रात्यो देवप्रियो, व्रात्यो ब्राह्मणक्षत्रिययोर्वर्चसो मूलं किंबहुना व्रात्यो देवाधिदेव एवेति प्रतिपाद्यते। यत्र व्रात्यो गच्छति विश्वं जगद् विश्वे च देवास्तत्र तमनुगच्छन्ति तस्मिन् स्थिते तिष्ठन्ति तस्मिंश्चलति ते चलन्ति। यदा स गच्छति राजवत् स गच्छतीत्यादि। न पुनरेतत् सर्वव्रात्यपरं प्रतिपादनम् अपि तु कंचिद्विद्वत्तमं महाधिकारं पुण्यशीलं विश्वमान्यं कर्मपरैर्ब्राह्मणैर्विद्विष्टं व्रात्यम् अनुलक्ष्य वचनम् इति मन्तव्यम्।

वरील उताऱ्यावरून व्रात्य हा असंव्यवहार्य, असंस्कृत पण अधिकारसंपन्न विद्वान् असा दिसतो. वेदांचे अभ्यासक वेबर, रमेशचंद्र दत्त, राजाराम रामकृष्ण भागवत इत्यादींनीं व्रात्यस्तोम हा संस्कार अहिंदूंना हिंदुसमाजांत समाविष्ट करण्याकरितां होता असें विधान केलेलें आहे. त्याचप्रमाणें ज्ञानकोशकार कै० डॉ० केतकर यांनीं व्रात्यस्तोमविधीनें एका जर्मन कुमारीला हिंदु समाजांत घेतलें व तिच्याशीं वैदिक पद्धतीनें विवाहही केला.

(४१०) कोणीही हिंदु होऊं शकतो.—या विधीनें कोणाही अहिंदूला हिंदु होतां येतें, उपनीत होतां येतें व वेदाधिकारही प्राप्त होतो. यास्तव पतितांच्या शुद्धीकरणाप्रमाणेंच अहिंदूंचें अभ्यावर्तनही अवश्य आहे.

व्रात्यस्तोमसंस्कार आणि प्रयोगविधि हाही सुटसुटीतच आहे. धर्मनिर्णय-मंडळानें यासंबंधाचा दिलेला पुढील निर्णय आचरणीय आहे:–

'अहिंदूस हिंदु करण्याचा विधि क्रमानें स्नान, शिष्टानुमति, शिष्टकृत वस्त्रदान, सूर्यदेवताक आज्यहोम, गोघृतप्राशन, विभूतिधारण, अभिषेक, शिष्टकृत उपदेश, व्रतोपायन आणि सूर्यदर्शन असा ठेवावा. अहिंदूंशीं विवाहसंबद्ध होणें असेल तेव्हां प्रथम या विधीनें त्यांना हिंदु करून घ्यावें.

(४११) **अडचणींचा बाऊ**:–पतितांचा प्रत्युद्धार केल्यावर आणि अहिंदूंना हिंदु बनविल्यावर त्यांना कोणत्या जातींत स्थान द्यावयाचें हा प्रश्न महत्त्वाचा आहे. नवा हिंदुधर्म जन्मजात उच्चता, नीचता व अस्पृश्यता मानीत नाहीं; तर तो अखंड एकजिनसी हिंदुसमाज पहातो. अफाट हिंदुसमाजाच्या पोटांत अशांना योग्य क्षेत्र मिळत नाहीं, असें तर कधींच होतां कामा नये. शुद्ध केलेल्याला स्वजातींत समाविष्ट करण्यास सर्व ज्ञातिबांधवांची संमति एकमतानें मिळणें हेंही असंभाव्य आहे; म्हणून ज्या गटांतील कांहीं लोक शुद्धीकृतांशीं व अभ्यावृतांशीं सहासन, सहभोजनादि व्यवहार करण्यास उत्सुक असतील त्यांत तो त्वरित समाविष्ट होतो. किंबहुना असेंही म्हणतां येईल कीं, ज्या पतिताला किंवा ज्या अहिंदूला हिंदुधर्माचा स्वीकार करावासा वाटतो, त्याच्याशीं मित्रत्वानें वागणारे हिंदु प्रथमपासूनच सहानुभूतीनें वागत असतात, सहभोजनादि व्यवहारही करतात आणि हें सर्व राजरोसपणें करतां यावें म्हणूनच त्याला संस्कारपूर्वक हिंदुधर्मांत येण्यास सांगतात. मित्रहिंदूंच्या सांगण्यामुळें अहिंदूचें वा पतिताचें मतपरिवर्तन होतें, मोकळ्या व्यवहाराला उगाच होत असलेली आडकाठी नष्ट करावी असें त्याला वाटतें, म्हणूनच तो हिंदुसमाजांत संस्कारपूर्वक येऊं इच्छितो. तात्पर्य संस्कारानंतर कोठें समाविष्ट करावें हा प्रश्न नसतो, तर त्यापूर्वींच त्यानें आपलें स्थान 'यथा कर्म यथा श्रुतम्' याप्रमाणें ठरविलेलें असतें. यास्तव समावेशनाची अडचण न आणतां शुद्धिसंस्कार व व्रात्यस्तोम संस्कार यांच्या साह्यानें हिंदुसमाजाची संख्या वाढविली पाहिजे, व आहे ती स्थिर ठेवली पाहिजे, असें नवा हिंदुधर्म सांगतो.

—*—

# प्रकरण सव्विसावें

## अंत्यसंस्कार, अशौच व श्राद्ध.

(४१२) **मृत्यु म्हणजे काय?** मनुष्याचें शरीर त्यांतून जीव निघून जातांच निरुपयोगी होतें. त्या शरीराची व्यवस्था योग्य तऱ्हेनें करणें अत्यावश्यक आहे. ही व्यवस्था आदरानें, यथाशास्त्र व संस्कारपूर्वक झाली पाहिजे. शरीर म्हटलें कीं त्याला जन्म व मृत्यु हे असतातच. मृत्युनंतरचा अंत्येष्टि हा शेवटचा संस्कार होय. तो आप्त, इष्ट, नातलग यांनीं करून मृताला सद्गति चिंतणें हें यथोचित आहे.

मृत्यु ही अवश्यंभावी अशी देहाची अवस्था आहे, परंतु त्याबद्दल माणसें शोक करीत बसतात. शोक करण्यानें गेलेला मनुष्य परत येत नाहीं, त्याचें व स्वतःचें हित होत नाहीं, म्हणून शोक न करतां यथाशक्ति आपलें कर्तव्य करावें, असें शास्त्रकार म्हणतात.

**नोपकुर्यान्नरः शोचन् प्रेतस्यात्मन एव वा ।** —अग्नि १५७
**शोचन्तो नोपकुर्वन्ति मृतस्येह जना यतः ।** —विष्णु. २०–३०
**अतो न रोदितव्यं हि क्रिया कार्या स्वशक्तितः ।** —या. व. अ. ३

शोक करणाऱ्यांना असें वाटतें कीं शरीरनाश म्हणजे जीवाचा आत्यंतिक नाश होय. परंतु हिंदुधर्मांत आत्मा अमर असून देह नश्वर असें मानलेलें आहे. आत्मा कर्माप्रमाणें पुनःपुन्हां जन्म घेतो व कर्मभोगार्थ भिन्नभिन्न शरीरें धारण करतो. एकाच शरीरांत कौमार, यौवन, जरा या अशा अवस्था अपरिहार्य आहेत त्याप्रमाणें देहांतर ही अवस्था अवश्य आहे. म्हणूनच गीतेंत जुनीं वस्त्रें टाकून नवीं धारण करणाऱ्या मनुष्या-प्रमाणें आत्मा जुनें शरीर टाकतो व नवें धारण करतो, असें म्हटलें आहे.*

**वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ॥**
**तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥४॥**
—गीता अ. २

---

* मृत्युसंबंधाचें मार्मिक विवेचन आमचा 'गीताप्रदीप' प्रकरणें १ ते ३ पहा.

हें तत्त्व ध्यानांत ठेवून शोक आवरून माणसांनीं मृत शरीराची व्यवस्था करावयास लागलें पाहिजे.

(४१३) 'मरणांतानि वैराणि':—मृताचे अगदीं जवळचे आप्तइष्ट त्या प्रसंगीं शोकाकुल होणारच. पण शेजारीपाजारी आणि इतर मित्र, आप्त व नातलग हेही मृत्यु अशुभ, प्रेताचें दर्शन अशुभ, रडण्याचा ध्वनि अशुभ, अशा समजुतीनें त्या प्रसंगीं येत नाहींत. ही अशुभाची कल्पनाही मूळ हिंदुधर्माच्या तत्त्वाविरुद्ध आहे. आत्मा हा अच्छेद्य, अदाह्य, अशोष्य असा आहे. शरीर हें झाडाच्या पानांप्रमाणें गळून पडणारच म्हणून कोणतेंही अशुभत्व न मानतां प्रेताच्या व्यवस्थेस शेजाऱ्यांनीं, आप्तेष्टांनीं, नातलगांनीं, फार काय पण शत्रूंनींही 'मरणांतानि वैराणि,' हें ध्यानांत ठेवून यावयास पाहिजे.

(४१४) प्रेतयात्रा व जुने निर्बंधः—प्रेतयात्रा, अंत्यविधि हे सव अशुभ समजल्यामुळें कोणी बाप जिवंत आहे म्हणून तर कोणी पत्नी गरोदर म्हणून प्रेत वाहण्यास येत नाहींत! कुणाचें अगदीं नडीचें काम त्याच वेळीं येतें आणि कांहीं पळे तर जवळ असें कांहीं होणार असें समजलें कीं दाराला कुलुपें ठोकून चालते होतात! प्रेतयात्रेहून आल्यानंतर एक दिवस उपास, नक्षत्रदर्शन, अशीं प्रायश्चित्तें सांगितलीं असल्यामुळें तीही अडचण कांहींचे मनांत येते. जुन्या हिंदुधर्मांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र इत्यादि भेद आहेत; म्हणून प्रेतयात्रेसही स्पर्शास्पर्श व विटाळ यांची आडकाठी येतेच. "असपिंड द्विजाच्या प्रेतयात्रेस गेल्यास तीन दिवसांनीं शुद्धि होते. ब्राह्मणाचें प्रेत शूद्रादिकांनीं नेल्यास मृताला अधोगति मिळते. मृत द्विजाला शूद्रानें नेऊं नये व मृत शूद्राला द्विजानें खांदा देऊं नये. अज्ञानानें ब्राह्मण जर वैश्याच्या प्रेतयात्रेस गेला तर तो दोन रात्रीं अशौच पाळल्यानें शुद्ध होतो. ब्राह्मण जर शूद्रप्रेतयात्रेस गेला तर तीन दिवसांनीं शुद्ध होतो; म्हणून ब्राह्मणांनीं व त्रैवर्णिकांनीं शूद्राच्या प्रेतयात्रेस जाऊं नये." (मनु. अ. ५ श्लो. १०१ ते १०४, विष्णु अ. १९ श्लो. ४६ ते श्लो. ४८ पराशर अ. ३ श्लो. ५०). या तऱ्हेच्या निर्बंधामुळें हिंदूच्या प्रेतयात्रेस एकंदरींत माणसें कमी जात असतात. हे जुने निर्बंध या कालांत सर्वथैव अयोग्य आहेत, असें नवा

हिंदुधर्म सांगतो. आजच्या कालांत अखिल हिंदूंनीं आपल्या पेठेंत, वा आळींत कोणताही हिंदु मृत झाला असें समजतांच तेथें उपस्थित व्हावें, प्रेतयात्रेस शक्य तें साह्य करावें, निदान प्रेताबरोबर चार पावलें जाऊन माघारीं परतावें. आजचा हा समष्टि धर्म आहे.

धर्मनिर्णयमंडळाचा निर्णयही आमच्या या म्हणण्यास पोषक असाच आहे.

'कित्येक ग्रंथांत भिन्न जातींच्या प्रेतयात्रेकरितां गेल्यास प्रायश्चित्त सांगितलेलें आहे. पण तें धर्मनिर्णयमंडळास मान्य नाहीं. कारण सर्व जाति समान योग्यतेच्या आहेत असें मंडळ मानतें.'

(४१५) **घरांतील साहित्य द्यावें:**—प्रेतदर्शन, प्रेतयात्रेस जाणें हें अशुभ समजूं नये. तसेंच प्रेतसंस्काराकरितां लागणारें साहित्य घरांतून देणें अशुभ आहे असेंही समजूं नये. प्रेतसंस्काराला तीळ, तांदूळ, कणीक, तूप इत्यादि वस्तु लागतात. पण चमत्कार असा कीं, या वस्तु घरांत असल्या तरी माणसें देत नाहींत तर तसें करणें अशुभ समजतात! पण ही चुकी आहे. कांहीं ठिकाणीं शेणकुटें, काड्याची पेटीसुद्धां घरांतील न घेतां परभारें दुकानांतून तीं घेण्यांत येतात. तें दुकानही वेगळें असतें. उत्तरक्रियेचें सामान विकणारा हिंदु दुकानदार व उत्तरक्रिया करणारा भटजी यांनाही हलकें समजण्यांत येतें, हें सर्वस्वीं अयोग्य आहे. भरल्या घरांतून जाणाऱ्या मनुष्याच्या प्रेतसंस्कारास घरांतील तीळतांदुळादि साहित्य न देणें व तें कोठूनतरी कसेंतरी आणणें, ही कल्पना फार कठोर आहे. त्यापेक्षां या अंत्यसंस्कारास तो शेवटचाच प्रसंग म्हणून घरांत जें साहित्य असेल तें आदरानें व श्रद्धेनें देणें फार चांगलें. तसेंच स्मशानांत लागणारें साहित्यही हिंदु दुकानदाराकडूनच घेणें योग्य होय.

(४१६) **उपाध्याय व अंत्येष्टि:**—जो उपाध्याय यजमानगृहीं उपनयनादि संस्कार करतो व यजमान जिवंत असतांना त्याचेकडून सर्व तऱ्हेचा आदरसत्कार करून घेतो, त्याला आपल्या आश्रदात्याचा अंत्यसंस्कार करावयास कमीपणा वाटावा व आयत्यावेळीं कोणतातरी गडबडगुंड्या आणून कांहींतरी उरकून घ्यावें हें अत्यंत निंद्य आहे. ही रूढी बदललीच पाहिजे. घरांतील सर्व उत्तम साहित्यासह नेहमींच्याच उपाध्यायानें कोणत्याही

तऱ्हेचा किंतु मनांत न आणतां अंत्यसंस्कार करावा. जो वृत्तिवान् असेल त्याला अवश्य तो भाग दिला म्हणजे झालें.

(४१७) प्रेत कसें न्यावें ?:—हिंदु समाजामध्यें तिरडी बांधून खांद्यावरून प्रेत नेण्याची पद्धति आहे. प्रेत भयाण न दिसेल अशी काळजी घ्यावी व प्रेतास वस्त्राच्छादित करावें. सोयीच्या दृष्टीनें प्रेत वाहाण्यास एक उंचशी गाडी केली तर तें धर्मविरुद्ध होईल असें नाहीं. तो सोयीचा प्रश्न आहे. अथर्ववेदांत (१८, ४, ४४) व आश्वलायनसूत्रांत (४, २, ३) प्रेतवाहनास गाडी असल्याचा उल्लेख आढळतो. प्रेतास सर्वांनीं क्रमाक्रमानें खांदा द्यावा. अगदीं शांतपणानें, गंभीरपणानें प्रेत न्यावें. फार तर 'श्रीराम, जयराम' असें हलक्या आवाजानें म्हणत जावें. परंतु 'राम बोलो राम' म्हणून भेसूर आरोळ्या ठोकीत जाण्याची पद्धत जी कित्येक ठिकाणीं आहे ती त्याज्य आहे. ऐन रात्रीं अशा भेसूर आरोळ्यांची प्रेतयात्रा चाललेली पहाणें व ऐकणें हें मुलांना नि वृद्धांनाही भीतिदायक असतें. स्मशानांत गेल्यावर यथाशास्त्र प्रेताचा संस्कार करून, त्याचें शुभचिंतन करून परतावें.

(४१८) स्नान कोणीं करावें ?:—प्रेतवाहक आणि त्यावेळीं प्रेतयात्रेस जे सपिंड उपस्थित असतील त्यांनींच स्नान करावें. केवळ लौकिकार्थ प्रेताबरोबर आलेल्यांनीं स्नान करण्याचें कारण नाहीं. एखाद्या मोठ्या मनुष्याच्या प्रेतयात्रेस पुष्कळ हिंदु जातात, पुष्कळ हिंदु चार चार पावलें खांदाही देतात, त्यावेळीं त्या सर्वांनीं स्नान न करतां हातपाय धुवून आपापले व्यवहार पूर्ववत् करावेत.

(४१९) दहनच इष्टः—हिंदु समाजांत प्रेतदहनाची चाल आहे, ती सर्वस्वीं योग्य आहे. ज्या अहिंदु संप्रदायामध्यें कधींतरी एक न्यायदिन येणार आहे व पुढें पापपुण्याचा निवाडा होणार आहे, असल्या केवळ अंधविश्वासाच्या समजुती आहेत, त्यांना थडग्यांतून हीं मेलेलीं शरीरें उठून उभीं राहातील अशा कल्पनेमुळें प्रेतें सुरक्षित ठेवण्याची फार काळजी घ्यावी लागते ! पण 'शीर्यते तत् शरीरम्' असा न्याय असल्यामुळें ती रूढी बरोबर नाहीं. प्रेतदहन हेंच सर्व दृष्टींनीं योग्य आणि सोयिस्कर आहे.

लहान मुलांना व मोठ्या माणसांनाही पुरण्याची व त्यावर समाधी बांधण्याची पद्धत हिंदु समाजांतील कांहीं गटांत असली तरी ती अपवाद म्हणूनच आहे.

(४२०) स्मशानव्यवस्था.–अखिल हिंदूंनीं जसें प्रेतयात्रेस उपस्थित झालें पाहिजे तसेंच अखिल हिंदूंकरितां स्मशानहि एकच पाहिजे. जागा भिन्न असल्या तरी तेथें अखिल हिंदूंचें दहन होण्यास अडचण येणार नाहीं अशी व्यवस्था असावी. स्मशानामध्यें सर्व तऱ्हेच्या सोयी असाव्या, रात्रीं अपरात्रीं केव्हांही गेल्यास, पावसांत उन्हांत जाण्याचा प्रसंग आल्यास प्रेतवाहकांना अडचणी येणार नाहींत, अशी व्यवस्था अखिल हिंदूंनीं व नगरपालिकेनें केली पाहिजे. अहिंदूंचीं स्मशानें आदर्शभूत असतात. हिंदूंनीं त्यांचें अनुकरण करावें.

(४२१) हा धर्म कसला ? :–प्रेतसंस्कार अशुभ व भयानक ज्यामुळें समजला जातो अशा कांहीं अनिष्ट चाली हिंदुसमाजांत आहेत. त्या आतां बंद केल्याच पाहिजेत. एखाद्याचा ब्रह्मचारी (अविवाहित) मुलगा वारला तर स्मशानांत त्या प्रेताचें एका बाहुलीशीं लग्न लावतात व मग मंत्राग्नि देतात ! ही क्रिया करीत असतांना पित्याला किती दुःख होत असेल, त्याचें अन्तःकरण शतशः विदीर्ण होऊन किती पिळवटत असेल याची कल्पनाच करणें बरें ! हा अधर्म्य प्रकार त्वरित नष्ट केला पाहिजे.

बाळंतीण मृत झाली किंवा सकेशा विधवा वारली म्हणजे असाच त्रासदायक विधि आहे. सकेशा विधवेचा सूड ती जिवंत असतांना समाज घेतोच. बिचारीची मेल्यानंतर तरी सुटका होईल म्हणावें तर स्मशानांत सकेशा विधवेच्या प्रेताचें वपन करतात ! कारण वपनाशिवाय मंत्राग्नि नाहीं, व मंत्राग्निशिवाय सद्गति नाहीं, अशी समजूत ! पित्याला आपल्या सकेशा मुलीच्या प्रेताचें तें विडंबन कसें पहावेल ? मुलाला आपल्या आईच्या प्रेताचें वपन चाललेलें पाहून किती वाईट वाटत असेल ? स्मशानांत प्रेताचें वपन करण्यास न्हावी सिद्ध होत नाहीं व झाला तरी तो तें वपन म्हशी बोडावयाच्या वृत्तीनेंच करणार ! तें दृश्य किती हिडीस आहे ? धर्माच्या नांवाखालीं चाललेला हा आचरटपणा बंद करणें भाग आहे. स्त्रिया, मुलें, विधुर, विधवा, कुमारी, ब्रह्मचारी या सर्वांच्या अंत्यसंस्कारांची माहिती, प्रेतवाहकांची शुद्धि, प्रेतयात्राविधि इ. धर्मनिर्णयमंडळाच्या अंत्येष्टि

प्रयोगांत आहे. अखिल हिंदूंनीं हा सुटसुटीत, सूत्रोक्त व शास्त्रोक्त प्रयोग अवश्य रूढ करावा.

(४२२) **अशौचविवेकः**– सांप्रतच्या परिस्थितींत मृताशौचा-संबंधाचे अवश्य तेवढेच निर्बंध पाळले जावेत. ' न वर्धयेत् अघाहानि ' अशौचाचे दिवस वाढवूं नयेत, या धोरणानें सुतकाचा शास्त्रार्थ केला पाहिजे.

**नाशौचं विद्यते पुंसां संसर्गं चेन्न गच्छति ॥** –वसिष्ठस्मृतिः

ज्यांचा प्रेताशीं संसर्ग फारसा येत नाहीं, त्यांना अशौच नसावें. पतिपत्नी, पितापुत्र, सख्खे बंधु इत्यादि अतिनिकट आप्तांना आणि ज्यांना उत्तरक्रिया करावयाची असेल, त्यांना दहा दिवस अशौच असावें. पण जे दूरचे आप्त आहेत, चुलत बंधु आहेत, अशांना अस्थिसंग्रह व रक्षाविसर्जन झाल्यावर अशौच नसावें. तत्त्वद्रष्टे, विद्वान् लोक चौथ्या दिवशींच सुत-क्यांना संव्यवहार्य समजतात, अशा अर्थाचा एक देवलोक्त नियम आहे. तो कलिवर्ज्यांत ढकललेला असला तरी आतां तोच रूढ केला पाहिजे.

परठिकाणीं दूर दूर असे आप्त असतात. त्यांना कधींकाळीं भेटावयास जाण्याचा प्रसंग येतो. अशावेळीं ज्याचें कधीं जिवंतपणीं तोंडही पाहिलेलें नसतें, अशाचें अशौच धरण्याचा प्रसंग येतो. मृत्यूनंतर कित्येक दिवसांनीं असें अशौच धरणें अनैसर्गिक आहे. परठिकाणच्या आप्तांपैकीं ज्यांचा उत्तरक्रियेशीं साक्षात् संबंध असेल त्यांना ती होईपर्यंत अशौच असावें. इतर कोणालाही अतिक्रांताऽशौच पाळण्याचें कारण नाहीं. मृताशीं प्रत्यक्ष संसर्ग, निकट आप्तसंबंध नि उत्तरक्रियेशीं ज्यांचा संबंध असेल तेवढ्यांनींच यथाधिकार दहा वा तीन दिवस अशौच पाळावें.

सुतक हें मृताच्या दुःखानिमित्त असतें. आईबाप वारले, मुलगा वारला, पति व पत्नी यांपैकीं कोणी गेले कीं दुःखाचा असा धक्का बसतो कीं त्या माणसाकडून कोणतेंही काम होऊं शकत नाहीं. अशा वेळेला सुतक पाळणें, आलेल्यांना भेटणें, त्यांचें सांत्वनपर शब्द ऐकणें हा व्यवहार दुःखनाशार्थ आवश्यक असतो. म्हणून मृताशौचाचा अवधी पुढीलप्रमाणें असावा:—

‘ पिता आणि जन्मदात्री माता यांचें पुत्रास व पुत्राचें या दोघांस; पतिपत्नींचें परस्परांस व अन्त्यक्रिया करणारास दहा दिवस; वर न उल्लेखिलेल्या नातेवाइकांस स्नान मात्र. ’

धर्मनिर्णयमंडळाचा वरील निर्णय अत्यंत योग्य आहे. जुन्या हिंदु धर्मांत व्यष्टि व समष्टि या दृष्टीनें सुतकासंबंधीं पुष्कळच तारतम्य दाखविलेलें आढळतें. उदा. राजाला सुतक नाहीं, कोणी वीज पडून मेल्यास त्याचें सुतक नाहीं, राष्ट्रावरील आपत्तीच्या निवारणाकरितां जो मेला, लढाईंत जो गतप्राण झाला, त्याचें सुतक नाहीं. इ.

(४२३) राजाला सुतक नाहीं: —

महीपतीनां नाशौचं हतानां विद्युता तथा ।
गोब्राह्मणार्थं संग्रामे यस्य चेच्छति भूमिपः ॥

—याज्ञवल्क्य प्र. १–२७.

असाच श्लोक मनुस्मृतींतही आहे. राजा जर सुतक नि सोयेर पाळीत बसेल तर त्याला राज्यकारभारास मनःस्वास्थ्य मिळणार नाहीं. मोठ्याशीं संबंध जोडण्याची[1] प्रवृत्ति साहजिक असते. त्यामुळें राजाच्या मागचें सुतक व सोयेर कधींही न संपण्याचा अनवस्था प्रसंग येईल. श्रीवर्धनकर भट मराठी साम्राज्याचे मुख्य प्रधान झाल्यावर त्यांनीं सुतक व सोयेर संभाळण्याची आपल्याच घराण्यांतील एकाला जहागीर देऊन व्यवस्था केली. त्यास खुंटाची जहागीर म्हणत. तो खुंट पेशव्यांचें सुतक नि सोयेर संभाळी, व हे मुख्य प्रधान आपल्या व्यवहारास मोकळे असत. कोल्हापुरास छत्रपतींचे व ग्वाल्हेरलाही शिंदे सरकारांचें सोयेर नि सुतक संभाळण्याची व्यवस्था नेमणूक देऊन केलेली आहे.

(४२४) सुतकांतील तारतम्यः—

एकाहात् शुध्यते विप्रो योऽग्निवेदसमन्वितः ।
त्र्यहात् केवलवेदस्तु निर्गुणो दशभिर्दिनैः ॥८३॥— अत्रि.

अग्निहोत्री व वैदिक ब्राह्मणाचे आईबाप वारल्यास तो केवळ एक दिवसांत शुद्ध होतो. वैदिक ब्राह्मण तीन दिवसांनीं शुद्ध होतो. व जो ब्राह्मण ना वैदिक, ना शास्त्री, ना अग्निहोत्री, जो नुसता निर्गुण आहे,

त्यानें दहा दिवस सुखानें सुतक धरावें; कारण त्यामुळें समष्टिधर्माची मुळींच हानि होत नाहीं! रोगग्रस्त, ऋणग्रस्त, व्यसनासक्त, क्रियाहीन, मूर्ख अशांनीं सतत सुतक धरावें म्हणजे समाजापासून शक्यतों दूर असावें, असेंही प्रतिपादन अत्रिसंहितेमध्यें आहे.

याज्ञवल्क्य स्मृतीवरील सुप्रसिद्ध टीकाकार विज्ञानेश्वर यांनीं अ. ३ प्र. १ श्लो. २७ वर टीका करतांना पुष्कळ मार्मिक विवेचन केलें आहे.

**कारवः शिल्पिनो वैद्या दासीदासास्तथैव च ।**
**राजानो राजभृत्याश्च सद्यः शौचाः प्रकीर्तिताः ॥** —प्रचेताः
**चिकित्सको यत्कुरुते तदन्येन न शक्यते ।**
**तस्मात् चिकित्सकः स्पर्शे शुद्धो भवति नित्यशः ॥** —स्मृत्यंतरे
**मूल्यकर्मकराः शूद्रा दासीदासास्तथैव च ।**
**स्नाने शरीरसंस्कारे गृहकर्मण्यदूषिताः ॥** —शातातप

**भावार्थः**—कारुकर्म करणारे म्हणजे स्वैपाकी, आचारी वगैरे, चित्रकार, धोबी, रंगारी, वैद्य, दासदासी, राजे, राजसेवक हे फक्त स्नानानें लगेच शुद्ध होतात. वैद्य जें करूं शकतो तें इतरांना शक्य नसतें म्हणून तो नित्य शुद्ध समजावा. मोलमजुरी करणारे दासदासी हे अंगाला तेल लावणें, चोळणें, घरकामें करणें इत्यादि कर्मांत शुद्ध समजावेत.

राजाला राजकर्मामध्यें जसें सुतक नाहीं, तसेंच वैद्य, दासदासी यांना आपापल्या समाजसंबद्ध कर्तव्यामध्यें सुतक नाहीं. वैद्य, डॉक्टर, न्हावी, धोबी, स्वैपाकी, मजूर, रंगारी, इत्यादींनीं जर दहादहा दिवस सुतक पाळून आपलें समाजसंबद्ध कर्तव्य सोडलें तर ती आपत्ति आहे. या लोकांना व्यष्टिधर्मामध्यें सुतक आहे, पण तें समष्टिधर्मांत नाहीं. त्यांचे घरीं कोणी जवळचें वारलें म्हणजे त्यांना आपल्या घरीं सणवार, लग्नकार्य, उत्सव करतां येणार नाहीं. समाजसंबद्ध कर्तव्यें दुःखावेग ओसरतांच त्यांनीं केलींच पाहिजेत. हें तारतम्य लक्षांत घेऊन सुतक पाळलें तर तें आजच्या कालास व समाजाच्या अभ्युदयास साधक आहे.

(४२५) **सोयेर फक्त आईला**:—सुतकाप्रमाणें सोयेर (जननाशौच) पाळण्याचा प्रघात आहे. याचाही दुरुपयोग समाजांत दिसतो. जनना-

शौच म्हणजे सोयेर हें फक्त मातेसच दहा दिवसपर्यंत आवश्यक आहे. इतरांनीं तें मानण्याचें कारण नाहीं, असा हा धर्मनिर्णयमंडळाचा नियम समुचित आहे. बाळंतिणीला शारीरिक दोषांमुळें दहा दिवस विश्रांति हवी, व तिनें अशौचही पाळलें पाहिजे. ही विश्रांति वैद्यशास्त्र व आरोग्यशास्त्र दृष्टीनें अवश्य आहे. पित्यानें, चुलत्यानें, इतर भाऊबंदांनीं हें सोयेर पाळ-ण्याचें मुळींच कारण नाहीं. धार्मिक भावनेनें सोयेर पाळण्यांत येतें, म्हणून त्याचा दावेदार भाऊबंद चांगला फायदा घेतात. समजा, एका भाऊबंदाचे घरीं कांहीं लग्नकार्य ठरलें कीं त्याचा दावेदार भाऊबंद नेमका त्याचा वेळेस त्याला एखाद्या सोयेराची हुंडी पाठवितो. तो गृहस्थ हुंडीला न जुमानणारा असेल तर त्याच गांवांतील नातलग आसन्नप्रसवा स्त्रीला शीघ्र प्रसूति व्हावी म्हणून औषधही देतो ! ! त्यामुळें ती बाळंतीण झाली कीं लग्नकार्य थांबतें. लग्नकार्यांत ही अडचण येऊं नये म्हणून माणसें आठ-आठ दिवस आधींच देवकस्थापना करतात व खर्चाच्या पेंचांत येतात ! एका गृहस्थाचा भाऊ कलकत्त्यास होता. त्याच्या मुलाच्या मुंजीची पत्रिका येतांच या बहाद्दरानें आपली बायको बाळंत झाल्याची एक्स्प्रेस तार पाठवून त्याची मुंज रहित करण्याचा यत्न केला ! असले हे वेडगळ प्रकार समाजांत जे चालत आहेत ते शक्य तेवढे लौकर बंद करण्याचा मार्ग म्हणजे फक्त मातेसच जननाशौच आहे अशी समजूत दृढ करणें हा होय. मनुस्मृतींत 'सूतकं मातुरेव स्यात्' (५, ६२) असें स्पष्ट विधान आहे. याज्ञवल्क्यांनींही 'सूतकं मातुरेव हि' (३, १८) असें म्हटलें असून मातेला जननाशौच असण्याचें लौकिक कारण

पित्रोस्तुसूतकं मातुस्तदसृक्दर्शनाद्ध्रुवं॥ ३, १९

'मातेचा रक्तस्राव' हें स्पष्ट दिलेलें आहे. संवर्त म्हणतो–

जाते पुत्रे पितुः स्नानं सचैलं तु विधीयते ।
माताशुध्येद्दशाहेन स्नानात् तु स्पर्शनं पितुः ॥

यावरून जननाशौच हें इतरांस आणि पित्यास असण्याचें मुळींच कारण नाहीं. सोयेरांत विटाळाचें बंड फारसें नसतेंच; बाळंतणीशीं त्याच दृष्टीनें वागावें म्हणजे तिची शुश्रूषा नीट होईल. मृताशौच व जननाशौचामुळें

मंगलकार्यांत येणाऱ्या अडचणी भ्रममूलक आहेत हें मागें अठराव्या प्रकरणांत सांगितलेंच आहे.

(४२६) श्राद्धस्वरूपः–प्रत्येक हिंदूनें जन्मदात्या मातापितरांचें आदरपूर्वक स्मरण ठेवून त्यांच्या उद्देशानें श्राद्ध करावें. महालयामध्यें मातृत्रयी व पितृत्रयीबरोबर इतरांचेंही स्मरण करावें लागतें. समाजाचा उत्कर्ष होण्यास पूर्वजांबद्दल आदर असणें अवश्य आहे. पूर्वजांची कृति, परंपरा व इतिहास यांमुळेंच प्रोत्साहन येत असतें. वर्षांतून एक महालय एक पितृश्राद्ध, एक मातृश्राद्ध एवढीं प्रत्येक हिंदूनें करावीं. निदान समस्त पितरांचा उच्चार करून त्यांना पिंड देण्याचा महालयविधि तरी अवश्य करावा.

पितरांच्या उद्देशानें श्रद्धापूर्वक जें अर्पण केलें जातें, तें श्राद्ध होय. तें पितरांना पोंचतें असें नव्हे; कारण पितर यथाकर्म अन्यत्र गेलेलेच असतात.

प्रेतं पितॄंश्च निर्दिश्य भोज्यं यत्प्रियमात्मनः ।
श्रद्धया दीयते यत्र तच्छ्राद्धं परिकीर्तितम् ॥　　–मरीचिः

श्राद्धं नामादनीयस्य तत्स्थानीयस्य वा द्रव्यस्य प्रेतोद्देशेन श्रद्धया त्यागः ।　　–मिताक्षरा

स्वतःला आवडणारा व पितरांना आवडणारा पदार्थ श्रद्धेनें देणें किंवा तो घेतां येईल एवढें द्रव्य सत्पात्र माणसास देणें किंवा संस्थेस पाठविणें म्हणजेही श्राद्ध होय. श्राद्धाचे प्रकार विविध आहेत. त्यांचीं अंगें व उपांगेंहि विविध असलीं तरी केवळ पिंडप्रदानानें श्राद्ध होऊं शकतें. धर्मनिर्णयमंडळानें प्रत्येक हिंदूला प्रयोगावरून श्राद्ध करतां येईल असा 'श्राद्धप्रयोग' तयार केलेला आहे. अखिल हिंदूंनीं त्याप्रमाणें श्राद्ध करावें, एवढेंच या प्रकरणाच्या शेवटीं सांगतों.

—*—

# प्रकरण सत्ताविसावें

## दिनचर्या

**(४२७) एक आख्यायिकाः**–जुन्या हिंदुधर्मांत प्रत्येक हिंदूनें सकाळीं उठल्यापासून सायंकाळपर्यंत धार्मिक दृष्टीनें कोणकोणत्या गोष्टी कराव्या याचें इतकें विवेचन आहे कीं तें वाचून व ऐकून जीव हैराण होऊन जातो. विशेषत: अलीकडील निबंधग्रंथामध्यें जें आन्हिकाचें निरूपण आहे तें वाचून तसें कोणीतरी त्या कालीं आचरणांत आणीत होता कीं नाहीं याची शंका वाटते. प्रत्यक्ष धर्मसिंधुकारांची एक आख्यायिका अशी आहे.

एक भाविक धर्मसिंधु वाचून त्याप्रमाणें तंतोतंत धर्मसिंधुकार वागत असतील अशा समजुतीनें त्यांच्या दर्शनास सकाळीं गेला. या भाविकाला वाटलें कीं यावेळीं हे ग्रंथकार जपतपादि कार्यांत मग्न असतील. घरीं जाऊन तो भाविक अंगणांत उभा राहिला तों तेथें एक कांबळें पांघरून गृहस्थ बसले होते, हुरडा भाजण्याकरितां गोंवर पेटविला होता, एक मनुष्य शाळूचीं कणसें चोळून त्यांना हुरडा देत होता व ते खात होते. भाविकानें विचारलें, 'धर्मसिंधुकार येथेंच राहतात काय, त्यांचें दर्शन होईल काय, ते कोठें आहेत?' त्यावर हुरडा खात बसलेल्या धर्मसिंधुकारांनीं स्वतः सांगितलें कीं, 'मीच तो ग्रंथकार, तुम्हांला काय हवें आहे?' तें ऐकतांच त्या भाविकानें आश्चर्यानें तोंडांत बोट घातलें व आपण ग्रंथांत लिहिलें आहे एक व करीत आहांत दुसरें, याची संगति कशी? असें विचारलें. धर्मसिंधुकार म्हणाले, 'अरे, जर मीं लिहिल्याप्रमाणें सर्व आन्हिकच करीत बसलों असतों, तर मला ग्रंथ लिहिण्यास आणि हुरडाही खावयाला वेळच मिळाला नसता!' हें ऐकतांच तो भाविक चालता झाला. या आख्यायिकेंतील मुख्य तत्त्व हें कीं अखिल हिंदूंची रोजची दिनचर्या आतां जखडण्याचे दिवस गेले. व्यवहार वाढले, व्यवसाय वाढले, त्यामुळें सर्वांना सामान्य असें सांगणेंही कठीण आहे. तथापि एकंदर दैनंदिन कार्यक्रमाचें धोरण कसें असावें एवढेंच या प्रकरणांत सुचवावयाचें आहे.

(४२८) प्रातःस्मरणः—हिंदुस्थानचें हवापाणी, कृषिप्रधानता आणि इतर परिस्थिति ध्यानीं घेतां पहांटे लौकर उठणें आणि रात्रीं लौकर निजणें हें सर्व दृष्टीनें हितावह आहे. कांहींना रात्रींच काम करावें लागतें, कांहीं कारखाने रात्रंदिवस चालतात, रेल्वे, पोष्टादि खातीं अहोरात्र काम करितात, रात्रीं प्रवासही होतो हे अपवाद सोडूनच पहांटे लौकर उठावें व रात्रीं जागूं नये असें म्हटलेलें आहे. पहांटें उठल्यावर प्रातःस्मरण करावें, ईश्वराचें चिंतन करावें, कांहीं पाठांतर करावें, चित्ताला प्रसन्नता, मनाला उत्साह वाटेल असें सात्त्विक वाङ्मय अवश्य वाचावें. स्तोत्रें, भूपाळ्या याही आवडीप्रमाणें नि सवडीप्रमाणें म्हणाव्यात. निदान 'हे परमेश्वरा, मी हिंदू आहें, हिंदू राष्ट्राचा उद्धार करण्याचे कामीं मला प्रेरणा कर, हिंदु धर्म, हिंदु संस्कृति यांची सेवा करण्याची स्फूर्ति मला दे' एवढीं तीन वाक्यें उच्चारलीं तरी पुरें आहे. कारण अलीकडे अगदीं खेडेगांव सोडल्यास हा प्रभातकाळचा रामपारा ( रामप्रहर ) चहा, वृत्तपत्रें आणि दाढी यांचा प्रहर झालेला आहे ! लौकर उठून चहा घेत, वृत्तपत्रें वाचीत, गप्पागोष्टी करीत दाढी करणें, असें सांप्रतचें आन्हिक झालें आहे, तें अपरिहार्य आहे !

(४२९) व्यायाम व संध्याः—वरीलप्रमाणें प्रातःस्मरण व नव्याकालांतील आन्हिक झाल्यावर किंवा त्यापूर्वी प्रत्येक हिंदूनें व्यायाम करावा. फिरावयाला जावें, पळावें, पोहावें, सूर्य नमस्कार घालावेत, आसनें करावींत, तालमींत जावें, संघस्थानावर जावें, कोठेंही जाऊन व्यायाम हें धर्मकृत्य आहे असें समजून तो घ्यावा. अभिरुचिप्रमाणें कोणतातरी व्यायाम अवश्य करावाच.

स्नानपूर्व किंवा स्नानोत्तर हिंदु स्त्रीपुरुषांनीं अवश्य तो व्यायाम करून गृहशुद्धि, केशरचना, वेणीफणी इत्यादि सर्व उरकून निदान पांच वेळ तरी गायत्रीमंत्राचा जप करून ईश्वराची प्रार्थना करावी. संध्या ही अखिल हिंदु स्त्रीपुरुषांनीं करावी. संध्या म्हणजे बुजून जाण्यासारखें कांहीं नाहीं. पाट, पळी, ताम्हन, भस्मादि साधनांचा पसाराही मांडण्याचें कारण नाहीं. स्नानानंतर घरांत स्वच्छ अशा एकांत स्थलीं वा देवघरांत बसावें, प्राणायाम करावा, आणि स्वस्थ चित्तानें वृत्तीची एकाग्रता करून पांच वेळ,

दहा वेळ, अठ्ठावीस वेळा, गायत्रीमंत्राचा जप करावा. निवांत जागीं एकांत सेवन करणें व कांहीं काल चित्ताची एकाग्रता करणें, याला सर्व दृष्टीनें फार महत्त्व आहे. मनाची शक्ति वाढविण्यास नि चित्तप्रसाद लाभण्यास एकांतावांचून उपाय नाहीं. एकांतांत विचार सुचतात, दूरदर्शीपणा येतो. 'एकांतेविण प्राणियातें बुद्धि कैंचि' –समर्थ. एकांतामुळें 'सर्वांआधीं' कळतें. हा एकांत या संध्येच्या निमित्तानें लाभतो. त्याचा लाभ प्रत्येक हिंदु स्त्रीपुरुषानें घ्यावा.

(४३०) **व्यवहारः**–एवढें सकाळचें आन्हिक होतांच विद्यार्थी व विद्यार्थिनी यांनीं आपापल्या अभ्यासास लागावें आणि इतरांनीं 'ज्या ज्याचा जो व्यवहार । तेथें असावें खबरदार' या समर्थोक्तीप्रमाणें आपापल्या उद्योगास लागावें. सत्पात्र व हिंदुसमाजाला उपकारक अशा संस्थेचा सेवक आल्यास त्याला वर्गणी देणें हा आजच्या कालांतील अतिथियज्ञ होय. रोज स्वतः कांहीं हिंदुत्वनिष्ठेनें वाचणें, मुलांमुलींच्या अभ्यासाकडे लक्ष देणें, हा ब्रह्मयज्ञ असून तो प्रत्येक हिंदूनें आचरावा. शेजारधर्म हा एक समष्टिधर्माचा भाग आहे. म्हणून अडलेल्या, गांजलेल्या हिंदूंना यथाशक्ति साह्य करावें.

(४३१) **भोजनः**–हातपाय धुणें, वस्त्रांतर करणें, सोंवळें–ओंवळें, स्वच्छता यांचा विचार आरोग्यशास्त्राचे दृष्टीनेंच करावा. स्वच्छ, निर्मल, पवित्र असें वातावरण भोजनाचे वेळीं असावें आणि प्रसन्न मनानें अन्न सेवन करावें. जसें अन्न तशी बुद्धि, हें खरें आहे. भोजन करतांना वादग्रस्त विषय चर्चेस घेणें, मोठ्यानें बोलणें, वादावादी करणें, मुलांवर रागावणें, असले तमोगुणी प्रकार वर्ज करावेत. जेवतांना मौन धारण करणें हें या दृष्टीनें इष्ट आहे. कांहीं माणसें फारच बोलतात. म्हणून फार थोडें बोलतच भोजन करणें इष्ट असतें. भोजनोत्तर आपापले व्यवहार सायंकाळपर्यंत जो तो करतो. कोणताही व्यवहार करतांना, पैशाकरितां धंदा करतांना हिंदुत्वनिष्ठेची जागरूकता ठेवावी. शयनीं, भोजनीं, आसनीं अष्टौप्रहर हिंदुत्वाचा ध्यास असला म्हणजे हिंदुसमाजाविरुद्ध, हिंदुत्वाविरुद्ध, हिंदुराष्ट्रहितास बाधक होईल असें कर्म करण्याची बुद्धि होत नाहीं.

**(४३२) सायंकाळचा कार्यक्रमः**—विद्यार्थीविद्यार्थिनी यांनीं, तरुण-वृद्धादिकांनीं सायंकाळीं आवडीप्रमाणें व्यायाम घ्यावा. सकाळींच पुरेसा व्यायाम झाला असेल तर सायंकाळीं हिंदुत्वनिष्ठेनें, हिंदुधर्माचा रक्षक व प्रचारक या नात्यानें कांहीं कार्य करावें. प्रत्येक हिंदु स्त्री-पुरुष हा हिंदु-धर्माचा प्रचारक व रक्षक झाला पाहिजे. ज्याला जें शक्य असेल तें कार्य त्यानें करण्याचा यत्न करावा. हिंदूवर आज कोठें आक्रमण झालें आहे, कोणच्या वृत्तपत्रांत काय आलें आहे, त्याचा प्रतिकार कसा झाला आहे, याचा विचार करणें, ते विचार दुसऱ्यांना सांगणें, हिंदुत्व-निष्ठ अशा विविध संस्थांमध्यें उत्साहानें अंग मोडून राबणें, हीं कामें शक्यतेप्रमाणें सायंकाळीं, रात्रीं व सकाळींही करावींत. ईश्वराच्या सेवेस जसें काळवेळाचें बंधन नाहीं, तसें हिंदुसमाजाचें काम करण्यास काळवेळेचें बंधन नाहीं. रोजच्या कार्यक्रमांत दैनंदिनींत या कार्याला अवश्य स्थान असावें.

**(४३३) देवदर्शनः**—प्रत्येक हिंदूनें रोज सायंकाळीं व्यष्टि व समष्टि-धर्म अशा दोन्ही दृष्टीनें आपल्या भागांतील प्रमुख अशा देवतेच्या दर्शनास जावें. गुजराथेमध्यें दररोज देवदर्शनास जाण्याची चाल आहे. सणावारीं तर देवदर्शनास गुर्जरबंधु समारंभानें जातात. त्यांचे घरांत देवांचें प्रस्थ नसतेंच म्हणून देवळांतल्या देवाकडे जाणें स्वाभाविक घडतें. महाराष्ट्रांत ही चाल येणें अवश्य आहे. ( देव, देवता, देवालयें यांचा विचार पुढें प्रकरण छत्तीस मध्यें केलेला आहे. त्यास अनुसरून तें देवालय असावें. ) त्या देवालयांत रोज अखिल हिंदूंची सामुदायिक प्रार्थना होत असेल तर तींत भाग घ्यावा. घरीं येऊन सायंकाळीं स्वच्छतेनें व पवित्रतेनें गायत्रीमंत्राचा पांच वेळां जप करावा. इष्ट तें, आवडेल तें नि येत असेल तें एखादें स्तोत्र म्हणावें व त्यानंतर रात्रीचें भोजन करावें.

**(४३४) धर्मग्रंथ वाचनः**—सायंकाळीं सिनेमाची करमणूक कांहींना अत्यावश्यक वाटू लागलेली आहे; पण तें आर्थिक परिस्थितीच्या दृष्टीनें आणि इतर कारणांनींही अनिष्ट आहे. इतरत्र या बोलपटांचा उपयोग जनतेला सुसंस्कृत करण्याकरितां होतो. हिंदुस्थानांत केवळ करमणूक हेंच या बोलपटांचें ध्येय दिसतें. त्यामुळें समाजाला अनिष्ट वळण लागत आहे.

यास्तव हिंदूंनीं तें व्यसन लावून घेऊं नये. क्वचित् प्रसंगीं हिंदुत्वनिष्ठेला पोषक आणि आपल्या जीवनाला उत्तेजक असा बोलपट पहाणें इष्टच आहे. त्यापेक्षां चार मंडळींनीं मिळून महाभारतादि ग्रंथ वाचणें, प्रचलित विषयांची चर्चा करणें, हे प्रकार पुरस्कारार्ह आहेत.

(४३५) **निद्रापूर्व ईशस्मरणः**–प्रत्येक हिंदूनें सकाळीं उठतांना जशी हिंदुत्वाची, हिंदुसंस्कृतीची, हिंदुराष्ट्राची आठवण ठेवली पाहिजे, त्याप्रमाणेंच त्यानें निजतांनाही स्वधर्म, स्वराष्ट्र व स्वसंस्कृति यांचें स्मरण ठेवलेंच पाहिजे. झोंपण्यापूर्वी हांतरुणावर कांहीं क्षण मन स्थिर करून बसावें. सबंध दिवसांतील व्यापाचा आढावा डोळ्यांपुढें ठेवावा. पोट व प्रपंच या व्यष्टिधर्माव्यतिरिक्त हिंदुधर्म, हिंदुराष्ट्र व हिंदुसंस्कृति यांना उपयुक्त असें काय घडलें, आपण काय केलें याचें थोडें चिंतन करावें. कांहीं चुकलें असल्यास परमेश्वराची करुणा भाकावी आणि स्वधर्म, स्वसंस्कृति व स्वराष्ट्र यांची सेवा अधिक करण्याची शक्ति, स्फूर्ति आणि बुद्धि दे, अशी ईश्वराची प्रार्थना करून झोंपीं जावें. याप्रमाणें अखिल हिंदूंची ही सुटसुटीत दिनचर्या आहे. नित्य व नैमित्तिक असे या दिनचर्येचे दोन भाग होतात. नित्यदिनचर्येचें धोरण वर सांगितलें आहे. नैमित्तिक दिनचर्येमध्यें सामुदायिक प्रार्थना, सार्वजनिक उत्सव आणि समारंभ इत्यादि अनेक विषय येतात. त्यांचा विचार त्या त्या विषयाच्या प्रकरणामध्यें केलेलाच आहे.

—*—

# प्रकरण अठ्ठाविसावें

## सण व शिष्टाचार

(४३६) **समाजबल व बंधनें**:–हिंदुसमाजाच्या भावी राष्ट्रिय जीवनाला समष्टिधर्माची फार आवश्यकता आहे. हिंदुसमाज जितका व्यष्टि-धर्माबद्दल उत्सुक आहे तितकाच तो समष्टिधर्माबद्दल उदासीन आहे. वैयक्तिक स्वार्थ, उन्नति, सुख, मोक्ष यांकडेच हिंदुसमाजांतील व्यक्तींचें

लक्ष अधिक आहे. अखिल हिंदुसमाजांत जूट, शिस्त, संघटना, कळकळ, उद्योग, आस्था, उत्साह इत्यादि सद्‌गुण वृद्धिंगत झाले तर त्यामुळें व्यष्टीचें तर हित होईलच, पण समाजाचेंही बल वाढेल. समाजाचें सामुदायिक बल वाढण्याकरितां कांहीं बंधनें पाळावीं लागतात. बंधनांमुळें औदासीन्य व शैथिल्य नष्ट होतें व प्रेम, ऐक्य व सहकार्य यांची वृद्धि होते. समाजाचें द्वेष्य एक, श्रद्धेय एक, ध्येय एक, विचार एक अशी स्थिति असली कीं समाजाचें बल वाढतें. हिंदुसमाजांतील जुनीं बंधनें शिथिल झालीं असून नवीं बंधनें तत्परतेनें स्वीकारलीं जात नाहींत. यास्तव जुनींच बंधनें नव्या स्वरूपांत पाळावयाचा मार्ग शोधणें अवश्य आहे.

**(४३७) वर्षप्रतिपदाः**—हिंदुसमाजांत वर्षांतून कांहीं सण पाळले जातात. सण, उत्सव, समारंभ यांची समाजाला आवश्यकताच आहे, या सणांना सामुदायिक स्वरूप देऊन त्याचा लाभ समाजसंघटनाला होईल, असें करणें अवश्य आहे. प्रत्येक सणाला कांहीं धार्मिक, कांहीं सामाजिक आणि राष्ट्रिय महत्त्व आहे व इतिहास आहे.* वर्षप्रतिपदा, गणेश चतुर्थी, नागपंचमी, विजयादशमी, दिवाळी, मकरसंक्रमण व होळी हे सण अखिल स्त्रीपुरुषांनीं समष्टिधर्म म्हणून सामुदायिक पद्धतीनें पाळावे. व्यक्तिदृष्ट्या जो तो हे सण पाळतोच, नवें वस्त्र धारण करतो, गोडधोड खातो. पण त्याला जी सामुदायिक भावनेची मदत असावी लागते, तितकी आज तरी मिळत नाहीं. ती वाढविण्याचे यत्न सामुदायिक प्रार्थना, व्याख्यानें, समारंभ, उत्सव यांच्या द्वारां व्हावे. उदाहरणार्थ, वर्षप्रतिपदेस घरोघरीं अखिल हिंदूंचा विजयध्वज उभारला जातोच. सायंकाळीं भगव्या ध्वजाची अखिल हिंदूंनीं प्रचंड मिरवणूक काढावी, व्याख्यानांत ध्वजाचें महत्त्व सांगावें आणि त्यानंतर पंचांगश्रवण व सामुदायिक प्रार्थना नि एकतागान करून हा समारंभ संपवावा. वर्षप्रतिपदेच्या ध्वजाचा वेदकालापर्यंत संबंध पोंचतो. इंद्रानें वृत्रवध केल्याच्या अनेक कथा आहेत. त्यांत चैत्र शु॥ १ स त्याचा वध करून विजयध्वज उभारल्याचाही उल्लेख आहे. पुढें श्रीरामचंद्र,

* टीप—ऋग्वेदीकृत 'आर्यांच्या सणांचा इतिहास' हा ग्रंथ वाचकांनीं पहावा.

चंद्रगुप्त, शालिवाहनादींनीं त्याच ध्वजाला जुन्या परंपरेच्या आधारानें मान दिला. विजयध्वजाचें गीत पुढीलप्रमाणें आहेः—

अखिल हिन्दु विजयध्वज हा। उभवुं या पुन्हां
ध्वज तो । लढवुं या पुन्हां ॥ ध्रु० ॥
या ध्वजासची त्या कालीं
रोविती पराक्रमशाली
रामचन्द्र लंकेवरती । वधुनि रावणा । ध्वज तो ॥१॥
करित जइं शिकंदर स्वारी
चन्द्रगुप्त ग्रीकां मारी
हिन्दुकूशशिखरीं चढला । जिंकुनी रणा । ध्वज तो ॥२॥
रक्षणीं ध्वजाच्या याची
शालिवाहनानें साची
उडविलीं शकांचीं शकलें। समरिं त्या क्षणा । ध्वज तो ॥३॥
हाणिलें हुसकितां जेथें
हूणांसि विक्रमादित्यें
हाचि घुमवि मंदोसरच्या । त्या रणांगणा । ध्वज तो ॥४॥
जइं जइं हिन्दु सम्राटें
अश्वमेध केले मोठे
करित पुढति गेला हाची । विजयघोषणा । ध्वज तो ॥५॥
उगवुनी सूड हिंदूंचा
मद मर्दुनि मुस्लीमांचा
शिवराय रायगडिं करिती । वीरपूजना। ध्वज तो ॥६॥
ध्वज धरुनि हाच दिल्लीला
वीरबाहु भाऊ गेला
मुसलमीन-तख्ता फोडी । हाणुनी घणा । ध्वज तो ॥७॥
पुढति नेम कांहीं ढळला
ध्वज जरी करांतुनि गळला
उभवुं या पुनरपि प्राणा । लावुनी पणा । ध्वज तो ॥८॥

—वि. दा. सावरकर.

चैत्र महिन्यांत चैत्रागौरीचें हळदकुंकूं स्त्रिया करीत असतात. तें सामुदायिकपद्धतीनें करावें व त्यांत स्त्रियांचीं व्याख्यानेंही करवावींत इतर शिक्षणात्मक, कलात्मक असे विविध कार्यक्रम योजावेत म्हणजे त्याला समष्टि-धर्माचें स्वरूप येईल.

(४३८) **गणेशचतुर्थी**:–गणेशचतुर्थीचा सण हा अखिल हिंदु-समाजामध्यें नव्या स्वरूपांत समष्टिधर्म या दृष्टीनें साजरा होतो; गण आणि त्यांचा पति म्हणजे समाज व त्यांतील पुढारी या सर्वांनीं मिळून धार्मिक नि सामाजिक दृष्ट्या या सणाला फार महत्त्व दिलें पाहिजे. बुद्धपूर्वकालीं गणराज्यें होतीं म्हणजे विशिष्ट प्रादेशिक समूहांतील लोकांना गण म्हणत आणि त्यांनीं निवडून दिलेल्या अध्यक्षाला गणपति म्हणत. गण आणि गणपति मिळून आपल्या उन्नतीचा विचार करीत. त्याहीपूर्वी वेदांमध्यें ब्रह्मन्, ब्रह्मणस्पति, गणपति असे उल्लेख आहेत. हे गणपते, मी तुला बोलावतों, तूं आमची स्तुती ऐक, अशी 'गणानां त्वा' या मंत्रामध्यें प्रार्थना केलेली आहे. वेदकालापासून चालू असलेल्या या गणपति-पूजनाला गेल्या पन्नास वर्षांत लोकमान्य टिळकांच्या प्रेरणेनें समष्टिस्वरूप आलेलें आहे. या उत्सवांत धार्मिक, सामाजिक आणि राजकीय स्वरूपाचीही चर्चात्मक नि विचारप्रवर्तक अशीं व्याख्यानें होत असतात हें चांगलें आहे. लोकमान्य टिळकांचा या उत्सवाला हें नवीन राष्ट्रीय स्वरूप देण्याचा उद्देश धर्म व समाज संस्कृति या दृष्टीनें या उत्सवांत दहा दिवस लोकांना मार्गदर्शक अशी चर्चा व्हावी आणि हिंदुसमाज संघटित, प्रतिकारक्षम आणि कर्तव्यप्रवण व्हावा हा होता.

अलीकडे सामान्य जनसमूहामध्यें याविषयीं उत्सुकता वाढत आहे. त्यामुळें सामान्य जनांना आकर्षक असे करमणुकीचे कांहीं कार्यक्रम होणें अपरिहार्य आहे. तथापि उत्सव चालकांनीं गाणीं, नाच, नकला, काव्य-गायन असल्या कार्यक्रमांना शक्य तेवढा कमी वाव द्यावा. तसें न केल्यास उत्सव म्हणजे गाणें बजावणें, नाचरंग, करमणूक असा अर्थ होईल. मर्दानी खेळ, पोवाडे यांचे कार्यक्रम अवश्य ठेवावेत. मुलींचे मेळे आणि काव्यगायन हे कार्यक्रम केवळ स्त्रियांकरितांच ठेवावेत. हे कार्यक्रम सर्वां-करितां ठेवल्यास केवळ सुस्वरूप मुली पहाण्यासाठींच मवाली लोकांची गर्दी

होत असते आणि तें एकंदरीनें फार वाईट आहे. बृहन्महाराष्ट्रांत तर या उत्सवांत मुलींचीं नाटकें, मुलांचीं नाटकें, मुलें आणि मुली यांचीं मिळून नाटकें, इतकेंच नव्हे तर प्रौढ स्त्रिया आणि पुरुष या उभयतांची मिश्र नाटकें करण्याची फार अनिष्ट प्रथा पडत आहे. गणेशोत्सव म्हणजे जणुं मोहरमप्रमाणें हैदोसधुल्ला करण्याचा म्हणजे सर्व तामसीवृत्तींचा आविष्कार करण्याचा प्रसंग आहे असें समजलें जात आहे तें वाईट आहे. या उत्सवांत शिरलेल्या दोषांची चर्चा हल्लीं पुष्कळच होत आहे. म्हणून त्याविषयीं अधिक न लिहितां मुख्य उद्देशाला धरून हा उत्सव करावा एवढेंच येथें सांगतों.

(४३९) **नागपंचमीः**—नागपंचमी हा सण अखिल हिंदूंमध्यें दक्षिण महाराष्ट्र व कर्नाटकांत पाळला जातो. स्त्रिया तर नागचौथीचा उपास करतात. जिवंत नाग पहाणें, त्याला दूध देणें, पैसे देऊन नागवाल्या अहिंदूंची भर करणें हा सगळा मूर्खपणा आहे. या सणाला नागलोक व आर्यलोक यांच्या ऐक्याच्या दृष्टीनें महत्त्व आहे. आर्य व नाग यांचा विग्रह शेंकडों वर्षें चालला होता. शेवटीं आर्यांनीं नागांना आत्मसात् केलें, त्यांना चातुर्वर्ण्यांत स्थान दिलें, त्यांच्याशीं शरीरसंबंध केले, त्या ऐक्याचें स्मारक म्हणून हा सण आहे. अखिल हिंदु—स्त्रियांचें सामुदायिक हळदकुंकू पंचमीच्या दिवशीं अवश्य घडवावें. कारण हा सण पुरुषांपेक्षां स्त्रियांतच अधिक दिसतो. अनेक स्त्रिया ठिकठिकाणीं खेळ खेळणें, गाणीं म्हणणें, झोंपाळ्यावर बसणें अशा निमित्तानें एकत्र जमतात. त्यांतच सामुदायिक हळदीकुंकवाचा समारंभ घडवून आणणें अशक्य नाहीं. पुरुषांनीं गांवांतील प्रमुख अशा देवालयांत जमून सामुदायिक प्रार्थना आणि हिंदु-समाजाच्या एकतेचें गान करून हा सण पाळावा.

(४४०) **विजयादशमीः**—विजयादशमी हा सण तर राष्ट्रिय, ऐतिहासिक आणि पौराणिकही आहे. विजयादशमीच्या सुमुहूर्तावर विजिगीषु बुद्धीनें आपले प्राचीन थोर पूर्वज अन्य देशावर आक्रमण करीत, अहिंदूंच्या आक्रमणाचा प्रतिकार करून विजयोत्साहानें भगवा—ध्वज फडकावीत, असा या सणाचा इतिहास अगदीं पेशवाईपर्यंतचा ताजा आहे. हिंदुमहासभा—सप्ताह व नवरात्र महोत्सव यानंतर हा सण असल्या-

मुळें यासंबंधाची उत्सुकता समाजांत चांगलीच दृष्टोत्पत्तीस येते. अखिल हिंदु स्त्री–पुरुषांनीं मोठ्या थाटानें भगव्या ध्वजाची मिरवणूक काढावी. त्यांत घोडेस्वार, शस्त्रधारी, लाठीबहाद्दर, लेजीम नि दांडपट्टा खेळणारे भालाबर्च्यांवाले, पेहेलवान, असे सर्व असावेत. गांवाबाहेर सीमोल्लंघन करून तेथें ध्वजाचें अभिवादन, सामुदायिक प्रार्थना, हिंदूंचें एकतागान, व्याख्यान इत्यादि कार्यक्रम सामुदायिक पद्धतीनें करावा. शमीपूजन करून पांडवांनीं शस्त्रें धारण केलीं, तद्वत् हिंदु समाजाचे हातीं शस्त्रास्त्रें येण्यास कोणते उपाय केले पाहिजेत, याचीही समाजाला कल्पना द्यावी आणि सोनें देऊन एकमेकाला भेटणें, नमस्कार करणें, इत्यादि समारंभ करावा. दसऱ्याच्या निमित्तानें आप्तइष्ट, स्नेहीसोबती इत्यादिकांकडे अवश्य जावें. एकमेकांच्या घरीं जाणें, बोलणें, परस्पर कुशल प्रश्न विचारणें यांतच समाजाचें ऐक्य व बल असतें. लहानांनीं थोरांचे पुढें सुवर्णाच्या राशी ओतून पराक्रम सांगावा व वडिलांनीं त्यांना आशीर्वाद द्यावा, अशा या सणाचा योग येईल तेव्हां येवो, पण तोंवर रूढ दसऱ्याचें सोनें जितक्या अधिक घरीं जातां येईल तितक्या ठिकाणीं जाऊन देण्यास आळस करूं नये. ग्वाल्हेर, म्हैसूर इ. ठिकाणचे दसरा समारंभ मोठे होतात. ग्वाल्हेरास सोनें देण्याचा शिष्टाचार पुढें १५ दिवसपर्यंत चालतो. तो अनुकरणीय आहे. पुढारलेले, मागासलेले, पूर्वास्पृश्य व स्पृश्य अशा सर्व घटकांना कोणताही भेदभाव मनांत न आणतां भेटण्याची, बोलण्याची, परस्परांना स्पर्श करण्याची, एकत्र बसण्याची संधि देणारा असा हा उत्कृष्ट सण आहे.

(४४१) **दिपवाळीः**–दिपवाळीच्या सणाचेंही महत्त्व अनेक दृष्टीनें आहे. नरकचतुर्दशीस नरकासुराचा श्रीकृष्णानें वध केला व अनेक कुमारिकांना कारावासांतून मुक्त केलें. यास्तव स्त्रीदास्यविमोचनाचा हा दिवस आहे असें समजून त्या दृष्टीनें हिंदु समाजांतील स्त्रियांवर जीं आक्रमणें होत असतील त्यांच्या प्रतिकाराचा विचार व्हावा. बलिप्रतिपदा हा सण व्यापारी लोक मोठ्या समारंभानें पाळतात. वहीपूजन व लक्ष्मीपूजन करणें, पानसुपारी देणें, रोषणाई करणें, अनेक लोकांना बोलावणें वगैरे सर्व प्रचार चांगलाच आहे. बलिप्रतिपदेचें महत्त्व आर्य व अनार्य यांच्या सख्ख्याच्याही

दृष्टीनें आहे. त्याचें स्मारक म्हणून हा सण आहे. पूर्व इतिहास व पूर्व परंपरा यांचें स्मरण जितकें उज्ज्वलतेनें असेल तितकें उत्तम. भाऊबीजेच्या सणाची वेदकालीन यम व यमी यांच्यापासूनची परंपरा आहे. भावानें एक दिवस बहिणीच्या घरीं जाऊन तिचें कुशल विचारणें, तिला ओवाळणी घालणें, अशा सर्व दृष्टीनें हा सण चांगलाच आहे. अखिल हिंदूंमध्यें अधिकाधिक हा रूढ व्हावा, इतकेंच नव्हे तर रक्तसंबंधाच्या भावा-बहिणीच्या नात्याबरोबरच कार्यसंबंधाचें, हिंदुत्वसंबंधाचें भावाबहिणीचें नातें अखिल हिंदूंत अधिकाधिक वृद्धिंगत होत जाईल, असें करावें.

(४४२) **मकरसंक्रमणः**—मकरसंक्रमण हा सण पर्वकाल म्हणून आणि सामाजिक दृष्ट्याही पाळण्यांत येतो. अखिल हिंदू या पर्वकालीं स्नानदानादि कृत्यें करतात आणि स्त्रिया किंक्रांतीचे दिवशीं हळदीकुंकवाचे समारंभ करतात. नागपंचमीप्रमाणेंच मकरसंक्रांतीस अखिल हिंदु स्त्रियांचें सामुदायिक हळदीकुंकू व्हावें. अखिल हिंदु–समाजांतील स्त्रियांमध्यें अधिकाधिक दळणवळण वाढविणें, प्रेमभाव वाढविणें या दृष्टीनें या सणाचा उपयोग अवश्य होईल. पुरुषवर्ग तिळगूळ देण्याच्या निमित्तानें आप्तइष्ट, स्नेही, नातलग अशांच्याकडे जात असतो तें अत्युत्तम आहे. ‘ तिळगुळ घ्या, गोड बोला ’ या शब्दांत मागचें सर्व विसरा, कडूपणा सोडून द्या, पुन्हां आपण गोडपणानें व गोडीगुलाबीनें वागूं, एक होऊं, असा ध्वनि आहे. प्रपंचांत अनेक कारणानें प्रसंगीं एकमेकांशीं कडू होण्याचा प्रसंग येतो, तो घालविण्याची मोठी संधि म्हणजे हा सण होय. मागचे दंश विसरूनच व्यवहार चालतो. तसे ते विसरून नवा स्नेह जमवून अखिल हिंदूंनीं समाजाचें पाऊल पुढें पडेल असा यत्न या सणाचें निमित्तानें करावा. पूर्वास्पृश्यांनीं स्पृश्यांचें घरीं तिळगूळ देण्यास अवश्य जावें. तसेंच पुढारलेल्या वर्गानें मागासलेल्या वर्गाचे घरींही अवश्य जावें. विविधकार्यांचे निमित्तानें जे संबंध येऊं शकतात ते अधिक प्रेमयुक्त व्हावेत म्हणून दसऱ्याचे दिवशीं व संक्रांतीचे दिवशीं एकमेकांकडे जाणें अत्यंत योग्य आहे.

(४४३) **शिमगाः**—हा सण होलिकामहोत्सव या नांवानें सबंध हिंदुस्थानांत आहे. उत्तरेंत याचें महत्त्व फार आहे. शिमग्यांतील बीभत्स व अशिष्ट प्रकार बंद व्हावेत यासंबंधानें दुमत नाहीं. पण समाजांतील

कांहीं लोकांची करमणूक त्याच गोष्टीनें होते म्हणून वर्षांतून एकच सण त्या वृत्तीला पोषक असा असेल तर त्यांत वावगें नाहीं. हिंदुसमाजाशेजारीं हायदोस धुल्ला घालणारे अन्य समाज आहेत. अन्यधर्मीयांच्या सणांत व उत्सवांत पुष्कळ मागासलेले व निरक्षर हिंदु समाविष्ट होतात, त्याचें कारण वाटेल तसें नाचावयाला व बागडावयाला मिळतें हें होय! बहुजन-समाजाकरितां तसले सण पाहिजेत; अभिजनांनींही ते पाळून त्यांत सुधारणा कराव्या म्हणजे हळुहळू योग्य वळण लागेल. मर्दांनी खेळ खेळणें, सिंहाचीं सोंगें घेणें, रंगगुलाल उधळणें, नाचणें, बागडणें, यथेच्छ आरडा-ओरड करणें इत्यादि कृत्यांच्या प्रादुर्भावाकरितां शिमग्याचा सण पाहिजेच. बीभत्स, अश्लील, अचकटविचकट, घाणेरडे प्रकार पूर्वींच्या मानानें कमी होत आहेतच. धुळवडीच्या दिवशीं आतां डांबर, शेण, शाई कोणी अंगावर फारशी ओतीत नाहीं, तर रंग व गुलाल हींच घालतात. या सुधारणेप्रमाणें इतरही सुधारणा क्रमानें होतील.

(४४४) उगाच ओरडः—हिंदुसमाजांत सण फार आहेत, त्याचा खटाटोप फार, अवडंबर फार, खर्चही बराच अशी ओरड करणारा एक वर्ग आहे. ही ओरड पुष्कळ अंशीं उगाचच आहे, हें येथवर जें सणांचें महत्त्व सामुदायिक दृष्टया सांगितलें त्यावरून ध्यानीं येईल. वर्षांतून दोन वेळां एकमेकांचें घरीं सणानिमित्त जाणें, तसेंच वर्षांतून हळदीकुंकवाचे दोन सामुदायिक समारंभ करणें आणि हिंदुध्वजाची दोन वेळां मिरवणूक काढणें म्हणजे कांहीं मोठा खटाटोप नाहीं, खर्चही नाहीं. आपापल्या घरीं प्रत्येक मनुष्य गोडधोड करून खातच असतो, स्वच्छ व नवीं वस्त्रें धारण करतो, त्यांत विशेष असें कांहीं नाहीं. सणवार साजरे करणें, त्या निमित्तानें एकमेकांचें घरीं भोजनास जाणें व त्यानिमित्त योग्य तो खर्च करणें यांत वावगें तें काय? हें सर्व अवश्य आहे. 'संभोजनं, संकथनं, संप्रश्नोऽथ समागमः' एकत्र जेवणें, बोलणें, बसणें यांकरितांच हे सण आहेत. म्हणून उगाच ओरड न करितां त्यांचा उपयोग समष्टीकरितां करून घ्यावा.

(४४५). देशभेद व शिष्टाचारः—जुन्या हिंदुधर्मांतही

श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः।
सम्यक् संकल्पजः कामो धर्ममूलमिदं स्मृतम् ॥७॥—याज्ञ. स्मृ. अ. १

धर्मप्रमाणांमध्यें सदाचार, शिष्टाचार व रूढी यांचा समावेश केलेला आहे. शिष्ट नि सज्जन लोक जो आचार करतात तो शिष्टाचार वा सदाचार होय. या अर्थानें हा शब्द असला तरी सामान्यतः रूढी, परंपरागत चाली या दृष्टीनेंच हे शब्द उपयोगांत येतात. जुन्या स्मृतिग्रंथांत निरनिराळ्या देशांत निरनिराळे शिष्टाचार असतात, असे उल्लेख आहेत. बौधायनानें दक्षिण देशांत पांच व उत्तर देशांत पांच अशा दहा परस्परविरुद्ध चालींचा म्हणजे शिष्टाचारांचा उल्लेख केलेला आहे. ( बौ. ध. १, १, १७–२४ )

'पंचधा विप्रतिपत्तिः दक्षिणतस्तथोत्तरतः। यानि दक्षिणतस्तानि व्याख्यास्यामः। यथैतदनुपेतेन सह भोजनं स्त्रिया सह भोजनं पर्युषितभोजनं मातुलपितृस्वसृदुहितृगमनमिति। अथोत्तरत ऊर्णाविक्रयः सीधुपानमुभयतोदद्भिर्व्यवहार आयुधीयकं समुद्रसंयानमिति ॥' —बौधा. प्र. १।१।२२

'बापानें मुलाला ताटांत जेवावयाला घेणें, पत्नीबरोबर जेवणें, शिळें खाणें आणि आतेबहीण व मामेबहीण यांशीं विवाह करणें अशा चाली दक्षिण देशांत आहेत.' कित्येक ठिकाणीं मामेबहीण न मिळाली तर भांडणेंही होतात. उत्तर देशांत 'लोकरीची विक्री, मद्यपान, एकच पदार्थ दोन्हीं बाजूंनीं दांतांनीं तोडणें, ब्राह्मणांनीं शस्त्रधारण करणें, समुद्रगमन इत्यादि चाली आहेत.' या गोष्टी एकमेकांच्या एकमेकांनीं केल्यास दोष आहे. त्या त्या देशांत मात्र त्या प्रमाण होत, असें कित्येक म्हणतात; पण गौतमानें त्याविरुद्ध लिहिलें आहे. त्यावरून सर्व चाली व रूढी या परिस्थितिसापेक्ष असतात. ज्या काळीं जशी ज्यांची आवश्यकता तशा त्या उत्पन्न होतात असा त्याचा इत्यर्थ आहे. ज्यामुळें समाजसुधारणा होईल, वैयक्तिक उन्नति व समाजहित साधेल, अशा नव्या रूढी अवश्य पाडल्या पाहिजेत व जुन्या ज्या बाधक असतील त्या सोडल्या पाहिजेत.

(४४६) शिष्टाचार व समाजः–शिष्टाचाराचा समाजाशीं संबंध आहे. माझा मी धनी, मी वाटेल तसा वागेन, मला कोण विचारणार, हें बोलणें व्यष्टिधर्मांत कदाचित् खपेल. पण समष्टिधर्मांत मुळींच चालणार नाहीं. स्नान करणें, जेवणें, देवपूजा करणें या व्यष्टिधर्मांचा दुसऱ्याशीं संबंध

नाहीं, परंतु दुसऱ्याशीं वागण्याचा जो जो प्रसंग येतो त्या त्या ठिकाणीं एकांडे शिलेदारी चालावयाची नाहीं. ज्याचा तो भोगील हें तत्त्व चुकीचें आहे. आळीमध्यें घराला घरें लागून असतात. जळणाकरितां पळकाट्या घरांत कुठें तरी रचलेल्या असतात. एखाद्याच्या मुलानें गमतीनें काडी लावली तर तें घर पेटलेंच, पण त्याबरोबर आळींतील इतर घरेंही भस्मसात होतात! म्हणजे एक करतो व तें सर्व समाजाला भोगावें लागतें.

**एकः पापानि कुरुते फलं भुङ्क्ते महाजनः ।**–म. भा. ५।३३।४२

म्हणून समष्टिधर्म या दृष्टीनेंच शिष्टाचाराकडे पाहिले पाहिजे.

स्वच्छतेनें वागणें हें सर्वसामान्य तत्त्व आहे. याचा आरोग्याशीं संबंध आहे. म्हणून तें धर्माच्या मर्यादेपलीकडचेंही आहे. प्रत्येक मनुष्य मी वाटेल तसा अस्वच्छतेनें वागेन, माझ्या घरीं घाण झाली, उकिरडे वाढले, ढेकूण झाले, तुम्ही कोण विचारणार असें जर म्हणेल तर त्या कृत्यांचा समष्टीवर अनिष्ट परिणाम होतो म्हणून त्याला नियंत्रण घालणें भाग आहे. इतर देशांत सार्वजनिक जागेंत जर केरकचरा टाकून अस्वच्छता केली तर तेथें दंड होतात. जेथें केर टाकावयाच्या पेट्या असतात त्यांतच तो टाकला पाहिजे असें बंधन असतें. कोठें थुंकावें, कोठें शिंकरावें, कोठें ओकाऱ्या काढाव्या, कोठें तोंड धुवावें, यालाही कांहीं नियम आहेत व मर्यादा आहेत. चार माणसांच्या बैठकींत बसलें असतां कोपऱ्यांत थुंकणें, शिंकरणें, डोकें खाजविणें वगैरे गोष्टी अशिष्ट समजल्या जातात. कारण त्यामुळें इतरांना चिळस येते. एखादा बिडीबाज वाटेल तेथें बिडी ओढूं लागतो, पण दुसऱ्याला जर बिडीचा भपकारा सहन होत नसेल, तर त्यानें त्याला विचारूनच बिडी ओढणें हें शिष्टाचाराचें लक्षण आहे. दुसऱ्याला त्रास न होईल, दुसऱ्याची भावना न दुखावेल, स्वतःच्या व दुसऱ्याच्या स्वाभिमानास धक्का न लागेल अशा तऱ्हेनें वागणें म्हणजे शिष्टाचार होय.

(४४७) **सर्वसामान्य शिष्टाचार**:–जुन्या धर्मशास्त्रांतील पुष्कळसे शिष्टाचार सर्वसामान्य आहेत व ते आजच्या कालांतही उपयुक्त आहेत.

**नित्यं शुचिः सुगंधिः स्नानशीलः ॥३॥**

**सति विभवे न जीर्णमलवद्वासाः स्यात् ॥४॥**

न रूढश्मश्रुरकस्मात् ॥८॥ —गौतम अ. ९ प्र. १

पन्था देयो ब्राह्मणाय गवे राज्ञे ह्यचक्षुषे ।
वृद्धाय भारतप्ताय गर्भिण्यै दुर्बलाय च ॥५७॥
—बौधायन प्र. २ अ. ३

न बालकान् निर्भर्त्संयेत् । नैको मिष्टं (अश्नीयात्)
—विष्णु. अ. ६८

न कंचनावमन्येत । न हीनान् सेवेत । नाश्लीलं कीर्तयेत् ॥
—विष्णु अ. ७१

सभां वा न प्रवेष्टव्यं वक्तव्यं वा समंजसम् ॥ —मनु. अ. ८

**भावार्थः**—नित्य स्नान करून स्वच्छ व पवित्र असें असावें. अस्वच्छ असूं नये. अनुकूल असतांना घाणेरडीं वस्त्रें धारण करून व हजामत वाढवून दैन्य दाखवूं नये. गरोदर स्त्री, अंध, वृद्ध, भारवाहक, दुर्बल इत्यादींना आधीं वाट द्यावी व शक्य तें साह्य करावें. मुलांची निर्भर्त्सना करूं नये. त्यामुळें त्यांच्या कोमल मनावर अनिष्ट परिणाम होतात. मुलांच्या देखत किंवा इतरांच्याही देखत एकट्यानेंच गोडधोड खाऊं नये. सर्वांना थोडें थोडें देऊन खावें. पंक्तिप्रपंच करूं नये. सर्वांशीं सामान्य भोजन करावें. बोलावल्याविना सभेस जाऊं नये, गेलें तर असमंजस बोलूं नये, सभेचे नियम पाळून वागावें.

(४४८) **शिष्टाचारांचें परिवर्तनः**—याप्रमाणें गुरूचें शिष्याशीं व शिष्याचें गुरूशीं, मुलांचें वडिलांशीं व वडिलांचें मुलांशीं, पत्नीचें पतीशीं व पतीचें पत्नीशीं वर्तन कसें असावें यासंबंधाचे शिष्टाचारयुक्त अनेक नियम सांगितलेले आहेत. पण आज त्यांत बदल होणें अपरिहार्य आहे. स्वच्छ स्नान करून, भस्म लावून, पंचा नेसून, उपरणें पांघरून जर एखादा ब्राह्मण सभेंत गेला तर त्याला आज अशिष्ट समजतात, पण त्या-उलट फक्त मांड्या झाकणारी लंडकी लावून, अंगांत कुडतें अडकवून, बोडक्यानें एखादा मनुष्य सभेंत गेला तर तें शिष्टपणाचें समजलें जातें ! मुलानें वडिलांशीं आदरानें वागावें, जरा बाजूस उभें राहावें, उलट उत्तर देऊं नये असा पूर्वकालीन शिष्टाचार होता. आज मुलगा वडिलांना

तुमचें मत चुकीचें आहे, आपला मतभेद आहे, असें सांगून, 'माझ्या वृद्ध मित्रा, आभारी आहें,' असेंही तो म्हणतो! पूर्वी बायको नवऱ्याचें नांव तर घेतच नसे, कुणीं विचारल्यास घरीं नाहींत, कपडे दिसत नाहींत, असें ती बोले व नवराबायकोचे एकत्र येण्याचे प्रसंग आल्यास ती शक्य तों लांब राही. पण आतां पतिपत्नी मिळून फिरावयास, सिनेमास व सभेस जातात, एकमेकांना एकमेकांच्या नांवानें हांका मारतात, आपापल्या मित्रांचा परिचय करून देतात व घेतात! परिस्थिति बदलली, व्यवहार बदलले त्यामुळें जुने शिष्टाचार जाऊन नवे येणें अपरिहार्य आहे. त्यांत कांहीं अधर्म नाहीं व पाप नाहीं.

(४४९) **आदरातिथ्यः**—कोणी सभ्य गृहस्थ आला म्हणजे 'या, बसा' म्हणावें, गोड बोलावें, कामाची विचारपूस करावी, काम उरकून त्याला मार्गास लावावें. परिचित पाहुणा, स्नेही, इष्टमित्र, सोयरेधायरे घरीं आल्यास त्यांचें कसें आदरातिथ्य करावें हें विस्तारानें सांगण्याचें कारण नाहीं. त्यासंबंधीं एकच तत्त्व सांगतां येईल कीं,

महतां बहुमानेन दीनानामनुकंपया ।
मैत्र्या चैवात्मतुल्येषु यमेन नियमेन च ॥१७॥

आपणांपेक्षां जे विद्या, तप, कर्तृत्व, कला, गुण या दृष्टीनें श्रेष्ठ असतील, त्यांचा बहुमान करावा. जे लहान असतील त्यांच्यांशीं सहानुभूतीनें वागावें आणि बरोबरीच्यांशीं मित्रभावानें वागावें. हीं सूत्रें ध्यानीं ठेवून आदरातिथ्य करावें.

(४५०) **शिष्टाचाराचें तत्त्वः**—शिष्टाचाराचें मूलतत्त्व महाभारतांतील पुढील श्लोकांत उत्तम तऱ्हेनें ग्रथित केलें आहे.

आत्मनः प्रतिकूलानि परेषां न समाचरेत् । —महाभारत ।
यदन्येषां हितं न स्यादात्मनः कर्म पौरुषम् ।
अपत्रपेत वा येन न तत्कुर्यात्कथंचन ॥

—महाभारत १२।१२४।६७

यदन्यैर्विहितं नेच्छेदात्मनः कर्म पूरुषः ।
न तत्परेषु कुर्वीत जानन्नप्रियमात्मनः ॥

—महाभारत १२।२५९।२०.

यद्यदात्मनि चेच्छेत तत् परस्यापि चिंतयेत् ॥ –महाभारत.

भावार्थः–जें स्वतःला अप्रिय व प्रतिकूल तसेंच तें दुसऱ्यालाही असतें, असें समजून इतरांशीं वागावें. ज्यामुळें इतरांचें हित होणार नाहीं व ज्यामुळें आपल्यालाही लाज वाटेल असें कृत्य करूं नये. स्वतःला अप्रिय असें वर्तन अन्याशीं न करतां जें स्वतःला इष्ट व अनुकूल असावें असें वाटतें, तसेंच तें दुसऱ्यांनाही वाटतें असें समजून वागावें. ( थोडक्यांत आपणावरून जग ओळखावें व वागावें. )

(४५१) अज्ञान व अशिष्टताः–हिंदुसमाजामध्यें पुष्कळसे शिष्टाचार निरक्षरता, अज्ञान व आपल्या हक्कांची जाणीव नसणें यांमुळें पाळले जात नाहींत. उदाहरणार्थ, इंडियन रेल्वे ॲक्टप्रमाणें डब्यांत बिडी ओढणें, गुडाखू ओढणें, हुक्का पिणें, वाटेल तेथें थुंकणें, या गोष्टी उपद्रवात्मक असल्यामुळें त्यांचा प्रतिबंध करतां येतो. डब्यांत सर्वच जर बिडी ओढणारे, हुक्का पिणारे असतील तर प्रश्न नाहीं. पण ज्याला ती संवय नाहीं, त्याच्या परवानगीनेंच धूम्रपान केलें पाहिजे; नाहींतर त्याला उलटी होण्याचा संभव असतो. एखाद्याच्या इच्छेविरुद्ध जर धूम्रपान होत असेल तर लगेच रेल्वे–अधिकाऱ्यांना सांगून तें बंद करतां येईल. डब्याची व शौचकूपाची स्वच्छता ठेवणें हें रेल्वे–अधिकाऱ्यांचें काम आहे. त्याबद्दलही तक्रार करतां येते. रेल्वेंत माणसें वाटेल तेथें थुंकतात! पण त्याचाही प्रतिबंध करतां येतो. तंबाकू खाणारे लोक घरांतील अंगण नि खिडकीबाहेरचा रस्ता थुंकून लाल करीत असतात. ज्यांना घरांतच ही असली संवय ते लोक बाहेरही तसेच वागतात. पण व्यष्टिधर्मांत कोणी विचारीत नसलें तरी समष्टीच्या व्यवहारांत हें चालत नाहीं, एवढें तरी या लोकांना सत्तेचें पाठबळ घेऊन दाखविलें पाहिजे.

(४५२) स्वच्छता ठेवावीः–खेडेगांवांत व क्वचित् शहरांतही सकाळीं उठून मुलांना शेजाऱ्याच्या भिंतीकडेस शौचास बसविण्याची प्रथा आहे. शेजाऱ्याचीं मुलें उलट आपल्या भिंतीकडेस शौचास बसतात व ही फिटाफीट होते. घरांतील केर दाराबाहेर रस्त्यावर कुठेंही टाकावा. कमेटीचे डबे, हौद, पिंपें असलीं तरी त्यांत केरकचरा टाकण्याचें शिक्षणच नाहीं.

या आपल्या वर्तणुकीनें एकंदर समाजाच्या आरोग्यावर काय परिणाम होतो, याचा विचार कोणी करील तर शपथ!

(४५३) **हळु बोलावें**:—आगगाडी, हॉटेलें, सभा अशा ठिकाणीं इतरांना किती त्रास होत असेल याचा विचार न करतां माणसें मोठ्यानें व आवेशानें बोलत असतात! स्टेशनवर तर अपरात्रींसुद्धां चहावाल्यांची ओरड चालूच असते. सभांतील कुजबुज तर प्रसिद्धच आहे. लेंकुरवाळ्या बायांच्या मुलांचें रडणें, मधूनमधून कांहीं लोकांनीं उठून जाणें व कांहींनीं बसणें हे सर्व सभेंतील अशिष्ट प्रकार होत. इंग्लंडादि देशांत एका वेळेला पांचपांच हजार माणसें जेवत असतात. पण प्रत्येकाचे शब्द आपापल्या टेबलाच्या बाहेर ऐकूं येत नसतात! गर्दी झाल्यास क्रमानें उभे राहणें, एकामागून एकेकांनीं जाणें, चेंगराचेंगरी न करणें अशा अनेक शिस्तीच्या व शिष्टाचाराच्या चाली हिंदुसमाजामध्यें यावयास पाहिजेत.

(४५४) **पत्रोत्तरें द्यावीं**:—घरीं कोणी भेटावयाला आला तर 'या बसा' असें म्हणणें व त्याच्याशीं कामाच्या तारतम्यानें बोलणें हें जसें शिष्टाचाराचें लक्षण आहे, तसेंच आलेल्या पत्रांचीं उत्तरें देणें हेंही एक शिष्टाचाराचें अंग आहे. विनाकारण कोणी पत्रें पाठवीत नसतात; कारण त्याला पैसा व वेळ खर्चावा लागतो. कार्यनिमित्तानें आलेल्या पत्रांचीं उत्तरें अस्तिनास्तिपक्षीं कशींही पण पाठवावीं. कार्यार्थ आलेल्या गृहस्थाशीं न बोलणें व पत्रोत्तर न देणें या दोन्ही गोष्टी सारख्याच अपमानास्पद होत. पूर्वीपेक्षां हल्लीं व्यवहार वाढला, दळणवळण वाढलें, त्यामुळें पत्रव्यवहारही वाढला आहे; म्हणून वेळचे वेळीं पत्रोत्तरें देणें हा शिष्टाचार आजच्या कालांत प्रत्येक हिंदूनें अवश्य पाळावा. पत्रोत्तरें न दिल्यामुळें कामाचा निकाल लागत नाहीं व तो दंशही मनांत राहतो.

(४५५) **प्रसंगीं साह्य करावें**:—अडीअडचणीस एकमेकांच्या उपयोगीं पडणें, निदान तशी वृत्ति दाखविणें हा शिष्टाचार अखिल हिंदूंनीं पाळावा. अलीकडे लग्नकार्यप्रसंगीं माणसें जीं भोजनास जातात तीं अगदीं पाहुण्यासारखीं जाऊं लागलीं आहेत. अशा प्रसंगीं आलींतील निमंत्रितांनीं, आप्तेष्टांनीं, स्नेह्यांनीं स्वतः होऊन थोडें तरी कार्य केलें

पाहिजे. स्वैपाकी, पाणके, वाढपी हे सर्व मोलानें मिळतात. हारतुरे, लावलेले विडेसुद्धां आतां विकत मिळूं लागलेले आहेत. पण याचा एकंदर परिणाम गरिबाच्या खिशावर तर चांगलाच होतो, पण मध्यम गृहस्थालाही तो जाणवतो! थोडी थोडी मदत जर जवळच्यांनीं केली तर निदान पंचवीस ते पन्नास रुपयांची बचत सहज होते. एकमेकांकरितां एवढे श्रम करणें हें फार अवघड नसतें. विडे लावणें, पाटरांगोळ्या घालणें, वाढणें, उष्टीं काढणें आणि या तऱ्हेचींच कामें करणें मोठ्या कष्टाचें असत नाहीं. खेड्यांत तर सर्व वस्तु विकत मिळत नसल्यामुळें व मंडळींचें साह्य नसल्यामुळें अलीकडे फारच नडतें. कोंकणप्रांतांत अद्यापि एकमेकांना अशा प्रसंगीं साह्य करण्याचा इष्ट प्रघात आहे. त्यांचें अनुकरण सर्वत्र व्हावें.

(४५६) **रुग्णसमाचार घ्यावा**:—आपल्या आळींत कोणी अत्यवस्थ आजारी असल्यास त्याही प्रसंगीं रोज चौकशी करणें आणि 'कांहीं मदत लागल्यास कळवा' असें आश्वासन देणें हाही शिष्टाचार पाळला पाहिजे. डॉक्टर, वैद्य व घरचीं माणसें असतातच. पण अशा प्रसंगीं सहानुभूतीची आवश्यकता अधिक असते. शाब्दिक सहानुभूतीनें सुद्धां मनुष्याला धैर्य येतें. यास्तव स्वतः जाऊन विचारपूस केल्यास माणसाला बरें वाटतें. नाहीं तर आळींत घर आहे, रोज तोंड पहाण्याचा प्रसंग आहे, पण **ज्याचा तो व कोणी कोणाचा नाहीं**, ही वृत्ति अत्यंत घातक आहे. रुग्णावस्था व कार्यप्रस्थ हे प्रसंग परस्परांस साह्य करण्याचे असतात. त्या वेळीं सहानुभूतीचा व शक्य तर कृतीचाही ओलावा दाखविला पाहिजे.

(४५७) **स्वाभिमान व शिष्टाचार**:—स्वतःचा स्वाभिमान राखून घेणें व दुसऱ्याचा स्वाभिमान न दुखविणें, हेंही एक शिष्टाचाराचें अंग आहे. स्त्रियांच्या स्वाभिमानाला धक्का लागेल असें वर्तन पुरुषाकडून होतें नि मुलांच्या स्वाभिमानाला धक्का लागेल असें वर्तन पालकांकडून होतें. कित्येक पालक तर मुलें पानावर जेवावयाला बसलीं कीं तोंडाचा पट्टा सोडत असतात!! कर्तव्याची जाणीव नसल्यास ती करून द्यावी. कर्तव्यतत्परता शिकवावी, पण त्याबरोबर अद्वातद्वा बोलणें, अपशब्द उच्चारणें, हा शिष्टाचार नव्हे. मोटार-ड्रायव्हर, मोटार एजंट नि उतारू, रेल्वेचे अधिकारी नि

ावासी, वकील नि पक्षकार, श्रोते आणि वक्ते, मालक नि मजूर, संपादक नि लेखक, शिक्षक नि विद्यार्थी, वैद्य नि रोगी अशांचे व्यवहार त्रासदायक, घासाघाशीचें, हमरीतुमरीचे घडलेले दृष्टीस पडतात; याचें कारण स्वाभिमानस्पर्शी असें भाषण आणि कर्तव्याची जाणीव नसणें हें होय. स्वाभिमान व कर्तव्यदक्षता हे गुण परस्परपोषक आहेत. धीरता, तेजस्विता, सभ्यता हेही गुण शिष्टाचारास अवश्य लागतात. अशिष्टपणामुळें वैयक्तिक हितास तर बाध येतोच, पण समाजहितासही प्रतिबंध होतो. अनेक नवे शिष्टाचार सांप्रत समष्टिहिताच्या दृष्टीनें रूढ व्हावयास पाहिजेत. नवे शिष्टाचार रूढ करण्यास लोकांची टीका सोसण्यापुरतें धैर्य लागतें. समाजांतील सर्व व्यक्ति एकदम कधीं सुधारत नसतात. म्हणून ज्याला पटेल व इष्ट वाटेल त्यानें आपल्यापासूनच नव्या शिष्टाचारास प्रारंभ करावा.

**(४५८) शिष्टभाषाः**–प्रत्येक हिंदूनें सज्ञान हिंदूशीं घराबाहेरच्या व्यवहारांत वागतांना ' अहो, जाहो ' असा शिष्टप्रयोग करावा. 'अरे, जारे' ही अशिष्ट भाषा सोडावी. हिंदुसमाजांत कांहीं पुढारलेले व कांहीं मागासलेले असे वर्ग आहेत. पुढारलेला वर्ग मागासलेल्याशीं बोलतांना ' अरे, जारे ' अशी भाषा वापरतो. तें यापुढें सोडून द्यावें. प्रत्येक हिंदूनें प्रतिदिनीं जी पहिली भेट परिचित हिंदूशीं होईल, त्यावेळीं परस्परांनीं परस्परांस उच्चार करून नमस्कार करावा. भेटीनंतर निरोप घेतांना ' वंदे मातरम्, ' ' हिंदुराष्ट्राचा विजय असो ' असें म्हणावें. बराच वेळ कामानिमित्त घेतला असल्यास ' उपकृतोऽस्मि ', ' क्षन्तव्यम् ' असें बोलावें. तारतम्यानें योग्य प्रसंगीं ' सुस्वागतम् ', ' सुप्रभातम् ' ' सुनिशम् ' ' सुदिनम् ' अशीं वाक्यें वापरण्याचा शिष्टाचार अवश्य पाळावा.

**(४५९) स्त्रीदाक्षिण्यः**–पूर्वीपेक्षां आजचें जीवन गुंतागुंतीचें झालें आहे. स्त्रीपुरुषांना एकत्र येण्याचे प्रसंग पुष्कळ येत असतात. त्या प्रसंगीं स्त्रीदाक्षिण्यानें वागणें अवश्य असतें. सिनेमा, नाटकें व सभा संपल्यानंतर स्त्रियांना धक्के देत गर्दीतून जाण्यापेक्षां त्या गेल्यानंतर पुरुषांनीं मागाहून जाणें चांगलें. देवालयें, पाणवठे, पाण्याचे नळ, हौद, विहिरी इत्यादि ठिकाणीं स्त्रीपुरुषांची गर्दी होत असते, त्याही वेळीं स्त्रीदाक्षिण्य दाखविणें अवश्य

आहे. तिकिटाच्या खिडकीवर माणसांची झोंड असल्यास, रेल्वेच्या डब्यांत गर्दी असल्यास, प्रथम स्त्रियांना तिकिटें घेऊं देणें, त्यांना जागा मिळवून देणें हा शिष्टाचारच होय.

(४६०) **दुर्जनप्रतिकारः**—अशिष्ट लोकांकडून कोणत्याही तऱ्हेचा, कोणत्याही प्रसंगीं त्रास होत असेल तर त्याचा वाणीनें, शरीरानें यथोचित प्रतिकार करणें हाही शिष्टाचारच होय! 'जाऊं द्या कीं हो, कशास त्याच्या तोंडीं लागतां, तो मूर्ख आहे,' असें म्हणणें **म्हणजे अशिष्टतेला उत्तेजन देणें होय!** रेल्वे, पोस्ट, बँका, कोर्टें, कचेऱ्या, शेतकीसंघ, व्यापारीसंघ, मजूरसंघ, मालकसंघ, शिक्षकसंघ, पालकसंघ अशा विविध संस्थांशीं आजचें जीवन निगडित झालें आहे. त्या त्या संस्थांचे नियम कार्यसौकर्याकरितां पाळणें, हाही शिष्टाचार आहे. त्या त्या संस्थांचे द्वारें जितकें हित करून घेणें शक्य असेल तितकें घेणें, त्याकरितां झटणें हा शिष्टाचारच होय. शिष्टाचारासंबंधीं सामान्यत्वानें येथवर जें विवेचन केलें, त्यावरून या विषयाचें स्वरूप वाचकांच्या ध्यानीं येईल.

—*—

# प्रकरण एकोणतिसावें

## व्रतें व नेमधर्म

हिंदुसमाजामध्यें अनेक प्रकारचीं व्रतें खालच्या थरापासून तों अगदीं वरच्या थरापर्यंत चालू असलेलीं आढळतात. परंपरेनें जीं व्रतें चालू आहेत, त्यांचा चिकित्सापूर्वक विचार करून नव्या कालाला अनुरूप अशीं कोणतीं व्रतें करावीं याची चर्चा येथें करितों.

(४६१) **व्रतांचा उपयोगः**—कोणतेंही व्रत करतांना त्याचें पारतें अदृष्ट आहे, पुढच्या जन्माशीं त्याचा संबंध आहे

अशी कल्पना असूं नये. व्रतामुळें मनःशांति, इंद्रिय-निग्रह, आत्मविश्वास, स्वाभिमान व समाजसंघटना यांचा लाभ झाला पाहिजे. व्रताचीं हीं फळें ध्यानीं घेऊनच व्रताचरण करावें. व्रत म्हणजे एक प्रकारचें तप होय. आणि तप म्हणजे मन व इंद्रियें यांना चांगल्या ध्येयाकडे वळविण्याचा प्रयत्न होय. व्रतामध्यें कायिक, वाचिक आणि मानसिक दृष्टया शुद्धीची आवश्यकता असते. भगवद्गीतेंत बुद्धिमान् व कर्त्या पुरुषांचा आदरसत्कार करणें, शुद्धता, सरळपणा, ब्रह्मचर्य व अहिंसा यांना शारीर तप म्हटलें आहे. ( गीता १७-१४ ). दुसऱ्यास उद्वेग उत्पन्न न करणें, सत्य, प्रिय व हितकारक असें भाषण करणें, चांगल्या ग्रंथांचें वाचन करणें, यांना वाचिक तप म्हटलें आहे. ( गीता १७-१५ ). मन शांत नि प्रसन्न ठेवणें, निर्मल अंतःकरणानें विचार करणें, सात्त्विक आनंदांत असण्याचा यत्न करणें, याला मानसिक तप असें म्हटलेलें आहे. ( गीता १७-१६ ). या त्रिविध तपांशीं सुसंगत नि अनुकूल अशीं व्रतें समाजांत रूढ झालीं पाहिजेत.

(४६२) **स्नानाचें व्रत**:—हिंदुसमाजांतील स्त्रियाच पुष्कळशीं व्रतें, नेमधर्म व उपवासादि करीत असतात. पुरुषाकडे हा भाग फारच थोडा दिसतो. तथापि प्रत्येक हिंदु स्त्रीपुरुषानें कांहीं व्रतें वर्षांतून अवश्य केलीं पाहिजेत. त्यांतील स्नान हें एक व्रत होय. स्नान हें शरीरशुद्धीकरितां आहे. स्नान करण्यास उत्तम वेळ म्हणजे सूर्योदयापूर्वीं पहाट ही होय. स्नानामुळें जठराग्नि प्रदीप्त होतो, पुरुषत्व, आयुष्य, उत्साह आणि शक्ति यांची वृद्धि होते, तरतरी येते, मनास एक प्रकारचा पवित्रपणा वाटतो. खाज, खरूज, पुरळ असले त्वचेचे रोग होत नाहींत. झोंप चांगली येते. घाम, झापड, तहान व दाह यांचा परिहार होतो. स्नान हें शीतोदकानें करणें अवश्य आहे. स्नानाचे दहा गुण महाभारतांत सांगितलेले आहेत. ( त्याचें विवेचन आमचा न. यु. विद्यार्थिधर्म पा. ३९ वर वाचकांनीं अवश्य पहावें. ) दिवसांतून केव्हां तरी स्नान न करतां पहांटे स्नान करणें चांगलें. बारा महिने पहांटे स्नान करणें जमतें नसतें. म्हणून कार्तिक स्नानें, माघ स्नानें आणि वैशाख स्नानें हीं तरी करावींत. या स्नानांच्या फलश्रुत्यांचा मुळींच विचार न करतां आरोग्यदृष्ट्या व मनःप्रसादाचे दृष्टीनें हीं स्नानें करावींत. आश्विनी पूर्णिमेपासून कार्तिकी पूर्णिमेपर्यंत शरदृतु असतो. माघी पूर्णिमेपासून

फाल्गुनी पूर्णिमेपर्यंतचा काल हा हिवाळा व उन्हाळा यांचा संधिकाल असतो. वैशाखांत तर उन्हाळाच असतो. म्हणून निसर्गाची अनुकूलता व आरोग्य या दृष्टीनें ज्यांना शक्य असेल त्यांनीं हीं स्नानें म्हणजे हें स्नानाचें व्रत अवश्य पाळावें. व्रत म्हणून हीं स्नानें करण्यांत आत्मविश्वास, निश्चय व निग्रह वाढतो. ज्यांना सोसत नसेल, जे आजारी असतील त्यांनीं हें व्रत करूं नये. ज्यांना शीतोदक स्नान सोसत नसेल त्यांनीं ऊन पाण्यानें स्नान करावें.

**(४६३) उपवास शब्दाचा अर्थः**–उपवास हा एक प्रत्येक व्रताचा भाग आहे. प्रत्येक व्रताशीं उपवासाचा संबंध असतो. कांहीं न खातां आणि न पितां चोवीस तास अगर छत्तीस तास राहाणें व त्या कालांत वरील त्रिविध तपांचें आचरण करणें यालाही कांहीं महत्त्व आहे. उपवास शब्दाचा अर्थ उप म्हणजे जवळ व वास म्हणजे राहाणें असा आहे.

उपावृत्तस्य पापेभ्यो यस्तु वासो गुणैः सह ।
उपवासः स विज्ञेयः सर्वभोगविवर्जितः ॥

–याज्ञ. अपरार्क १–१५४

पापापासून म्हणजे दुर्गुणापासून लांब राहून सद्गुणांच्या सहवासांत राहाणें म्हणजे उपवास होय. गुणाशीं सहवास म्हणजे गुणवानाशीं सहवास असा लक्षणेनें अर्थ केला पाहिजे. वामनपंडितांनीं 'चित्त जो उपसमीपचि वासी । राघवी करिल तो उपवासी,' असें म्हटलें आहे. कांहीं न खातां किंवा खाण्यांत निग्रह व नियम ठेवून शीलसद्गुणादि दैवी संपत्तीनें युक्त होऊन ईशचिंतन करणें असा उपास शब्दाचा अर्थ होतो. या दृष्टीनें व्रतांगभूत उपवास जर पाळले गेले तर तेंही एक तपच आहे. तपाचें महत्त्व निरनिराळ्या ठिकाणीं महाभारतांत पुढीलप्रमाणें वर्णिलें आहेः—

**(४६४) उपवास हें एक तपच होय.**

**नाप्राप्यं तपसा किंचित् ।** –म. भा. १२।२९५।२३
**उपभोगांश्च तपसा ( लभेत् )** –म. भा. १३।७।१४
**तपो हि बलवत्तरम् ।** –म. भा. १३।१२२।८

मनुष्याकडून कायिक, वाचिक, मानसिक दोष घडतात. प्रत्येकानें आत्मनिरीक्षण करून जर आपल्या मनाशीं आढावा घेतला तर त्याला असें

दिसून येईल कीं स्वतः निश्चित केल्याप्रमाणें आपलें मन व इंद्रियें वागत नाहींत, अर्थात् त्यांचेकडून कांहीं दोष घडतात. या सर्व चुकांना उपास हें प्रायश्चित्त आहे. शारीरिक दृष्ट्या आणि आरोग्यदृष्ट्या उपास अवश्यच आहे आणि सामाजिक दृष्ट्याही उपासाला एक महत्त्व आहे. केव्हां तरी मर्जीप्रमाणें उपास करणें यापेक्षां एकादशी, जन्माष्टमी, शिवरात्र, संकष्टी या निमित्तानें उपास करण्यांत समष्टीच्या त्या भावनेचा लाभ मिळतो. कारण त्या दिवशीं सबंध समाजामध्यें आज उपास आहे, आज हरिदिनी आहे, आज शिवरात्र आहे, अशी कल्पना वावरत असते.

(४६५) **उपवासविडंबनः**—कांहीं न खातां व कांहीं न पितां अगदीं निर्जला वैष्णवी उपास करणें हें एक टोंक, तर उपासाच्या नांवावर वऱ्याचें तांदूळ, शिंगाडे यांच्या पिठाच्या जिलब्या, पुऱ्या, लाडू झोडणें, भुइमूग, बटाटा, शाबूदाणा यांचे विविध पदार्थ भोजनाच्या दुप्पट खाणें, असें उपवासाचें दुसरें टोंक आहे. भोजन करतांना रामराम म्हणत जेवलें म्हणजे उपास घडतो किंवा दिवसांतून दोन वेळांच जो जेवतो तो उपाशी होय अशा समजुती आहेत. आज समाजांत जो रूढ, एकादशीचा उपास, आहे तो आर्थिक दृष्ट्याही अधिक खर्चाचा पडतो. ज्या घरांत चारदोन मुलें—बाळें व तीनचार स्त्रीपुरुष उपासाचे आहेत तेथें केळीं, रताळीं, शाबूदाणा, खजूर, वऱ्याचें तांदूळ इत्यादिनिमित्त निदान एक रुपाया लागतो व तो फस्त करून पुन्हां उपास तो उपासच !! उपासाचे पदार्थ घरीं आल्यापासून मुलांची एकादशी सुरू होते. दाणे, रताळीं, केळीं, मुलें जातां येतां खातात. जेवावयाचें जेवून पुन्हां हे सर्व पदार्थ खातात ! त्यामुळें मुलांच्या प्रकृतीला अपाय होतो. पावसाळ्यांत तर मोठ्या माणसांनाही हे सात्म्य न होणारे पदार्थ अपाय करतात ! रोजच्या स्वैंपाकापेक्षां हा एकादशीचा खटाटोपही कांहीं कमी नसतो. तोंडपालट म्हणून हे पदार्थ खावयाचे असले तर ते जेवणांतही खातां येतात. पण तसें होत नसल्यामुळें खर्च, खटाटोप व आरोग्यदृष्ट्या रूढ उपास त्रासदायक झालेला आहे. तो बंद करून लहान मुलांसह सर्वांना जमेल असा हविष्यान्नाचा, दूधभाताचा किंवा नुसती चपाती व दूध यांचा पर्याय रूढ करणें अवश्य आहे. अलीकडे कांहीं घरांना खादाडपणामुळें खानावळीचें व हॉटेलचें स्वरूप येत चाललें आहे. कोणी केव्हांही आला कीं चहा दे,

जास्त परिचित आला कीं त्याला चिवडालाडूचा आग्रह कर, व त्याबरोबर स्वतःही खा, असें दिवसांतून कांहीं वेळां तरी होतें. या अतियोगावर तोडगा म्हणजे पंधरा दिवसांतून एक दिवस मुलांबाळांसह नुसता दूधभात खाऊन एकादशी करणें हा होय.

(४६६) उपास कसा करावा ?:—

स यदेवाशितमनशितं ( भवति ) तदश्नीयादिति
यस्य वै हविर्न गृह्णन्ति तदशितमनशितम् ॥

—शत. ब्रा. १–१–१–८–९

जें देवांना द्यावयाचें नसतें, जें हविर्द्रव्य नव्हे तें खाऊन उपवास होतो. कांहीं न खातां उपास करणें म्हणजे शरीराचें कर्षण होत. अर्थात् फळें, दूध असें कांहीं थोडें खावें किंवा दूधभात किंवा नुसतें दूध व चपाती असें कांहीं खाऊनही उपास होतो. नव्या दृष्टीनें सांगावयाचें म्हणजे दर पंधरवड्यास एकादशीचा एक उपास अवश्य आहे. दशमीच्या रात्रीं कांहीं न खातां मूठभर काळ्या मनुका खाऊन पाणी पिऊन निजावें. दुसऱ्या दिवशीं शौचास साफ होतें. दिवसभर थोडेंथोडें पाणी प्यावें. सायंकाळीं एनिमा घ्यावा. रात्रीं झोंप येतच नसेल तर आणि पोटांत फार कलकललें तर पावशेर दूध व दोन केळीं खावींत. हा उपवासाचा प्रकार अत्यंत हितकर होय. हें न जमलें तर दिवसभर उपास करून सायंकाळीं एनिमा घेऊन रात्रीं नुसता तूपभात किंवा दूध-भात खावा. वाटल्यास ताकभात खावा. हेंही नको असल्यास उपवासाचे रूढ पदार्थ अगदीं बेतानें खावेत. उपासाच्या दिवशीं शक्य तर मौन पाळावें. मौनामुळेंही मनाचें सामर्थ्य वाढतें. मौनपूर्वक धर्मग्रंथांचें वाचन, मनन, चिंतन, जप, मानसपूजा अभिषेकादि करीत पंध्रवड्यांतून एक दिवस घालवावा. मौन धारण केलें असतां अवश्य तेवढ्या खुणा करणें, थोडेंसें लिहून दाखविणें क्षम्य आहे. शक्य तों असा प्रसंगच येणार नाहीं अशी व्यवस्था मौनापूर्वी करावी. सारख्या खुणा, सारखे हातवारे, सारखें लिहून दाखविणें यांपेक्षां मौन मोडणें चांगलें.

**(४६७) कोणतीं कामें करावींत ?**:—उपवासाच्या दिवशीं उप-वासाचे म्हणून अरबट चरबट पदार्थ खाणें, अद्वातद्वा बोलणें, क्रोध,

ईर्ष्या, असूयादि वृत्ति वाढतील अशीं कामें करणें अयोग्य आहे. स्त्रिया तर उपासाच्या दिवशीं भाजाणीचें काम काढतात, कुणी शेवया करतात, कुणी मेतकूट करतात, तर कुणी घराचें सारवणही काढतात. उपवासाचा दिवस हा रजोगुणी व तमोगुणी कार्यांत न घालवितां पवित्र कार्यांत, पवित्र विचारांत व उदात्त कल्पनांमध्यें घालवावा. तसें करण्यास मौनाचें फार साह्य होतें.

(४६८) मंगळागौरी व महालक्ष्मीः—व्रतांगभूत जो उपास त्याचें येथवर विवेचन केलें. आतां व्रतविचार करूं. स्त्रियांमध्यें हरितालिका, वटसावित्री, हीं दोन व्रतें लहानपणापासून पाळण्यांत येतात. कुमारिकेचें लग्न झालें म्हणजे पांच वर्षे शिवामूठ, मंगळागौर आणि कांहीं हिंदु स्त्रियांमध्यें महालक्ष्मीचें व्रतही पांच वर्षे करण्यांत येतें. पूर्वी लहानपणीं लग्नें होत असत. तेव्हां पांच वर्षे मंगळागौरी पूजणें व महालक्ष्मीव्रत करणें ठीक होतें. आतां विवाहाची वयोमर्यादा वाढली आहे. म्हणून या व्रताचा अवधि एका वर्षावर आणला पाहिजे. कारण या पांच वर्षांत या विवाहित कुमारीचीं दोन तरी बाळंतपणें होतात आणि विटाळसपण, बाळंतपण आणि इतर नडी यांमुळें तिच्या मंगळागौरी अंतरतात! दोनतीन मुलें बरोबर घेऊन मंगळागौर पूजणें हें विडंबनच होय, यास्तव काळाचा संकोचच इष्ट आहे. स्वतःचे घरीं एकदांच हौसेनें मंगळागौर होते. दुसऱ्या घरीं जाणें, अपरिचित ठिकाणीं जाणें, घरांत पुनःपुनः ती केल्यास खर्च पडणें अशाही अडचणी आहेत. पांच वर्षे महालक्ष्मीपूजन हें तर त्याहीपेक्षां त्रासदायक होत आहे. म्हणून सामुदायिक महालक्ष्मीपूजनाची पद्धत पडत चालली आहे, ती ठीक आहे. महालक्ष्मीव्रताचाही काल पांच वर्षांवरून एक वर्षावर आणणें अवश्य आहे.

(४६९) हरितालिकाः—हरितालिका व्रत हें समाजांत सर्वत्र रूढ आहे. भविष्योत्तर पुराण—कथित या व्रताचा विचार केल्यास मुलीच्या मान्यतेशिवाय पित्यानें लग्न करूं नये व तें प्रौढपणीं करावें एवढाच त्याचा इत्यर्थ आहे. पार्वतीच्या पित्यानें तिचें लग्न ठरविलें. पित्यानें योजलेला वर तिला पसंत नव्हता, म्हणून ती घरांतून पळून गेली व तिनें वनांत जाऊन तपश्चर्या केली. तिला मनापासून शंकरच पति हवा होता,

तो तिच्या तपश्चर्येनें प्रसन्न झाला व त्याच्याशीं तिनें लग्न लावलें, असें या व्रताच्या कथेंत आहे. आज विवाहाची वयोमर्यादा वाढली आहे आणि प्रौढ मुली आपापले पती पसंत करीत आहेत. इतकेंच काय पण त्यांच्या संमतिविना कोणताही पिता आपल्या मुलीचें लग्न करीत नाहीं; म्हणून हें व्रत स्त्रियांनीं यापुढें न पाळलें तरी चालेल.

(४७०) **वटसावित्रीः**–अखिल हिंदु स्त्रियांनीं वटसावित्रीचें व्रत व पूजा एक दिवसाचा उपास करून अवश्य पाळावें. सावित्रीनें सत्यवानाला जसें यमाच्या कचाट्यांतून सोडविलें तसें स्त्रियांनीं ज्यांचे पति रोग, ऋण, व्यसन, अव्यवस्थितपणा इत्यादींच्या तावडींत सांपडले असतील, त्यांना सोडविण्याचा यत्न करावा. देहांतर हा जसा मृत्यु तसा 'किं मरणम् मूर्खत्वं' मूर्खपणा हेंही मरण होय. प्रत्येक स्त्रीला मूर्खत्वाच्या मरणांतून आपल्या पतीला मुक्त करणें शक्य आहे. स्त्रियांनीं प्रतिवर्षी ज्येष्ठी पूर्णिमेस एकंदर स्त्रीजीवनाचा, स्त्रीचारित्र्याचा, स्त्रियांच्या हक्काचा विचार करावा व त्यांत आपापली प्रगति कशी होईल याची चर्चा करावी. 'सावित्री केवळ अलौकिक होती, ती यमाशीं भांडली, आपल्या हातून काय होणार,' असें म्हणत न बसतां आपल्याभोंवतीं स्वसमाज, स्वराष्ट्र, स्वसंस्कृति यांना मृत्युपंथांत लोटणारे जे यम दिसत आहेत, त्यांच्याशीं सावित्रीप्रमाणें झगडण्याची व आपले जन्मसिद्ध अधिकार मिळविण्याची महत्त्वाकांक्षा स्त्रियांनीं बाळगावी.

(४७१) **ऋषिपंचमीः**–ऋषिपंचमीचें व्रत हें अखिल हिंदु स्त्रीपुरुषांनीं उपवास व ऋषीपूजन करून अवश्य करावें. ऋषींचें ऋण फेडणें म्हणजे मागील ज्ञानाचा आढावा घेऊन पुढें कोणतें ज्ञान संपादन केलें पाहिजे याचा विचार करणें होय. ऋषी व ऋषिका यांचा वेदकालापासून संबंध आहे. त्यांचें ऋण ज्ञानवान् होऊनच फेडावयाचें असतें. ज्ञानचर्चा, ज्ञानविकास, ज्ञानाचा कार्यक्रम ठरवून हें व्रत अखिल हिंदु स्त्रीपुरुषांनीं आचरावें. रूढ ऋषिपंचमीव्रतांत विटाळशीच्या विटाळासंबंधींच्या भविष्योत्तर पुराणांतील ज्या कुत्रा, बैल आणि वेदांतील इन्द्र नि वृत्रासुर यांच्या कथा आहेत त्यांना फाटा द्यावा आणि ऋषींचें अन्न म्हणून बैलाचा संबंध नसलेले उपासाचे पदार्थ खाण्याचा व आणण्याचा जो खटाटोप

करण्यांत येतो, तोही आतां वर्ज्य करावा. कारण वृषभसंबंधाशिवाय यंत्रानें हल्लीं वाटेल ते पदार्थ उत्पन्न होत आहेत. यंत्रपूर्व कालांतील तो आचार आतां न ठेवतां पूर्वीं उपासाचा जो उत्तम पर्याय सांगितला त्याप्रमाणें उपास करून ऋषीपूजन, ऋषींचें स्मरण म्हणजे प्रचलित ज्ञानाचें वर्धन या दृष्टीनें हें व्रत अवश्य पाळावें.

**(४७२) वर्षांतून पांच उपवासः**—हिंदु समाजामध्यें सामान्यतः आषाढी व कार्तिकी, शिवरात्र, रामनवमी व कृष्णाष्टमी हे दिवस उपवास करून धार्मिक वृत्तीनें पाळण्याचा प्रघात आहे. नदी असल्यास अखिल हिंदू स्नानास जातात, देवदर्शनास जातात. तेथें अखिल हिंदूंची सामुदायिक प्रार्थना, त्यानंतर प्रवचन, हिंदूंच्या एकतेचें गान, असा कार्यक्रम करण्यांत यावा. अखिल हिंदूंमध्यें हें व्रत या ना त्या स्वरूपांत पाळलें जातें व त्याचा उपयोग अधिकांत अधिक समाजसंघटना, अधिकांत अधिक समाजामध्यें दळणवळण वाढणें, ऐक्यभाव उत्पन्न करणें यांकडे झाला पाहिजे.

**(४७३) शुद्धिकार्याचे पर्वकालः**—दोन महा—एकादशा आणि शिवरात्र हे तीन दिवस शुद्धिकार्याचे आणि व्रात्यस्तोमाचे पर्वकाल समजण्यांत यावेत. जेवढ्या पतित लोकांची शुद्धि या पुण्य—पर्वकालीं करतां येईल तेवढी तर करावीच,. शिवाय व्रात्यस्तोमविधीनें अहिंदूंचें हिंदूकरणही याच प्रसंगीं व्हावें.अहिंदूंना उज्ज्वल व पवित्र हिंदुत्व देण्याचे आणि स्वतःचें हिंदुत्व वाढविण्याचे हे पर्वकाल समजले जावेत. गांवांतील एखाद्या प्रमुख, प्रशस्त व सर्व दृष्टीनें सोयीस्कर अशा देवालयामध्यें या पुण्यदिवशीं अखिल हिंदूंची सामुदायिक प्रार्थना, शुद्धि नि व्रात्यस्तोमसमारंभ करण्याचा प्रघात हिंदूंनीं यापुढें पाडला पाहिजे.

**(४७४) सूर्यनमस्कारांचा नियमः**—हिंदुसमाजामध्यें चातुर्मास्यांत विशेषतः व्रतें व नियम करण्याचा परिपाठ आहे. सत्य बोलणें, ऋण न काढतां संसार चालविणें, अपशब्द न उच्चारणें, स्वाभिमानानें वागणें, स्वच्छता ठेवणें, दैन्य न दाखवितां लीनपणानें राहाणें इत्यादि व्रतें सदैव आचरण्याजोगीं आहेत. बारा महिने वरील व्रतांचें आचरण व्हावें म्हणून प्रथम चार महिने या व्रतांची संवय लावून घेणें कांहीं वाईट नाहीं.

परंतु समाजांत असल्या व्रतांकडे फार थोडें लक्ष दिसतें. चातुर्मास्यांत नमस्काराचें व्रत तरुणांनीं अवश्य पाळावें. रोज सव्वाशें, दीडशें नमस्कार चार महिने शास्त्रोक्त पद्धतीनें जर तरुणांनीं घातले तर त्यांचें हित होईल. नमस्कार, आसनें, प्राणायाम यांचा पुष्कळ प्रमाणांत आरोग्याला चांगला उपयोग होतो. म्हणून आरोग्यकारक, बलवर्धक, इहलोकीं उपकारक अशीं हीं व्रतें करावींत.

(४७५) **पुरुषांचे नेमधर्मः**—हिंदुसमाजांतील स्त्रियांच्याकडेच केवळ व्रतांचा आणि नियमांचा मक्ता दिलेला नाहीं. हिंदु पुरुषांतही व्रतशीलता, नियमशीलता यावयास पाहिजे. 'मी स्वदेशीच वस्तु वापरीन, धार्मिक कृत्यांत अहिंदूंचा संबंध सर्वस्वीं टाळीन आणि इतर प्रत्येक व्यवहारांत हिंदुत्वनिष्ठेनें वागेन' हा नियम बारा महिने पाळण्याजोगा आहे. निदान चार महिने तरी तो पाळावाच. आज हिंदुत्वनिष्ठेनें विविध सार्वजनिक कार्यें चालू आहेत. त्यांना हरतऱ्हेचें साह्य लागतें. पुष्कळ ठिकाणीं असें दिसतें कीं, सभेच्या बैठका घालण्यापासून तों अध्यक्षीय भाषणाचा वृत्तांत पाठविण्यापर्यंत सर्व गोष्टी एकाच माणसाला कराव्या लागतात. बैठका घालणें, हस्तपत्रकें वाटणें, सभेची व्यवस्था करणें, सभासद नोंदणें, निधि गोळा करणें असलीं अनेक कामें करण्यास माणसें हवीं आहेत. मोठें काम होत नाहीं म्हणून व लहान काम करण्यांत मोठेपणा मिळत नाहीं म्हणून पुष्कळ माणसें कोणतेंच काम करीत नाहींत! नुसत्या लांब लांब गप्पा मात्र मारतात! त्यापेक्षां लहान व मोठें जें जें कार्य उत्तम करतां येईल तें मनापासून करण्याचा नियम करावा. चातुर्मास्यांत तरी 'हिंदुत्वनिष्ठ संस्थांचीं लहान मोठीं कार्यें जीं होतील तीं मी करीन' असा नियम हिंदु पुरुषांनीं अवश्य करावा. आज हिंदुमहासभेच्या कामाकरितां, सामुदायिक प्रार्थना घडविण्याकरितां, शुद्धिकार्याकरितां, अस्पृश्यतानिवारणाकरितां, कांही कमी अंगमेहनत पडते, असें नाहीं. पैसा असला तरी शारीरश्रमाशिवाय कामें होत नाहींत. म्हणून तन, मन, धन या तीन्हीचा संयोग एका व्यक्तीकडून होत नसला तरी विविध व्यक्तींकडून हा संयोग नियमशीलतेनें झाल्यास तो हिंदुसमाजाला लाभदायकच होईल.

(४७६) **काम्यव्रतें:**—हेमाद्रीच्या चतुर्वर्ग–चिंतामणीमध्यें एक स्वतंत्र व्रतखंड असून त्यांत दररोज दोन पडतील इतकीं व्रतें सांगितलेलीं आहेत. हीं व्रतें करीत बसल्यास दुसरें कांहीं होणें शक्य नाहीं. सकलकामनापूर्ती या व्रतानेंच होते, अशा समजुतीनें हीं व्रतें सांगितलेलीं आहेत. व्रताचरणाचा मुख्य हेतु त्रिविध तप, इंद्रियनिग्रह, मनःशांति हा आहे. व्रताचें फल येथेंच या जगांतच मिळावयाचें असतें. हें लक्षांत न घेतां अमुक व्रत केलें असतां अमुक मिळतें, असल्या कामनेनें व्रतें करण्यांत येतात. काम्यव्रतें व त्यांच्या रोचक फलश्रुत्या यांची कल्पना धर्मसिंधूंतील पुढील वाक्यांवरून येईल. पण यापुढें ही पद्धति मान्य होणार नाहीं.

(१) गुडवर्जनात् मधुरता, (२) तैलवर्जनात् सुंदरांगता, (३) तांबूलत्यागात् भोगी मधुरकंठश्च, (४) घृतत्यागी स्निग्धतनुः; (५) शाकात्यागी पक्वान्नभुक्, (६) दधिदुग्धतक्रत्यागात् विष्णुलोकः, (७) अभ्यंगत्यागात् वपुःसौगंध्यं, (८) भूमौ दर्भशायी विष्णुदासः, (९) भूमिभोजनात् नृपत्वं, (१०) एकांतरोपवासात् ब्रह्मलोकः, (११) नखकेशधारणात् दिने दिने गंगास्नानं, (१२) मौनात् अस्खलिताज्ञा, (१३) विष्णुपादस्मरणात् कृतकृत्यता, (१४) हरेरालये संमार्जनादिना नृपत्वं, (१५) तुलसीदललक्षेण कार्तिके योऽर्चयेत् हरिम् । पत्रे पत्रे मुनिःश्रेष्ठ मौक्तिकं लभते फलम् ॥ (१६) बिल्वपत्रलक्षेण लक्ष्मीप्राप्तिः, (१७) दूर्वालक्षदलेन अरिष्टशांतिः, (१८) चंपकलक्षेण आयुष्यवर्धनं, (१९) गोधूमतंडुलादि प्रशस्तधान्यलक्षेण दुःखनाशः ॥

(४७७) **तर्कशुद्ध चिकित्साः**—आतां या वाक्यांत सांगितलेलीं व्रतें व त्यांचीं अर्थवादयुक्त रोचक फलें यांचा संबंध कसा काय जमतो हें पाहिलें पाहिजे.

चार महिने गूळ सोडला कीं आवाज मधुर होतो हें खरें आहे काय? गवयांनीं कधीं प्रयोग करून पाहिला आहे काय? गायनशास्त्राच्या दृष्टीनें आवाज खुलविण्याचीं साधनें निराळीं असतांना गूळ सोडण्याचा व आवाज खुलण्याचा संबंध काय आहे हें त्या ग्रंथकाराला विचारलें पाहिजे.

काम्यव्रतांमध्यें अंगाला तेल लावूं नये व तेल खाऊं नये असेंही एक व्रत आहे. त्यामुळें म्हणे अंग सुंदर होतें ! अन्नांत स्निग्धपणा नाहीं

आणि बाहेरूनही शरिराला तेल लावून स्निग्धपणा नाहीं, तर शरीर किती राकट होईल याची कल्पना वाचकांनींच करावी. शरीरसौष्ठव व सौंदर्य यांचीं साधनें फार भिन्न आहेत. तेल हें एक सौंदर्य वाढविणारें साधन आहे. पण त्याच्या त्यागानें सौंदर्य वाढतें, ही खरोखरी थाप आहे. याच्याहीपेक्षां पुढें घृतत्यागाचें व्रत सांगितलें आहे. त्यामुळें मनुष्य स्निग्ध-तनु होतो हें खरें आहे काय? खूप गलेलठ्ठ मनुष्य असला तर त्याच्या अंगांत खूप चरबी असते म्हणून त्यानें कदाचित् घृतत्याग केला तर चालण्यासारखें आहे; पण हें व्रत लडदुलक्यांकरितांच सांगितलेलें नाहीं, सर्वांकरितां आहे.

चार महिने दूध, दहीं व ताक खावयाचें सोडलें म्हणजे म्हणे विष्णुलोक मिळतो! दूध, दहीं व ताक हें स्निग्ध व पौष्टिक अन्न सोडलें म्हणजे खरोखरीच मनुष्यास विष्णूचा लोक म्हणजे (मृत्यु) येथेंच प्राप्त होत असेल यांत शंका नाहीं. अशाच थापा जेथेंतेथें मारलेल्या आहेत. देवाच्या देवळांत सडासंमार्जन केलें म्हणजे मनुष्य राजा होतो! तसेंच भुईवर जेवल्यानें नृपत्व येतें! या दोन्ही गोष्टी किती हास्यास्पद आहेत? देवालयें झाडण्यांत ज्यांचे जन्म गेले, अशांपैकीं अद्याप एकही राजा झाला नाहीं व पुढें होण्याची लोकशाहीमुळें आशा नाहीं. दारिद्र्यामुळें हिंदुस्थानांतील पुष्कळ लोकांना भुईवर बसून व दगडावरच चटणीभाकर ठेवून खाण्याचा प्रसंग असतो. हीं माणसें जर राजे होणार असलीं, तर जगांत यांच्याकरितां एक कोटी राज्यें नवीं उत्पन्न केलीं पाहिजेत. कारण हिंदुस्थानांत दोन कोटी लोक भुईवर बसूनच मिळेल तो तुकडा खाणारे आहेत.

कार्तिक महिन्यांत कोणी शाळिग्रामावर तुलसीदलांचा आणि मंजिरांचा लक्ष वाहतो, त्याला म्हणे पानागणिक मोती प्राप्त होतात. मोत्यांच्या व्यापाऱ्यांनीं हा प्रयोग करून पाहावा म्हणजे दरसाल नवी खरेदी करण्याचें कारणच पडणार नाहीं. तुळशीचा लक्ष वाहिल्यावर घरांत एक लाख मोत्यें एकदम येतील व अशीं तीं सर्वत्र येऊं लागलीं तर गिऱ्हाईक तरी कशाला येईल? मग मोत्यांच्या व्यापाराला तरी महत्त्व कसें राहील?

अस्मानी व सुलतानी अशा आपत्ति समाजावर येतात. अतिवृष्टि, अनावृष्टि, रोग, सांथी, लढाया, भूकंप हीं सर्व अरिष्टेंच होत. या वेळीं प्रतिकाराचे उपाय कोणते करावेत हें आजचे शास्त्रज्ञ बहुतेक नेमकें सांगतात. तें न करतां जर दूर्वांचे लक्षच वाहिले तर अरिष्टांची शांति न होतां तीं अधिक मात्र वाढतील !

पतीचें आयुष्य हें उत्तम अन्न, हवा, पाणी, व्यायाम व आरोग्याचे नियम पाळल्यानें वाढतें. पण त्याकडे दुर्लक्ष करून स्त्रिया जर चांफ्याच्या फुलांचे लक्षच वाहतील, तर आयुष्य कसें वाढेल ? लोकांच्या घरीं जावयाचें, सगळीं फुलें आपल्याला मिळावीं म्हणून धडपड करावयाची, अधाशीपणानें फुलें काढतांना डहाळ्या मोडावयाच्या व त्याकरितां लोकांच्या शिव्या खावयाच्या ! इतकें करून तो चांफ्याच्या फुलांचा लक्ष वाहिला तर पतीचें आयुष्य वाढणार तरी कसें ? ही सर्वस्वीं थाप आहे, असें समजून या फंदांत न पडलेलेंच बरें.

गहूं, तांदूळ, हरभरे, यांचे लक्ष वाहाणें हाही एक रिकामटेकडा उद्योग नाहीं काय ? बेलवाती, विष्णुवाती, शिववाती वळून त्या तुपांत भिजवून देवापुढें लावल्यानें शिवलोक व विष्णुलोक प्राप्त होणें शक्य आहे काय ? तें खरें असल्यास वाती वळण्याचे कारखाने निघतील, गठ्ठेच्या गठ्ठे रवाना होतील आणि या वाती लावणाऱ्यांची विष्णुलोकामध्यें एकच गर्दी होऊन तेथील हवाही बिघडून जाईल ! त्यापेक्षां रहाटावर सूत कातून त्याचें एखादें वस्त्र सत्पात्र व गरजू हिंदूला देणें हें अधिक योग्य नव्हे काय ?

**(४७८) नवे नेमधर्म कोणते करावेत ?** :–चातुर्मास्यांत फुलांचे लक्ष वाहाण्याचे नियम स्त्रिया करतात. देवाच्या डोक्यावर फुलांचा ढिगारा रचण्यापेक्षां हिंदु समाजांतील ज्या गरिबांच्या मुलींना फुलें कधीं दिसत नाहींत व फुलांच्या वेण्या तर माहितही नाहींत अशा मुलींना चार महिने रोज फुलांच्या वेण्या देण्याचा नियम स्त्रियांनीं करावा. तोंड धुऊन, दांत घासून, व्यवस्थित केशरचना करून ज्या मागासलेल्या वर्गांतील मुली येतील, त्यांपैकीं दहांना क्रमाक्रमानें फुलांच्या वेण्या देत गेल्यास त्या

मानवकुसुमांचा विकास होईल, त्या मुली स्वच्छतेनें वागूं लागतील व त्यांना वेण्या देणाऱ्याबद्दल प्रेम उत्पन्न होईल! चातुर्मास्यांत हळदीकुंकवाच्या पुड्या व त्याबरोबर एक पैसा सुवासिनीला देण्याचा नियम स्त्रिया करीत असतात. तोही हिंदूंतील ज्या स्त्रिया रोज कुंकूं लावीत नाहींत, वेणीफणी करीत नाहींत, अशा स्त्रियांना उद्देशून करावा. ज्या हिंदु स्त्रिया रोज कुंकूं लावतात, वेणीफणी करतात, त्यांना हळदीकुंकूं व पैसा देण्यापेक्षां ज्या सौभाग्यवती स्त्रियांमध्यें हा आचार नाहीं, त्यांना या आचाराची संवय लागावी म्हणून हळदीकुंकूं व एक पैसा देण्याचा नियम करावा. चातुर्मास्यांत वृक्षाभोंवतीं प्रदक्षिणा न घालतां विधवांना नि पतितांना भेटून, त्यांच्याविषयीं अनुकंपा दाखवून, त्यांची इच्छा असल्यास त्यांच्या विवाहास साह्य करावें. चातुर्मास्यांत स्वतः हस्तकौशल्यानें निरनिराळीं खेळणीं, कागदाचीं फुलें वगैरे वस्तु करून त्या घेण्याविषयीं स्त्रियांचें मन वळविण्याचा नियम करावा व परदेशी खेळणीं बंद पाडावीं. ज्यांना थोडी अनुकूलता असेल अशा स्त्रियांनीं अकरा निरक्षरांना साक्षर करण्याचा, साक्षरांना रोज थोडें वाचून दाखविण्याचा नियम केल्यास तो खास उपयुक्त होईल. ज्या स्त्रीला गीता चांगली म्हणतां येते व थोडें संस्कृतही येतें, अशा स्त्रीनें चातुर्मासांत गीता म्हणून दाखविणें, गीतापाठ देणें असा नियम करावा. अनेक हिंदुस्त्रियांकडे जाऊन त्यांना हिंदुत्वाचें श्रेष्ठत्व व महत्त्व पटवून द्यावें. स्वच्छतेनें नेहमींच राहावें. पण ती स्वच्छता आसपासच्या हिंदु स्त्रियांना आणि मागसलेल्या हिंदु स्त्रियांना शिकविण्याचा नियम चातुर्मास्यांत करून घर, परसू, मोरी, शौचकूप, भांडीं, कपडे, दांत, तोंड, नाक इत्यादि सर्व कसें स्वच्छ ठेवावें, गृहरचना कशी करावी, घरांतील सौंदर्य कसें वाढवावें हें जर जाणत्या स्त्रियांनीं चातुर्मास्यांत करण्याचें व्रत अंगिकारलें तर तें त्यांना व समाजालाही उपकारक आहे. अधिक महिन्यांत स्त्रिया विविध नियम करतात. कोणत्या तिथीला कोणता पदार्थ खावा व कोणता न खावा इतके सूक्ष्म नियम त्या पाळतात व शेवटीं तीसतीन ब्राह्मणांना भोजनें देतात. सत्पात्र, गरजू व विद्वान् अशा हिंदु माणसाला अवश्य भोजन द्यावें. पण त्याबरोबर तीसतीन विद्यार्थ्यांना, मागसलेल्या वर्गांतील मुलींना, ज्यांना शुद्ध करून घेतलें आहे अशांना व

पतितांनाही यथाशक्ति भोजन द्यावें. बदललेल्या कालाला अनुसरून स्त्रियांनीं आपल्या व्रतांतही परिवर्तन केलें पाहिजे. वृक्ष, पाषाण, पशुपक्षी या प्रतीकांच्या द्वारें ईशसेवा करण्यापेक्षां सर्वांत उन्नत प्राणी जो मनुष्य त्याची सेवा करण्यानें ईश्वर संतुष्ट होतो, असें समजावें. ज्यामुळें स्त्रियांचें दुःख-निवारण होईल, विधवांना साह्य होईल, स्त्रियांच्या उन्नतींत भर पडेल, स्वतःचें व समाजाचें आरोग्य वाढेल, मनःशक्तीचा विकास होईल, साक्षरता, शुद्धता, स्वच्छता, संघटना इत्यादि कार्यास साक्षात् वा परंपरेनें साह्य होईल असलीं व्रतें स्त्रियांनीं बारा महिने करावींत, चातुर्मास्यांत तीं अवश्य करावींत. चार महिने हा व्रतनियमाला दीर्घकालच आहे. त्यामुळें कंटाळा येतो आणि स्वपरवंचना होते. यास्तव स्त्रियांनीं निदान श्रावण महिन्यांत तरी व्रतें व नियम पाळावेतच. त्यानंतर दोन महिन्यांनीं कार्तिकमासही व्रतनियमास उक्त आहे. कोणत्याही व्रताच्या शेवटीं दानाचा विधी असतो, यास्तव या व्रतांशीं संबद्ध असलेल्या दानाचा विचार पुढील प्रकरणांत करतों.

**(४७९) स्त्रिया, प्रदक्षिणा नि नवसः**—कांहीं स्त्रिया चातुर्मास्यांत तुळसी, पिंपळ,वड, यांना प्रदक्षिणा घालतात. यामुळें स्त्रियांना व्यायाम होतो, असेंही कोणी त्याचें समर्थन करतात. पण हीं झाडें कोठें तरी उकिरड्यावर सांदीकोपऱ्यांत असतात ! तेथें नीट हवाही असत नाहीं म्हणून प्रदक्षिणेच्या व्यायामापेक्षां मोकळ्या हवेंत फिरण्याचा, दूर असलेल्या देवास रोज दर्श-नार्थ जाण्याचा नियम केल्यास तो अधिक उपयोगी होईल. झाडें हीं बोलून, चालून झाडेंच होत. त्यांना देवत्व नाहीं. निसर्गनियमाप्रमाणें छाया देणें-मोठ्या वाऱ्यानें उन्मळून पडणें वगैरे धर्म या झाडांमध्यें आहेत. त्यांच्य भोंवतीं गिरक्या घालण्याची श्रद्धा बळावली कीं एखादा बुवा आचरटपणानें निवडुंग, बाभळ, शौचकूप अशांनाही प्रदक्षिणा घालण्यास सांगतो आणि स्त्रिया वेडेपणानें तें सर्व करतात. विशेषतः निपुत्रिक स्त्रिया आचरटपणानें असले खुळचट नियम करतात ! त्यांचें वर्णन न करणेंच बरें. मुलाला ताप आला-कीं कोणी सटवाईला दंडवत मागून घेतात, कोणी पिराताज्याला रोजे मागून घेतात, कोणी मूर्खपणानें पिराच्या थडग्याभोंवतीं, चोळी न घालतां, तर कोणी अर्धनग्नपणानें प्रदक्षिणा घालण्याचा नवस मागून घेत असतात. हा सर्व आचरटपणा पुरुषांच्या विचारानेंच होत असतो. पुरुषमंडळी जर

तीव्र विरोध करतील तर कोणतीही हिंदु स्त्री खिचडा व मलिद्याचा नैवेद्य घेऊन पिराकडे वा थडग्याकडे घांव घेणार नाहीं व पुत्रप्राप्तीकरितां गंडे, दोरे व ताईतही गळ्यांत अडकविण्याचें साहस करणार नाहीं. पुरुषवर्गानें ' नवसें कन्या-पुत्र होती । तरी कां करणें लागे पती ॥' हा तर्कशुद्ध विचार स्त्रियांना शिकविला पाहिजे. म्हणजे असल्या या सर्व अनिष्ट व्रतांना आळा बसेल.



# प्रकरण तिसावें

## दानें

(४८०) दान हें कर्तव्यः—अर्थप्राप्ति हा एक पुरुषार्थ आहे. शरिरामध्यें जसें पित्त, परमार्थांत जसें चित्त तसें प्रपंचांत वित्त पाहिजे. धर्मानुष्ठान, शिष्टाचारपालन, कुटुंबपोषण या सर्व गोष्टी अर्थमूलकच आहेत. म्हणून गृहस्थानें अर्थसंपादन अवश्य केलें पाहिजे. द्रव्य मिळविणें हें जितकें कठीण आहे त्याहीपेक्षां त्याचा अवश्य तो उपभोग घेणें, तें नीट रक्षण करणें आणि त्याचा सत्पात्रीं विनियोग करणें हें फारच कठीण आहे. दान, भोग आणि नाश अशा द्रव्याच्या तीन अवस्था असतात. द्रव्यामुळें मनुष्याला इष्ट व अवश्य ते सुखोपभोग घेतां येतात. द्रव्य देऊन दुसऱ्याला साह्य करतां येतें. द्रव्याचें योग्य रक्षण न केल्यास तें कोणाच्याही हातास कसेंही लागून त्याचें वाटोळें होतें. द्रव्याचा नाश न व्हावा म्हणून पात्रापात्र-विवेक पाहून दान करावें. दान हाच धर्म आहे. गृहस्थांनीं दान देऊनच समाजसेवा करावी. मिळविलेल्या द्रव्यांतून जो दान देत नाहीं तो पापी होय! अशा तऱ्हेचे विचार अनेक ग्रंथांत आहेत. समाजांत कांहीं लोकांजवळ पैसा अधिक असतो व कांहींच्याजवळ तो नसतो. श्रीमंताकडील पैसा गरिबाकडे येण्यास दान हा एक मार्ग आहे. श्रीमंत

असून जो दानधर्म करीत नाहीं आणि वित्तशाठ्य करतो, त्याच्या गळ्यांत धोंडा बांधून त्याला पाण्यांत बुडवावा असें उद्योग पर्वांत (अ. ३३ श्लोक ६०) म्हटलें आहे.

**(४८१) दान व आर्थिक विषमताः**– मनुष्यानें दानाकडे प्रवृत्त व्हावें म्हणून पुष्कळच तर्कशुद्ध विचार धर्मग्रंथांत सांगितलेले आहेत. आपल्या द्रव्याचे तीन हिस्से करून त्यांतील एक दानाकडे द्यावा असें 'दान-मयूखां'त सांगितलें आहे. दान म्हणजे स्वतःची त्या वस्तूवरील स्वत्वनिवृत्ति करणें व दुसऱ्याच्या स्वत्वाची त्यावर प्रस्थापना करणें. दुसरा जेव्हां तें दान स्वीकारतो त्याच वेळीं आपल्या स्वत्वाची निवृत्ति होते. मनुष्यानें यथाशक्ति दान देत असावें. तें गुणवानाला द्यावें. सर्व दानांमध्यें अन्नदानाचें आणि त्याहीपेक्षां विद्यादानाचें महत्त्व फारच सांगितलेलें आहे. राजेरजवाड्यांनीं आणि श्रीमंतांनीं भूमिदानें, अग्रहारादि दानें करावींत असेंही आहे.

मातापित्रोर्गुरौ मित्रे विनीते चोपकारिणि ।
दीनानाथविशिष्टेषु दत्तं च सफलं भवेत् ॥ –दक्ष.

**भावार्थः**–आई, बाप, गुरु, मित्र, सेवक, उपकारकर्ता, दीन, अनाथ आणि विशिष्ट सत्पात्र यांकरितां दिलेलें दान म्हणजे खर्च केलेला पैसा सत्कारणीं लागला असें समजावें.

श्रीमंतांनीं खूप चैनी केल्या म्हणजे त्यावर कांहीं गरीबांचीं पोटें भरतात, हें जरी खरें असलें तथापि त्याला दान म्हणतां येणार नाहीं. बुद्धिपुरःस्सर दुसऱ्याकरितां जें सात्त्विक भावनेनें दिलें जाईल, तें दान होतें. समाजांतील आर्थिक विषमता नष्ट करण्याचा पूर्वी दान हा एकच मार्ग होता. आज ही विषमता नष्ट करण्याचे निरनिराळे यत्न होऊं लागलेले आहेत. त्यांना कालपरिपक्वतेप्रमाणें यथाकाल जें यश यावयाचें तें येईलच.

**(४८२) दानप्रवृत्तिः**–समाजांतील प्रत्येक माणसाला जसें कांहीं मिळवावेंसें वाटतें, तसेंच कांहीं द्यावेंसारखेंही वाटतेंच. दानामुळें लौकिक वाढतो, कीर्ति होते, लोक बरें म्हणतात. पण त्याशिवाय सत्पात्र पाहून जी वृत्तींत कालवाकालव, तळमळ किंवा वेदना उत्पन्न होते, ती नष्ट करण्याकरितां मनुष्य दान करीत असतो. द्रव्य देणें, धान्य देणें, वस्त्र देणें आणि

एखाद्या कार्याकरितां शारीरश्रम देणें हें सर्व दानांतच मोडतें. प्राचीनकाळीं विद्यादान, औषधदान व प्रसंगीं न्यायदानही विनामूल्य होत असे. देश, काल आणि पात्र पाहून सात्त्विक वृत्तीनें दान करणें हा उत्तम प्रकार होय.

(४८३) **दान व अभ्युदयः**—दान ही समाजाच्या उन्नतीकरितां एक उपयुक्त संस्था आहे. समाजांत अनेक वैगुण्यें असतात. तीं नष्ट करण्याकरितां आणि समाजाच्या सामुदायिक गरजा भागविण्याकरितां दानाचा ओघ तिकडे वळला पाहिजे. हिंदुसमाजांत आज दानें कांहीं थोडींथोडकीं होत नाहींत. पण जीं होतात तीं आंधळ्या परंपरेनें व पारलौकिक दृष्टीनें च होत असतात. दानाचें फळ दृश्य आहे, त्याचा अभ्युदयाशीं संबंध आहे, तें केवळ परलोकसंबद्ध नाहीं, ही कल्पना हिंदुसमाजांत प्रथमतः यावयास पाहिजे. या जन्मीं अमुक दान केलें तर पुढच्या जन्मीं तमुक फळ मिळतें असल्या कल्पनेनें केलेलीं दानें नि काम्यव्रतें अभ्युदयदृष्ट्या निरुपयोगी आहेत.

(४८४) **दानें व फलश्रुत्याः**—याज्ञवल्क्यस्मृतीवरील मिताक्षरा-टीकेवर बाळंभट्टी नांवाची टीका आहे. तींत ब्रह्मांडपुराणांतील म्हणून दानांच्या फलश्रुत्यांचे कांहीं श्लोक आहेत. त्यांत "जरा प्राप्त होऊं नये म्हणून जिऱ्याचें दान द्यावें, फूल पाहून आनंद होतो म्हणून पुष्पदान करावें, सर्व रसांत इक्षुरस श्रेष्ठ आहे म्हणून गुडदान करावें आणि म्हणावें कीं, 'हे गुळा, मला लक्ष्मीची प्राप्ति होवो" इत्यादि सांगितलें आहे. शेर, दोन शेर गूळ दिल्यानें जर लक्ष्मीची प्राप्ति होत असेल तर हिंदुस्थानांतील सगळ्या गुळाचें दान करून जगांतील सर्व संपत्ति कां आणतां येऊं नये? 'विष्णुदेहापासून उडीद उत्पन्न झाले म्हणून त्यांच्या दानानें शांति प्राप्त होते, पावट्याचें दान केल्यानें मनुष्य निष्पाप होतो, वस्त्रदान केल्यानें दात्याच्या लज्जेचें रक्षण होतें व हरभऱ्याची डाळ दिल्यानें कांति प्राप्त होते', असेंही म्हटलें आहे. याशिवाय लढाईत जय मिळावा अशी इच्छा असल्यास कोणतें दान द्यावें, विद्याप्राप्तीकरितां कोणतें दान द्यावें, एखाद्या तरुणाला चांगली स्त्री व एखाद्या तरुणीला चांगला नवरा हवा असेल तर त्यांनीं कोणकोणतीं दानें करावींत, याचेंही वर्णन अर्थवादात्मक असें विष्णुधर्मसूत्रांत दिलेलें आढळतें. या दृष्टीनें आणि या भावनेनें केलेलीं दानें समाजदृष्ट्या निरुपयोगी नव्हेत काय?

संवर्तस्मृतीमध्यें कांहीं दानांच्या हास्यास्पद फलश्रुत्या सांगितलेल्या आहेत, त्यांतील कांहीं येथें देतों:—

तांबूलं चैव यो दद्यात् ब्राह्मणेभ्यो विशेषतः ।
मेधावी सुभगः प्राज्ञो दर्शनीयश्च जायते ॥
दद्याच्च शिशिरेष्वग्निं बहुकाष्ठं प्रयत्नतः ।
कायाग्निदीप्तिं प्राज्ञत्वं रूपसौभाग्यमाप्नुयात् ॥
तैलमामलकं प्राज्ञः पादाभ्यंगं ददाति यः ।
प्रहृष्टः स नरो लोके सुखी चैव सदा भवेत् ॥

या श्लोकांचा अर्थ उघड आहे. त्यांचें स्पष्टीकरण करणें म्हणजे व्यर्थ शीण होय !

गोदानाचें महत्त्व तर विचारावयासच नको. गायीमध्यें सर्व देव आहेत. डोक्यांत महादेव, कपाळांत गौरी, नाकांत कार्तिकस्वामी, कानामध्यें अश्विनीकुमार, डोळ्यांत चंद्रसूर्य, दांतांत वायु, जिभेंत वरुण, ओठांत संध्या, कांखेंत राक्षस, पुच्छांत पितर, केसांत सोम व गोमयांत गंगा याप्रमाणें हजारो देवांनीं युक्त अशी ती गाय आहे. तिची पूजाअर्चा करावी, तिच्या पुच्छोदकानें आईकडचे, बापाकडचे असे सर्व पितर तृप्त होत असतात; म्हणून त्या उदकानें तर्पण करावें, असेंही म्हटलेलें आहे. परलोकांत सद्गति मिळावी, यमलोकांतून पलीकडे जाण्यास चांगली वाट मिळावी म्हणून कित्येक शतगोदानेंही करतात. शतगोदानें देण्यास शंभर गायी संभाळणारा सत्पात्र ब्राह्मण भेटत नाहीं. कारण तितक्या गायींना चारावयास पुरेसें कुरणही द्यावें लागेल. म्हणून माणसें स्वतःच्या मनाची फसवणूक करून सव्वारुपयास एक गोप्रदान या हिशेबानें सव्वाशें रुपये वाटून टाकतात. कारण शंभर गायींचें दान घेणारा एखादा सत्पात्र संस्थानिक ब्राह्मण भेटत नाहीं व कोणाला तरी गायी दिल्या तर यमलोकांतील वाटेचा प्रश्न बाजूस राहून इहलोकांतच घरापुढील वाट बंद होण्याचा प्रसंग यावयाचा !

(४८५) व्रतें व दानें:—व्रताचे शेवटींही दानें सांगितलेलींच आहेत. नक्त भोजनाचें व्रत केलें असल्यास दोन वस्त्रांचें दान करावें;

दिवसांतून एकदां जेवावयाचें वृत केलें असल्यास गोदान करावें; भूमीवर निजण्याचें व्रत केलें असल्यास शय्यादान करावें; आणि रांगोळी घातली असल्यास सुवर्ण व कमल यांचें दान करावें. असल्या या फलश्रुतियुक्त दानांच्या फेऱ्यांत हिंदुसमाज सांपडलेला आहे. ऐहिक अभ्युदयाचे दृष्टीनें हीं दानें निरुपयोगी होत.

**(४८६) धर्मादाय कोठें जातो?:**—धर्मादाय या स्वरूपांत जो पैसा व्यापारीवर्ग गिऱ्हाइकाकडून विक्रीवर घेतो, तो धर्मादायही असाच आंधळा आहे. गिऱ्हाईक कधीं त्या धर्मादायाची चौकशी करीत नाहीं. मुंबईसारख्या शहरांतून जो माल बाहेरगांवीं जातो त्यावर निदान शेंकडा चारआठ आणे धर्मादाय म्हणून अडत्या नेहमीं कापून घेत असतो. पेढी अगदीं लहान असली तरी धर्मादायाची रक्कम वर्षाचे कांटीं हजारपंधराशें रुपये सहज होते. ही रक्कम अत्यंत निष्काळजीपणानें कोठें तरी खर्च होते व अनास्थेनें ती पेढीच्या रकमेंत जमा होते. प्रत्येक पेठेंतील मोठ्या दुकानांत, गिरणींत वजन, माप, कांटा यांवर गोरक्षणार्थ म्हणून किंवा धर्मादाय म्हणून अशीच रक्कम मिळविली जाते. तिचाही सदुपयोग क्वचितच हेतूप्रमाणें होतो!

**(४८७) दानाचा दुरुपयोग:**—देवाच्या निमित्तानें दिलेलें दान आणि तीर्थयात्राप्रसंगीं केलेलें दान असेंच निरर्थक होतें. क्षेत्रस्थ पंडे व बडवे आलेल्या यात्रेकरूंच्या अज्ञानाचा व भावनेचा फायदा घेऊन वाटेल तसे त्यांना लुबाडतात. रेल्वे कंपन्यांनींही सवलतीच्या तिकिटाचें आमिष दाखवून लोकांच्या धार्मिक भावनेच्या साह्यानें पैशाची नि माणुसकीची लूट चालविलेली आहे. मठ आणि पीठें येथील महंत आणि बावा यांच्या हातीं धर्मादायाचा पैसा खूप येत असल्यामुळें ते नाना तऱ्हेचे ढंग करून पैसा उधळत असतात. ना विद्या, ना संस्कार, ना आचार, ना शील असे हे लोक अधिक पैसा यावा म्हणून देवळाच्या आंत व बाहेर दुकानें बांधतात आणि प्रसंगीं तीं वेश्यांनाही भाड्यानें देतात. अद्याप दारूच्या गुत्त्याला तीं भाड्यानें देत नाहींत, ही कृपाच म्हटली पाहिजे! मठपति, महंत, पुजारी, गोसावी, बुवा, श्रावक व चारण यांनिमित्त आज जो दानधर्म होत आहे व त्या-निमित्त ज्या जहागिरी व वतनें आहेत, त्यांचा समाजाला काडीचाही उपयोग नाहीं असें म्हणणें भाग आहे.

(४८८) **राजेलोक नि दानें**:—कोणत्याही समाजांत धर्मसंस्थांचें पालनपोषण राजाच करीत असतो. राजेलोक मिळविलेल्या द्रव्यांतून कांहीं भाग दानाकडे खर्च करतात. समाजाला शिक्षण देणारे, अध्ययन व अध्यापन करणारे, नीति, कायदा, शास्त्र यांचें ज्ञान समाजाला देणारे, अध्यात्माचा मार्ग चोखाळणारे, विरक्त व त्यागी वृत्तीनें राहून समाजाच्या उपयोगीं पडणारे जे लोक असतात त्यांचा परामर्श राजानें घेणें योग्य आहे. हा वर्ग पूर्वीं त्यागपूर्वक आपलें कर्तव्य करीत होता, तेव्हां त्यानिमित्त वेचला जाणारा पैसा सत्पात्रींच कारणीं लागत होता. पण पुढें मठ, मंदिरें, आश्रम, यति, गोसावी, पुजारी, ब्राह्मण, पुरोहित, धर्मगुरु, चारण, मठपति, जंगम इत्यादींना स्वास्थ्याकरितां जेव्हां नेमणुका व जहागिरी मिळाल्या, तेव्हां स्वास्थ्यामुळें या वर्गाचा अपकर्ष होऊं लागला. शार्लेमिनसारख्या सम्राटानेंही आपली दोनतृतीयांश जमीन ख्रिस्ती धर्ममठाला अर्पण केली होती! अर्वाचीन क्रांतियुगाच्या पूर्वीं युरोपांतील प्रत्येक देशांतील जवळ जवळ अर्धी जमीन धर्ममठांच्या ताब्यांत होती. राजपुतान्यांतील सुमारें एकपंचमांश जमिनी आजसुद्धां देवस्थानांच्याच ताब्यांत आहेत.

हिंदुस्थानांत गिरी, पुरी, डाकोर, द्वारका, नाथद्वार, वृंदावन, मथुरा अशीं अनेक प्रसिद्ध देवस्थानें आहेत. तिकडे संपत्तीचा ओघ चालू आहे. त्याचा उपयोग कसा होतो हें समजावें म्हणून दोनच उदाहरणें देतों—

(४८९) **नाथद्वार**:—राजपुतान्यांत 'नाथद्वार' हें प्रसिद्ध देवस्थान आहे. औरंगजेबानें मंदिरें पाडण्याचा सपाटा चालविला, त्यावेळीं मथुरेची मूर्ति राणा राजसिंहानें मोठ्या पराक्रमानें आणविली व नाथद्वार येथें तिची प्रतिष्ठा केली. या देवस्थानाला अनेक गांवें व शहरें इनाम आहेत. त्याचा उपभोग महंत घेत आहेत. या जहागिरीमध्यें मालावर कर नाहीं, वाहातुकीवर कर नाहीं, राजाचा कर नाहीं, फार काय, पण कित्येक ठिकाणीं राजाचा कारभारही नाहीं. म्हणजे सर्वाधिकारी महंतच आहेत! नाथद्वारच्या महंतांचीं कोशागारें द्रव्यानें तुडुंब भरलीं आहेत. एका काळीं जसे महंत मोठे विरक्त व त्यागी होते, तसेच ते दुसऱ्या एका काळीं मोठे लढाऊ वीरही होते. स्वतःच्या पैशावर घोडदळ व सशस्त्र

फौज तयार करून त्यांनीं लढाया देऊन नाथद्वाराचें संरक्षणही केलें आहे. पण आज ना युयुत्सु वृत्ति, ना त्याग!

हिंदुस्थानचा सर्वांत वरिष्ठ अधिकारी जो व्हाइसरॉय, त्याच्याएवढें वार्षिक उत्पन्न या महंतांचें आहे. त्या सर्व द्रव्याचा विनियोग ऐदीपणा, व्यसनें आणि चैन वाढविण्याकडे होत आहे. पंचपक्वान्नें, घृतकुल्या, मधुकुल्या, मिष्टान्नें यांचें भोजन! शयनाला रेशमी मखमलीची मऊ नि सुंदर शय्या! बसावयाला गाद्यागिर्द्या, अंगाला केशरकस्तुरीच्या उट्या, पहिल्या वर्गाचा रेल्वेचा प्रवास! सेवेला सुस्वरूप व तरुण शिष्या! भोंवतालीं स्तुतिपाठकांचा गराडा! फुकटखाऊ लोकांकडून स्तुतिसुमनवृष्टि! मूर्ख, आळशी, लोभी अशांशीं गप्पा! अशा थाटांत आयुष्य चाललें असतां या महंतांच्या हातून समाजाला उपयुक्त असें कोणतें कार्य घडून येईल? राष्ट्रावर आपत्ति आली, दुष्काळ पडला, साथीनें लोक मरूं लागले तरी या ऐदखाऊंना त्याचें कांहीं वाटत नाहीं. ईश्वरेच्छेनें सर्व गोष्टी घडत आहेत असें म्हणून हे लोक स्वस्थ बसतात आणि स्वतःच्या चैनींत कांहीं कमी करीत नाहींत! यशवंतराव होळकरानें पूर्वीं इंग्रजाशीं लढतांना या महंतांकडून एकदोन वेळां जशी तीन तीन लाख खंडणी वसूल केली होती, तसाच सक्तीचा कर हिंदुसमाज नि हिंदुराष्ट्रकार्यार्थ ठिकठिकाणच्या महंतांवर बसविला तरच त्या द्रव्याचा कांहीं सदुपयोग होईल.

(४९०) डाकोरः—दुसरें उदाहरण गुजराथेंतील डाकोरचें आहे. या देवाला यात्रेकरूंच्या कराच्या उत्पन्नासह एक लक्ष रुपयांचें उत्पन्न आहे. गुजराथ प्रांत संपन्न, तेथें पुष्टिमार्गाचें वर्चस्व, यामुळें या देवस्थानाकडे भोगानिमित्त सारखी संपत्ति येत असते. डाकोरच्या देवाला भोगाशिवाय विषय नाहीं व तो भोग म्हणजे पंचामृतपूजा, महापूजा आणि महानैवेद्य इत्यादींचा! कोणी जिज्ञासु तेथें श्रद्धेनें चार महिने राहिला तर कीर्तन, पुराण, प्रवचन, व्याख्यान या निमित्तांनीं कांहीं ज्ञानांत भर पडेल असें मुळींच नाहीं. कारण यांतील कोणतीही गोष्ट तेथें होत नाहीं. देवाचें कीर्तनभजन चाललें तर त्यांतही लाडू, पोळ्या, घीवर यांचीं नांवेंच असावयाचीं! निरनिराळया पक्वानांचें कीर्तन, त्यांचें स्मरण अशी खाद्य-

पदार्थांची तेथें नवविधा भक्ति चालते ! याचें कारण देवाला तोच कार्यक्रम आवडतो.

देव पहांटे उठले कीं चूळ भरावयाला ऊन पाणी, हाताला उटी व आटीव दुधाच्या चार घागरींचा भोग! नंतर नऊ वाजतां दोन पराती पुऱ्या व दोन पातेलीं बासुंदी यांचा भोग! दोनप्रहरीं अनेक पक्कान्नें, भाज्या, कोशिंबिरी यांचा भोग! तिसऱ्या प्रहरीं भोपळ्याएवढे मोठमोठे लाडू, फराळाचे अनेक जिन्नस आणि विविध फळें यांचा भोग! सायंकाळीं पुन्हां दोन पराती पुऱ्या व आटीव दुधाच्या घागरी यांचा भोग! इतके भोग खाऊनही देव तृप्त होत नाहीं. रात्रीं पंचपक्कान्नांचा भोग जेव्हां द्यावा तेव्हां कुठें देवाला गाढ झोंप येते. एकंदरींत या देवाला रोज निदान दोनशें रुपये आहाराला लागतात! या भोगाची विक्री करून पुजारी, पंड्ये, बडवे त्यांवर दुप्पटचौपट पैसे मिळवितात. अत्तर गुलाब, उट्या, सुगंधीं द्रव्यें, पूजासाहित्य या निमित्तांनीं पुष्कळच पैसा देवाकडे खर्च होत असतो. या सर्व पैशाचा विनियोग राष्ट्राच्या दृष्टीनें आणि समाजाच्या उन्नतीच्या दृष्टीनें होत आहे असें कोणीही समंजस मनुष्य म्हणणार नाहीं.

**(४९१) संस्थानिकांच्या पैशाचा दुरुपयोग:**—अहिंदूंतील संपन्न लोक व संस्थानिक स्वसमाजाच्या हिताकरितां पैसा कसा खर्च करीत आहेत हें प्रसिद्धच आहे. त्याउलट हिंदु संस्थानिक काय करतात तर तें असें— कुणाला घोड्यांचा शोक म्हणून तो संस्थानचा पैसा घोड्यांच्या खरेदींत घालवितो! कोणी संस्थानिक मोटारींचा शोकी म्हणून तो प्रजेचा पैसा दर-साल दहापंधरा नव्या मोटारी खरेदी करून उधळून टाकतो! शर्यतीच्या नादानें स्पेशल गाड्या सोडून कोणी संस्थानची तिजोरीच रिकामी करितो! पोलोच्या नादानें कोणी आपलें संस्थान सर्वस्वीं दरिद्री बनवितो!! कोणी संस्थानिक आंग्ल नटीच्या प्रेमांत अडकतो व तिच्यापायीं प्रजेच्या कोट्यवधि रुपयांचा चक्काचूर करतो! कोणाला कटिशूळाची बाधा, कोणी व्यसनासक्त, कोणाला रुजवाडे बांधण्याचा व पाडण्याचा नाद. अशामुळें हिंदु संस्था-निकांचा पैसा हिंदुसमाज—बलवर्धनासारख्या कार्यांकडे खर्च होत नाहीं.

**(४९२) धनिकांचा अनाठायीं खर्च:**—श्रीमंत, शेठ, सावकारांचे पैसे खटलीं, कोर्टें, भांडणें यांत नाहींसे होतात. पुष्कळ श्रीमंत लोक

ईर्षेनें एकमेकांवर चढ करावी म्हणून कडाक्यानें लग्नें लावतात, बिन-हिशेबी पैसा खर्च करतात, बँड, शोभेची दारू आणि इतर निमित्तांनें पुष्कळशी अहिंदूंची भर करून कर्जबाजारी होतात! कांहीं पाटील-पटवाऱ्यांचा पैसा गंधर्व लावण्यांत व रगडून दारू पिण्यांत खर्च होतो! कोणी जनावरांना जिलब्याच चारीत बसतात. वकील डॉक्टरादींचा पैसा स्वतःच्या चैनींत खर्च होतो. मामलेदार, मुन्सफ, सबजज्ज वगैरेपैकीं कांहींचा पैसा बहुतेक गुरुमहाराजांचे मठाकडे दर महिन्यास जात असतो. संपन्न निपुत्रिक एखादें देवालय बांधतो. पिढिजाद धनिकाचा पैसा चैनींत खर्च होतो. या सर्व द्रव्याचा ओघ हिंदुसमाजांतील सत्पात्र संस्थांकडे वळावयास नको काय?

(४९३) **नव्या संस्था:**—हिंदुसमाजांत चालू असलेली दानपद्धति कशी सदोष आहे हें येथवर दाखविलें. आतां ती निर्दोष कशी करावी यादृष्टीनें कांहीं सूचना करतों. देणें व दुखणें हें कोणाला नको असतें. पण कोणत्याही काळांत दिल्याशिवाय मिळत नसतें आणि आजच्या काळांत तर वर्गणी दिल्याविना मतदानाचा हक्क मिळूंच शकत नाहीं. आजच्या आपल्या जीवनाशीं ज्या ज्या संस्थांचा संबंध आहे त्या सर्वांपासून व्यक्तीला व समाजाला लाभ व्हावा अशी इच्छा असल्यास प्रत्येक हिंदूनें त्या संस्थांचे सदस्य झालें पाहिजे. रेल्वे, पोस्ट, नगरसभा, लोकलबोर्ड, पोलीसखातें, शिक्षणखातें, अशा सर्व संस्था लोकहितार्थ आहेत. त्यांपासून जर समाजाला उपद्रव होत असेल तर तो नाहींसा करण्याचें कार्य विविध संस्थांचे द्वारें करून घेतलें पाहिजे. तसेंच व्यायामसंस्था, उद्योगसंस्था, उत्सवसंस्था, ज्ञानवर्धक-संस्था इत्यादि जर हिंदुत्वनिष्ठेनें चालविल्या जात असतील तर त्यांचे नि हिंदुमहासभादि संस्थांचे सदस्य होणें अत्यावश्य आहे. विविध संस्थांचे सदस्य होऊन वेळेवर वर्गणी देणें म्हणजे त्यांवर कांहीं उपकार करणें नव्हे. ही वर्गणी देतांना तिचा लाभ मला अमुक अमुक मिळणार आहे, अशी भावना असतेच, हा सरळ मोबदल्याचाच विषय असतो. अशा संस्थांना देणगी दिली व ती सात्त्विक दानाच्या भावनेनें दिली तर गोष्ट निराळी. अशा देणगीदारांनासुद्धां कांहीं अधिकार मिळतात.

(४९४) जुने दाखले कसे मिळणार ?:—पुष्कळ माणसें संस्था व वर्गणी म्हटलें कीं कपाळाला आंठ्या घालतात. कोणी जुना दाखला नाहीं, असें जमाखर्ची टिपणें पाहून मोठ्या आढ्यतेनें सांगून आपल्या हिशेबी वृत्तीचें प्रदर्शन करतात. शिवाजीउत्सव, पैसाफंड, हिंदुमहासभा, धर्मनिर्णयमंडळ या प्रकारच्या संस्था पन्नास वर्षांपूर्वी जर नव्हत्याच तर जुना दाखला मिळणार कसा ? जुना दाखला फक्त ब्राह्मणास दक्षिणा दिली, सहस्रभोजन घातलें, क्षेत्रांत जाऊन श्राद्ध करून ब्राह्मणांना दक्षिणा दिली, येवढाच मिळावयाचा ! त्या दाखल्याच्या आधारावर नवोदित कालाला अनुरूप अशा संस्थांना कांहीं देतां येत नाहीं असें म्हणणें, विचार करतों म्हणून सांगून प्रचारकाला पांचचार हेलपाटे देणें, शेवटीं कांहीं तरी निमित्त काढून सर्व सार्वजनिक संस्थांवर व त्यांतील कार्यकर्त्यांवर यथास्थित टीका करणें हें सर्वस्वीं निंद्य होय ! समाजाच्या गरजेप्रमाणें नव्या संस्था वाढणारच, त्यांचे प्रचारकही येणारच ! व त्यामुळें ‘वर्गण्यांनीं डोकें उठविलें’ असा कांगावा न करतां मागणारा आल्याबरोबर यथाशक्ति देणें हाच उत्तम मार्ग होय ! कांहीं माणसें तर दहापांच हेलपाट्यां-नंतर वर्गणी देऊन ‘तें तसेंच नाहीं, तें असेंच नाहीं, आम्हांला कोणी विचारीतच नाहीं’ असा बकवा करतात ! या लोकांचें हें करणें म्हणजे गाजराची तुळा करून (ती घरच्या म्हशीलाच खावयाला घालून) स्वर्गां-तील विमानाची वाट पहाण्यासारखें आहे. सात्त्विक दात्याची वृत्ति जरी न ठेवतां आली तरी कोणत्याही संस्थेला देणगी देणें ती मनाच्या मोठे-पणानेंच द्यावी.

(४९५) सत्पात्र संस्था:—देश, काल व पात्र पाहून दान देणें हा उत्तम मार्ग होय. दान देतांना तें “श्रिया देयम्, ह्रिया देयम्, संविदा देयम्” या भावनेनेंच द्यावें. पण तें सत्पात्र निश्चित सांगणें कठीण आहे. ज्यानें त्यानें आपापल्या आवडीप्रमाणें व सवडीप्रमाणें सत्पात्र संस्थांना दान दिलें पाहिजे. श्रांतसंवाहन, रुग्णपरिचर्या, दीन, अंध, कृपण, अनाथ—प्रेतसंस्कार यानिमित्त द्रव्य द्यावें, असें याज्ञवल्क्यस्मृतींत (१–९–२०९) व अन्यत्रही सांगितलेलें आहे.

समाजाचें आरोग्य सुधारणें, लोकांत रोग उत्पन्न न होतील अशी दक्षता घेणें, असें शिक्षण देणाऱ्या संस्थांना दान द्यावें. रोग्याकरितां रुग्णालयें, औषधालयें, शस्त्रक्रियालयें लागतात. अशा संस्थांना दान दिल्यास मोठा उपयोग होतो. रुग्णपरिचर्येच्या द्वारानें अहिंदु लोक कसा धर्मप्रसार करतात व कसें द्रव्य मिळवितात हें सर्वश्रुत आहे. पण त्यांच्या संस्थांच्या मागें त्यांचे मोठे द्रव्य–निधि आहेत, हेंही विसरतां कामा नये. दीन, अनाथ, गरीब अशांना कोणी विचारीत नाहीं म्हणून त्यांवर परधर्म स्वीकारण्याचा प्रसंग येतो! अनाथ स्त्रिया दुष्टांच्या आक्रमणाला बळी पडतात! यास्तव **हिंदु-अनाथालयें, हिंदु-अनाथ-महिलाश्रम, हिंदु-अनाथ-विद्यार्थीगृहें** अशा संस्थांना हिंदुसमाजानें आपल्या दानशक्तीनें जगविलें पाहिजे. अनाथांच्या प्रेतसंस्काराची व्यवस्थाही समाजाच्या दानवृत्तीवरच होऊं शकेल. सैनिक, नाविक, वैमानिक, शिक्षणसंस्था, व्यायामसंस्था, आरोग्यसंस्था, शरीरबलवर्धकसंस्था, शिस्त व संघटना उत्पन्न करणाऱ्या संस्था, हिंदुमहासभेच्या शाखा, राष्ट्रीय स्वयंसेवक संघ, राष्ट्रसेविका समिति, रामसेना इत्यादींना (या आजच्या कालांतील सत्पात्र समजून) दान देणें हें अत्यंत उचित होय. बेकारी निवारण करणाऱ्या संस्थांना चांगली मदत करून हिंदु बेकारांना काम करून जगण्याचा मार्ग दाखविण्याचें श्रेयही हिंदुसमाजानें घेतलें पाहिजे. अदृष्ट, अपूर्व व पुण्य अशा भावनेनें दगड, झाड, पशुपक्षी, किडामुंगी यांप्रीत्यर्थ दान न करतां ज्यामध्यें अखिल हिंदुसमाजाची उन्नति आहे, ज्यामुळें हिंदुधर्माचा, हिंदुराष्ट्राचा व हिंदुसंस्कृतीचा उत्कर्ष होणार आहे, अशा संस्थांना दान देणें हें प्रत्येक हिंदूचें कर्तव्य आहे.

**( ४९६ ) साक्षात्कारीः**—सुशिक्षित बेकार भिक्षेकरी निरनिराळ्या थापा देऊन, कोणाचीं तरी सर्टिफिकिटें दाखवून, कोणच्या तरी कंपनीचे दलाल आहों असें भासवून, द्रव्य मिळवीत असतात. जीर्णोद्धार, देवालयाचा सभामंडप या गोष्टी तर सततच्या आहेत. त्याहीपेक्षां दृष्टांत झाला, साक्षात्कार झाला, अमक्या ठिकाणीं आतां देऊळ बांधलें पाहिजे, भंडारा केलां पाहिजे, असें सांगून दानबुद्धीचा लाभ कांहीं लोक घेत असतात; असल्या लोकांपासून सावध रहावें.

(४९७) **देशसेवक हें एक सत्पात्र:**–दान जें द्यावयाचें तें 'श्रिया देयम्, ह्रिया देयम्, संविदा देयम्' असें द्यावें असें सांगितलें. (४९५ पहा) यासंबंधीं शुक्रनीतींत व अन्यत्र जें विवेचन आहे त्या धोरणानें कलावंत, मल्ल, गायक, वादक, शाहीर, विद्वान, वक्ते आणि हिंदुराष्ट्रकार्य करणारे लोक हे सर्व दान देण्यास सत्पात्रच होत. जो आपला प्रपंचव्यवसाय सोडून सर्व वेळ सार्वजनिक कार्यांतच घालवितो त्याला समाजानें जगविलें पाहिजे. तो जर एखाद्या संस्थेच्या द्वारें तें कार्य करीत असेल तर त्या संस्थेस लोकांनीं आश्रय द्यावा व संस्थेनें त्या कार्यकर्त्यांचा संसार चालवावा हें अत्यंत योग्य होय. पण सर्व संस्थांची स्थिति अशी असते असें नाहीं. जो त्यागपूर्वक प्रामाणिकपणें कार्य करीत असेल त्याचेबद्दल समाजांत सहानुभूति पाहिजे. देशकार्य करणारा किंवा कोणतेंही सार्वजनिक कार्य करणारा मनुष्य अगदीं दरिद्री असावा, त्याच्या मुलांनीं मधुकरी मागावी, बायकोनें लोकांच्या घरीं स्वैपाक करीत हिंडावें, अशी कल्पना करणें सर्वस्वी चुकीचें आहे. दैन्य न दाखवितां स्वाभिमानानें, प्रापंचिक गरजा भागवून व्यवस्थित जगतां येईल, इतका आश्रय अशा माणसाला पाहिजेच. त्याशिवाय कार्यच होणार नाहीं. ज्या माणसांनीं पूर्वी असे त्याग केले, त्यांना आतां वार्धक्यांत कोणी विचारीत नाहींत आणि द्रव्यावर मताधिकार असल्यामुळें द्रव्यहीन, पण स्वार्थत्यागी कार्यकर्त्या माणसाला राजकारणांत कवडीचीही किंमत उरलेली नाहीं ! गेल्या पिढींतील कार्यकर्त्यांची ही शोचनीय स्थिति पाहूनच नव्या पिढींतील तरुण राष्ट्रकार्यार्थ पुढें सरसावत नाहींत. कारण एकदां एक कार्यकर्ता सार्वजनिक कार्यांत पडला कीं जवळ जवळ त्याचें सर्व कुटुंब त्या कार्यांत ओढलें जातें आणि आर्थिक दृष्ट्या तें कुटुंब कधींही वर येत नाहीं ! अशीं अनेक उदाहरणें आढळतात. यास्तव दान देण्यास सत्पात्र असे हिंदुराष्ट्राचे कार्यकर्ते लोक होत, हेंही हिंदुसमाजानें ध्यानांत ठेवलें पाहिजे. लोक देतात, आदर दाखवितात म्हणून त्यांच्या भावनेचा अयोग्य लाभ हिंदुत्वनिष्ठ कार्यकर्त्यांनीं घेणें हें चांगलें नाहीं हें सांगावयास नकोच. त्यामुळें एका व्यक्तीबद्दल तर अनादर उत्पन्न होतोच, पण सर्व देशभक्त ( सार्वजनिक कार्यकर्ते ), अप्रामाणिक व फंडगुंड आहेत, असा प्रवाद उगाचच बोकाळतो. याकरितां कार्यकर्त्यानें व समाजानें दोघांनींही दक्षता ठेवली पाहिजे.

**(४९८) जुन्या विद्येस उत्तेजनः**—लग्न, मुंज, हव्यकव्य अशा प्रसंगीं पुरोहिताला दक्षिणा देणें म्हणजे तें दान नसून त्याच्या श्रमाची ती मजुरीच असते. भटाच्या दक्षिणेचा उगाच बोभाटा करण्यांत आलेला आहे. या वर्गाला विद्या व श्रम या मानानें फारच थोडा पैसा मिळतो. हिंदु गृहस्थांनीं हिंदु भिक्षुकांचा परामर्श घेतलाच पाहिजे. वर्षांतून एखादें मंत्रजागर करावें व दक्षणा देऊन वैदिकांना उत्तेजन द्यावें. उपनयन, विवाह, अंत्येष्टि अशा प्रसंगीं वैदिक, पुरोहित, शास्त्री, संस्कृत पाठशाळा, वेदशाळा इत्यादींना दान द्यावें. पुराणिक, प्रवचनकार, हरिदास, अशांचें वर्षांतून योग्य वेळीं एखादें प्रवचन वा कीर्तन करवून त्यांचा यथायोग्य गौरव करावा. अशा आश्रयाशिवाय हा वर्ग जगणार नाहीं. परंपरा टिकविणारा व देशकालसापेक्ष धर्म सांगणारा हिंदूंतील वैदिक, शास्त्री, उपदेशक हा वर्ग राहिलाच पाहिजे. दानाचा सर्व ओघ केवळ विविध संस्थांकडे वळला आणि या वर्गाची उपेक्षा झाली तर तें अनिष्ट आहे. धार्मिक, लौकिक, सामाजिक असे विविध प्रसंग प्रपंचांत येत असतात. त्यांतील धर्मकार्यप्रसंगींचा जो दानधर्म आहे तो या अशा वर्गाकडेच झाला पाहिजे. अखिल हिंदूंतील जे जे कोणी या क्षेत्रांत प्रामाणिकपणानें, सदाचारानें व विद्वत्तेनें कार्य करीत असतील, त्यांना दानाच्या आधारानें हिंदुसमाजानें जगविलेंच पाहिजे.

**(४९९) विद्यार्थ्यांना साह्य कराः**—विद्यार्जन करणाऱ्या कोणाही हिंदु विद्यार्थ्याला साह्य करणें हा दानाचा उत्तम प्रकार होय. वेदशाळा, पाठशाळा, धंदेशाळा, हायस्कुलें, कॉलेजें, वैद्यशाळा, व्यायामशाळा आणि परदेशांतीलही विद्यालयांत जे होतकरू व गरीब विद्यार्थी शिकत असतील, अशांना मधुकरी, वार, फी, पुस्तकें, शिष्यवृत्ति अशा विविध प्रकारांनीं साह्य करावें. हिंदु समाजांतील मधुकरी ही संस्था स्वावलंबी, गृहस्थांना फारसा उपद्रव न देणारी आणि विद्यार्थ्यांना सोयिस्कर अशी आहे. गांवांतील कोणाही होतकरू व गरीब हिंदु विद्यार्थ्याला मधुकरी अवश्य घालावी. ताज्या अन्नाचा थोडा भाग अशा विद्यार्थ्यांना त्यांच्या व आपल्या सोयिस्कर वेळेवर दिल्यास फार उपयोग होतो. 'भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें ॥' हें तत्त्व विद्यार्थ्यांना लागू नाहीं.

अलीकडे ही प्रवृत्ति कमी होत आहे. वार लावण्यापेक्षां मधुकरी मागणें हें उत्तम. त्यामुळें निस्पृहता राहाते. मधुकरी घालणाऱ्यांनींही तो विद्यार्थी कसा आहे, त्याचा अभ्यास कसा आहे, त्याची एकंदर वागणूक कशी आहे, तो विद्यार्जन करतो आहे कीं नाहीं वगैरे सर्व चौकशी करीत असावें. गांवोगांवीं ना विद्या, ना आचार, ना सत्कार्य असे मधुकरी उगाच असतात. त्यांना मधुकरी न घालतां 'काम करा' असें सांगावें. यति, तापसी, ब्रह्मचारी, संन्यासी असे अधिकारी याचक आल्यास त्यांना अन्नदान नि वस्त्रदान अवश्य करावें. डवरी, गोंधळी, वासुदेव, बाळसंतोष, बहुरूपी, बैरागी, कुडबुडया जोशी, गोसावी, नंदीबैल, खरखरमुंडे असले शेतकऱ्याला लुबाडणारे वतनदार भिक्षेकरी आतां बंद केले पाहिजेत. अहिंदु भिक्षेकऱ्याला तर दारांतच उभें राहूं देऊं नये. केवळ हिंदूंतील विद्वान्, विद्यार्थी, संन्यासी व तापसी यांचाच परामर्श घ्यावा.

(५००) **पाण्याची सोय करावी**:—खेड्यांत, वाटेवर व अन्यत्र जेथें पाण्याची सोय नसेल तेथें विहीर, हौद, तलाव यांच्या व्यवस्थेकरित द्रव्य देणें हा दानाचा उत्तम प्रकार होय. पुष्कळ ठिकाणीं जनावरांकरित पाण्याची सोय नसते. कित्येक ठिकाणीं वाटसरूंचेही पाण्याविना फार हाल होतात. पुष्कळ खेड्यांतील हाल सांगतांच येत नाहींत. अशा ठिकाणीं एखादा बोअर खोदणें, विहीर खणणें, सबंध गांवाच्या उपयोगाकरितां तलाव बांधणें, हीं कृत्यें दानास सत्पात्र होत.

वापीकूपाप्रमाणें आराम म्हणजे बागा करणें, वृक्ष लावणें, शहरच्या मध्यभागीं आरामाकरितां वृक्षवेलीजल इत्यादींनीं युक्त अशी बाग तयार करणें, हें आजच्या कालांतील दानाचें एक सत्पात्र होय. रुग्णशुश्रूषा, विद्याभिवृद्धि, बेकारीनिवारण याप्रमाणेंच वरील कार्याकडे दानाचा ओघ हिंदूंनीं वळवावा.

(५०१) **भिक्षेकरी**:—क्षुधिताला अन्न द्यावें, उघड्याला वस्त्र द्यावें, कोणी भिक्षेकरी आल्यास मूठभर जोंधळे घालावे, नाहीं म्हणूं नये, निदान त्याचे अंगावर खेकसूं नये, हा सर्वसामान्य शिष्टाचार आहे. पण भिक्षेकरी वर्गही हल्लीं धंदेवाईक झालेला आहे. नेहमीं उघडें राहून अनेक वस्त्रें मिळवून तीं बाजारांत विकून ते धंदे करतात. ओल्या अन्नाच्या झोळ्या

भरभरून तेंही सर्व विकून द्रव्य मिळवितात. अंध, पंगु, बहिरे हे भिक्षेकरी तर आगगाड्या, मोटारी अशांतून राजरोस फुकट प्रवास करून लोकांना उपद्रव देऊन, पैसे मिळवून देणें घेणें करतात व कोर्टांत त्याकरितां दावेही लावतात! कांहीं भिक्षेकरी एखाद्या बाईला नुकतीच ती बाळंत झाली आहे अशा तऱ्हेचीं रंग दिलेलीं वस्त्रें नेसवून तिचे नांवावर पैसे मिळवितात! भिक्षेकऱ्यांचे जुने प्रकार कमी झाले असून नव्या पद्धतीनें लोकांची धर्मभावना ध्यानीं घेऊन भिक्षेचा धंदा कसा करावा इकडे लक्ष देणारा नवा वर्ग निघत आहे. म्हणून याबाबतींत हिंदुसमाजानें सावधच असलें पाहिजे. मूठभर जोंधळे आणि घांसभर अन्न एवढेंच देण्याचा प्रश्न असेल तर गोष्ट निराळी. पण जोंधळे दिले कीं तांदूळ, पुढें वस्त्र, पुढें द्रव्य अशी मागणी वाढते; त्यावेळीं अवश्य विचार करावा. काम करण्यास जे योग्य आहेत अशांना भिक्षा मुळींच घालूं नये. अशा लोकांनीं भिक्षा मागूंच नये असा निर्बंध करण्याचा यत्न केल्यास त्यामुळें समाजाचा उपद्रव कमी होईल; व तो वर्ग काम करूं लागेल.

**(५०२) वतनदार भिक्षेकरीः**—गांवोगांवीं, घरीं, दारीं, बाजारांत, स्टेशनवर, मोटार अड्ड्यावर एक वतनदार भिक्षेकरी वर्ग अत्यंत उपद्रवकारक असा आहे. याला कायद्यानें प्रतिबंध करणें भाग आहे. निदान लोकांनीं हे भिक्षेकरी दानास अपात्र आहेत असें समजावें. लोण्याच्या बाजारांत हे वतनदार भिक्षेकरी लोणीवाल्यांच्या इच्छेविरुद्ध लोण्याच्या मडक्यांत बचकन् बोट घालून लोण्याचे लचके मारतात! धान्यांच्या ढिगांत भसाभस हात घालून पसे मारतात! भाजीवाल्या माळणीचीं वांगीं, रताळीं, पेरू इत्यादि पदार्थ त्यांच्या इच्छेविरुद्ध बळकावतात. स्टेशनवर उतारू उतरला कीं त्याला तिकिट काढणें, हमाल करणें व गाडी गांठणें हें करावयाचें असतें. त्या घांदलींत या पिरा—फकिरांची झुम्मड पुण्यासारख्या स्टेशनवरही उपद्रव देते. त्यामुळें कुणाचें सामान राहातें, कोणी कांहीं विसरतो, एकंदरींत मनःस्वास्थ्य नसतें. रेल्वे व मोटारी यांच्या सोयीमुळें हे वतनदार भिक्षेकरी राजरोस फुकट प्रवास करतात. अगदीं पुढचा किंवा अगदीं मागचा डबा हा असल्या फुकट्यांचा जणुं राखीव असतो, असें म्हटलें तरी चालेल. इतर उतारूंना हे फुकटे त्रास देतात, शिव्याशाप देतात.

प्रसंगीं पादत्राणें व इतर जिन्नसही त्यांचे चोरतात! हा त्यांचा नित्याचा व्यवसाय आहे. प्लॅटफॉर्मच्या दोन्ही बाजूंनीं पसार होण्याची कला त्यांना चांगली अवगत असते. लोकांच्या धर्मबुद्धीमुळें यांना पैसे मिळतात, गोडघोड खावयास मिळतें. त्यामुळें अत्यंत मस्तवाल व उद्दाम असा हा वर्ग बनलेला आहे. पोलिसखातें नि रेल्वेखातेंही या लोकांचा हा अन्याय्य उपद्रव मुळींच कमी करूं शकत नाहीं.

(५०३) संख्या कां वाढते ? :–मजुराला, कारकुनाला, रोजचे दोन रुपये मिळत नाहींत. पण या वतनदार निसुग भिक्षेकऱ्यांना परस्पर पोट भागून शेर दोन शेर जोंधळे, कपडालत्ता वगैरे मिळतो. या धंद्यांत प्राप्ति बरी होते, फुकट प्रवास करतां येतो, गोडघोड खावयाला मिळतें म्हणूनच यांची संख्या वाढत आहे. बाह्य धंदा भिक्षेकरी, जोडधंदा चोरी असा नाना ढंग करणारा हा वर्ग दानास आज सर्वथैव अपात्र आहे. यांतील कांहीं लुच्चे अंगांत देव आणतात, देव सांगतात, भविष्य बोलतात, प्लेग, पटकी, पाऊसपाणी, मुलें होणें, लग्नें होणें यांचींही भाकितें वर्तवीत असतात आणि अडाणी वर्गाला नाडून त्यावर जगत असतात. शेतकरीवर्गाला नि प्रवाशाला या असल्या लोकांचा उपद्रव फारच असतो. म्हणून हिंदुसमाजानें हा वर्ग दानास सर्वस्वीं अयोग्य समजून आपल्या दानाचा ओघ हिंदुसमाजोपयुक्त वर दर्शविलेल्या सत्पात्राकडेच वळवावा.



## प्रकरण एकतिसावें

## पापपुण्य, स्वर्गनरक व प्रायश्चित्त

(५०४) पापाचे प्रकारः—मनुष्याचे हातून बरींवाईट कृत्यें बुद्धिपुरस्सर वा अबुद्धिपुरस्सर होतात, त्यांना पापकृत्यें वा पुण्यकृत्यें असें म्हणतात. ऋग्वेदांत अंहस, एनस, दुरित, पाप्मन, वृजिन इत्यादि शब्द

आलेले आहेत. वेदांतील पवमानांत आणि अनेक सूक्तांत ‘ हे जलदेवते, तूं माझें पातक धुऊन टाक ’ अशी प्रार्थना केलेली आहे. देव, मित्र, अग्नि यांविरुद्ध जर कांहीं पाप घडलें असेल तर त्याची निष्कृति होवो, असेंही (ऋग्वेद १, १८५, ८) म्हटलेलें आहे. ब्रह्महत्त्या हें सर्वांत मोठें पाप इंद्रानें केलें, म्हणून त्यानें तें तीन ठिकाणीं वांटून दिलें, अशी कथा तैत्तिरीय संहितेमध्यें (२, ५, १२) आहे, छांदोग्योपनिषदांत अश्वपति राजा म्हणतो, ‘ माझ्या राज्यांत चोर नाहीं, कृपण, मद्यपी, अनाग्निहोत्री, अविद्वान्, स्वैराचारी मनुष्य नाहीं, मग स्वैरिणीची गोष्ट कशाला ? ’

‘ **न मे स्तेनो जनपदे न कदर्यो न मद्यपः । नानाहिताग्निर्नाविद्वान्न स्वैरी स्वैरिणी कुतः ।** ’ म्हणजे त्या काळीं हीं सर्व पातकें समजत. चोरी, सुरापान, व्यभिचार, खून करणारे व या चौघांशीं संसर्ग करणारा अशांना पंचमहापातकी समजत असत.

‘ **स्तेनो हिरण्यस्य सुरां पिबंश्च गुरोस्तल्पमावसन् ब्रह्महा चैते पतन्ति चत्वारः पञ्चमश्चाचरंस्तैरिति ।** ’ कोणी पांचाच्या जागीं सात पातकें सांगतात, तर कोणी बाराही सांगतात. पांचाच्या वर्गीकरणांत अतिपातक, महापातक, अनुपातक, उपपातक, जातिभ्रंशकरण, संकरीकरण असे वर्ग केलेले आहेत.

**(५०५) पापाचें मूळः**—मनुष्याची प्रवृत्ति पापकर्म करण्याकडे होते याचें कारण काय ? ‘ **किमहं साधु नाकरवम् । किमहं पापमकरवमिति ?** ’ असा प्रश्न उपनिषदांतही एका प्रसंगानें आलेला आहे. ‘ माझ्या हातून पुण्य कां घडत नाहीं ? पापच कां घडतें ? मला धर्म समजत असतांना मी तिकडे कां प्रवृत्त होत नाहीं व अधर्मापासून मी निवृत्त कां होत नाहीं ? ’ या प्रश्नाचें उत्तर—कामक्रोधादि रजोगुणसमुद्भूत जे विकार तेच या सर्व पापांच्या प्रवृत्तीस कारणीभूत आहेत, हें होय.

**अथ पुरुषस्य कामक्रोधलोभाख्यं रिपुत्रयं सुघोरं भवति ।**
**तेनायमाक्रान्तोऽतिपातकमहापातकानुपातकोपपातकेषु प्रवर्तते ॥**

—विष्णुसंहिता ३३।१

कर्मेंद्रियांना व ज्ञानेंद्रियांना जगण्याकरितां विषय पाहिजेत. परंतु हाव, अतितृष्णा, "कामात्मता न प्रशस्ता" प्रशस्त नव्हे तिला अंतच नसतो व ती अनर्थावह आहे. अर्थात् सर्व पापांचें मूळ जी आशा, तृष्णा, वासना, हांव तिला संयमानेंच जिंकलें पाहिजे.

(५०६) **परिस्थितिसापेक्ष पापपुण्य**:–पूर्वकालांत जीं पातकें गणलीं गेलीं, त्यांतील व्यवसाय, आहार, शिवाशीव या निमित्तान्नीं पापें सोडल्यास बाकी सर्व तशींच मानलीं पाहिजेत. कारण तीं सर्व समाज-स्वास्थ्याकरितां आहेत. समाजाचा अभ्युदय, उत्कर्ष आणि व्यक्तीचें कल्याण याला जें जें कांहीं साधक तें पुण्य व याला बाधक तें पाप समजलें पाहिजे. मनुष्याला बरें व वाईट हें थोडें तरी कळतें. आपल्या हातून कांहीं तरी चुकी झाली या जाणिवेंत पापकल्पनेचा उगम आहे. दुरित म्हणजे चुकीच्या मार्गानें जाणें. आपल्या हातून कांहीं तरी विशेष घडलें, लोकांनीं बरें म्हणण्याजोगें घडलें या कल्पनेंत पुण्य अथवा सुकृत यांचें बीज असतें. समाजांत ज्या नैतिक कल्पना असतात व समाजाचीं जीं उच्च ध्येयें असतात त्यांस अनुसरून पाप व पुण्य हीं परिस्थितिसापेक्ष बदलत असतात. पूर्वी अस्पृश्याला शिवण्यांत पाप वाटे तर आज तसें वाटत नाहीं. पूर्वी समुद्र-गमन पाप वाटे तर आज परदेशगमन अवश्य वाटतें. आठव्या वर्षी मुलीचें लग्न करणें हें पूर्वी पुण्य समजत, तर तें आज पाप आहे, असें समजण्यापर्यंत मजल आलेली आहे.

(५०७) **प्रच्छन्न पातकें**:–मनुष्य खोटें बोलून दुसऱ्याला फस-वितो. पण त्याचें मन त्याला खातच असतें. परस्त्रीला माता म्हणतांना व्यभिचारी मनुष्याचे दांत जिभेचा चावा घ्यावयास सरसावतात. 'परस्त्रीतें म्हणतां माता । चित्त लाजवितें चित्ता ॥' दुसऱ्याला गंडवून द्रव्य मिळविलें व बाह्यात्कारी जरी मोठेपणा लाभला, तथापि आंतून दुःखी, कष्टी व पोळलेला असाच तो मनुष्य असतो. म्हणून सर्व पापांत प्रच्छन्न पाप हें फार वाईट होय. 'आमरणात् किं शल्यम्? यत् प्रच्छन्नं कृतं पापम् ।' धन, मान, स्त्री, सत्ता आणि कीर्ति यांच्या कामनेनें क्रोध, ईर्षा व असूया-युक्त अनेक गोष्टी मनुष्य करतो. त्यावेळेला तो जर आत्मनिरीक्षण करील तर त्याला स्वपरवंचनेची जाणीव खास होईल.

(५०८) **पापाचें लक्षणः**–मनुष्यानें आत्मापहारक म्हणजे स्वतःचे वंचक होऊं नये. ज्यामुळें स्वतःच्या आत्म्याचा नाश होतो; प्रबल मनोविकारानें सदसद्विवेकबुद्धीचा ऱ्हास होतो; दंभ, दर्प, अहंकार, स्वार्थादि वृत्तीनें अन्तःकरण पतित होतें; सौजन्य, सत्प्रवृत्ति व मनुष्यत्व लोप पावतें, तें पाप होय. माझें पाप ईश्वराला दिसतें काय, ईश्वर आहे तरी कोठें? समाजाला व राजदंडाला चकवून जेवढें पचवितां येईल, तें सर्व पुण्य असें समजणाऱ्यांनीं अन्तर्मुख दृष्टीनें विचार केल्यास त्यांचीं पातकें त्यांना समजतात.

(५०९) **पुण्यपापाची कसोटीः**–स्वसमाज व स्वराष्ट्र हें ईश्वराचें प्रतीक. याची ज्या प्रकारानें सेवा करतां येईल ती करणें हें पुण्यकर्म होय. प्राप्तकर्तव्य न्यायानें, सत्यानें, निःपक्षपातानें केल्यास त्यांत आत्म्याची उन्नति होते, चित्त प्रसन्न राहातें आणि मनाला शांति मिळते. सात्त्विक मनःशांति म्हणजे पुण्य नि अशांति म्हणजे पाप ही पापपुण्याची कसोटी समजावी. विहित कर्म न करणें व निंदित कर्मांचें सेवन करणें, यामुळें मनुष्याला पातित्य येतें, असा जुना दंडक होता. आतां विहित कर्मांची व्याप्ति कुटुंब, जाति, समाज, राष्ट्र व मानव्य एवढ्याला व्यापून राहिलेली आहे, म्हणून पापपुण्याच्या कल्पनाही व्यापक राहाणार.

(५१०) **स्वराष्ट्रोपकारक तें पुण्यः**– हिंदुसमाजाच्या आणि हिंदुराष्ट्राच्या सर्वांगीण उन्नतीकरितां पापपुण्याच्या कल्पनाही आतां बदलावयास पाहिजेत. जुन्या हिंदुधर्मांत व्यष्टीला महत्त्व असल्यामुळें वैयक्तिक पापपुण्याच्या कल्पनांचा प्रभाव अधिक आढळतो. व्यष्टि व समष्टि यांच्या हिताचा जेथें प्रश्न येईल व त्यांत जेव्हां हें का तें असा प्रश्न येईल तेव्हां समष्टीच्या हिताला व कल्याणाला जें साधक तें पुण्य आणि जें बाधक तें पाप होय, असें समजलें पाहिजे.

पापपुण्याच्या या व्याख्या नव्या आहेत असा भाग नाहीं. अठरा पुराणांचें सार म्हणून भगवान् व्यासांनीं जें सांगितलें आहे, त्यांतही हेंच आहे.

**अष्टादशपुराणानां सारं सारं समुध्दृतम् ।**
**परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम् ॥**

(५११) **आजचीं पापें**:—अखिल हिंदूंनीं हिंदु देवता, हिंदु साधु, यांच्या उत्सवांत भाग घेऊन आपला उत्साह कारणीं लावला पाहिजे. पण जर विश्वबंधुत्वाच्या वेडानें अहिंदूंच्या उत्सवांस हिंदु साह्य करूं लागतील, त्यांच्या थडग्यांतील प्रेतांना आणि जित्या मेल्या साधूंना भजतील तर तें आजच्या कालांतील मोठें पाप समजलें पाहिजे. एखाद्या वेडपट हिंदूला पिराच्या वरप्रसादानें म्हणे मुलगा होतो! म्हणून तो त्या पिराचा उरूस करण्याकरितां मोठी मशीद बांधून देतो! आधीं हिंदूनें पिराला भजणें हा मूर्खपणा होय! त्याच्या प्रसादानें पुत्र होतो असें समजणें महामूर्खपणा होय, आणि वैयक्तिक समाधानाकरितां त्या पिराची मशीद बांधून देणें व ती भर वस्तींत हिंदूंच्या उरावर बांधणें हा तर अधमपणा होय! पंचमहापातकीही प्रसंगीं पुरवले, कारण त्याचें पातक त्याच्यापुरतें प्रभाव दाखवितें. परंतु हा हिंदुसमाजद्रोही मनुष्य इतका अधम आहे कीं तो आपल्या पापाचा प्रभाव सर्व हिंदूंना दीर्घकालपर्यंत भोगावयाला लावतो. 'सर्वं खल्विदं ब्रह्म' या कल्पनेनें अहिंदु कल्पनांचे देव्हारे जर अजागळ हिंदु, हिंदूंच्या नाकावर टिच्चून माजवूं लागले तर त्यांना पापी नराधमच समजलें पाहिजे. आज एखादा हिंदु पुण्यकर्म म्हणून अखिल हिंदूकरितां **पतीतपावन मंदिर** बांधील तर तें योग्य आहे. पण तसें न करतां एखादा हिंदु वैयक्तिक समाधानाकरितां व हौसेकरितां देवालय बांधील तर तें पुण्य नसून पापच समजलें पाहिजे. गल्लोगल्लीं व रस्तोरस्तीं कितीतरी पोरके व परदेशी देव पडलेले आहेत. त्यांचें रक्षण व पूजा ही होत नाहींत. अशा स्थितींत आणखी देवदेवळांची संख्या वाढविणें, हें पुण्य नसून पापच आहे. देशद्रोह, राष्ट्रद्रोह हीं महापातकें आहेत. त्यांना देहान्तप्रायश्चित्तें जगांत देतात. जपानांत त्या पापाकरितां लोक आत्महत्त्या करितात! हिंदुराष्ट्रांत देशद्रोह्याशीं बाकून वागण्याची तरी वृत्ति यावयास हवी. देशद्रोही पण प्रतिष्ठित अशांवर समाजानें बहिष्कार घालावा.

(५१२) **अर्थशौच हें पुण्यः**—शरीरशुद्धि, अन्नशुद्धि, वस्त्रशुद्धि, सोवळें, ओवळें, पात्रशुद्धि वगैरे गोष्टी स्वच्छतेच्या, आरोग्याच्या, टापटिपीच्या, शिस्तीच्या व सोयीच्या आहेत. त्यांत पापपुण्याचा संबंध नाहीं.

**सर्वेषामेव शौचानामर्थशौचं परं स्मृतम् ।**
**योऽर्थे शुचिः स शुचिर्न मृद्वारिशुचिः शुचिः ॥** —मनु. ५,१०६

शारीरशौच, मनःशौच या सर्वांपेक्षां अर्थशौच म्हणजे द्रव्याचे बाबतींत अगदीं निर्मल असणें हें मोठें पुण्य आहे. चोरी करणें, लुबाडणें, निरनिराळ्या प्रकारानें श्रमापेक्षां अधिक पैसा घेणें हीं सर्व पापेंच होत. आजच्या कालांत माणसाच्या गरजा, आकांक्षा, उपभोगसाधनें आणि द्रव्य ठेवण्याचीं स्थानें इतकीं वाढलीं आहेत कीं त्याला कितीही मिळविलें तरी पुरेंच पडत नाहीं. सार्वजनिक पैशाचा अपव्यय करणें, अपहार करणें, तीन पैशाचें कार्ड लिहून सव्वा आणा खर्ची टाकण्यापासून तों साठ हजाराचें काम करून एक लाख रुपये पी. डब्ल्यु. डी. खात्यांत व्यवस्थितपणें खर्च टाकणें आणि काळ्या बाजारावर अनेकांची धनहिंसा करून घडगंच पैसा मिळविणें हीं सर्व पापेंच होत. सार्वजनिक संस्था या लोकसेवेकरितां आहेत. समाजाचें पाऊल थोडें तरी पुढें पडेल, हक्काची जाणीव होईल, कर्तव्यतत्परता वाढेल, या बुद्धीनें सार्वजनिक संस्थांमध्यें काम केलें पाहिजे. नगरसभा, लोकलबोर्डें, व्यापारी कंपन्या, विमा कंपन्या, कारखाने आणि संस्था यांमध्यें धन, मान आणि सत्ता यांच्या कामनेनें शिरून मोठीं माणसेंही स्वपरवंचनेचें पातक करीत असतात. श्रमाचा योग्य मोबदला घेणें हें अवश्यच आहे. पण श्रम न करतां किंवा केले त्यापेक्षां दसपट किंवा वीसपट मोबदला लाटणें व तें साखसुरतपणें नियमबद्धतेनें लाटणें हें पातक प्रायश्चित्तार्ह आहे.

व्यापारी कंपन्या निघाल्याच पाहिजेत, पण या सार्वजनिक वा खाजगी लिमिटेड कंपन्यांचे व्यवहार कसे चालतात हें ऑडिटरांना विचारावें. ऑडिटरांनीं प्रशस्ति दिलेल्या कंपन्यांतसुद्धां कसा गोंधळ असतो, हेंही त्यांचेकडून समजून घेण्याजोगें असतें. महाराष्ट्रांत तर मध्यमवर्गाच्या पैशावरच अनेक कारखान्यांची उभारणी झालेली आहे. पण भागिदारांना नफ्यांतील फार थोडा भाग देऊन डायरेक्टर आणि वरिष्ठ अधिकारी यांनीं मात्र अनेक मार्गांनीं कारखान्यांतील पैसा उकळून गबर होणें हें पापी वृत्तीचेंच दर्शक होय! नफ्याच्या आमिषावर पैसा गोळा करणें व नफा झाल्यावर अनेक खर्चाचीं अनेक तोंडें दाखवून भागीदारांना चूप बसविणें, हेंही आजच्या कालांतील कौशल्ययुक्त पातकच होय!

**(५१३) कामुकता वाढविणें हें पापः**—वाचकांची वृत्ति चटोरपणाकडे वळेल, तरुण व तरुणी स्वेच्छाचारी व कामुक होतील, वाचकांचीं

मनें केवळ अर्थकामप्रवण होतील असले विचार सांगणें व लिहिणें आणि त्यामुळें आपल्या साहित्याचा खप वाढविणें हेंही पातकच होय! समाजांत लैंगिक भावना अधिक वाढतील, विवाहबंधनें शिथिल होतील, पतिपत्नींचे संबंध पवित्र न राहातील, माणसांची दानत खालावेल, शील, सौजन्य व सत्प्रवृत्ति यांचा ऱ्हास होईल, अशा तऱ्हेच्या लेखनाला व भाषणाला पापांतच गणलें पाहिजे.

**(५१४) स्वर्ग म्हणजे काय?**:—पापाचरणानें नरकप्राप्ति व पुण्यकर्मानें स्वर्गप्राप्ति होते, अशा समजुती लोकांत आढळतात. स्वर्ग म्हणजे एक विशिष्ट देश आहे, तेथें अनेक सुखोपभोग असतात, सुंदर वस्तूंचा संग्रह असतो व नरक म्हणजे त्या उलट सर्व असतें, असा समज आहे. यमलोक, नरक, रौरवनरक यांचीं वर्णनेंही गरुडपुराण, मार्कंडेय पुराण, इत्यादि ठिकाणीं आढळतात. स्वर्ग व नरक हे लोक कोठें तरी असतील व तेथें गेल्यावर प्राण्यांना सुखदुःखें भोगावयास मिळतील ही कल्पना प्रश्नचिन्हांकित असली तरी कर्माचें फल मिळतें, हा कर्मविपाकाचा सिद्धांत बरोबर आहे. आत्मा, कर्म व त्याचें फल यांचा नित्यसंबंध असल्यामुळें उत्तमफल भोगार्थ उत्तम लोक व अधमफलभोगार्थ अधम लोकच पाहिजेत व ते स्वतंत्र पाहिजेत असें समजण्याचें प्रयोजन नाहीं; हें सर्व या लोकांतच मिळूं शकतें. '**सुखविशेषः स्वर्गः**' अशी स्वर्गाची व्याख्या तंत्रवार्तिकांत श्रीकुमारिलभट्टांनीं केली आहे. स्वर्ग म्हणजे संतोष, स्वर्ग म्हणजे आत्मसंतोष असाही अर्थ आहे.

'**प्रीतौ स्वर्गशब्दो वर्तते**' –(शाबरभाष्य जै. सू. ४, ३, १५) कुमारिल भट्टांनीं शेवटीं निष्कर्ष असा सांगितला आहे कीं, एकाचा स्वर्ग म्हणजे आत्मसंतोष व दुसऱ्याचा स्वर्ग म्हणजे संतोष देणारी वस्तु. '**एकस्य प्रीतिः स्वर्गशब्दवाच्या अपरस्य प्रीतिमद् द्रव्यम्।**' यावरून स्वर्ग म्हणजे कोणता एक विशिष्ट लोक अशी कल्पना नाहीं असें दिसतें.

**(५१५) पारतंत्र्य हाच नरकः**– हिंदूंनीं यापुढें स्वर्गनरकाच्या पारलौकिक कल्पना मनांत न आणतां हिंदुराष्ट्राचा स्वर्ग बनविण्याचीच आकांक्षा धरावी. आज हिंदुराष्ट्र पारतंत्र्याच्या नरकामध्यें आहे. '**को नरकः परवशता।**' परवशता म्हणजे पारतंत्र्य ही निरयगति आहे. तिच्या

अनुषंगानें शस्त्र, अस्त्र व शास्त्र यांचा अभाव, अस्पृश्यता, निरक्षरता, कर्तव्यविन्मुखता, स्वाभिमानशून्यता इत्यादि दोष समाजांत वाढलेले दिसतात. या अधोगतींतून वर येणें म्हणजेच स्वर्ग व या दोषांतच खितपत पडणें म्हणजे नरक होय ! आजच्या हिंदुसमाजांत फूट, वैमनस्य, मत्सर, बेशिस्त, असंघटितपणा, मनोदौर्बल्य, निवृत्तितत्परता इत्यादि दुर्गुणांचें जें जंजाल वाढलेलें आहे, तो नरक होय. एकजूट, शिस्त, सहकार्य, प्रेम, उत्साह, आनंद, हुरूप, स्फूर्ति, तडफ, धैर्य, स्वाभिमान अशा गुणांनीं हिंदुसमाजानें संपन्न होणें म्हणजेच स्वर्ग होय. अशा या दृश्य इहलोकांतील स्वर्गप्राप्ती-कडे हिंदुसमाजानें आपलें बल खर्चावें. ऐहिक जगांतील वरील नरकाची संपादणी ज्यामुळें होईल असें कोणतेंही कृत्य हिंदूंनीं करूं नये.

(५१६) पातकें व त्रिविध दंडः—मनुष्यस्वभावानुसार स्वेच्छेनें वा परच्छेनें पातकें होतातच. त्यांची निष्कृति जपामुळें आणि पश्चात्तापा-मुळें होते. पाप घडलें कीं त्याबद्दल वाईट वाटणें व पुन्हां तें न करण्याचा निश्चय करणें हेंच खरें प्रायश्चित्त होय! आपण केलें हें फार वाईट केलें, पुन्हां तसें करणार नाहीं, असें वाटणें हेंच खरोखरी प्रायश्चित्त होय.

प्रायो नाम तपः प्रोक्तं चित्तं निश्चय उच्यते ।
तपोनिश्चयसंयोगात् प्रायश्चित्तमिति स्मृतम् ॥

पश्चात्ताप, आत्मशोधन, जप हे एक प्रायश्चित्ताचेच प्रकार आहेत. शरीरदंड, मनोदंड व वाग्दंड हेही प्रायश्चित्तांत मोडतात. चोरी केली तर राजा त्याला दंड करतो. हा शरीरदंड झाला. पण परद्रव्यअप-हरणाची जी बुद्धि तिची निष्कृति शरीरदंडानें होत नाहीं, तिला पश्चात्तापच पाहिजे. चोराला शिक्षा देण्यांत राजाचा त्रिविध हेतु असतो. ज्याचें द्रव्य गेलें त्याचें त्याला परत मिळावें, चोरी केल्यास शिक्षा होते, असें समाजाला समजावें, आणि त्या व्यक्तीला असें कृत्य करूं नये असेंही वाटावें. शारीरिक पापांना शारीरदंड जसा उपयोगी होतो तसा लोभमूलक पापांना दानरूपी प्रायश्चित्तदंड अवश्य आहे.

(५१७) दान व पातकें:—प्रायश्चित्त म्हणजे चुकीकरितां शिक्षा. मनुष्य द्रव्याकरितां खूप खटपट करतो. द्रव्य देणें म्हणजे श्रम देणें होय.

द्रव्यदानानें लोभाचें निराकरण होतें. ज्यांनीं लोभमूलक पातकें केलीं असतील, त्यांनीं द्रव्यद्वारां त्यांची निष्कृति करावी. याचा अर्थ असा नव्हे कीं वाटेल तसे पैसे मिळवून ते विविध संस्थांना देऊन पुन्हां तींच कर्में करण्याची सिद्धता ठेवावी ! पूर्वीं या प्रकाराचा अतिरेक झाला. सर्व पापांना दानाचें प्रायश्चित्त सांगितलें गेलें. गाय, वस्त्र, घोडा, भूमि, तीळ, तूप, अन्न यांच्या दानानें सर्व पातकें भस्म होतात, अशी कल्पना आली. वाटेल तें करावें, शेवटीं दानें करावींत व ब्राह्मणभोजनें घालावींत, म्हणजे तीं पचतात असा अपसमज उत्पन्न झाला. समष्टिहितार्थ राजानें केलेल्या सर्व पापांचा नाश ब्राह्मणांना दान दिल्यानें होतो, असें म्हटलें आहे. आजसुद्धां काळाबाजार, कंट्रोलखातें व कंत्राटें यांवर मिळविलेला पैसा पचविण्याकरितां संस्थांना मोठाल्या देणग्या देण्यांत येतात.

यदेनः कुरुते किंचिद् राजा भूमिमवाप्नुवन् ।
सर्वं तन्नुदते पश्चाद्यज्ञैर्विपुलदक्षिणैः ॥७८॥
ब्राह्मणेभ्यो ददद् ग्रामान् गाश्च राजन् सहस्रशः ।
मुच्यते सर्व पापेभ्यस्तमोभ्य इव चंद्रमाः ॥७९॥ —वन. प. अ. ३३

(५१८) दंभाचें नवें स्वरूप:—वाटेल तें करून पैसे मिळवावे, बरेवाईट प्रकार करून, हिंदुसमाजाचा द्रोह करून अनन्वित प्रकारें लोकांना छळून नोकरींत बढती मिळवावी आणि नोकरींतून मोकळें होतांच दहाबारा हजार रुपये एखाद्या संस्थेला देऊन पापनिष्कृति करून पुनः देशभक्त म्हणून मिरवावें, हें प्रायश्चित्त नसून दंभाचें प्रदर्शन होय ! ना समाजदंड, ना राजदंड, ना मनोदंड अशा स्थितींत कोणी देहदंडाचें प्रायश्चित्त घेण्याकरितां तीर्थयात्राही करतात नि क्षौर व श्राद्धें करून पातकांची निष्कृति करतात ! तीर्थक्षेत्राच्या ठिकाणीं गेल्यास क्वचित् सज्जनसहवास होऊन वृत्तींत पालट होण्याचा संभव असतो. परंतु अलीकडे तीर्थें व क्षेत्रें यांनाही धंद्याचें स्वरूप आलेलें आहे. अन्यत्र केलेलीं पापें या ठिकाणीं वज्रलेप होण्याची भीति असल्यामुळें अंतरींचे दुर्गुण घालविण्यास पश्चात्ताप, जप हींच योग्य साधनें आहेत. सत्यव्यवहार, सद्वासना, पवित्रता, उदारता इत्यादि सद्गुण उत्पन्न होणें हेंच पाप गेल्याचें खरें लक्षण आहे. केवळ बाह्य शुद्धीनें पातकांची निवृत्ति होत नसते.

—*—

# भाग पांचवा

# तत्त्वविचार

## प्रकरण बत्तिसावें

### नीतिधर्माची सापेक्षता

(५१९) **नीतिधर्मः**–तत्त्वविचार हा या ग्रंथाचा शेवटचा भाग आहे. गेल्या चार भागांत प्रमाणविचार, व्यवहारविचार, विवाहविचार आणि समष्टिविचार असा विषय झाला. परिस्थितिसापेक्ष आचार, रूढि, शिष्टाचार कसे बदलले पाहिजेत, याचें विवेचन केलें. आचारधर्माप्रमाणेंच नीतिधर्म हेंही धर्माचें एक अंग आहे. तेंही परिस्थितिसापेक्ष कसें असतें याचें विवेचन प्रस्तुत करावयाचें आहे.

**अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिंद्रियनिग्रहः ।**
**एतं सामासिकं धर्मं चातुर्वर्ण्येऽब्रवीन्मनुः ॥**–मनु अ. १० श्लो. ६३
**अहिंसा सत्यमस्तेयमकामक्रोधलोभता ।**
**भूतप्रियहितेहा च धर्मोऽयं सार्ववर्णिकः ॥** –भा. स्कं. ११।१७।२१
**अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिंद्रियनिग्रहः ।**
**दानं दया दमः शान्तिः सर्वेषां धर्मसाधनम् ॥**
–याज्ञवल्क्य १, १२२

**भावार्थः**–अहिंसा, सत्य, अस्तेय, शौच, इंद्रियनिग्रह, कामक्रोधादि विकारांच्या तावडींत न सांपडणें, अव्यभिचार, प्राणिमात्रांच्या कल्याणाची इच्छा करणें, दान, दया, दम, शान्ति हा मनुष्यमात्राचा सामान्यतः नीतिधर्म होय.

(५२०) **हिंसा अपरिहार्यः**–अहिंसा हा सामान्य नीतिधर्म असला, तथापि तो पूर्ण निरपवाद आहे, असें मात्र नव्हे. पुष्कळांची

समजूत अशी कीं अहिंसा ही निरपवाद आहे, तिचा समाजधारणेशीं कांहीं संबंध नाहीं, ती पूर्णतया पाळली पाहिजे. असल्या एकांतिक विचारानें अहिंसेचे आणि सत्याचे प्रयोग हिंदुस्थानांत सांप्रत चालू आहेत. महाभारतकार भगवान् व्यास यांचें मत "अहिंसेकरितां अहिंसा नाहीं, सत्याकरितां सत्य नाहीं, तर हें सर्व समाजधारणेकरितां आहे," असें आहे. जगांत जोंवर जगावयाचें आहे तोंवर हिंसा अपरिहार्य आहे. निसर्गाकडे पाहिलें तर निसर्गानें माणसाला चावण्याकरितां म्हणजे हिंसेकरितांच दांत दिले आहेत. दांत हें एक शस्त्रच आहे. मनुष्य हातानें कांकडी, ऊंस, नारळ हीं मोडतो, फोडतो व खातो म्हणून हातसुद्धां हिंसेचीं शस्त्रेंच होतात. मनुष्य घरांत पाटा, वरवंटा, चूल, उखळ, मुसळ असल्या वस्तूंचा अन्नसंस्काराकरितां उपयोग करतो. हीं सुद्धां हिंसा करण्याचीं शस्त्रेंच म्हणून वैश्वदेवाचें प्रायश्चित्त सांगितलें आहे. ऊंस चरकांत घालून गाळणें, खळ्यांत कणसें घालून तीं मळणें वा बडविणें हेही प्रकार हिंसेचेच होत. तात्पर्य, कोणत्याही स्थितींत हिंसा अपरिहार्य आहे; म्हणूनच भगवान व्यास म्हणतात,

न हि पश्यामि जीवन्तं लोके किंचिदहिंसया ।
सत्त्वैः सत्त्वा हि जीवन्ति दुर्बलैर्बलवत्तराः ॥

—महाभारत १२–१५–२०

अन्यत्र राजन् हिंसाया वृत्तिर्नेहास्ति कस्यचित् ।
अप्यरण्यसमुत्थस्य एकस्य चरतो मुनेः ॥

महाभारत शां. प. अ. १३० श्लो. २८

**भावार्थः**—या जगांत अहिंसेनें कोणीही जगूं शकणार नाहीं. बलवान् लोक व बलवान् प्राणी दुर्बल लोकांवर व प्राण्यांवर जगतात, असा हा निसर्गव्यवहार आहे. हिंसेविना अरण्यवासी एकट्या नंग्या बैराग्याची सुद्धां जीविका चालणें अशक्य आहे. देह जोंवर आहे तोंवर पूर्ण अहिंसा अशक्य आहे.

ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायांत अहिंसापदावर खूप भाष्य लिहून वाचकाचा जीव तें वाचतांना किती हैराण होतो तें लक्षांत न घेतां एक प्रकारें हिंसाच केली आहे. पण पुढें १६ व्या अध्यायांत ओवी

११४ मध्यें मात्र " शरीर वाचा मानसें । जगाचिया सुखोद्देशें । राहाटणें तें अहिंसे । स्वरुप जाण ॥ " अशी " सर्वदा सर्वथा भूतानामनभिद्रोहः " या योगभाष्याधारें सुटसुटीत व्याख्या केली आहे. गांधीजीही सामान्य तारतम्य सोडून अहिंसेचें पुराण गेलीं वीस वर्षें सारखें सांगत आहेत तीही अतिरेकामुळें एका दृष्टीनें जन–मनाची हिंसाच आहे.

**(५२१) जैनधर्म व अहिंसा:**–जैनधर्मांत संकल्पिनी, औद्योगिक, आरंभि व विरोधिनी असे हिंसेचे प्रकार सांगून अहिंसेमध्यें तारतम्य असल्याचें मान्य केलेलें आहे. अहिंसेमध्यें तारतम्य आलें, सापेक्षता आली म्हणजे मग वाद रहात नाहीं, अर्थात् अहिंसेकरितां अहिंसा नाहीं हें सिद्ध होतें.

मनुष्य फार तर दुसऱ्याला फार कमी उपद्रव देऊन जगूं शकेल व तेंच महाभारतांत तुलाधारानें जाजलीला सांगितलें आहे–

**अद्रोहेणैव भूतानां अल्पद्रोहेण वा पुनः ।**
**या वृत्तिः स परोधर्मस्तेन जीवामि जाजले ॥**

–महाभारत शां. प. अ. २६३ श्लो. १२

**(५२२) दुष्टदंडन ही अहिंसाच:**-त्रिगुणात्मक अशा या जगामध्यें खल असणें संभवनीय आहे. समाजांत समाजकंटकांचा जर प्रभाव पडेल तर समाजामध्यें स्वास्थ्य राहाणार नाहीं. अतएव अशा खलांचें निर्दलन करणें ही हिंसा नसून अहिंसाच आहे. पूजा करीत असतांना देव्हाऱ्यावर विंचू आला, त्यावेळीं त्याची पैजाऱ्याशीं गांठ घालणें ही हिंसा नसून अहिंसाच आहे.

देव्हाऱ्यावरी विंचू आला । देवपूजा नावडे त्याला ।
तेथें पैजारीचें काम । अधमाशीं तो अधम ॥ –तुकाराम

भूतमात्रीं सर्वत्र एकतत्त्व असलें, सर्वत्र एक नारायण असला तरी गुणांचा आदर नि अवगुणांचा तिरस्कार केलाच पाहिजे. कारण त्याशिवाय जगांत चांगलें व वाईट यांचा विवेक राहाणार नाहीं.

**परपीडक तो आम्हां दावेदार । विश्वीं विश्वंभर म्हणवुनी ॥**
**तुका म्हणे सर्वांभूतीं नारायण । अवगुणीं दंडण गुणी पूजा ॥**
**सर्प विंचू नारायण । परि ते वंदावे दुरून ॥**

सर्प, विंचू, व्याघ्र, सिंह अशा हिंस्र पशूंशीं अहिंसेनें वागणें, हें आत्मघातकीपणाचें आहे. याच वृत्तीचीं जीं माणसें असतात त्यांना आततायी म्हणतात. अशा आततायींना जगांत जगूं देणें, म्हणजे जगाची हिंसा करण्यास साह्य करण्यासारखें आहे.

(५२३) आततायी वध अवश्यः–

अग्निदो गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः ।

क्षेत्रदारहरश्चैव षडेते ह्याततायिनः ।–वसिष्ठ स्मृ. अ. ३।१९

आग लावणारा, विष देणारा, शस्त्र घेऊन अंगावर चाल करणारा, द्रव्य हरण करणारा, घरदार सर्व लुबाडणारा असे हे आततायी होत. ही संख्या एवढीच आहे असें नव्हे, हें केवळ उपलक्षण आहे. याच्या जोडीला देवांवर, स्त्रियांवर, मिरवणुकीवर आक्रमण करणारे, अन्यधर्मीयांची असहिष्णुतेनें कत्तल करणारे, स्वातंत्र्याचे अपहारक आणि संस्कृतीचे आक्रमक असे सर्व यांत बसवितां येण्याजोगे आहेत. त्यांत मग प्रत्यक्ष आपला आजोबा, बाप, मुलगा असा असला, फार काय विद्वान पंडित जरी असला तरी त्याची तमा न धरतां त्याला योग्य प्रायश्चित्त द्यावें नि विचारांत वेळ न घालवितां असला आततायी समोरून आला कीं त्याचा नाश करावा, असें महाभारतकारांचें आणि मन्वादि स्मृतिकारांचें निश्चित व ठाम मत आहे.

गुरुं वा बालवृद्धौ वा ब्राह्मणं वा बहुश्रुतम् ।

आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन् ।। –मनु स्मृ. ८–३५०

आततायिनमायान्तमपि वेदान्तपारगम् ।

जिघांसन्तं जिघांसीयान्न तेन ब्रह्महा भवेत् ।।–वसिष्ठ स्मृ.३-२०

हिंसकाशीं हिंसक वृत्तीनें वागणें हा अत्याचार नसून योग्याचार आहे. शठाशीं शाठ्यनीतीनें वागणें 'शठे शाठ्यं समाचरेत्' हा दुराचार नसून सदाचार, योग्याचार आहे. किंबहुना तो अनत्याचारही आहे. यासंबंधीं अधिक विस्तृत विवेचन 'हिंदुसंस्कृति प्रदीप' ग्रंथांतील 'हिंदुसंस्कृतीच्या संकोचाची मीमांसा' या प्रकरणांत वाचकांनीं पहावें.

(५२४) **अहिंसा व मांसाहारः**–अहिंसा पूर्णपणें पाळण्याचा व पाळण्यास लावण्याचा मार्ग म्हणजे स्वतः समर्थ व सबल होणें हा होय. मांसाहार करून जर समर्थ होतां येत असेल तर तो अवश्य करावा आणि प्रबलांशीं टक्कर द्यावी. जगांत बलाला महत्त्व आहे. शारीरबल, मनोबल, आत्मबल, शस्त्रबल, शास्त्रबल इत्यादि सर्व बलें आहेत. दुर्बल माणसांना डॉक्टर लोक लिव्हर–एक्स्ट्रॅक्ट, चिकन्स फुड, कॉडलिव्हर ऑईल, मटन इसेन्स, लेसिथिन ( अंड्यांतील पिवळें ) इत्यादि घेण्यास सांगतात आणि औषधें म्हणून लोक तीं घेतात ! त्याप्रमाणें पुष्टी, बल इत्यादिकरितां आणि **विशेषतः प्रबलाच्या हिंसावृत्तीचा प्रतिबंध करण्याकरितां मांसाहार करूनही म्हणजे थोडी हिंसा करूनही स्वतःची हिंसा वांचविली पाहिजे.** चराचर हें प्राणाचें अन्न आहे; त्या अन्नांत पशुपक्ष्यांचा समावेश होतो आणि हिंस्रपशूंच्या अन्नांत मनुष्याचाही समावेश होतो ! हें सगळें जग असें एकमेकाला खात असतांना स्वतः सबल होणें हाच खरा अहिंसातत्त्व पाळण्याचा मार्ग आहे.

(५२५) **अहिंसेचा अतिरेकः**–अहिंसेच्या एकांतिक कल्पनांमुळें हिंदुराष्ट्राची अपरिमित हानि झालेली आहे. आजच्या जंतुशास्त्राच्या दृष्टीनें सर्वत्र जीव भरलेले आहेत. महाभारतकारांनाही हें जंतुशास्त्र अवगत होतें.

सूक्ष्मयोनीनि भूतानि तर्कगम्यानि कानिचित् ।
पक्ष्मणोऽपि निपातेन येषां स्यात् स्कन्धपर्ययः ॥

–म. भा. शां. प. १५–२६

डोळ्यांनीं न दिसले तरी तर्कानें ज्यांचें अस्तित्व समजतें असे सूक्ष्म जंतु या जगांत इतके भरले आहेत कीं, आपण आपल्या डोळ्यांच्या पापण्या हालविल्या तर तेवढ्यानेंच या हजारों जीवांचे हातपाय मोडून पडतील. मग अहिंसा अहिंसा असें ओरडण्यांत काय हंशील ? अहिंसेच्या अतिरिक्त आणि खुळचट कल्पनांमुळें माळव्यांतील राजा शिलादित्य हा माशीचींही हिंसा न होईल अशी काळजी घेई ! पाण्यांतील जीवजंतु मरूं नयेत म्हणून घोडे व हत्ती यांना तो पाणी गाळून पाजण्यास सांगे. पावसाळ्यांत बारिकसारीक किड्यांची हिंसा न व्हावी म्हणून रजपूत राजांनीं तलावांचें पाणी उपसण्यास

बंदि केली! तेल्याचा घाणा, कुंभाराचीं गरगर फिरणारीं चाकें हत्त्येच्या भीतीनें बंद पाडलीं; दिवे बंद करून लोकांना अंधारांत राहावयास लावलें. अनिलवाडपट्टणच्या कुमारपाल राजानें तर एका ऊच्या हत्त्येवरून एका वाण्याची सबंध मालमत्ता जप्त करून त्या ऊचें देऊळ बांधलें. तें यूकाविहार या नांवानें आजही प्रसिद्ध आहे. अहिंसेच्या अतिरेकाची मरगळ बुद्धोत्तर कालांत हिंदु समाजाला आलेली होती, त्याचा लाभ पुढें मुसलमानांनीं घेतला.* तात्पर्य, अहिंसा हें नीतितत्त्व सापेक्ष आहे. तें निरपवाद नाहीं.

**(५२६) धनहिंसा:**—वेळीं अवेळीं अहिंसेचे गोडवे गाणारा, संपन्न नि सुखासीन असा एक व्यापारी वर्ग आहे. मुंग्यांना साखर घालून किंवा गायींना जिलब्या चारून ढेकूण, डांस, किडामुंगी यांची काळजी घेऊन आपल्या अहिंसेचें प्रतिपालन व प्रदर्शन हा वर्ग यथायोग्य करीत असतो. इकडे चक्रवाढीनें व्याजावर व्याज चढवून, काळ्या बाजारानें गरजूचें सर्वस्व गट्ट करण्यांत त्यांना कांहीं वाटत नाहीं! कारण प्राणहिंसेपेक्षां धनहिंसा अधिक पापकारक आहे, असें त्यांना कधींच वाटत नाहीं.

> जीवितं धर्मकामौ च धने यस्मात् प्रतिष्ठितौ ।
> तस्मात् सर्वप्रयत्नेन धनहिंसां विवर्जयेत् ॥१६॥
> प्राणिहिंसापरो यस्तु धनहिंसापरस्तथा ।
> महादुःखमवाप्नोति धनहिंसापरस्तयोः ॥१७॥

—विष्णु अ. ५२

**भावार्थ:**—जीवित, धर्म व काम हे पुरुषार्थ धनामध्यें सुप्रतिष्ठित आहेत. म्हणून धनहिंसा करण्याचा प्रसंग (एखाद्याला सर्वस्वीं लुबाडणें) टाळावा. प्राणघातकापेक्षां धनहिंसक हा अधिक अधम होय. प्राणघातामुळें एकच मनुष्य मरतो. पण धनहिंसेमुळें तें सबंध कुटुंबच धुळीस मिळतें! म्हणजे सबंध कुटुंबाचा घात करण्याचें पातक धनहिंसकाला लागतें. याप्रमाणेंच मानहिंसा, संस्कृतिहिंसा, स्त्रीपावित्र्यहिंसा करणाऱ्यासंबंधानेंही म्हणतां येईल. अहिंसा म्हणजे केवळ दुसऱ्याची हत्त्या न करणें, जीवजंतूंना

---

* याकरितां 'हिंदुसंस्कृतिप्रदीप' हा आमचा ग्रंथ अवश्य पहावा.

न मारणें असें नसून तिची व्याप्ति फार मोठी आहे. शरीरानें, वाणीनें, मनानें, कोणाचेंही अनिष्ट न चिंतितां जगाचे कल्याणाकरितां झटणें हें प्रापंचिकांना तर अशक्यच पण साधूंनाही तें निःसंशय कष्टसाध्य आहे.

(५२७) **सत्पुरुष व अहिंसाः**—सत्पुरुष हे निर्वैर असतात. पण निर्वैर म्हणजे निष्प्रतिकार वा निष्क्रिय असा अर्थ नाहीं. गीतेच्या अ. ११ श्लो. ५५ मध्यें 'मत् कर्मकृत्' या श्लोकांत आदर्श सत्पुरुषाचीं लक्षणें सांगितलेलीं आहेत. सत्पुरुष लोकसंग्रहार्थ परमेश्वरार्पण बुद्धीनें कर्मे करितात. ईश्वर सुष्टांचें पालन व दुष्टांचें दंडन करतो, तेंच कार्य सत्पुरुषही करितात ! सत्पुरुष तसें न करतील तर दुष्टांचें प्राबल्य माजेल, लोकसंग्रहास बाधा येईल व ज्याला जो अपात्र त्याला तें दिल्याचें पातक सत्पुरुषांना लागेल ! दुर्जनांच्या आक्रमणास साधुपुरुष जर बळी पडूं लागले तर जगांत प्रलय होईल. जो दुसऱ्याशीं दुष्टपणानें वागतो त्याला इतरांनीं आपल्याशीं चांगुलपणानें वागावें असें म्हणण्याचा अधिकार राहात नाहीं. तात्पर्य साधुपुरुषांनासुद्धां ईश्वराप्रमाणें कर्मफलसापेक्ष, यथायोग्य, जशास तसें, तंतोतंत वागावें लागतें. अशा या वागण्यांत सत्पुरुषानें जरी आततायी दुष्टाला ठार केलें, तथापि ती हिंसा नसून अहिंसाच असते व तिचा लेप सत्पुरुषाला लागत नाहीं.

**यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।**
**हत्वाऽपि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबद्ध्यते ॥१७॥**

—गीता अ. १८

(५२८) **सत्य म्हणजे काय ?**:—अहिंसेप्रमाणेंच सत्याचेही प्रयोग सांप्रत चालू आहेत. सत्य हेंही निरपवाद नाहीं. कारण सत्याकरितां सत्य नाहीं, तें समाजधारणेकरितांच आहे. '**नास्ति सत्यात् परो धर्मः ।**' हा अर्थवाद आहे. केवळ सत्य बोलून जगांतील सर्व व्यवहार चालतात असें नाहीं. दुर्जनाशीं नि शठाशीं वागतांना सत्याला मुरड घालावी लागते, 'नरो वा कुंजरो वा' असें बोलावें लागतें, किंवा कांहींच न बोलतां वेळ मारून न्यावी लागते. सत्य भाषण निरपेक्षतया करून भागणार नाहीं. श्रीशिवाजी महाराज अफजुलखानाशीं व आग्र्यास गेल्यावर औरंगजेबाशीं अगदीं सत्य

बोलते तर त्याचा परिणाम कसा झाला असता, हें काय सांगावयास पाहिजे? कर्णार्जुनयुद्धप्रसंगीं श्रीकृष्णांनीं कर्णाची खरडपट्टी काढून शत्रूची आपत्ति ही सुवर्णसंधि असें अर्जुनाला पटवून त्याला कर्णवधास प्रवृत्त केलें. ज्यांनीं विष चारलें, भरसभेंत स्त्रीची विटंबना केली, राज्याचा अपहार केला, असे जे जे संस्कृति–आक्रमक व स्वातंत्र्य–अपहारक असतील त्यांच्याशीं खरें बोलून कसा निभाव लागेल? म्हणून ज्यामुळें स्वसमाजाचें, स्वराष्ट्राचें हित साधेल तेंच सत्य नि तोच धर्म होय असें व्यासांनीं लिहिलेलें वचन प्रमाण मानावें लागतें.

सत्यस्य वचनं श्रेयः सत्यादपि हितं वदेत् ।
यद्भूतहितमत्यंतं एतत्सत्यं मतं मम ॥–म. भा. शां. प. ३२९–१३
यद्भूतहितमत्यंतं तत्सत्यमिति धारणा ॥–म. भा. व. प. २०८–४

(५२९) सत्याचे अपवादः–केवळ आपला सत्पक्ष आहे म्हणून सत्यावर भिस्त ठेवून भागत नाहीं. श्रीरामचंद्र, धर्मराजा, श्रीशिवाजी-महाराज यांचे सत्पक्षच होते. पण त्यांना जेथें जेथें दुर्जनांचे खांचखळगे आढळले तेथें तेथें त्यांतून वर येण्याकरितां तारतम्यानें व सापेक्षतेनेंच वागावें लागलें. व्यष्टिधर्मांतील सत्य निराळें व समष्टिधर्मांतील सत्य निराळें. स्वसमाज व परसमाज, स्वधर्मी व विधर्मी, स्वराष्ट्र व परराष्ट्र अशा भिन्न-भिन्न क्षेत्रांत सत्यपरिपालन एकाच मापानें करून चालणार नाहीं. याचा अर्थ उठल्या सुटल्या खोटें बोलावें, प्रामाणिकपणा मुळींच ठेवूं नये, असा नव्हे. सत्य व प्रामाणिकपणा या गुणांमुळें व्यक्तीची दानत वाढते, महत्त्व येतें, हें खरें आहे. पण त्यामुळें जर स्वसमाज व स्वराष्ट्र याची हानि होऊं लागेल, तर तो सद्गुणाचा अतिरेक झाल्यामुळें दुर्गुणच होतो. म्हणून व्यष्टिधर्म व समष्टिधर्म असे सर्व प्रसंग ध्यानांत घेऊन सत्याचे प्रयोग करावे लागतात. कांहीं प्रसंगीं व्यवहारांत असत्य बोलावेंच लागतें, ते प्रसंग असेः–

विवाहमैथुनमार्तसंयोगेष्वदोषमेकेऽनृतम् ॥२९॥
–गौतम अ. ६ प्र. २

उद्वाहकाले रतिसंप्रयोगे प्राणात्यये सर्वधनापहारे ।
विप्रस्य चार्थे ह्यनृतं वदेयुः पञ्चानृतान्याहुरपातकानि ॥३१॥
–वसिष्ठ अ. १६

न नर्मयुक्तं वचनं हिनस्ति न स्त्रीषु राजन्न विवाहकाले ।
प्राणात्यये सर्वधनापहारे पंचानृतान्याहुरपातकानि ॥
—म. भा. आ. प. ८२—१६

भावार्थः—विवाह, रति, आर्तावस्था, प्राण, जाण्याचा प्रसंग, सर्वस्व अपहाराची वेळ, विनोद आणि राष्ट्रहित अशा प्रसंगीं असत्य भाषण करणें दोषावह नाहीं.

हे अपवाद उपलक्षण म्हणूनच सांगितलेले आहेत. आजच्या कालांत हीं अपवादस्थळें आणखी वाढवितां येतील. त्या सर्वांची कसोटी एकच कीं ज्यामुळें हिंदुसमाजहित नि हिंदुराष्ट्रहित साधेल तें भाषण सत्य होय. अन्य भाषण जरी शाब्दिक व वाचिक सत्य असलें तरी तें असत्य होय.

(५३०) **राजकारण व सत्यः**—राजकारण व सत्य हा 'वदतो व्याघातः' आहे. वंध्यापुत्रवत् ही कल्पना आहे. राजकारण हें अत्यंत बुद्धिमान्, युक्तिमान् अशा लोकांचें शास्त्र आहे. अत्यंत धूर्त, अत्यंत आंतल्या गांठीचा व बुद्धिमान मनुष्य तोच राजकारणी व धोरणी समजला जातो. स्पष्ट भाषेंत सांगावयाचें म्हणजे राजकारण हें जगांतील अत्यंत बुद्धिमान धूर्तांचें शास्त्र आहे. जो जास्त धूर्त तो जगतो व जो सरळ मनुष्य तो राजकारणांत फजीत होतो. करावयाचें तें बोलावयाचें नाहीं, बोलावयाचें तें लिहावयाचें नाहीं असें हें सर्व राजकारणशास्त्र आर्यचाणक्याच्या अर्थशास्त्रांत, महाभारतांत, दासबोधांत नि जगांतील आजच्या व्यवहारांत दिसत असतांना राजकारणांत सत्याचे प्रयोग करणें, सत्याचे अवडंबर माजविणें हें शुद्ध ढोंग आहे.

(५३१) **अस्तेयः**—अहिंसा व सत्य याप्रमाणें अस्तेय म्हणजे चोरी न करणें, हें एक नीतितत्त्व आहे. चोरी करूं नये, दुसऱ्याचें द्रव्य हरण करूं नये, ईश्वराला भ्यावें, हें सर्व लहानपणापासून शिकविलें जातें व तें योग्य आहे. दुसऱ्याच्या खिशांत हात घालणें, दुसऱ्या देशावर स्वारी करून तो लुटणें असे हे सर्व प्रकार चोरीचेच होत. जगांत प्रबल चोराला महत्त्व असतें व दुर्बल चोराला शिक्षा होते, हें उघड आहे. प्राण जात असेल तर त्या प्रसंगीं चोरी करून अन्न खावें, कारण जगणें हा धर्म आहे. जगण्याकरितां मृदु व दारुण कर्म करावें. याचा अर्थ उठल्या सुटल्या

चोऱ्या कराव्यात, लोकांचे खिसे चाचपावे, दुसऱ्याला लुबाडावें, असा नव्हे. म्युनिसिपालट्या, लोकलबोर्डें, लिमिटेड कंपन्या, कारखाने इत्यादि सार्वजनिक संस्थांतील द्रव्याचा दुरुपयोग करणें, अनेक निमित्तांनीं अपहार करणें हें अत्यंत निंद्य आहे. सार्वजनिक कार्याकरितां फंड उभारून त्याचा अपहार करणें हेंही निषेधार्ह आहे. सार्वजनिक संस्था या लोकहिताकरितां असतात. म्हणून पाप-भीरुपणानें संस्थांतील पैशाचा सदुपयोग करावा. जपानसारख्या चिमुकल्या राष्ट्राची दानत असल्या प्रत्येक व्यवहारांत दिसून येते. आज जे लाटेशाहीचे व समाजाला लुबाडण्याचे निरनिराळे प्रकार साळसूदपणें चाललेले आहेत ते सर्वस्वीं निंद्य होत. 'न हर्तव्यं परधनं' हें नीतितत्त्व समाजस्वास्थ्याकरितां अत्यावश्य आहे, पण तेंही सापेक्ष आहे इतकेंच.

**(५३२) रिपुदमन करा:**—नीतितत्त्वांमध्यें इंद्रियनिग्रहाचा व कामक्रोधादि विकारांच्या शमनाचा अन्तर्भाव केलेला आहे. कामक्रोधादि रिपु यांचा त्याग सर्वस्वीं होणें शक्य नाहीं. म्हणून त्यांना आपल्या स्वाधीन ठेवावें, त्यांना जिंकावें असेंच समजलें पाहिजे. समूळ काम जर नष्ट झाला तर शंभर वर्षांत सृष्टीचा लय होईल. धर्मविरोधी अर्थकाम टाकावेत, पण धर्माला अविरुद्ध असा काम अवश्य हवा आहे. जगांत जे ज्ञाते, कर्ते आणि शोधक लोक झाले, ज्यांमुळें जगाला सुख लाभलें आहे, त्यांची उत्पत्ति जगांत काम नसता तर झाली असती काय ? सुप्रजेकरितां कामविकार हवा, दुष्टदंडनाकरितां क्रोधही हवा. कारण ज्याला चीड नाहीं व राग नाहीं त्याला जगांत कोणी विचारीत नाहीं.

**तस्मान्नित्यं क्षमा तात पंडितैरपवादिता ॥** —म.भा.व.प. २८–६–८

क्षमावानाला दुष्ट लोक दुर्बल समजतात व त्याची स्त्रीही पळवून नेण्याचा यत्न करितात. यास्तव माणसांत त्वेष, द्वेष, संताप, चीड हीं सर्व पाहिजेत. सुसंगतीचा, शीलाचा, स्वसंस्कृतीचा व स्वराज्याचा लोभ आणि हव्यासही पाहिजे. दुर्जनाशीं वागतांना मद आणि मत्सर यांचा उपयोग केलाच पाहिजे. थोडक्यांत म्हणजे हे षड्रिपु पुरुषार्थानें मित्र बनविले पाहिजेत. त्यांचा यथायोग्य सापेक्षतेनें उपयोग न केल्यास ते शत्रू होतात.*

*टीप—रिपुदमन का रिपुत्याग हें 'ब्रह्मज्ञान व बुवाशाही,' या आमच्या ग्रंथांतील प्रकरण पहा.

(५३३) **दयाधर्मः**–अहिंसा, सत्य, अस्तेयादि नीतितत्त्वांप्रमाणें दया, धैर्य, तेज, अद्रोहादि गुण दैवी संपत्तीचीं अंगें म्हणून सांगितलीं आहेत. त्यांचा उपयोगही व्यवहारांत तारतम्यानेंच केला पाहिजे. दया ही एक अंतःकरणाची कारुण्यवृत्ति आहे. एखादा प्राणी भुकेनें तडफडत असला, तृषेनें व्याकुल झाला असला तर त्याला पाहून अंतःकरण द्रवतें, अनुकंपा उत्पन्न होते, व कांहीं तरी करावेसें वाटतें. ही सहज प्रवृत्ति आहे; तथापि भुकेनें तडफडणाऱ्या सर्पाला दूध पाजलें तर तो गरलच ओकणार हें ध्यानीं घ्यावें लागतें. गरीबावर दया करा, प्राण्यावर भूतदया करा. पण दया हाच खरा धर्म आहे हें नीतितत्त्व सापवाद आहे. ख्रिस्तांतक नीत्शे म्हणतो, " दया करणें म्हणजे दुर्बलाला उत्तेजन देणें, व दुर्बल राहाणें म्हणजे हिंसकाला उत्तेजन देण्यासारखें आहे. जगांत जर कोणी दुर्बल नसेल तर हिंसक कोणाची हिंसा करणार ? यास्तव दयाधर्माची महती उगाच दुबळ्यांनीं वाढविलेली आहे."

(५३४) **दयेचे दोन प्रकारः**–दयेचे प्रकार सामर्थ्याप्रमाणें दोन होतात. एक दुर्बल दया व दुसरी सबल दया. दुसऱ्याचें दुःख पाहून हळहळणें, तळमळणें, ओरडणें हें दुर्बल दयेचें लक्षण होय, आणि यत्नपूर्वक (स्वतःचा जीव धोक्यांत घालूनही) दुसऱ्याचें दुःख कमी करणें ही सबल दया होय. त्याचीं लक्षणें अशीं—

**परस्मिन् बंधुवर्गे वा मित्रे द्वेष्ये रिपौ तथा ।**
**आत्मवत् वर्तितव्यं हि दयैषा परिकीर्तिता ॥**

—अत्रिसंहिता श्लो. ४१

**यत्नादपि परक्लेशं हर्तुं या हृदि जायते ।**
**इच्छा भूमिसुरश्रेष्ठा सा दया परिकीर्तिता ॥**

स्वतः प्रत्येकानें चांगलें वागावें, इतरांशीं निर्दयतेनें वागूं नये हें ठीक आहे. परंतु समाजांत दुष्ट नि कंटक असतात, परपीडकही असतात, त्यांचेवर दया करावी असें मुळींच नव्हे. शत्रू तावडींत सांपडला कीं अगदीं केविलवाणा होऊन क्षमा मागेल, व सुटका झाली कीं पुनः प्राण घेण्यास सिद्ध होईल; म्हणून त्याच्याशीं दयाबुद्धीनें वागणें हा अधर्म समजून

अमित्रो न विमोक्तव्यः कृपणं बह्वपि ब्रुवन् ।
कृपा न तस्मिन् कर्तव्या हन्यादेवापकारिणम् ॥

—महाभारत १।१००।२२

त्याला ठार करणें हेंच योग्य आहे व तीच खरी दयाही आहे.

**(५३५) अनाठायीं दया:**—महाभारतांत व मन्वादि स्मृतींत राजधर्माच्या विवेचनांत असें सांगितलेलें आहे कीं जे दंडार्ह त्यांस दयाबुद्धीनें दंड न केला व जे दंडास अयोग्य त्यांस दंड केला तर त्या राजाला पातक लागतें.

अदंड्यान् दंडयन् राजा दण्ड्यांश्चैवाप्यदंडयन् ।
अयशो महदाप्नोति नरकं चैव गच्छति ॥ —मनु. ८।१२८
यथाऽवध्ये वध्यमाने भवेद्दोषो जनार्दन ।
स वध्यस्यावधे दृष्ट इति धर्मविदो विदुः ॥ महाभारत ५।८२।१८

वरील विवेचनावरून दया हें जें धर्माचें मूलतत्त्व तें किती सूक्ष्म आहे, व त्यांतही कसें तारतम्य आहे याची कल्पना येईल. धैर्य, उपकार, अद्रोहादि सर्व नीतितत्त्वांविषयीं असेंच सांगतां येईल. सारांश नीतिधर्मही परिस्थितिसापेक्ष आहे, येवढें वाचकांनीं ध्यानांत ठेवावें.

—*—

## प्रकरण तेत्तिसावें

## नव्या हिंदुधर्माचें तत्त्वज्ञान

**(५३६) तत्त्वज्ञान म्हणजे काय ? :**—धर्माचीं अंगें आचार, नीति व तत्त्वज्ञान हीं होत. गेल्या प्रकरणांत नीतिधर्माचें विवेचन केलें व तोही परिस्थितिसापेक्ष व सापवाद कसा आहे हें दाखविलें. प्रस्तुत धर्माचें मुख्य अंग जें तत्त्वज्ञान त्याचा थोडा विचार करावयाचा आहे.

तत्त्वज्ञान, अध्यात्म, वेदांत, या क्षेत्रांत शिरलें म्हणजे जीव, जगत्, ईश्वर, कर्म, पुनर्जन्म असे विषय प्रामुख्यानें पुढें येतात. सर्व शास्त्रांचे निष्कर्षभूत जे सिद्धांत त्यांचा साकल्यानें विचार केल्यास शेवटीं त्या सर्वांची परिसमाप्ति वरील विषयांतच होते. मनुष्यप्राण्याच्या अनुभवाचा, प्रयत्नाचा व शोधाचा शेवटचा निर्णय अध्यात्मांत म्हणजे वेदांतांत होतो. वेदांचा म्हणजे ज्ञानाचा अंत म्हणजे शेवट ज्यांत होतो तें वेदांत—तत्त्वज्ञान होय. जड वा चेतन वस्तूचें मूल स्वरूप म्हणजे तत्त्व होय व त्याचें ज्ञान म्हणजे तत्त्वज्ञान होय.

(५३७) **वैदिक तत्त्वज्ञानच ग्राह्यः**—नवा हिंदुधर्म वेदांतशास्त्रांतील सर्व मुख्य सिद्धांत मान्य करतो. वैदिक तत्त्वज्ञान व वेदांतशास्त्र हें हिंदुसंस्कृतीचें भूषण व अभिमानस्थान आहे. फक्त त्यावर बुद्धोत्तरकालांत जे दुःखवादाचे व निवृत्तिपर संन्यासाचे संस्कार झालेले आहेत, ते नव्या हिंदुधर्माला सर्वस्वीं अग्राह्य आहेत. सूक्ष्मदृष्टीनें हिंदुसंस्कृतीचा व आर्यसंस्कृतीचा अभ्यास केल्यास तिजमध्यें बुद्धपूर्वकालीन व बुद्धोत्तरकालीन असे विचारप्रवाह दृष्टीस पडतात. बुद्धोत्तरकालीन तत्त्वज्ञान सहिष्णु, मुमूर्षु, दुःखवादात्मक, शून्यात्मक आहे, तर बुद्धपूर्वकालीन तत्त्वज्ञान हें जयिष्णु, आक्रमणशील, विजिगीषु, आनंदमय व भावात्मक आहे. जीव, जगत्, ईश्वर इत्यादि विषयांसंबंधाचे सिद्धांत बुद्धीला चालना देणारे आहेत. शोधकाच्या तर्काचें तें मोठें क्षेत्र आहे. हे सिद्धांत मानल्यानें मनुष्याला हतबुद्धता येत नाहीं. मानवी जीवनाला आनंद व उत्साह देणारे असे हे सिद्धांत आहेत. यासंबंधीं मूळ सूत्रग्रंथ, भाष्यग्रंथ, टीकाग्रंथ, प्रकरणग्रंथ इतके आहेत कीं त्यांचा नामनिर्देशही येथें करणें अशक्य आहे. तथापि प्रत्येक विषयाची थोडी रूपरेषा देतों.

(५३८) **जगत्कारण सचेतनः**—जगत् हें जड, निसर्गधर्मानें चालणारें सें आहे, कां त्याला चेतनाची प्रेरणा आहे ? या प्रश्नाचें उत्तर जगाचें ारण चेतन, सर्वव्यापी, नित्य, शुद्ध, बुद्ध, कूटस्थ, सत्, चित् व दयुक्त आहे. विश्वाचें मूलतत्त्व हें वाणी नि मन यांच्या पलीकडचें, स्वरूपानें न कळणारें आहे. चराचर वस्तुजाताची उत्पत्ति, स्थिति

व लय हीं यांतच होतात. हें तत्त्व स्वयंभू आहे, सत्तामात्र आहे, तें सर्वशक्तिमान् आहे, त्यालाच परब्रह्म असें म्हटलेलें आहे, असें उत्तर वेदान्तशास्त्र देतें.

जगाचें मूल कारण हें वरीलप्रमाणें असल्यामुळें जगत् हें आपल्या कारणांतील गुण घेऊनच विकसित झालेलें आहे. ब्रह्माच्या एका अंशांत गति उत्पन्न होते. ती झाली कीं भ्रम उपत्न्न होतो. अलात चक्र हें त्याचें प्रसिद्ध उदाहरण आहे. जगत् म्हणजे गतिमत् ब्रह्म व ब्रह्म म्हणजे स्थितिमत् जगत् असें समजावें. माया म्हणजे गति. गतीमुळें भ्रम होतो. पार्थिव गति व मानसिक भ्रम यालाच विवर्त म्हणतात. जग हा एक विवर्त आहे, तें परिवर्तनशील आहे म्हणजे त्याचें स्वरूप सदैव एकच असतें असें नाहीं, तर तें नेहमीं पालटत असतें. जगत् हें खोटें अभावरूप वंध्यापुत्र अथवा ख-पुष्पाप्रमाणें नाहीं तर तें गतिमत्त्वमुळें भ्रम उत्पन्न करणारें असें आहे. नकुल हा अश्वविद्येत फार निपुण होता. त्यानें घोड्याला मंडलावर धरलें म्हणजे जणुं घोड्यांचेंच मंडळ उभें आहे असें वाटे. घोडा वेगानें पळूं लागला तर घोड्यांची रांगच पळत आहे असें भासे व घोडा डाव्या व उजव्या अशा दोन्ही बाजूस पळूं लागला म्हणजे त्याला दोन तोंडें आहेत कीं काय असा भ्रम होई. याबद्दल पुढील सुभाषित प्रसिद्ध आहे.

**मंडले मंडलाकारो रेखा वाजिमयी जवे ।**
**सव्यापसव्ये द्विमुखो नकुलाधिष्ठितो हयः ॥**

तात्पर्यः—ब्रह्म जसें सत्य आहे, तसेंच जगत्‌ही व्यावहारिक सत्तेमध्यें सत्य आहे. किंबहुना चैतन्याचा विकास म्हणजेच हें जग होय.

**(५३९) जगत् हें आनंदमय** * :—जगत् हें दुःखमय नसून आनंदमय आहे. जगांत आनंद नसता तर कोणीही जिवंत राहाण्याची इच्छा न करता !

**को ह्येवान्यात्कः प्राण्यात्, यदेष आकाश आनन्दो न स्यात् ॥**

तै.—आनंदवल्ली

* यासंबंधाचें अधिक विवेचन वाचकांनीं पं. लक्ष्मणशास्त्री जोशीकृत ‘ आनंदमीमांसा ’ या पुस्तकांत पहावें.

विश्वाचें कारण आनंदमय आहे. आनंदांतच विश्वाची स्थिति असते आणि आनंदांतच विश्वाचा लय होत असतो.

**आनंदाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते । आनन्देन जातानि जीवन्ति । आनन्दं प्रयन्त्यभिसंविशन्तीति । –तै. उ. २**

जगांत जर दुःख असेल तर तो दोष माणसांचा आहे, शासन-संस्थेचा आहे. जगांतील दुःख नष्ट करणें हें मनुष्यांच्या आणि शासन-संस्थेच्या हातांत आहे. अन्न हें जीवन आहे. पण तेंच अन्न कुजल्यावर विष होऊं शकतें. तो दोष अन्नाचा नाहीं. जगांत तप, त्याग व भोग अशी परंपरा आहे. या जगांत सुख नाहीं, आनंद नाहीं, तें सर्व मरणोत्तर मिळावयाचें आहे, ही कल्पना भ्रामक आहे. या जगांत ज्याला तपत्यागयुक्त आनंद भोगतां येतो, त्यालाच मृत्यूनंतर आनंद मिळतो. इहलोकांत जो कल्याण करून घेतो, त्यांचेंच परलोकांतही कल्याण होतें. जगत् दुःखमय आहे, तें असार आहे ही विचारसरणी बुद्धोत्तरकालांत आली. दुःखवाद, शून्यवाद, संन्यासवाद हे वैदिक आर्यांचे नाहींत. हे सर्व वाद बौद्धधर्माचा सूर्य पूर्ण माध्यान्हावर आल्यावर उत्पन्न झाले. संन्यासी, श्रमण, भिक्षु, बुवा, बैरागी यांनीं आपल्या प्रवृत्त्यनुसार हा दुःखवाद पुढें आणला. दरिद्री, रोगी, पुरुषार्थहीन असल्यांनीं चतुर्थाश्रमाचा स्वीकार करून प्रपंचाच्या दुःखाचें चित्र भडक रंगविलें.

सृष्टी, पंचमहाभूतें, शरीर यासंबंधाचे वैदिक उज्ज्वल विचार घालवून वायु, नद्या, औषधी यांत सर्व दुःख आहे, शरीर हा विटाळाचा गोळा आहे, जीवनांत स्वारस्य नाहीं, असले विचार रूढ केले. वैदिक ऋषींच्या हृदयांत आशावाद, जयिष्णु वृत्ति, दुर्जन–प्रतिकार, तप यांचें वास्तव्य दिसतें. सत्कर्म, सामर्थ्य, सत्य, ज्ञान व तप यांना ते हापापलेले दिसतात; म्हणूनच त्यांनीं शेंकडों वर्षें जगावें, पहावें, खावें, ऐकावें, राज्यें करावीं अशा प्रार्थना केलेल्या आहेत. वैदिक ऋषींना संस्कृतीची स्थापना व समाजाची व्यवस्था करून समाजाला पुरुषार्थाकडे प्रवृत्त करावयाचें होतें; तर बुद्धोत्तरकालांतील बैरागी, गोसावी, संन्यासी यांना स्वतःचें स्तोम माजवून दुःखवादाचा काथ्याकूट करावयाचा होता. जगत् सुखमय आहे

हाच समाजव्यवस्थेचा आणि राष्ट्रधारणेचा पाया आहे; म्हणून नवा हिंदुधर्म जगत् आनंदमय आहे, हा वैदिक आर्यांचा सिद्धांत स्वीकारतो.

(५४०) **जगत् हा चैतन्याचा विकासः**–नवा हिंदुधर्म परलोकाकडे पाहून धर्मानुशासन करीत नाहीं. राजसंस्था, समाजसंस्था, गृहसंस्था या सर्व सुखाकरितां आहेत. मनुष्याची प्रवृत्ति व धडपड सुखाकरितां आहे. जगांत दुःखच जर असतें तर गृहस्थाश्रम, प्रपंच, राज्यें यांची उरसफोड कोणीही केली नसती. वैदिक आर्य आनंदवादी होते. धृत्युत्साहसमन्वित होते आणि जगत् हा चैतन्याचा विकास आहे, अशीच त्यांची समजूत होती.

सूर्य व प्रकाश, ज्वाला व अग्नि, पाणी व द्रवत्व, साखर आणि गोडी यांमध्यें जसा अभेद आहे, तसाच चैतन्य व जग यामध्यें अभेद आहे. चैतन्याच्या एका अंशानें हें सर्व जगत् व्यापून टाकलेलें आहे. जलाहून द्रवत्व वेगळें नाहीं, दिव्याहून प्रकाश वेगळा करतां येत नाहीं, तसें जगत्‌ही चैतन्याहून वेगळें नाहीं. हें सर्व विश्व वृक्ष, पर्वत, आराम, उपवन इत्यादिकांनीं जें नटलेलें आहे, तो सर्व चैतन्याचा विकासच होय.

विश्वं यावद्विभाति द्रुमनगनगरारामचैत्याभिरामं ।
तावत् चैतन्यमेकं प्रविकसति यतस्तत्तदात्मावशेषम् ॥
–शतश्लोकी–शंकराचार्य

श्रीज्ञानेश्वर ज्ञानेश्वरींत विविध ठिकाणीं म्हणतात—

ऐसेनि हें विश्व येथें । मीचि विस्तारिलोसें निरुतें ॥
आतां पै माझेनि एके अंशें । हें जग व्यापिलें असे ।
या लागीं भेद सांडोनि सरिसें । साम्यें भज ॥
माझिया विस्तारलेपणाचेनि नांवें । हें जगचि नोहे आघवें ।
या लागीं मजपासूनि भूतें । आने नव्हती हें निरुतें ।
आणि भूतावेगळिया मातें । कांहींच न मनीं हो ॥

(५४१) **गीताप्रोक्त कर्मयोगः**–जगत् हें आनंदमय, जणुं चैतन्याचा विकासच असें आहे, म्हणून नवा हिंदुधर्म गीतोपदिष्ट कर्मयोगाचा आदरानें स्वीकार करून त्याचा आग्रहानें पुरस्कार करतो. गीतेंतील तत्त्वज्ञान विजिगीषु, आक्रमणशील व जयिष्णु आहे. भारतीय आर्यांतील

विवस्वान्, मनु, इक्ष्वाकु, जनक इत्यादि राजर्षींचें आणि प्रजापतींचें तत्त्वज्ञान कोणतें होतें, हें भगवान् श्रीकृष्णांनीं भगवद्गीतेंत सांगितलेलें आहे. गीता हें नीतिशास्त्र आहे, समाजाच्या बाह्य व अध्यात्मिक सुखाकरितां कसें वागलें पाहिजे हें सांगणारें तें शास्त्र आहे. व्यक्ति नि कुटुंब, जाति व राष्ट्र यांवर साक्षात् किंवा परंपरेनें आपल्या कर्मांचा दुष्परिणाम होऊं नये या दृष्टीनें गीतेंतील विवेचन मार्गदर्शक आहे. म्हणूनच गीता हा अखिल हिंदूंचा तत्त्वज्ञानाचा ग्रंथ आहे. अर्थात् गीतोपदिष्ट प्रवर्तक तत्त्वज्ञान हें आजच्या कालांतच नव्हे तर कोणत्याही कालांत अनुकरणीय आहे. तत्त्वज्ञान हें नौकेच्या होकायंत्रासारखें आहे. तत्त्वज्ञानावरून इतिहासाची घडण कशी घडेल हें सांगतां येतें व इतिहासांतील पानें चाळून त्यावरून त्यांतील तत्त्वज्ञान प्रवर्तक आहे का निवर्तक आहे याची कल्पना करतां येते. अंगणावरून घराची परीक्षा, खोलींतील वस्तूवरून माणसाच्या संस्कृतीची परीक्षा जशी होते, तशीच तत्त्वज्ञानावरून समाजाच्या व राष्ट्राच्या आकांक्षा काय आहेत याची कल्पना येते. नव्या हिंदुधर्माला हिंदुराष्ट्र समर्थ, स्वतंत्र, स्वावलंबी, सुखी, पुरुषार्थी, भौतिकशास्त्रसंपन्न, शीलसंपन्न, शिस्त व संघटनासंपन्न आणि देशाभिमानयुक्त असें करावयाचें असल्यामुळें तो गीतोक्त कर्मयोगाचें तत्त्वज्ञानच मानतो. *

(५४२) **निवृत्तिपर तत्त्वज्ञानः**—हिंदुसमाजामध्यें आज बुवांचें, बैराग्यांचें, संन्याशांचें निवृत्तिप्रधान तत्त्वज्ञान रूढ झालेलें आहे. कर्त्या पुरुषांचें, राजर्षींचें, कर्मयोग्यांचें बुद्धपूर्वकालांतील तत्त्वज्ञान लुप्त झालेलें आहे. सर्व कांहीं प्रभुसत्तेनें चालतें ! मानवी प्रयत्न दुर्बल आहे ! कशाला करा द्रव्यसंग्रह ! कशाला करा बायकापोरांची काळजी ! कोणाची बायको आणि कोणाचीं मुलें ! हवा कशाला तो देव आणि हवें कशाला तें स्वराज्य ! सर्व परब्रह्म आहे, मग आपपरभाव कशाला ? अहिंदूशीं स्पर्धा कशाला ? 'वंदेमातरम्' कशाला ? इंग्रजाशीं तरी हक्काकरितां चळवळ कशाला ? '**स्वस्थ बसावें हरि ठेविल तैसें राहावें ।**' माणसाची

* गीतोक्तकर्मयोगाचें सुलभ नि व्यवहारस्पर्शी विवेचन "गीताप्रदीप" या आमच्या पुस्तकांत पहा.

घडपड उगीच आहे. अरे, '**औट हात तुझा जागा । येर शिणसी वाऊगा ॥ एक शेर अन्ना चाड । येर वाऊगी बडबड ॥**' हें सर्व क्षणभंगुर आहे, दुःखमय आहे, असार आहे, मिथ्या आहे; असें मिसरूड न फुटलेल्या पोरापासून तों अगदीं म्हाताऱ्या आजीबाई-पर्यंतच्या सर्वांना ( शिक्षितांना, अशिक्षितांना, पुढारलेल्यांना, मागासले-ल्यांना ) शिकविलें जातें. जगांत ब्रह्मज्ञान हें श्रेष्ठ असलें तरी इतर ज्ञानांची आवश्यकता जीवनाकरितां आहेच. कारण ज्ञान म्हणजे शक्ति आहे. ज्ञानानेंच जगावर राज्यें होतात. ज्ञान हें मानवी जीवनाचें प्रमुख अंग आहे. हिंदु-समाजांत इतर ज्ञानजिज्ञासा औत्कट्यानें दिसत नाहीं याचें कारण वरील विचार-सरणीनें आणलेली मरगळ हें होय! जगण्याकरितां, अभ्युदयाकरितां, प्रपंचाकरितां नाना विद्या, नाना कला, नाना शास्त्रें, नाना शोध यांची आवश्यकता आहे. मोक्ष व ईश्वरप्राप्ति हें ध्येय एखाद्याचें असूं शकेल, परंतु इतरांना या सर्व विद्यांची, कलांची व शास्त्रांची आवश्यकता आहेच आहे.

(५४३) **तत्त्वज्ञानाचा अधिकारीः**—ब्रह्मज्ञान, आत्मज्ञान, तत्त्वज्ञान श्रेष्ठ असलें तरी, इतर ज्ञानांची 'तें ज्ञान नव्हे, तें मिथ्याज्ञान आहे, तें भ्रमात्मक आहे' असें म्हणून हेटाळणी करणें चुकीचें आहे. ज्या जगांत जगावयाचें त्याला मिथ्या ही शिवी देऊन मोकळें व्हावयाचें; आणि जो विषय एखाद्या बुद्धिमंताला वा साधनचतुष्टयसंपन्नालाच आकलन होण्यास योग्य त्याचें नुसतें नांव घेऊन दुरून नमस्कार करीत बसावयाचें हा शुद्ध मिथ्याचार आहे.

दूध हें अमृत आहे. व्यायाम करून जो तें पचवील त्याला तें तुष्टि, पुष्टि व हृष्टिकर होईल. पण दूध पचविण्याचें ज्याला सामर्थ्य नाहीं, त्याला तें पाजल्यानें उपाय न होतां अपायच होतो. ज्यांना सामान्य ज्ञान वा विशेषज्ञान याचा गंधही नाहीं, अशांच्यापुढें ब्रह्मज्ञानाचे विचार मांडणें हें त्या शास्त्राचें तर विडंबन आहेच, पण त्या श्रोत्यांच्या आयुष्याचेंही अहित करणारें आहे!

ज्यानें तीन ऋणें फेडलीं, ज्यानें तीन आश्रमांतील कर्तव्यें व्यवस्थित पार पाडलीं, ज्यानें स्त्री, द्रव्य व लौकिक ह्या एषणा मनांतून नाहींशा

केल्या, तोच या तत्त्वज्ञानाचा अधिकारी आहे. परंतु बुद्धोत्तर कालांत सर्वच भिक्षु होण्यास पात्र ठरले, बैरागी बनले आणि त्यांचाच सुकाळ आज हिंदुसमाजांत झाला असून त्यांच्या दुर्बल विचारांची पकड हिंदुसमाजाच्या मनानें घेतली आहे.

(५४४) **विश्वबंधुत्वाची मरगळः**–हिंदुसमाजामध्यें विश्वबंधुत्वाच्या कल्पनेला अतिरिक्त महत्त्व आलेलें आहे. अनधिकारी, दुबळ्या आणि आळशी लोकांनीं आणलेलें हें महत्त्व झडझडून नाहींसें करणें अत्यंत आवश्यक आहे. हिंदुसमाजांतील विश्वबंधुत्व म्हणजे केवळ दंभ होय! आलस्य, दौर्बल्य, निष्क्रियता, नैराश्य लपविण्याचें उत्तम साधन म्हणजे विश्वबंधुत्त्वाचें दांभिक प्रदर्शन होय. दंभ म्हणजे दुराचारी लोकांनीं सदाचाराला दिलेली शरणागती, ( Hypocrisy is homage done by vice to virtue ) या इंग्रजी म्हणीचें प्रत्यंतर हिंदुसमाजांत पदोपदीं दिसतें. हिंदुसमाजाला हिंदु राष्ट्र म्हणून हिंदुस्थानांत हिंदुत्वनिष्ठेनें जगावयाचें आहे, हेंही विसरतां कामा नये. ना स्तुति ना निंदा, ना हर्ष ना विषाद, ना शत्रु ना मित्र, ना सुख ना दुःख, ना शीत ना उष्ण, ना शुभ ना अशुभ अशा वृत्तीनें जगतां येणार नाहीं. ज्याला आपपर नाहीं, अरिमित्र नाहींत, स्वजनपरजन नाहींत म्हणजे जवळजवळ कांहींच नाहीं; सगळे सारखे, सगळे बंधु, मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वत्र समत्वानें पहाणें अशी एक निर्द्वंद्व अवस्था परिपूर्णतेची निदर्शक आहे, यांत शंका नाहीं. परंतु ती परा कोटींतील एखाद्या अधिकाऱ्याकरितां आहे, 'येरा गव्हारांचा' तेथें प्रवेशही नाहीं. अनधिकारी माणसें तें ध्येय डोळ्यांपुढें ठेवून तीं लक्षणें हीं साधनें समजून व्यवहारांत वागतात आणि फजीत होतात. राजाचीं छत्रचामरादि भूषणें भाड्यानें आणून तीं धारण केल्यानें कोणी राजा होत नाहीं. तर सामर्थ्यानें राज्य मिळविलें म्हणजे राजाचें सर्व ऐश्वर्य आपोआप येतें. तीच गोष्ट स्थितप्रज्ञ, गुणातीत वगैरेची आहे. आत्मसाक्षात्कारानें ती अवस्था लाभली म्हणजे वरील लक्षणें आपोआप येतात. प्रापंचिकांनीं म्ह. त्रिविध पुरुषार्थांकरितां झगडणाऱ्यांनीं विश्वबंधुत्वाचें ध्येय मुळींच डोळ्यापुढें ठेवूं नये. त्यामुळें ना प्रपंच ना परमार्थ, ना इह ना पर

अशी फजीती होते. बुवा, बैरागी, यति, संन्यासी, भिक्षु इत्यादींचें हें तत्त्वज्ञान आहे. प्रापंचिकांना तें उपयोगी नाहीं. निवृत्तिपर तत्त्व-ज्ञानाच्या अतिरेकानें आणि विश्वबंधुत्वाच्या कल्पनेनें आलेली मरगळ नष्ट करण्याचा मार्ग म्हणजे प्रवृत्तिपर तत्त्वज्ञानाचा आणि समष्टिधर्मयुक्त समाज-बंधुत्वाचा स्वीकार करणें हा होय !

हिंदुसमाजाला आज निवृत्तिपर वेदांताचा उपदेश नको आहे. जिज्ञासा मारणारा हा वेदांत समाजांतून नष्टच केला पाहिजे. 'नको शास्त्र अभ्यास व्युत्पत्ति मोठी' शास्त्र नको, विद्या नको, वैभव नको, कर्तृत्व नको, आचार नको हें सर्व 'नको नकोचें तत्त्वज्ञान,' आतां बस्स झालें. आजारांतून बरा झालेला तरुण जसा वखवखलेला असतो आणि हें खाऊं तें खाऊं असें करीत असतो, तशी सर्व ज्ञानाबद्दल, कलांबद्दल, पुरुषार्थां-बद्दल वखवख उत्पन्न व्हावयास हवी आहे. मला सत्ता पाहिजे, प्रजा पाहिजे, घरदार, धनदौलत, शस्त्रें, शास्त्रें, विद्या, कला वगैरे सर्व पाहिजेत. सुखसोयी पाहिजेत. मोटारी, विमानें, तारायंत्रें, आगगाड्या हीं सर्व पाहिजेत. स्वतःकरितां, समाजाकरितां, राष्ट्राकरितां या सर्वांची आवश्यकता आहे. हीं सर्व हस्तगत करून मी पुरुषार्थी होणार, मी पराक्रमी ( म्हणजे परावर आक्रम करणारा ) होणार, मी जगावर आक्रमण करणार असा आवेश प्रत्येक हिंदु तरुणांत येऊं लागला तरच हिंदुराष्ट्राचा अभ्युदय होईल.

**(५४५) कर्त्या गृहस्थांनीं पुढें यावें:**—आज समाजांत कोणी मुलगी देत नाहीं म्हणून ब्रह्मचारी, पैसा मिळवितां येत नाहीं म्हणून वैराग्यशील आणि कांहींच करतां येत नाहीं म्हणून वेदांती असलीं माणसें जिकडे तिकडे पसरलेलीं दिसतात. यांचें महात्म्य व बंड कमी होण्यास कर्तृत्ववान् तरुण गृहस्थच पुढें आले पाहिजेत. जगाची निंदा, जगतांतील ज्ञानांची व कलांची निंदा, कर्तृत्वाची निंदा, प्रपंचाची निंदा जी बुद्धोत्तर कालापासून सारखी चालली आहे ती तात्काल बंद करणें, हें तरुणांचे हातीं आहे. धैर्य, निर्भयता, तप, त्याग आणि दैवी संपत्तीनें युक्त असा आत्म्याच्या अमर-त्वाचा, जयिष्णु वृत्तीचा, कर्तृत्वाचा वेदांत समाजांत रूढ करणें अवश्य आहे. पूर्वींचें अध्यात्मतत्त्वज्ञान किंवा हा वेदांत तरवारीच्या धारेसारखा

तीक्ष्ण, अग्नीसारखा प्रखर, सूर्यासारखा तेजस्वी, चिंतामणीसारखा चिंतित फल देणारा व कामधेनूसारखा ' इष्टकामधुक् ' असा आहे; पण त्या चिंतामणीची गारगोटी हिंदुसमाजांतील निवृत्तिपर उपदेशकांनीं आणि या बुवांनीं केलेली आहे. बुवाशाहीपासून ब्रह्मज्ञानाच्या मिषानें कोणकोणते अनर्थ होत आहेत हें सांगण्याचें हें स्थळ नव्हे. *

(५४६) **मरणमारणाचा वेदांतः**—आज ' देव मस्तकीं धरावा। अवघा कल्लोळ करावा। ' असें म्हणून उच्चध्येयाकरितां मरणमारणाची दीक्षा घेणारे जळजळीत, त्यागी व कर्तव्यतत्पर असे वेदांती हवे आहेत. असले वेदांती जेव्हां मधून मधून उत्पन्न होतात तेव्हांच राष्ट्राचा अभ्युदय होत असतो. तेजस्वी, उत्साही व पौरुषयुक्त तत्त्वज्ञानाच्या आश्रयानेंच श्रीशिवछत्रपतींनीं व त्यांच्या प्रभावळींतील वीर तानाजीप्रभृतींनीं आपले प्राण पणाला लावले व ध्येय गांठलें. शेंकडों कर्ते पुरुष वेदकालापासून हिंदुस्थानांत झाले. त्यांनीं जो कर्ममार्ग आयुष्यांत आचरला, जी आध्यात्मिक वृत्ति अन्तःकरणांत तेवत ठेवली, जो विवेक, जें वैराग्य बाणवून कर्तृत्व प्रगट केलें, त्याच मार्गानें आज हिंदुसमाजानें जावयास हवें आहे. ' **धर्माकरितां मरावें । मरोनि अवघ्यांसि मारावें । मारतां मारतां घ्यावें । राज्य आपुलें ॥** ' या श्रीसमर्थोक्तीमध्येंच खऱ्या वेदांताचें सार आहे. यत्न करीत, हालअपेष्टा सोशीत, न डरतां, ' बचेंगे तो और लढेंगे ' हे जे उद्गार वीर दत्ताजीराव शिंदे यांनीं पानिपतच्या रणांगणावर काढले, त्याचेंच बाळकडु तरुण पिढीला आतां हवें आहे. मनुष्यप्राणी हा ईश्वराचा अंश आहे, **नव्हे तो ईश्वर आहे,** ब्रह्म आहे, इतका आत्मविश्वास हिंदुधर्माचें तत्त्वज्ञान उत्पन्न करतें. आत्म्याचें अमरत्व व देहाचें नश्वरत्व ध्यानीं घेऊन चुकारू, दुबळी, मेंगी, निष्क्रिय मनोवृत्ति टाकून देऊन शेंकडों वर्षे जगावें, आक्रमावें, सत्कर्में करावीं, समाजोपयुक्त कार्यें करावीं, स्वराष्ट्राचा उद्धार करावा, सतत कर्म करावें, तें धैर्यानें करावें, तें अचुक करावें, तें आसक्ति न ठेवतां करावें, असें जें श्रीकृष्ण, जनक, याज्ञवल्क्य यांच्या परंपरेंतील तत्त्वज्ञान आहे, त्याचा सत्वर ?कार हिंदुसमाजानें करावा; असें नवा हिंदुधर्म आग्रहानें सांगतो.

---

*वाचकांनीं आमचा 'ब्रह्मज्ञान व बुवाशाही' हा ग्रंथ अवश्य वाचावा.

(५४७) **जीवस्वरूपः**—जगताचें कारण व जगताचें स्वरूप यांचा येथवर विचार केला. आतां जीव, कर्म व पुनर्जन्म यांची थोडी कल्पना देणें क्रमप्राप्त आहे. देहाव्यतिरिक्त आत्मा नाहीं, असें अनेक जसें म्हणतात तसेंच देहाव्यतिरिक्त आत्मा आहे, देहनाशाबरोबर त्याचा नाश होत नाहीं, तो कर्मफलभोक्ता आहे, असेंही अनेक तत्त्वज्ञांचें मत आहे. प्रत्येकाला मी आहें, मी असणार, सदैव राहाणार, असा बोध होतच असतो. आत्म्याच्या उपलब्धीला देहाची आवश्यकताच आहे असें नाहीं. जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन्ही अवस्थांचा साक्षी एकच असल्यामुळें देहनाशाबरोबर आत्म्याचा नाश होऊं शकत नाहीं. केवळ आत्मा कर्ता नाहीं, बुद्धिसंयोगामुळें तो कर्ता होतो. आत्मा व बुद्धि मिळून कर्तृत्व संभवतें. सुषुप्तींत आत्मा परब्रह्मामध्यें एकरस होतो. पण पुन्हां जागृतींत पूर्वसंस्कार घेऊन तो अभिव्यक्त होतो. जीवाला जायापुत्रादि विषय स्वतःकरितां प्रिय असतात. अन्नमयादि पंचकोशांच्यापलीकडे जीव आहे. ब्रह्मज्ञान होई-पर्यंत जीव संसारांत असतो. जीव हा कर्ता आहे. "कर्ता शास्त्रार्थवत्वात्" (ब्रह्मसूत्र). सत्यं वद, धर्मं चर इत्यादि विधि जीव कर्ता मानूनच प्रवृत्त होतात. तो भोक्ता आहे आणि विज्ञाताही आहे. जीवाला इच्छा-स्वातंत्र्य व प्रवृत्तिस्वातंत्र्य आहे. पण परिस्थिति व साधनें यांच्या आधीन जीव असतो. हृदयस्थ ईश्वराच्या साह्यानें जीव हा आपापल्या संस्कारां-प्रमाणें (कर्मबीजशेष) कर्म करीत असतो. जीव कर्ता असला तरी अज्ञानानें स्वहिताला विरोधी अशींही तो कर्में करतो. जीवाचें कर्तृत्व हें औपाधिक असतें. उपाधिनिरास झाला कीं जीवाचें कर्तृत्व संपतें. तो निरास ज्ञानानें होतो. जीव हा जगताप्रमाणें अनादि आहे.

(५४८) **संसार अनादिः**— वेदांत्यांनीं जीव, जगत्, कर्म, ईश्वर इत्यादि अनादि मानले आहेत. अनादि म्हणजे ज्याचा प्रारंभ सांगतां येत नाहीं असें. ही सृष्टि केव्हां उत्पन्न झाली हेंच सांगतां येत नाहीं. वृक्ष आधीं कां बीज आधीं याचा उलगडा जसा होत नाहीं, तसेंच जगाचें आहे; म्हणून वेदांत्यांनीं संसार हा अनादि मानला आहे.

(५४९) **कर्मविपाकः**—जगत् हा एक कर्माचा परिपाक आहे. कर्मानेंच जगाला शोभा आलेली आहे. असंख्य प्राणिमात्रांचीं जीं असंख्य

कर्में तेंच हें जग होय. कर्मामुळेंच सृष्टि निर्माण होते, कर्मापासूनच फल मिळतें, कर्मामुळें अहंकार उत्पन्न होतो, कर्मामुळें सुखदु:खें भोगावीं लागतात. कर्म हें कर्त्याविना होत नाहीं. कर्मांचें फल कर्त्याला व समाजालाही भोगावें लागतें. कर्म, कर्ता व फल अशी ही त्रयी आहे. अहंकारयुक्त सर्व कर्में फल देतात. कर्मबंधांतून सुटण्याचा मार्ग म्हणजे आसक्ति व अहंकारविरहित कर्में करणें हा होय. प्रत्येक कर्माला फल हें असतेंच. कांहीं पिकें तीन महिन्यांनीं, तर कांहीं सहा महिन्यांनीं, तर कांहीं बारा महिन्यांनीं फलसनाथ होतात. तसेंच कर्मांचें आहे. कर्ता, कर्म व फल यांची सांगड घालून देणारी एक शक्ति मानावी लागते. कर्मफलप्रक्रिया स्वीकारली कीं पुनर्जन्माचा सिद्धांतही स्वीकारावा लागतो. या लोकांत जीवाचे पुत्र, द्रव्य, कृत्यरूपानें पुनर्जन्म होतात. मरणोत्तर जीवाला कर्मपरिपाकाप्रमाणें कांहीं अवस्था आहे असें मानावें लागतें. हे सर्व अध्यात्म विषय गूढ, अभ्यसनीय असे आहेत. त्यांचा अधिक विचार वाचकांनीं वेदांतशास्त्राधारें अवश्य करावा. आतां ईश्वर, त्याची भक्ति व तदनुषंगिक विषयांचा विचार करूं.

—*—

# प्रकरण चौतिसावें

## ईश्वराचें स्वरूप.

(५२०) **ईश्वरासंबंधीं दोन पक्षः**—आजपर्यंत जगांत मोठमोठ्या तत्त्ववेत्त्यांनीं आणि शोधकांनीं पुष्कळ प्रयत्न करून पूर्णपणें न सोडविलेला पण आमच्या आत्मसाक्षात्कारी ऋषींनीं स्वानुभवानें निश्चित केलेला असा कोणता विषय असेल तर तो ईश्वराच्या अस्तित्वाचा होय. ईश्वर आहे असें मानणारे जसे आत्मसाक्षात्कारी स्वानुभवी ऋषी व त्यांच्यावर आप्त म्हणून

विश्वास ठेवणारे जसे सश्रद्ध लोक आहेत, तसेंच ईश्वर न मानणारे बुद्धि-वादि व नास्तिकही आहेत. जगाच्या प्रारंभापासून जगाच्या अंतापर्यंत हे पक्ष राहणार यांत शंका नाहीं. हिंदुधर्मामध्यें सहा आस्तिक व सहा नास्तिक दर्शनें आहेत. वास्तविक हीं दर्शनें म्हणजे मानवप्राण्याच्या हातून अनादि कालापासून आजपर्यंत सत्याच्या संशोधनार्थ झालेल्या प्रयत्नांचा अनुक्रमवार इतिहासच होय. म्हणूनच दार्शनिकांमध्यें सुध्दां कांहीं सेश्वरवादी तर कांहीं निरीश्वरवादी आहेत. मीमांसक निरीश्वरवादी असले तरी मंत्रमय देवता मानतात. सांख्यांमध्येंही सेश्वर व निरीश्वर असे पक्ष आहेत. जोंवर ईश्वर प्रत्यक्ष नाहीं तोंवर हे भेद अपरिहार्य आहेत.

ईश्वर व वेद मानणारे ते आस्तिक व ते न मानणारे नास्तिक एवढी संकुचित व्याख्या आज उपयुक्त नाहीं. जडवादी म्हणजे नास्तिक हें अंशतः खरें असलें तरी जडवाद्यांमध्यें सुद्धां जर ज्ञानलालसा, त्याग, सेवा व कर्तव्याची जाणीव असेल तर तेही आस्तिकच होत. त्यांना अजाणतेपणानें आस्तिक्याची जाणीव होत नाहीं येवढेंच. अंधश्रद्धा हा जसा दुर्गुण तसा अंध अश्रद्धा हाही दुर्गुणच होय.

जुना आस्तिक हा जसा अंधश्रद्धेनें दुराग्रही तसाच नवा नास्तिकही जडवादाच्या अभिनिवेशानें दुराग्रही असेल तर त्याला धर्मापासून स्फूर्ति मिळणार नाहीं. आज समाजामध्यें त्यागाची आवश्यकता आहे. पण बुद्ध भिक्षूप्रमाणें देहदंडन नको आहे. वैराग्य हवें पण जीवनविषयक उदासीनता नको. राजकारण, समाजकारण, शिक्षण आणि धर्म इत्यादि जीवनाच्या प्रमुख अंगांबद्दल स्वकीय योग्यतेप्रमाणें व अभिरुचीप्रमाणें उद्योग करण्याची इच्छा जर आजच्या जडवाद्यांमध्येंही असेल तर त्यांना आस्तिक म्हणावयास काय हरकत आहे? कारण हा जडवादी न कळतच समाजधारणेच्या धर्माला मान्यता देतो. जीवनाच्या कांहीं अंगांबद्दल तो अधिक उत्सुक असला तरी अन्य अंगांबद्दल तो सहानुभूति दाखवितोच. जुना आस्तिक हा अंधश्रद्धेनें जवळ जवळ नास्तिक म्हणजे निरुपयोगी ठरतो. तसा जडवादी बुद्धिवादाच्या पकडींत सांपडून समाजधारणेचीं तत्त्वें मान्य करून जवळ जवळ आस्तिकच बनतो. इतक्या व्यापक दृष्टीनें आस्तिक्य ठरविलें म्हणजे

ईश्वर, कर्मविपाक, पुनर्जन्म वगैरेविषयक जडवाद्यालाही समाजधारणेचें अंग म्हणून मान्य करणें भाग पडेल.

**(५५१) ईश्वर एकच आहे:**—जगांत ईश्वर हा एकच असला पाहिजे. ईश्वर अनेक मानल्यास ते एकमेकांच्या अधिकाराचें आक्रमण करतील व त्यांच्यामध्येंही मानवांप्रमाणें विग्रह उत्पन्न होतील. यास्तव जगन्नियंता ईश्वर एकच आहे, हें मानणें सयुक्तिक दिसतें.

ईश्वराची अस्तित्वसिद्धि कोणी प्रमाणपद्धतीनें, कोणी मानसशास्त्राचा आधार घेऊन, तर कोणी नीतिशास्त्राधारें करीत असतात. स्वतः ईश्वरानें मी असा आहें व अमुक ठिकाणीं आहें असें कधींही सांगितलेलें नाहीं. मनुष्यानें तर्कानें व अनुभवानें ईश्वराची कल्पना केली व ती सिद्ध करण्याचा यत्न केलेला आहे, असें बुद्धिवादी लोक म्हणतात. परंतु योग्यांनीं व परम ऋषींनीं ध्यानावस्थित होऊन एकाग्रचित्तानें ईश्वराचा अनुभव घेतलेला आहे.

"ध्यानावस्थित तद्गतेन मनसा पश्यंति यं योगिनो। यस्यान्तं न विदुः सुरासुरगणा देवाय तस्मै नमः ।। 'युक्तेन मनसा सदा' 'योगिभिर्ध्यानगम्यम्' वगैरे वचनांवरून ईश्वराचें अस्तित्व व साक्षात्कार या गोष्टी काल्पनिक नसून त्या सत्य आहेत असें सिद्ध होतें. कठोपनिषदांतील

एष सर्वेषु भूतेषु गूढात्मा न प्रकाशते ।
दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ।।

या वचनाप्रमाणें सर्वत्र असलेला परमात्मा सूक्ष्म बुद्धीच्या तपस्व्यांना व योग्यांनाच साक्षात् होतो असें स्पष्ट होतें.

**(५५२) ईश्वरकल्पनेचा उगमः**—ईश्वरकल्पनेचा उगम वन्य स्थितींतील मानवी बुद्धीच्या दौर्बल्यांतून व निसर्गाच्या चमत्कारांतून झालेला आहे. कोणत्याही अवस्थेमध्यें मनुष्याचें लक्ष स्वभाविक निसर्गाकडे वेधतें. विजेचा कडकडाट व लखलखाट सुरू झाला, मुसळधार वृष्टि होऊं लागली, काळेकुट्ट ढग एकमेकांवर आदळून ते गर्जूं लागले, गारांची वृष्टि होऊं लागली, इंद्रधनुष्य दिसूं लागलें, हिमवृष्टि, महापूर यांनीं समाज गांजूं लागला कीं माणसाला सहज वाटतें कीं हें आपल्या बुद्धीपलीकडचें आहे व

आपल्या शक्तीच्या आटोक्यांतीलही नाहीं. याचा नियंता कोणीतरी असावा अशी कल्पना करून तो त्या शक्तीची ( स्वतःस त्रास न व्हावा म्हणून ) करुणा भाकतो. भीतिदायक परिस्थिति आणि त्रस्त मनोवृत्ति अशा अवस्थेंत कोणीतरी सोडविणारा हवा असें वाटतें व तो त्राता म्हणजेच ईश्वर होय !

(५५३) **ईश्वरकल्पनाही सापेक्षः**–कोणत्याही काळीं मनुष्य आपल्या अवस्थेप्रमाणें व ज्ञानाप्रमाणें ईश्वराविषयीं सापेक्षच विचार करतो. समाजाच्या प्राथमिक अवस्थेंत ईश्वर हा आडदांड, राकट, क्रूर, धिप्पाड, आखाडमल्ल असा समजला जातो. कारण त्याकाळीं माणसांतहि तसा जो असेल त्यालाच मोठा समजतात. पुढें समाजाची अवस्था बदलली म्हणजे ईश्वर हा करुणामय आहे, दयाघन आहे, दीनोद्धारक आहे असें समजण्यांत येतें. मनुष्यसमाजामध्यें जेव्हां सुसंस्कृतपणा येतो व प्रेम, कारुण्य आणि वात्सल्य या वृत्ति वृध्दिंगत होतात तेव्हां त्यांचाच आरोप ईश्वरावर केला जातो व ईश्वराचें स्वरूप बदलतें.

(५५४) **ईश्वरसिद्धीच्या पद्धतिः**–ईश्वराची सिद्धी नैयायिक हे अनुमानानें करतात. कोणत्याही कार्यास प्रथम ज्ञान, नंतर इच्छा व पुढें प्रयत्न अशा त्रयीची आवश्यकता असते. या दृष्टीनें अत्यंत व्यवस्थित, नियमबद्ध व आश्चर्यमय अशा विश्वरचनेच्या बुडाशीं सर्वज्ञता, इच्छाशक्ति व प्रयत्न असला पाहिजे, असें अनुमान तार्किकांनीं केलेलें आहे.

**'रचनानुपपत्तेश्च नानुमानम्'।** –ब्र. सू. २।२।१

या सूत्रांत बादरायणाचार्यांनीं हीच तर्कपद्धति स्वीकारली आहे.

मानसशास्त्रदृष्ट्या ईश्वरविषयक कल्पनेचा अभ्यास केल्यास असें दिसतें कीं संस्कृतिसंपन्न मनुष्याला सदसतांचा निवाडा करण्याला प्रेममय पिता किंवा जगाचें शासन करणारा ईश्वर असावा असें वाटतें. मानसशास्त्रदृष्ट्या ईश्वरविषयक कल्पना भव्य, उदात्त, काव्यमय, सुंदर, रमणीय व जीवनाला उत्तेजक अशीच आहे.

नीतिशास्त्रदृष्ट्या 'सत्यानृते अवपश्यञ्जनानाम्' ( ऋ. ७।४९।२ ) जनांच्या सदाचरणाचा व दुराचरणाचा न्यायनिवाडा करणारा, धर्माधर्म-

फलदाता कोणी तरी मानावा लागतो. मातेनें मुलांच्या खस्ता खाणें, देशभक्तांनीं राष्ट्राकरितां सर्वस्वाचा होम करणें, साधूंनीं हालअपेष्टा सोसणें, सत्यनिष्ठांनीं सत्याकरितां प्राण पणास लावणें, अशा श्रेष्ठ कृत्यांची जर जगांत दाद नसेल तर मग हीं कृत्यें कां करावींत? सदाचरण निष्फळ होतां कामा नये. त्याचा न्यायनिवाडा करणारा कोणी तरी जगांत असला पाहिजे, असा विचार सहजच मनांत येतो. हाच विचार 'फलमत उपपत्तेः।' (ब्र. सू. ३–२–३८) या सूत्रांत मांडलेला आहे.

या व अशा विविध तर्कपद्धतीनें ईश्वराचें अस्तित्व सिद्ध होवो वा न होवो, या कल्पनेचा परिणाम मानवी जीवनावर होतोच. फार काय पण ईश्वराप्रमाणेंच आत्मा, पुनर्जन्म, कर्मफल इत्यादि जे अध्यात्मांतील सिद्धांत आहेत त्यांचाही परिणाम मानवी जीवनावर होतो; म्हणून नवा हिंदुधर्म ईश्वराचें अस्तित्व मानतो आणि त्याच्या भक्तीचा पुरस्कार करतो.

(५५५) **ऋग्वेदांतील ईश्वरः**–ऋग्वेदसंहितेच्या दहाशेंसतरा सूक्तांपैकीं एकतृतीयांश सूक्तें अग्नि या देवतेला उद्देशून आहेत. म्हणजे त्या कालीं अग्नि हा देव मानला जात असे. त्याच्या खालोखाल इंद्र, वरुण, बृहस्पति, सविता, पूषा, उषा, मरुत, विष्णु इत्यादि देवतांनाही मानीत असत; कारण त्यांचींही स्तुतिसूक्तें आढळतात. अनेक देवता मानून त्यांची स्तुति करून पुत्र, पशु, अन्न यांची मागणी ऋग्वेदांत केलेली असली तरी त्या सर्वांत परमेश्वर एकच आहे अशी कल्पना अनुस्यूत आढळते. उदाहरणार्थ,

**इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहुरथो दिव्यः स सुपर्णो गरुत्मान्।**
**एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः ॥**

(ऋ. १, १६४, ४६)

परमेश्वर एक असून ज्ञाते त्याला अनेक प्रकारें म्हणजे अग्नि, यम, मातरिश्वा इत्यादि नांवांनीं संबोधितात असें म्हटलें आहे.

'**सुपर्णं विप्राः कवयो वचोभिरेकं सन्तं बहुधा कल्पयन्ति।**'

(ऋ. १०,११४,५) या ऋचेंतही हीच कल्पना आहे. याशिवाय ऋग्वेदाच्या 'नासदीय' नामक सूक्तांत सृष्टीच्या आधीं परमेश्वराचें एकच स्वरूप

होतें, त्याला सत् किंवा असत् असें कांहींच म्हणतां येत नव्हतें, असें वर्णन आहे. निरनिराळ्या देवतांना संतुष्ट करून घेण्याचा त्याकालीं यज्ञ हा एकच मार्ग होता. 'अग्निमुखा वै देवाः ।' अग्नि हा सर्व देवांचें मुख होय. वैदिक आर्य अग्नीच्या द्वारानें सर्व देवांना हविर्भाग देऊनच त्यांनीं शत्रूंचा संहार करावा, असुरांचा नाश करावा, हिमप्रलय, जलप्रलय अशा आपत्ति आणूं नयेत, आपले पशु व प्रजा यांचें संरक्षण करावें, अशी करुणा भाकीत असत. पुढें यज्ञांनीं जन्म नि मृत्यु पुनःपुन्हां मिळणार म्हणून त्यांची कास न धरतां श्रवण, मनन, निदिध्यासानें आत्मस्वरूप समजून घ्यावें, अशी विचारसरणी आली.

(५५६) **निर्गुण व निराकारच ईश्वरः**—ईश्वराच्या अस्तित्वा-संबंधीं जसे वाद आहेत तसेच त्याच्या स्वरूपाविषयींही वाद आहेत. अखिल चराचराच्या बुडाशीं निर्गुण, निराकार, सर्वाधार, निर्मल, स्वच्छ, नित्य-तृप्त, अनंत, स्वयंप्रकाश, परिपूर्ण, सर्वव्यापी, सर्वांतर्यामी असें एक तत्त्व आहे, तें केवळ सत्तामात्र आहे, असें मानणें हेंच तर्कशास्त्रदृष्ट्या युक्त आहे. वेदांत्यांनीं, तत्त्ववेत्त्यांनीं ईश्वराचें हें विशुद्ध स्वरूपच मानलेलें आहे. तो सम आहे, निःपक्षपाती आहे, दयावान आहे, त्याला कोणी प्रिय नाहीं, द्वेष्य नाहीं, तो कुणाचें पुण्य घेत नाहीं व कुणाचें पाप नष्ट करीत नाहीं. तो साक्षी, नित्य नि चेतन असा आहे.

(५५७) **गीता व ईश्वरः**—श्रीमत् भगवद्गीतेमध्यें ईश्वराच्या या स्वरूपाचें वर्णन ठिकठिकाणीं आलेलें आहेः—

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।**
**न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥**　　—गी. अ. ५—१४
**नादत्ते कस्यचित् पापं नचैव सुकृतं विभुः ।**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जंतवः ॥**　　—गी. अ. ५—१५
**न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय ।**
**उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥**　　—गी. अ. ९—९
**मयाऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ॥**　　—गी. अ. ९—१०
**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्त मूर्तिना ॥**　　—गी. अ. ९—१४

समोऽहं सर्व भूतेषु न मे द्वेष्योस्ति न प्रियः ।
ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥
—गी. अ. ९–२९

वरील सर्व श्लोकांचा भाव पाहिला तर ईश्वर हा अव्यक्त, निर्गुण, सत्तामात्र, सर्वव्यापी, निर्लेप, उदासीन, सर्वाध्यक्ष अशा स्वरूपाचा मानलेला दिसतो. वेदांतशास्त्रदृष्ट्या एकमेव, अद्वितीय ( म्हणजे द्वितीयसंबंधशून्य ) असें जगद्व्यापी तत्त्व नामरूपात्मक जगाच्या बुडाशीं आहे, त्याची सत्ता सर्वत्र आहे; म्हणूनच त्याला ( ईश–ऐश्वर्ये वा सत्तायाम् ) ईश्वर म्हणतात. त्याचें सामर्थ्य वा ऐश्वर्य अतर्क्य आहे.

**(५५८) वैषम्य व नैर्घृण्यः**—निर्गुण, निराकार ईश्वर जर जगताचें कारण आहे व जगताचें नियमनही तोच करतो तर त्या ईश्वरावर निर्दयता व विषमता हे दोष नाहीं का येणार? कारण त्यानें ही सृष्टि विषमच उत्पन्न केली आहे. या सृष्टींत श्रीमंत, गरीब, सुखी, दुःखी, सज्जन, दुर्जन अशी विषमता आहेच ना? त्यावर उत्तर असें कीं ईश्वरानें प्राण्यांचीं ( धर्माधर्म व पापपुण्यें इत्यादि ) कर्मे लक्षांत घेऊन सापेक्षत्वानें जगत् उत्पन्न केलें आहे. त्यांत ईश्वराचा दोष नाहीं.

वैषम्यनैर्घृण्ये न सापेक्षत्वात्तथा हि दर्शयति ।
—ब्र. सू. २–१–३४

ईश्वर हा पावसासारखा म्हणजे पाण्यासारखा आहे. पाणी जमिनींत ज्या जातीचें बीज पेरलें असेल त्याला विकसित होण्याला सहाय करतें. पाणी हें कारलें, ऊंस व मिरची यांच्या बुडाशीं गेलें कीं त्या त्या ठिकाणीं जी बीजगत शक्ति असते तिचाच विकास करतें. ज्या बीजामध्यें जी शक्ति नाहीं, ती पाणी कधींही उत्पन्न करूं शकत नाहीं. तात्पर्य, ही सृष्टि सापेक्ष आहे व ती अनादि असल्यामुळें ईश्वरावर वैषम्यादि कोणतेही दोष येऊं शकत नाहींत. ईश्वर हा सम, साक्षी, प्रभु व निर्लेप असा आहे.

**(५५९) ईश्वर कुठें आहे ?**—अनेक प्राण्यांचीं अनेक कर्मे त्यामुळें झालेले जे संस्कार ( बीजशेष ) त्यांचें विकसन करून प्रत्येक प्राण्याला त्याच्या त्याच्या कर्माप्रमाणें फलभोग मिळणें, हें या ईशस्वरूपी नियतीचें

कार्य आहे. कर्ता, कर्म व फल या त्रयीची सांगड घालून देणारी शक्ति म्हणजे ईश्वर होय. ही शक्ति निर्गुण, निराकार, नामरूपातीत अशी असून ती जगांत सर्वत्र आहे, फार काय पण मनुष्यमात्राच्या हृदयांत ती शक्ति वास्तव्य करीत आहे. त्या शक्तीच्या अधिष्ठानावर किंवा त्या शक्तीच्या प्रेरणेनें मनुष्यमात्राच्या क्रिया आपापल्या संस्काराप्रमाणें चाललेल्या आहेत.

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ –गीता अ. १८–६१

**भावार्थः**– हे अर्जुना, ईश्वर सर्व प्राण्यांच्या हृदयामध्यें वास करतो व आपल्या मायेच्या सामर्थ्यानें चाकावर चढविलेल्या मडक्याप्रमाणें त्यांना गरगर फिरवितो.

पूर्णिमेस पूर्णचंद्राचा उदय झाला म्हणजे जशी समुद्राला भरती येते, सोमकांताला पाझर फुटतो, चंद्रविकासिनी कमलें फुलतात, चकोर पक्ष्याचें पारणें सुटतें, तसें हृदयस्थ ईश्वराच्या सत्तेनें प्रत्येक मनुष्य आपल्या संस्काररूपी बीजानुरूप घडपड करीत असतो.

तया सिंधू भरितें दाटे । सोमकांता पाझर फुटे ।
कुमुदांचकोरांचा फिटे । संकोच तो ॥ १३१३ ॥
तैसीं बीजप्रकृतिवशें । अनेकें भूतें येकें ईशें ।
चेष्टविजति तो असे । तुझ्या हृदयीं ॥१३१४॥
अर्जुनपण न घेतां । मी ऐसें जें पांडुसुता ।
उठतसे तें तत्त्वतां । तयाचें रूप ॥१३१५॥ ॥ ज्ञानेश्वरी अ. १८

शेवटच्या ओवींत अर्जुनपणाचा अहंकार सोडून जें राहातें तें त्या ईश्वराचें स्वरूप होय असें म्हटलें आहे. त्यावरून ईश्वराच्या व्यापकत्वाची कल्पना येते.

—*—

# प्रकरण पस्तिसावें

## सगुण ईश्वर व अवतार

**(५६०) सगुण ईश्वरः**—तर्कदृष्ट्या, शास्त्रदृष्ट्या ईश्वर हा निर्गुण, निराकार आहे असें जरी असलें तथापि अधिकाराप्रमाणें मनुष्य हा ईश्वराला सगुण नि साकार मानतो नि आपल्यासारखाच तो एक हस्तपादादिकांनीं युक्त आहे, अशी सोयिस्कर कल्पना करून त्याची उपासना करतो. कारण निर्गुण ईश्वराची भक्ति होत नाहीं. मनुष्यप्राणी ईश्वराला आपापल्या आवडीप्रमाणें नांवें देतो. कोणी त्याला शिव, कोणी विष्णु, कोणी गणपति, कोणी ब्रह्म असें म्हणतो. कोणी ईश्वराला आकाशांतील बाप समजतो! कोणी त्याला सात समुद्रांपलीकडील क्षीरसमुद्रांत सिंहासनावर बसवितो! कोणी त्याला आठ दिवसांनीं एक दिवस विश्रांति देतो! कोणी त्या ईश्वराला जगाच्या अंतीं न्यायाधिशाच्या आसनावर अधिष्ठित करून, तो न्यायनिवाडा करणार आहे, असें म्हणतो. तात्पर्य, ज्याला नांव नाहीं त्याला नांव देऊन, ज्याचा जन्म नाहीं त्याचा जन्मकाल करून, ज्याला कुलगोत्र नाहीं त्याला कुलगोत्र चिकटवून मनुष्यप्राणी ईश्वराला सगुणत्व देतो. कधीं तो त्याला लहानांत लहान तर कधीं त्याला मोठ्यांत मोठा, कधीं भक्तवत्सल तर कधीं क्रूर, कधीं सर्वज्ञ असें समजून त्याप्रमाणें तो ईश्वराची भक्ति करतो.

**(५६१) सगुण कल्पनेला आधारः**—ईश्वराचें सगुणत्व हें वेदमंत्रांतही अस्फुटपणें दृग्गोचर होतें. मैत्रायणी संहितेमध्यें ( २,९११ ) महादेव, गिरिसुत, कार्तिकेय, हस्तिमुख, नारायण, प्रभाकर अशा देवतांचीं नांवें आलेलीं आहेत. या देवता विग्रहवान् व शरीरधारी असाव्यात, अशी कल्पना मूळ उत्तरमीमांसकांची आहे. वेदमंत्रांत अग्नीला चार शिंगें तीन पाय, दोन डोकीं, सात हात असल्याचें वर्णन आहे. “ चत्वारिशृंगा-, त्रयो अस्यपादा”...पूर्वमीमांसक हे मंत्रमय देवता मानतात. उत्तरमीमांसक

मंत्रावरून देव हे आकृतिविशेषानें म्हणजे शरीरानें युक्त असतात, असें समजतात. आदित्यमंडळांत तेज आहे, वायुमंडळांत शक्ति आहे, या वैदिक प्रयोगांवरून उत्तरमीमांसकांनीं त्या देवता शरीरधारी असाव्यात असें कल्पिलेलें आहे. इंद्र हा शब्द व्यक्तिवाचक नसून अधिकारवाचक आहे, असें वेदांती समजतात. इंद्र म्हणजे स्थानविशेषाच्या निमित्तामुळें असलेला एक अधिकारी होय! त्या स्थानावर जोंवर तो आहे तोंवरच तो इंद्र असतो. स्थानभ्रष्ट झाल्यावर तो इंद्र असत नाहीं. उदाहरणार्थ सेनापति हा शब्द जसा अधिकारवाचक आहे तसाच इंद्र शब्दही आहे. ( शांकरभाष्य १–२–८ )

' इंद्रो नाम कश्चित् विग्रहवान् देवताविशेषः । ' असें उत्तरमीमांसकांचें म्हणणें आहे. इंद्र ही बळाची देवता आहे. अपाचा अधिपति वरुण होय; परमात्मा वैश्वानर होय. जठराग्नि विश्वात्मा होय, अशा प्रकारचे उत्तरमीमांसकांचे जे देवताविषयक विचार आहेत, त्यांवरून ईश्वराच्या सगुणत्वाची कल्पना येते. ईश्वर हा सगुण आहे, मोठ्यांत मोठा आहे, त्याला हस्तपादादि अवयव आहेत, बुद्धयादि इंद्रियें आहेत, असें मानून समाजांत जो मोठ्यांत मोठा मनुष्य असे, ज्याच्यामध्यें कांहीं विशेष दिसे त्याला ईश्वरी अंश, अवतार व विभूति समजण्यांत येऊं लागलें. राम, कृष्ण या ऐतिहासिक वीरांना, महावीर, जिन व गौतमबुद्ध इत्यादि संप्रदायप्रवर्तकांनाही अवतार समजण्यांत येऊं लागलें. अवतार हा मूर्तिमंत सदैव डोळ्यांपुढें असतो असें नाहीं. म्हणून मग त्याचें प्रतीक, त्याची मूर्ति, त्याची प्रतिमा काष्ठ, धातु व पाषाण इत्यादिकांची बनवून मनुष्य त्याची पूजाअर्चा, ध्यानधारणा करूं लागला. असो.

(५६२) गीता व अवतारः–येथवर ईश्वराचें मूळ निर्गुण स्वरूप, त्याला पुढें आलेलें सगुणत्व, त्यांतून अवतारकल्पनेचा उदय व त्याचें मूर्तिपूजेंत रूपांतर कसकसें होत गेलें याचें विवेचन केलें. आतां प्रथम क्रमप्राप्त म्हणून हिंदुसमाजांत जी अवतारकल्पना आहे तिची थोडी चिकित्सा करूं. वैदिक वाङ्मयांत अवतारकल्पना आढळत नाहीं. प्रामुख्यानें ती कल्पना गीतेंतील पुढील श्लोकांत आलेली आहेः—

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् –गी. अ. ४–६
परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ –गी. अ. ४–७

ज्यावेळीं धर्माची ग्लानि होते, त्यावेळीं अधर्म नष्ट करण्याकरितां, धर्मसंस्थापना करण्याकरितां, साधूंचें रक्षण व दुष्टांचें दंडन करण्याकरितां मी वेळोवेळीं अवतार घेतों, असें श्रीकृष्णानें अर्जुनाला सांगितलें आहे. यांतील सूक्ष्म आशय लक्षांत घेतला तर असें स्पष्ट दिसतें कीं 'युगे युगे' म्हणजे वेळोवेळीं परमेश्वर तेजस्वी व पराक्रमी माणसाचे रूपानें त्या त्या कालांत समाज व राष्ट्र यांच्या अभ्युदयाकरितां येत असतो. इंग्रजीमध्यें Times create their own men यांत जो आशय आहे तोच वरील वाक्यांत आहे. परिस्थितिसापेक्ष कर्तृत्ववान् माणसें जगांत उत्पन्न होतात. त्यांचें कर्तृत्व असामान्य कोटींतील असलें म्हणजे मग त्यांना 'सुपरमॅन,' अतिमानव किंवा पुरुषोत्तम, अवतार असें मागाहून समजण्यांत येतें. गीतेमध्यें अवतार हा शब्द नाहीं. अवतार याचा अर्थ वरून खालीं येणें. परब्रह्म मनुष्य-रूपानें अवतरतें असा आहे. गीतेमध्यें अवतार या शब्दापेक्षां विभूति हा शब्द अन्वर्थक आलेला आहे व तोच अधिक ग्राह्य आहे. ज्या ज्या ठिकाणीं कांहीं विशेष असेल ती विभूति होय. विभूति म्हणजे विशेष मनुष्य, असामान्य, कर्तृत्ववान् मनुष्य अशी कल्पना येते. विभूति शब्दानें मनुष्याला स्फूर्ति मिळून डोळसपणा येतो; तर अवतार या शब्दानें मनुष्य दिपतो व त्याला अंधत्वही येतें. अवतार म्हणजे साक्षात् ईश्वर, त्याची लीला तोच जाणे! दुर्बल मनुष्य पामर काय करणार? अशी वृत्ति होते, पण विभूति म्हटली कीं आपल्यासारखाच एक मनुष्य कर्तृत्वानें व गुणानें केवढा मोठा होतो असें वाटून कार्यास स्फूर्ति मिळते.

(५६३) श्रीशंकराचार्यांचें मतः–श्रीशंकराचार्यांनीं गीताभाष्याच्या उपोद्घातांत अवतारासंबंधाचें केलेलें विवेचन मननीय आहे.. 'पुष्कळ काळ गेल्यामुळें धर्माचरण करणाऱ्यांमध्यें कामलोभादिकांचा उद्भव होऊन त्यामुळें विवेक व विज्ञान हीं नष्ट होतात. मनुष्यस्वभावांतच कामलोभादि

हे दोष आहेत. त्यामुळें जेव्हां घडी विसकटते तेव्हां समाजाला कर्मप्रवृत्त करण्याकरितां कर्त्या मनुष्याची आवश्यकता असते.' हा कर्ता मनुष्य त्या कालांतील कर्तृत्ववान् बहुसंख्य व्यक्तींच्या आकांक्षा आत्मसात् करून त्यांच्या सहाय्यानें महत्कार्य करून दाखवितो.

(५६४) **युगपुरुष कोणः ?** :–श्रीकृष्ण, श्रीराम, परशुराम हे त्या त्या कालांतील युगपुरुष होत. ज्याच्या विचारांची पकड आणि ज्याच्या कर्तृत्वाचा प्रभाव हा समाजाच्या मनावर जेवढ्या काळापर्यंत ठसठशीतपणानें असतो, तेवढ्या कालांतला तो युगपुरुष होय. असामान्य कर्तृत्व व बुद्धिमत्ता ज्यामध्यें असते, असाच मनुष्य अद्भुत कार्य करून दाखवितो, व मागाहून त्याला अवतार समजण्यांत येतें. बुद्धि, तेज, कर्तृत्व यांनीं युक्त अशीं माणसें समाजांत वेळोवेळीं उत्पन्न होतात व तीं समाजाला धक्के देऊन कार्यप्रवण करतात, अशी ही अनादि परंपरा आहे.

(५६५) **श्रीकृष्ण हा अवतारः**–पुराणामध्यें ईश्वराचे अंश, कला व आवेश असे अवतार मानलेले आहेत. त्याचाही चिकित्सक बुद्धीनें विचार केला तर प्रत्येक कर्तृत्ववान् मनुष्य ईश्वरी अवतारांत मोडतो, असेंच सिद्ध होतें. प्रत्येक मनुष्य ईश्वराचा अंश आहे. त्याच्या ठिकाणीं सत्, चित् व आनंद या गुणांचा आविष्कारही आहे. अर्थात् असामान्य कर्तृत्व जर त्याचे ठिकाणीं दिसेल तर तोही अवतार समजला जातो.

वेदांतशास्त्रांत ईश्वर हा शुद्धसत्त्वप्रधान अशा मायेच्या योगानें अवतार धारण करतो व अवतारकार्य करतो, जीव हा अविद्येच्या आधीन, अज्ञ व अल्प शक्तिमान् असल्यामुळें व त्याचें शरीर पंचभूतात्मक असल्यामुळें ईश्वराप्रमाणें अवतारकृत्य करूं शकत नाहीं, असें विवेचन आहे. ईश्वराची उपाधि शुद्ध आणि जीवाची उपाधि मलिन आहे, ईश्वराचें शरीर मायामय तर जीवाचें शरीर जड असें मानलेलें आहे.

अस्यापि देववपुषो मदनुग्रहस्य ।
स्वेच्छामयस्य न तु भूतमयस्य कोऽपि ॥ –भाग. दशमस्कंध

या श्लोकांतील 'स्वेच्छामयस्य न तु भूतमयस्य कोऽपि' हीं पदें महत्त्वाचीं आहेत. त्यावरून परमेश्वराचें शरीर कसें असतें व त्याकडून

अद्भुत लीला कशा होतात याची कल्पना येते. भगवान् श्रीकृष्णाचें शरीर हें मायामय होतें व तो अवतारी होता, यासंबंधाचें वर्णन भागवतांत पुष्कळ ठिकाणीं आहे.

क सप्तहायनो बालः क महाद्रिविधारणम् ।
ततो नो जायते शंका व्रजनाथ तवात्मजे ॥ –भा. १०।२६।१४
तस्मान् नन्द कुमारोऽयं नारायणसमो गुणैः ।
श्रिया कीर्त्यानुभावेन तत्कर्मसु न विस्मयः ॥ –भा.१०।२७।२२

**भावार्थः**–सात वर्षांचा मुलगा तो काय व त्याच्या हातून गोवर्धन पर्वताचें उद्धरण होतें काय? नंदा, तुझ्या मुलाबद्दल आम्हाला शंका येते. (नंद म्हणतो, गर्गाचार्यांनीं असें सांगितलें कीं) 'हा तुझा मुलगा नारायणासारखा गुणवान् आहे. म्हणून कीर्ति, ऐश्वर्य व कर्तृत्व या क्षेत्रांत तो नारायणसदृशच होणार आहे.'

**(५६६) श्रीकृष्ण हा लौकिक मनुष्यः**–ज्या भागवतांत श्रीकृष्णाला एवढा अवतार असें म्हटलें आहे त्यांतच पुढील विचार आहेत.

दुर्भगो बत लोकोऽयं यदवो नितरामपि ।
ये संवसन्तो न विदुर्हरिं मीना इवोडुपम् ॥८॥
इङ्गितज्ञाः पुरुप्रौढा एकारामाश्च सात्वताः ।
सात्वतामृषभं सर्वे भूतावासममंसत ॥९॥
देवस्य मायया स्पृष्टा ये चान्यदसदाश्रिताः ॥१०॥
–भागवत अ. २ स्कं. ३

**भावार्थः**–उद्धव म्हणतो, 'हे विदुरा, या लोकांचें काय दुर्भाग्य पहा! मासे जसे समुद्रांतील नावेला अज्ञानामुळें ही नाव आहे असें समजत नाहींत, तसे हे लोक यांच्यामध्यें वास्तव्य करणाऱ्या श्रीहरीला ओळखत नाहींत. हे प्रौढ इङ्गितज्ञ यादवसुद्धां आपल्यांतील सर्वश्रेष्ठ अशा श्रीहरीला ओळखत नाहींत. ईश्वराच्या मायेमुळें यांनीं अज्ञानाचा स्वीकार केलेला आहे.'

उद्धवाच्या या उद्गारावरून श्रीकृष्णाला तत्कालिन यादव अवतार समजत नसत हें उघड आहे. 'चिरपरिचयात् अवज्ञा' हा न्याय सर्वत्र आहे.

श्रीकृष्णाला अर्जुन आपल्या बरोबरीचा मित्र समजत होता आणि शिशुपाल तर त्याला सामान्य सज्जन मनुष्यही समजत नव्हता! दुर्योधन श्रीकृष्णाला काय समजत होता, हें त्यानें एकट्या श्रीकृष्णाच्या सहायापेक्षां अनेक लक्ष यादवांचें सैन्य पसंत केलें, यावरूनच सिद्ध होतें.

तसेंच दुर्योधन व दुःशासन हे श्रीकृष्णाला काडीचीही किंमत देत नव्हते. हें शिष्टाईचे वेळीं त्यांनीं केलेल्या वर्तनावरून सिद्ध होतें.

भारतीय युद्ध समाप्त होऊन श्रीकृष्ण व अर्जुन प्रेमानें गोष्टी बोलत बसले असतां भगवंताचे मुखानें गीता पुन्हा ऐकावी म्हणून अर्जुनानें त्याला विनंति केली. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाला तो उपदेश त्याप्रसंगीं अत्यंत योगयुक्त चित्तानें मी केला असल्यामुळें तो पुन्हा तसाच सांगणें मलाही अशक्य आहे.

स हि धर्मः सुपर्याप्तः ब्रह्मणः पदवेदने ।
न शक्यं तन्मया भूयः यथावक्तुं अशेषतः ॥
परं हि ब्रह्म कथितं योग–युक्तेन तन्मया ।

अश्वमेधपर्व अ. १६–१०–१३

श्रीकृष्णाच्या या उद्गारावरून तो स्वतःलाही अवतार मानीत नव्हता आणि योगयुक्त स्थितीमध्यें असतांना मात्र विशेष ज्ञानी आणि शक्तिसंपन्न होता असें दिसतें.

शांतिपर्व अध्याय ८१ मध्यें भीष्मांनीं वासुदेव व नारद यांचा संवाद सांगितला आहे. त्यावरून श्रीकृष्ण हा कर्ता पुरुष कसा होता व त्यावेळीं त्याला ज्ञातींतील लोक कसें जुमानीत नसत हें दिसतें.

वासुदेव नारदाला म्हणतो– माझे जातिबांधव विशेषतः उग्रसेन व अक्रूर हे दुर्वचनें बोलतात. उग्रसेन व अक्रूर यांचें वाकडें आहे. मी कोणाच्याही बाजूनें बोललों तरी एक मला दोष देतोच. ते दोघेही माझा निषेध करतात. मला लोक ईश्वर म्हणतात म्हणून मी ज्ञातीचें दास्य करीत नाहीं आणि भोग्य वस्तूंपैकीं अर्ध्यांचा उपभोग घेत असतांनाही मला ज्ञातीचीं वचनें सहन करावीं लागतात.

दास्यं ऐश्वर्य-वादेन ज्ञातीनां न करोम्यहम् ।
अर्धं भोक्तास्मि भोगानां वाक् दुरुक्तानि चक्षमे ॥
—शांतिपर्व अ. ८१।५

श्रीकृष्णाची ही परिस्थिति पाहून नारदांनीं त्याला अन्नदान, सहिष्णुत्व, सरलत्व, मृदुत्व, इंद्रियनिग्रह, द्रव्यदान व योग्य मनुष्याचा सत्कार इत्यादि उपाय सांगितलें. आपला पक्ष स्वाधीन ठेवण्याचें हें मृदु शस्त्र आहे असें नारद म्हणाला.

अनायासेन शस्त्रेण मृदुना अहृदयच्छिदा ।
जिव्हां उद्धर सर्वेषां परिमृज्यानुमृज्य च ॥
—शांतिपर्व अ. ८१।१९

एखादा मनुष्य कर्तृत्वानें मोठा झाला म्हणजे त्याच्या बाललीलासुद्धां फुगवून सांगण्यांत येतात. श्रीकृष्णाप्रमाणें श्रीरामाच्या बाललीला रामायणांत, गणपतीची लीला गणेशपुराणांत आणि इतर अवतारांच्या लीला निरनिराळ्या ग्रंथांत सारख्याच वर्णिलेल्या आहेत. त्यावरूनही कर्तृत्ववान् माणसांच्या चरित्रांत हे प्रक्षेप मागाहून घुसडले असावे, असें अनुमान संभवतें.

**(५६७) समान सत्ता पाहिजेः**—"समानसत्ता असेल तरच साधक-बाधक व्यवहार होतो, भक्त व दुर्जन ज्या व्यावहारिक सत्तेंत असतात त्या सत्तेमध्यें व्यवहार करण्याकरितां ईश्वर मायामय शरीरधारण करून भक्तांना आणि अभक्तांना त्यांच्या पापपुण्याचीं फळें देऊन आपल्या विग्रहाचा उपसंहार करतो," असें विवेचन वेदांतशास्त्रामध्यें आहे. हेंही शुद्ध तर्कदृष्टीनें पाहिलें तर कर्तृत्ववान् मनुष्य आपल्या ध्येयाला अनुकूल असणाऱ्यांचें रक्षण आणि प्रतिकूल असणाऱ्यांचा निःपात करीत असतो व तसें करून यश आल्यावरच त्याला महत्त्व प्राप्त होतें, या व्यवहाराशीं तें सुसंगत दिसतें. तें निराळ्या भाषेंत मांडलें आहे, एवढेंच !

**(५६८) विभूति म्हणजे काय ?**:—गीतेच्या चौथ्या अध्यायांत जशी अवतारकल्पना आहे, तशीच गीतेच्या दहाव्या अध्यायामध्यें विभूति-विस्ताराची कल्पना मांडलेली आहे. दहाव्या अध्यायामध्यें त्या कालांत ज्याला ज्याला कांहीं विशेष समजत त्याचा त्याचा उल्लेख केलेला आहे.

त्यावरून ते सर्व ईश्वराचे अवतार अगर विभूति असें म्हणतां येणार नाहीं. पिंपळ, सिंह, द्यूत, मार्गशीर्ष महिना, चंद्र, सूर्य, समुद्र अशा कित्येकांचा विभूति म्हणून उल्लेख तेथें केलेला आहे. या सर्व विभूतींना जर आपण देव समजूं लागलों तर द्यूत (जुगार) बंद करतां येणार नाहीं! सिंहाला सर्कशीमध्यें आणतां येणार नाहीं आणि पिंपळाच्या झाडाचीं मुळें जर एखाद्या घराच्या खालीं जाऊन घर पाडूं लागलीं तर तो पिंपळ त्याच्या देवपणामुळें तोडतां येणार नाहीं! दहाव्या अध्यायाचा बारकाईनें विचार केला तर त्या कालांतील प्रत्येक विशेष व्यक्ति, वस्तु व विषय मी आहें, असें भगवंतांना सांगावयाचें होतें. म्हणूनच शेवटीं उपसंहारांत जें जें वस्तुजात विशेष गुणांनीं युक्त असेल, श्री, विद्या, ऐश्वर्य इत्यादींनीं विभूषित असेल तें तें सर्व विभूतींत ढकललें आहे. शस्त्र धारण करणाऱ्यामध्यें जो राम तो मी आहे, वृष्णिकुळांतील वासुदेव तो मी आहे, असें सांगणारा भगवान् आज जर विभूतिविस्तारयोग सांगूं लागेल तर त्याला विद्यमान जगांतील सर्व कर्तृत्ववान् व्यक्तींचा व विशेष वस्तूंचा नामनिर्देश करावा लागेल.

(५६९) जेथें तेथें अवतार लागतो!:— मनुष्याला कर्तृत्वानें 'नराचा नारायण हो,' असें सांगणें अवश्य आहे. पण कर्तृत्ववान् माणसाला अवतार समजणें, त्याला देव समजणें व त्याचीं स्तुतिस्तोत्रें गात बसणें हें हतबुद्धतेचें लक्षण होय! कोणी कर्ता मनुष्य पुढें आला कीं हिंदु समाज त्याला अवतारकोटींत ढकलतो आणि त्याच्या जयंत्या व जयजयकार करीत बसतो! तेजस्वी व कर्तृत्ववान् पुरुष कर्मोपदेश करूं लागला कीं त्याप्रमाणें वागण्याची पाळी आपणावर येईल व मग पंचाईत पडेल म्हणून त्याला अवतारकोटींत ढकलून त्याला स्तुतीची, वंदनाची व जयजयकाराची लांच देऊन हिंदु मनुष्य नामानिराळा राहतो! 'महाराज, आपण फार मोठे आहां, अवतारी पुरुष आहां, नमस्कार असो आपल्याला, आपल्या दर्शनानें मी पुनीत झालों', असें बोलण्यांतच हिंदु माणसाला समाधान वाटतें!

कोणी मनुष्य विद्या व तेज यांच्या प्रभावानें पुढें आला व कांहीं समाजकार्य करूं लागला तर तें कार्य मोठें अवतारकृत्य आहे असें हिंदु-

समाज समजतो. सामान्य अन्यायांचा प्रतिकार, आततायींचा प्रतिकार अस्पृश्यतानिवारण, पोटजातींत विवाह, असल्या गोष्टीसुद्धां करण्यास, हिंदुसमाजाला अवतार लागतो. अवतारावांचून कांहीं होणें शक्य नाहीं, असल्या दुबळ्या कल्पनेनें हिंदुसमाजाला पछाडलेलें आहे. तुळसीदासांनीं हिंदीमध्यें रामायण लिहिलें, तर ते म्हणे वाल्मीकिचे अवतार! नामदेवांनीं अभंगरचना केली, तर ते म्हणे उद्धवाचे अवतार! मोरोपंतांनीं आर्या चांगल्या केल्या, कारण काय तर ते म्हणे गणेशाचे अवतार! श्रीसमर्थांनीं महाराष्ट्रांत सामर्थ्य उत्पन्न केलें, कारण काय तर ते म्हणे मारुतीचे अवतार! तुकाराम, ज्ञानदेव इत्यादि संत, शिवाजी, तानाजी, बाजीप्रभु इत्यादि कर्मवीर हेसुद्धां अवतारच! तात्पर्य, या अवतारांचा अतिरेक हिंदुसमाजांत झाला आहे, तो नष्ट केला पाहिजे.

(५७०) **अवतारकल्पना व दौर्बल्यः**—मनुष्याला अवतारकोटींत ढकलणें यासारखी गुलामगिरी नाहीं. राम, कृष्ण, परशुराम, शंकर हे त्या त्या कालांतील वीर नि कर्ते पुरुष होते. या ऐतिहासिक पुरुषांचें कर्तृत्व ध्यानीं घेऊन आजचें आपलें जीवन सुखी केलें पाहिजे. हें सोडून देऊन यांच्या कथा व पुराणें **ऐकण्यांत पुण्य** आहे, ही कल्पना सर्वस्वी चुकीची आहे. कारण रामकृष्णचरित्र श्रवण करण्यांत पुण्य आहे, अशी कल्पना झाली कीं मग स्वतःच्या वागण्याकडे कोणी लक्ष देत नाहीं. कर्त्या मनुष्याला देव ठरवून त्याची स्तुति करण्याचा, टाळ्या वाजवून भजन करण्याचा जो अभ्यास हिंदुसमाजानें आजवर केला आहे तो आतां लौकर बंद केला पाहिजे; जुन्या लोकांप्रमाणें नव्या शिक्षितांतही जयंत्यांचें व मयंत्यांचें पुष्कळ वेड पिकलेलें दिसतें. विद्वान, थोर, राजकारणी, कर्तृत्वशाली अशा पुरुषांच्या श्राद्धतिथी अवश्य साजऱ्या कराव्यात, त्यांच्या कर्तृत्वाचें मनन करावें व त्याप्रमाणें वागण्याचा यत्न करावा; परंतु केवळ पुण्यतिथ्या साजऱ्या करण्यांत व वृत्तपत्रांतून त्यांची जाहिरात फडकविण्यांत कांहीं विशेष करतों, असें समजणें सर्वथैव चुकीचें आहे.

(५७१) **अवतारांची पार्श्वभूमिकाः**—अवतारी कृत्यांची पार्श्वभूमिका लक्षांत घेतली तर असें दिसतें कीं ज्याला पुढें अवतार समजण्यांत येतें,

त्यानें एकट्यानेंच सर्व कार्य केलेलें नसतें. कारण एकटा अवतार सर्व कार्य करूं शकतच नाहीं. पुष्कळ सर्वसामान्य माणसांचे श्रम अवतारकार्यास सहायभूत होतात, म्हणूनच त्यांच्या हातून मोठालीं कार्यें घडतात. श्रीरामावतार होण्यापूर्वी जी परिस्थिति होती तिचें वर्णन पुढीलप्रमाणें आढळतें:—

'पृथ्वीला पीडा झाली. ऋषी त्रस्त झाले. पतिव्रता, ब्राह्मण, गायी आणि देव यांचा छळ होऊं लागला. अत्यंत आक्रांत उत्पन्न झाला. अशा वेळीं सर्व देव ब्रह्मदेवासह ईश्वराकडे शिष्टाईला गेले व म्हणाले, 'हे ईश्वरा, हे जे रावणकुंभकर्णादिक दुष्ट उन्मत्त झालेले आहेत त्यांच्या त्रासांतून तूं आम्हांला सोडव.' ईश्वर म्हणाला, 'मी अवश्य तुम्हाला साह्य करतों, श्रीरामरूपानें येतों; पण तुम्ही सर्व देवांनीं वानररूपानें येऊन मला साह्य केलें पाहिजे. तुम्ही जर याप्रमाणें आपलें कर्तव्य प्राणपणानें कराल तर तुमच्या साह्यानें मी दुष्टदंडन करून पृथ्वीचा भार हलका करीन, सत्पुरुषांना नि देवांना सुख देईन.'

श्रीकृष्णावताराचे वेळींही ईश्वरानें शिष्टाईकरितां आलेल्या सर्व देवांना तुम्ही गोपाळ होऊन मला साह्य केलें पाहिजे असेंच निक्षून सांगितलें. आजवर जें जें अवतारकार्य झालें तें तें सर्व तत्कालीन अनेक मनुष्यांच्या कर्तृत्वाच्या व प्रयत्नाच्या साह्यानेंच झालें आहे. श्रीशिवाजी-महाराजांनासुद्धां अवतार समजणारे कांहीं थोडेथोडके लोक नाहींत. पण आज जें संशोधन झालें आहे त्यावरून शिवपूर्वकालीं समाजांत किती असंतोष उत्पन्न झाला होता, प्रतिकारवृत्ति कशी जागृत झाली होती, आणि त्या वेळच्या मराठा समाजांतील देशमुखदेशपांड्यांमध्यें कशी संघटना उत्पन्न झालेली होती, हें पाहिलें म्हणजे त्या सिद्धतेचा व आकांक्षेचा लाभ घेणारा कोणीतरी निमित्तमात्र पुढें यावयास हवा होता, तो शिवाजी महाराजांच्या रूपानें आला, असें निदर्शनास येतें. समाज हा निधि असून त्यांतील कर्ता पुरुष हा त्या समाजाचा प्रतिनिधि असतो. श्रीशिवकालांत बहुजन-समाजामध्यें, मराठ्यांमध्यें, मावळ्यांमध्यें म्लेंच्छप्रतिकाराची जी बलवत्तर भावना उद्भूत झाली होती ती जर नसती, तर श्रीशिवछत्रपतींना अपेशच आलें असतें. आजही जे पुरुष विशेष कर्तृत्वानें क्षितिजावर चमकत आहेत,

त्यांच्या मागेंही त्यांच्या अनुयायांच्या कर्तृत्वाची आणि सर्वसामान्य समाजाच्या सहानुभूतीची भूमिका सिद्ध आहे, हें विसरतां कामा नये. समाजामध्यें संघटना उत्पन्न झाली, जाज्वल्य व उत्कट वृत्तींचा उदय होऊन एका उच्च ध्येयाकडे समाज जाऊं लागला म्हणजे तो समाजच आपल्यांतील एक कर्तृत्ववान् प्रतिनिधि पुढें ढकलतो व त्याच्याकडून आपणास हवें तें घडवून आणतो. हाच सिद्धांत श्रीतुकाराममहाराजांनीं—

देवा हातीं रूप। धरवूं आकार।
नेदूं निराकार। होऊं त्यासी॥

या अभंगवाणींत ग्रथित केला आहे.

**(५७२) अवतारवेडांतून मुक्त व्हाः**—हिंदुसमाजामध्यें दशावताराची कल्पना असून सांप्रत नववा बौद्धावतार चालू आहे, असें समजतात. धर्मकर्माच्या संकल्पामध्यें ' बौद्धावतारे भारतवर्षे भारतखंडे ' असें म्हणतात. म्हणजे अद्याप दहावा एक अवतार व्हावयाचा आहे म्हणून त्याची वाट पहात कांहीं लोक स्वस्थ बसलेले आहेत ! हिंदूंच्या या भोळसट कल्पनेचा लाभ अनेक अहिंदु घेत आहेत. कोणी एखादा लुच्चा, ठग्या किंवा महाबेरकी मनुष्य पुढें येतो व स्वतः मी कलंकी अवतार आहें असें घोषित करून भल्याबुऱ्या मार्गांनीं समाजाला लुबाडूं लागतो ! अहिंदुसमाजांतील एखादा संपन्न मनुष्य, एखादा हायनेस किंवा एखादा सर सुद्धां स्वतःच्या कलंकीअवताराची जाहिरात देतो, तीर्थप्रसादानें लोकांना पुनीत करण्याचा आव आणून यथेच्छ दक्षिणा घेतो. हिंदुसमाजाच्या या भोळसट कल्पनेचा लाभ अहिंदु लोक घेणारच. यास्तव त्याच्या डोक्यांतून हें अवताराचें वेड अवश्य घालविलें पाहिजे.

**(५७३) धर्मकर्मसंकल्प बदलाः**—नवा हिंदुधर्म हिंदुसमाजाला असें सांगतो कीं म्लेंच्छसंहारक हिंदुपदपादशाहीसंस्थापक असा दहावा अवतार श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांच्या रूपानें तीनशें वर्षांपूर्वीं होऊन गेला. तोच कलंकी अवतार होय ! हिंदूंनो, धर्मकर्मामध्यें ' शिवावतारे भारतवर्षे भारतखंडे ' असा संकल्प रूढ करा. ईश्वरानें हिंदुस्थानांत दशावतार घेऊन जें करावयाचें तें केलें. आतां ईश्वर हिंदुसमाजांतील

मनुष्याकडूनच सर्व कांहीं करून घेणार आहे. हिंदूंनो, आतां कर्तव्यतत्पर व्हा. तुम्ही कर्तृत्ववान् झालां कीं ईश्वर साह्य करतो. मानवी कर्तृत्वानेंच जगाला शोभा आणलेली आहे. ईश्वर सदासर्वदा जवळ आहे. तुमचें कर्तृत्व, तुमची उत्कटता व तुमचें धैर्य हें तो पहात आहे. हिंदूंनो, स्वधर्माकरितां मरण्यास व प्रतिकार करण्यास सिद्ध व्हा. सद्धेतूनें व सत्प्रवृत्तीनें जो आपण उद्योग करतों त्यास ईश्वर सदैव साह्य करीत असतो. यास्तव हिंदूंनो, धर्माकरितां, समाजाकरितां, स्वतःच्या हक्काकरितां, देवाकरितां, सत्य, न्याय, स्त्रियांची अब्रू यांच्या रक्षणाकरितां तुम्ही स्वतः मरण्यास व मारण्यास सिद्ध व्हा. ईश्वराची वाट पहात बसूं नका. तुम्ही कर्तव्य करूं लागलां कीं ईश्वर धांवून येईल, असें नवा हिंदुधर्म तुम्हाला आग्रहानें सांगतो.



# प्रकरण छत्तिसावें

## भक्तिमार्गाचें नवें स्वरूप

(५७४) मूर्तिपूजा सर्वत्र आहेः—येथवर ईश्वराच्या सगुण स्वरूपाच्या अनुषंगानें येणारी जी अवतारकल्पना तिची चिकित्सा केली. आतां मूर्तिपूजा, नामस्मरणादि नवविधा भक्ति आणि देवालयें इत्यादि विषयांचा विचार करणें क्रमप्राप्त आहे.

कोणत्याही समाजांत या ना त्या स्वरूपांत ईश्वराच्या मूर्त स्वरूपाची म्हणजे प्रतीकाची पूजा चालू असतेच. कोणी ईश्वराचें प्रतीक म्हणून एखादी मूर्ति, एखादा फोटो पुढें ठेवतो व त्याचें ध्यान करतो, कोणी क्रॉसपुढें गुडघे टेकतो, कोणी थडग्याला पुजतो, कोणी त्याच्या डोक्यावर सबजा घालतो तर कोणी कृष्णपाषाणाचें चुंबन घेतो! म्हणजे मनुष्याच्या मनाला ईश्वर म्हणून कांहीं तरी सगुण विषय लागतो, हें निर्विवाद आहे.

(५७५) मानला तर देवः–प्राचीन परंपरेमध्यें मूर्तिपूजेला मुळींच महत्त्व नव्हतें. ' मुर्खस्य प्रतिमापूजा ' किंवा ' प्रतिमा स्वल्प-बुद्धीनाम् ' अशी या मुर्तिपूजेची निंदाच केलेली आहे. प्राचीनकालीं यज्ञरूपानें देवतांची भक्ति करीत, तर मध्यकालांत मूर्ति वा प्रतिमा स्थापन करून त्यांची नवविधा भक्ति चालू झाली. लहान मुलें काठीचा घोडा व आगपेट्यांची आगगाडी करून कांहीं वेळ गंमतीनें खेळतात व पुढें कंटाळा आला कीं टाकून देतात. एखादी सुपारी, एखादा पाषाण, एखादी मृत्तिकेची मूर्ति यांना देव मानणें व कांहीं काल आनंदांत घालविणें हेंही त्यासारखेंच आहे. मूर्तीमध्यें देव आहे, शाडूच्या गणपतीमध्यें वेदमंत्रांनीं प्राणप्रतिष्ठा होते हा सर्व विषय भावनेचा आहे. ' मानला तर देव नाहीं तर धोंडा ' या म्हणींतही हाच अर्थ आहे. शिव, विष्णु, गणपती यांची मृत्तिकापाषाणाची मूर्ति समोर ठेवून ध्यानधारणा करीत बसणें, विशेषतः त्या मूर्तींत कांहीं अद्भुत सामर्थ्य आहे असें समजणें हा प्रमाद आहे. गीता व भागवतादि ग्रंथांत अव्यक्त अशा ईश्वराला व्यक्त किंवा सगुण समजणें हें अज्ञानाचें लक्षण आहे, असेंच म्हटलेलें आहे.

(५७६) मूर्ति, गीता व भागवतः–

अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः ।
परं भावमजानंतो ममाव्ययमनुत्तमम् ॥ –गी. अ. ७ श्लो.२४
अहं सर्वेषु भूतेषू भूतात्मावस्थितः सदा ।
तमवज्ञाय मां मर्त्यः कुरुतेऽर्चाविडम्बनम् ॥२१॥
यो मां सर्वेषु भूतेषु सन्तमात्मानमीश्वरम् ।
हित्वार्चां भजते मौढ्याद् भस्मन्येव जुहोति सः ॥२२॥
–भा. स्कं. ३ अ. २९

भावार्थः–मी अव्यक्त असतां मला अज्ञानी लोक मनुष्यदेहधारी मानतात. याचें कारण माझें अव्यय, श्रेष्ठ व उत्तम असें जें अव्यक्त स्वरूप त्याचें अज्ञान हें होय. मी सर्व भूतांमध्यें असतांना जो मूर्तीची पूजाअर्चा करून माझी चेष्टा करतो, तो जणुं सर्वभूतस्थ जो मी त्याचा अवमान करून भस्मांतच हवन करतो.

(५७७) **मूर्ति व योगशास्त्रः**—या तऱ्हेचे मूर्तिपूजेविरुद्ध पुष्कळ विचार असले तरी मूर्तिपूजा समाजांत रूढ आहेच. तिचा प्रादुर्भाव बुद्धोत्तर कालांत अधिक झाला असावा. पातञ्जलयोगशास्त्रदृष्ट्या ध्यान, धारणा, चित्तस्थैर्य व मनःप्रसाद यांकरितां मूर्त प्रतीकाची आवश्यकता आहे.

**'यथाभिमतध्यानाद्वा'।** यो. सू. १-३९

जें मान्य व पसंत असें प्रतीक असेल त्याच्या ध्यानानें चित्तस्थैर्य किंवा चित्ताची एकाग्रता साधावी.

**यदेवाभिमतं तदेव ध्यायेत्। तत्र लब्धस्थितिकमन्यत्रापि स्थितिपदं लभत इति।** —योगभाष्य ॥

**किंबहुना यदेवाभिमतं हृदि हरिहरमूर्त्यादिकं तदेवादौ ध्यायेत्।** —भावागणेशवृत्ति.

**किंबहुना यदेवेष्टं शिवरामकृष्णादिरूपं तदेव ध्यायेत् तत्र लब्धस्थितिकं अन्यत्रापि स्थितिं लभते।** —मणिप्रभा

वरील तीन्ही वाक्यांचा मथितार्थ असा आहे कीं चित्तस्थैर्याकरितां हरी, हर, राम इत्यादि कोणत्याही देवाचें शास्त्रमान्य असें प्रतीक ठेवून त्याचें ध्यान करावें. या साधनानें चित्ताची एकाग्रता साधली व त्याला स्थैर्य आलें तर त्याचा उपयोग अन्यत्रही होतो.

(५७८) **मूर्ति हें साधनः**—यावरून मूर्तिपूजा ही प्रथम चित्त-स्थैर्याचें एक साधन म्हणून आली असें दिसतें. मूर्तिपूजा हें साध्य नसून तें उपासनेचें साधन आहे. सर्वव्यापी तत्त्वाचें आकलन मनाला होत नसल्यामुळें बाह्य प्रतीकाची आवश्यकताही आहे. प्रशांत स्थानीं मनाची एकाग्रता साधावी व चित्तप्रसन्नता लाभावी म्हणून मूर्तीचें ध्यान व त्याकरितां देवघराचें स्थान, अशी कल्पना निघाली. बाह्य षोडशोपचार-पूजेचा या मुख्य ध्येयाशीं कांहीं संबंध नाहीं. आज पुष्कळ घरांतील देव्हाऱ्यांत वीसपंचवीस देवांची गर्दी, एकाच देवाच्या अनेक मूर्ति आणि त्यांच्या पूजाअर्चा हा प्रकार दिसतो. तो मुख्य हेतूस धरून नाहीं. त्यापेक्षां प्रत्येक घरांत एक स्वच्छ व प्रसन्न देवघर, तेथें ध्यान व धारणा करण्यास प्रसन्नता आणि त्या देवघरांत एकाच देवाची सुंदरशी मूर्ति अशी योजना

असावी. उदबत्ती लावून, फुलें वाहून तेथें कांहीं काल चित्तस्थैर्यार्थ एकांतवास अवश्य स्वीकारावा.

(५७९) देवविडंबनः—आज समाजांत ज्या स्वरूपांत देवपूजा चालू आहे, तें एका दृष्टीनें विडंबनच आहे. दारिद्र्यामुळें पुष्कळ घरांना देवघरें नसतातच व जेथें तीं आहेत तेथें देव सोंवळा म्हणून प्रपंचांतील अनेक सोंवळ्या (लोणचें, शेवया, सांडगे, पापड इत्यादि) पदार्थांनीं देवघरांतच ठाणें दिलेलें असतें. देवघरें हीं खालीं अस्वच्छ, वर जळमटें, कोंपऱ्यांत केर अशींच बहुतेक आढळतात. हें पावित्र्यविडंबन होय!

पूजा करतांना मौन धारण करणें, मध्येंच मुलगा रडूं लागला कीं त्याला 'मार दे,' असें सांगण्याकरितां बाळकृष्णावर पळी मारून दाखविणें, अनेक देवांची गर्दी करून आपल्या इष्ट देवाला धूप, दीप, नैवेद्याचा आस्वाद कमी मिळेल म्हणून इतर देवांचीं तोंडें बाजूस करणें, देवपूजेचा स्वतःला कंटाळा म्हणून मुलावर पूजेची सक्ति करणें, त्यानें ती कटकट नाहींशी करण्याकरितां सर्व देव रोवळींत घालून धुतां धुतां एक स्वर्गवासी झाल्याची वार्ता देऊन वर्षभर पूजेच्या त्रासांतून मुक्त होण्याची युक्ति करणें वगैरे सर्व प्रकार विडंबनाचे होत. म्हणून वर सांगितल्याप्रमाणें चित्तस्थैर्यार्थ मूर्तिपूजेचा प्रचार रूढ व्हावा. *

(५८०) 'भावेन देवं':—सांख्यप्रक्रियेप्रमाणें हें जग त्रिगुणात्मक मानलें गेलें. या त्रिगुणांच्या ब्रह्मा, विष्णु, महेश अशा मुख्य देवता रूढ झाल्या आणि इतरही अनेक देव प्रकृतिस्वभावधर्माप्रमाणें हिंदुसमाजांत मानण्यांत येऊं लागले. राम, कृष्ण, गणेश, शंकर, मारुती हे पांच देव किंवा ग ना शं र दे, गणेश, नारायण, शंकर, रवि व देवी असें पंचायतन रूढ झालें. सांप्रत शिव, विष्णु, शंकर, गणेश आणि त्यांच्या पंचायतनांतील मूर्तींची किंवा शाळिग्राम, नर्मदा, गणपती, बाण इत्यादि पाषाणांची ईश्वराचें प्रतीक समजून पूजा करण्यांत येते. प्रतीकाचे ठिकाणीं भक्ताचा भाव पाहिजे म्हणूनच 'भाव तोचि देव, 'पाषाण देव, पाषाणं पाहिरी' "भावेन देवं' अशी भाषा योजतात.

---

* पं. कोकजेकृत 'नवा आचारधर्मा'तील मूर्तिपूजा प्रकरण पहा.

(५८१) **मूर्तींत जीव येतो काय ?**:–कोणत्याही देवाची मूर्ति म्हणजे तें प्राचीन, वीर, विद्वान्, कर्त्या व मुत्सद्दी पुरुषांचें प्रतीक होय. प्रतीक म्हणजे देव नव्हे. ' न प्रतीके न हि सः' असें ब्रह्मसूत्र आहे. म्हणजे प्रतिकांत देव नसून तो उपासकाच्या भावनेंत असतो. वेदमंत्रांनीं मूर्तीच्या ठिकाणीं प्राणप्रतिष्ठा केली म्हणजे भक्ताची भावना उत्तेजित होते. पण त्यामुळें त्या मूर्तिमध्यें वा प्रतीकामध्यें जीव येतो अथवा अद्‌भुत सामर्थ्य येतें असें मात्र नव्हे. मूर्तींवर जडजवाहिर घालून निष्ठेनें उपासना केली म्हणजे मूर्ति भक्ताला श्रीमंत करते, असेंही नाहीं. तंत्रग्रंथांत मृत्तिका, लोह, ताम्र, रौप्य व सुवर्ण इत्यादिकांच्या मूर्ती करून त्यांची आराधना केल्यास यथानुक्रम विशिष्ट फळें मिळतात, असें जें वर्णन आहे तो अर्थवाद आहे. धातु, काष्ठ, पाषाणाची मूर्ति कांहीं देऊं शकत नाहीं, भक्तांनीं तिजवर आपल्या भावनेनें केवढ्याही सामर्थ्याचा आरोप केला तरी ती निर्जीव मूर्ति निर्जीवच असते. भक्त आपल्या वीरभावनेचा आविष्कार देवाच्या हातांत दुष्ट-संहाराचीं आयुधें चक्र, गदा, त्रिशूळ, सुदर्शन देऊन करील. पण त्यामुळें स्वतः मूर्ति हातांतील तरवारीनें दुष्टाचा गळा कापणार नाहीं, किंवा त्यावर गदाही फेकणार नाहीं. हें सर्व भक्तांनींच करावयाचें असतें. भक्त जें जें कर्म करील त्याला कर्मसापेक्ष नियतिनियमाप्रमाणें फल मिळतच असतें. न होऊन ती मूर्ति स्वतः कांहीं करीत नाहीं.

(५८२) **मूर्ति हें अभिमानस्थान**:–पूर्वीं अहिंदूंनीं हिंदूंच्या सुप्रसिद्ध देवालयांवर आक्रमण केलें त्यावेळीं मूर्ति पाहून घेईल, ईश्वर पाहून घेईल, आपल्या मूर्तींत अद्‌भुत सामर्थ्य आहे अशा कल्पनेनें हिंदूंनीं प्रतिकार केला नाहीं. त्यावेळीं मूर्तीनें काय केलें नि मूर्तींत सामर्थ्य कुठें दिसलें याची साक्ष इतिहास देतच आहे. मूर्तींवर आक्रमण करणाऱ्यांची मूर्तींचा अपमान करावा अशी वृत्ति नव्हती. ज्या समाजाचे ते देव, त्यांचा अपमान करण्याकरितां आणि द्रव्याच्या लुटीकरितां तीं आक्रमणें होतीं. मूर्तींत चैतन्य नसलें, प्रतीकांत सामर्थ्य नसलें तरी तीं प्रतीकें त्या त्या समाजाचीं अभिमानस्थानें असतात. आज इंग्रजी राज्याचा प्रतिनिधि जो बादशाहा वा व्हाईसरॉय त्यांच्या पुतळ्याला जर कुणीं डांबर फांसलें तर तो त्या निर्जीव पुतळ्याचा अपमान न समजतां ब्रिटिश साम्राज्याचा

अपमान समजला जातो, म्हणून गुन्हेगारांना शोधून कडक शिक्षा देण्यांत येते. पण त्याउलट पोस्टखातें दररोज राजाराणीच्या मुखवट्यांवर शिक्के मारमारून ते काळे करीत असलें किंवा ज्युडिशियल डि. कोर्ट फी स्टांपांतले मुखवटे कापूनच काढीत असले तरी त्या खात्यांतील नोकरांना मुळींच शिक्षा होत नाहीं! या उलटसुलट उदाहरणांवरून मूर्ति किंवा प्रतीक हा भावनेचा विषय कसा आहे याची कल्पना येईल.

**(५८३) भावना व तिचें सामर्थ्यः**—भावना ही एक मनाची शक्ति आहे. तिला कांहीं प्रमाणांत महत्त्व आहे. मानसोपचारानें पुष्कळ रोग कांहीं प्रमाणांत बरे होतात. जिवंत समाजामध्यें तीव्र, उत्कट व जळजळीत भावना असतात, त्यांचा आरोप तो आपापल्या देवावर करतो, म्हणून देवही जाज्वल्य असतात. मुमूर्षु समाजांत मिळमिळित व भोळसट भावना असतात, त्यांचाही आरोप तो आपल्या देवावर करतो, म्हणून देवही मिळमिळित असतात. जळजळीत भावनेचे लोक तेजस्वी व ओजस्वी असतात आणि मिळमिळीत भावनेचे लोक उदास व हताश असे असतात! एखादा भोळसट भक्त कितीही उत्कट भावनेनें खटल्यांत जय मिळावा म्हणून मूर्तीचें डोकें धरून बसेल, मुलाचा आजार जावा म्हणून सारखा अभिषेक करीत बसेल, आपत्ति आली कीं तिच्या निवारणार्थ देवाच्या दारीं धरण धरून बसेल तर भावनेच्या औत्कट्यामुळें या गोष्टी घडतील असें नाहीं. चित्तैकाग्र्यामुळें त्याच्या मनाला शांति मिळेल, त्याला उपाय सुचेल व त्यामुळें त्याला यशही येईल. प्रयत्नविहीन अशा केवळ भावनेनें कांहीं होणार नाहीं. तसें झालें तर अत्यंत दरिद्री मनुष्य केवळ भावनेनें श्रीमंत होऊं शकेल, अविद्वान् विद्वान् होऊं शकेल आणि दुर्बळ प्रबळही होऊं शकेल! परंतु तसा अनुभव नसल्यामुळें धातुपाषाणांच्या मूर्तींच्या ठिकाणीं भावनेनें अद्‌भुत सामर्थ्याचा आरोप करणें सर्वस्वी चुकीचें आहे. मंदिरांतील मूर्ति कधीं धांवून गेल्याचें नि पराक्रम केल्याचें उदाहरण ना दृष्ट ना श्रुत! म्हणून ही भोळी कल्पना नव्या हिंदुधर्माला सर्वस्वी अग्राह्य आहे.

**(५८४) कृति म्हणजे भक्तिः**-मंत्रकालीन यज्ञसंस्था मागें पडल्यावर तंत्रकालामध्यें मूर्तिपूजेचा नि नवविधा भक्तीचा प्रचार चालू झाला. म्हणून

श्रवण, कीर्तनादि जी नवविधा भक्ति आज लोकांत समजण्यांत येते तिचाही विचार करणें भाग आहे. अवतारी पुरुषांचीं चरित्रें ऐकणें, त्यांचें मनन करणें, तीं दुसऱ्यांना सांगणें यांचा व्यक्तीच्या चारित्र्यावर कांहीं प्रमाणांत खास उपयोग होतो. परंतु केवळ नामसंकीर्तन, स्तुतिगान, नाममहिमा हाच जो भक्तीचा प्रचार अट्टाहासानें सांगण्यांत येतो तो अग्राह्य आहे. हिंदुसमाजांत आज स्तुति म्हणजे भक्ति अशी कल्पना रूढ आहे. तिच्या जागीं 'तस्मात् सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च' या गीतोक्तीप्रमाणें ईश्वरस्मरणपूर्वक कृति करणें म्हणजे भक्ति, अशी कल्पना रूढ केली पाहिजे. ईशस्मरणपूर्वक सतत कर्तव्यकर्म करीत राहाणें हेंच ईश्वरपूजन व हीच भक्ति होय.

(५८५) मातृपितृभक्तः–'सा परा अनुरक्तिः ईश्वरे' ईश्वराविषयीं जें उत्कट प्रेम त्याला भक्ति म्हणतात. मातेबद्दल उत्कट प्रेम असणारा मातृभक्त, तर पिता, गुरु व देश यांविषयीं उत्कट प्रेम धारण करणारा अनुक्रमें पितृभक्त, गुरुभक्त व राष्ट्रभक्त ठरतो. प्रेम ही एक भावना असली तरी तीही निष्क्रिय असूं शकत नाहीं. प्रेमाचें पर्यवसान शेवटीं कृतींतच होतें! मातृभक्त मुलगा आईनें सांगितलेलें काम न करितां जर 'थोर तुझे उपकार' म्हणून आईची स्तुति करील वा 'दुर्गे दुर्घट भारी' म्हणून जर आरती ओवाळील तर ती मातृभक्ति होईल काय? एखादा प्रौढ मुलगा पितृभक्तीच्या प्रदर्शनार्थ सकाळीं स्नान करून बापापुढें जाऊन बसेल आणि गंधपुष्पादिकांनीं जर पितृपुजा करूं लागेल तर ती भक्ति नसून तो भाजाकार आहे, असेंच त्या पित्याला वाटेल ना? गुरूबद्दल आदर ठेवून अभ्यास करणारा मुलगाच जसा गुरुभक्त किंवा पतीची आदरानें केवळ स्तुति न करितां सेवा करणारी जशी पतिव्रता तसाच कर्तव्यानें जो ईश्वराची पूजा करतो, तोच ईश्वरभक्त होय.

अपहाय निजं कर्म कृष्ण कृष्णेऽति वादिनः।
ते हरेर्द्वेषिणः पापाः धर्मार्थं जन्म यद्धरेः॥ –विष्णुपुराण

स्वकर्तव्य सोडून 'हरि हरि' म्हणत बसणारे लोक हे हरीचे द्वेष्टे व पापी होत; कारण हरीचा जन्म धर्मरक्षणादि कर्में करण्याकरितां असतो.

(५८६) रामकृष्णादींची भक्तिः—स्वकर्तव्य सोडून देवाच्या नांवानें केवळ आरडाओरड करणारे आज पुष्कळ भक्त दिसतात. त्यांनीं या स्तुतिभक्तीचा त्याग करून कृतिरूपी भक्तीचा स्वीकार केला पाहिजे. आज हिंदुसमाजांत असंख्य रामभक्त आहेत. केवळ रामनामोच्चारानें ते स्वतःला कृतार्थ समजतात; पण श्रीरामचंद्रानें स्वस्त्रीला पळवून नेणाऱ्या दुर्जनाचा प्राण घेतला व आर्यसंस्कृतीचा ध्वज लंकेवर रोवला, हें विसरून रामभक्ति होईल काय? जोंवर हिंदुसमाजांतील स्त्रियांवर आक्रमणें होत आहेत, आणि त्या आक्रमकांचा प्रतिकार करण्याची वृत्ति जाज्वल्यतेनें रामभक्तांमध्यें उत्पन्न झालेली दिसत नाहीं, तोंवर ती रामभक्ति नसून तें रामाचें विडंबन आहे! श्रीकृष्णाच्या उपासकांनीं जोंवर समाजामध्यें कर्मयोग रूढ झाला नाहीं, श्रीकृष्णाचा मुत्सद्दीपणा समाजांत आलेला आढळत नाहीं तोंवर कृष्णभक्ति विफल झाली असेंच समजलें पाहिजे. श्रीकृष्णानें आपल्या सुदर्शनानें आततायींचा वध केला आणि तो करण्यांत मुळींच पातक नाहीं असें सांगितलें. हिंदुसमाजाला ताप देणारे जे अनेक आततायी आहेत त्यांचा प्रतिकार अटीतटीनें जोंवर होत नाहीं, तोंवर कृष्णनामोच्चाराला कवडीचीही किंमत नाहीं! श्रीशंकर ही तर रुंडमाला धारण करून दुर्जननिषूदन करणारी संहारकर्ती देवता आहे. शंकरभक्तांनीं नुसता बेल वाहून 'बु बु बु' म्हणून मुख वाजवून शंकरभक्ति न करतां शंकराप्रमाणें शस्त्रास्त्रविद्येचा अभ्यास करून ती विद्या समाजांत आणली पाहिजे. नित्यपाठांत असलेल्या शिवकवचामध्यें शंकराच्या हातीं अनेक आयुधें दिलीं आहेत. ऐतिहासिक दृष्ट्या शंकर हा शस्त्रास्त्रविद्येमध्यें मोठा प्रवीण पुरुष होता, असें दिसतें. हिंदुधर्मांतील देवी आणि देव हे सर्व सशस्त्र, सायुध आणि सशक्तिक आहेत. त्यांत निःशस्त्र, निरायुध, निर्बल असा एकही देव नाहीं. अशा देवतांचे उपासक जे हिंदु त्यांनीं आपल्या देवतेच्या भक्तीकरितां सशस्त्र व सशक्तिक व्हावयास नको काय? देवाची केवळ स्तुति म्हणजे भक्ति नसून तदनुकूल स्वतः कर्म करणें म्हणजे भक्ति आहे, हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

(५८७) कर्तव्यकुसुम व ईश्वरपूजनः—श्रीकृष्णानें गीतेच्या उपसंहारांत

**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः ॥**

—गी. अ. १८ श्लो. ४५

स्वकर्मरूपी कुसुमानें सर्वात्मक परमेश्वराची पूजा करावी, ती केली असतांना तो संतुष्ट होतो, असें म्हटलेलें आहे. केवळ स्तवन ही भक्ति नसून कृति हीच भक्ति होय. मुलांना विषय उत्तम तऱ्हेनें शिकविणें ही शिक्षकाची भक्ति, रोग्यांची चांगली चिकित्सा करून अचूक औषध देणें, ही वैद्याची भक्ति, दोन्ही बाजू नीट ऐकून घेऊन योग्य न्याय देणें, ही न्यायाधिशाची भक्ति नि प्रजेच्या सर्व अडचणी लक्षांत घेऊन तिच्या उन्नतीकरितां झटणें ही राजाची भक्ति होय. आजच्या कालांत हिंदुराष्ट्र व हिंदुसमाज हे ईश्वराचे प्रतीक समजून त्यांच्या उन्नतिप्रीत्यर्थ निरनिराळ्या द्वारानें यत्न करणें हीच खरी ईश्वराची भक्ति होय. पूर्वी यज्ञ व देवपूजा हीं ईश्वरभक्तीचीं साधनें होतीं, आज हिंदुराष्ट्रसेवा हीच ईश्वराची भक्ति आहे.

**(५८८) ईश्वर बुद्धि देतोः**—कलियुगांत नाम हेंच मोक्षाचें साधन आहे. ‘ मुखीं नाम हातीं मोक्ष ’ ‘ नामाच्या चिंतनें । बारा वाटा पळती विघ्नें ’ असें नाममाहात्म्य साधुसंतांनीं मराठीमध्यें व भागवतादि संस्कृत ग्रंथांतही प्रतिपादन केलेलें आहे. पण तो सर्व अर्थवाद आहे. ईश्वरस्मरणपूर्वक कर्म करावें एवढाच त्याचा अर्थ आहे. गीतेंत भगवान् ‘ **मामनुस्मर युध्य च** ’ म्हणजे स्मरणपूर्वक कर्म कर असें सांगतो. कारण ईश्वरविस्मरण झाल्यास उन्मत्तपणा येईल आणि कर्मच्युति झाल्यास व्यवहारांत अपकर्ष होईल. ऋग्वेदामध्यें ‘ **न ऋते श्रांतस्य सख्याय देवाः ।** ’ असें वचन आहे. त्याचा अर्थ देव हे कष्ट नि प्रयत्न करणाऱ्याच्या मैत्रीचीं इच्छा करतात, ( God helps those who help themselves ) असा आहे. केवळ स्तुतीनें नि नामघोषानें कार्य होत नाहीं, तर तदनुकूल कृति करावी म्हणजेच तें होतें.

प्रसन्न मनानें व चित्तैकाग्र्यानें नामस्मरण व जप केल्यास तें अन्तःकरणाच्या शुद्धीस उपकारक होतें. मनन, मानसपूजा, ध्यान हीं शुद्ध अन्तःकरणानें केल्यास मनाला एक प्रकारचा उत्साह वाटतो व वृत्तींतही बदल होतो. शुद्ध सत्त्ववृत्तीचा उदय झाला तर एकांतामुळें मनुष्याला

उपाय सुचतो, युक्ति सुचते व यत्न करून तो यशस्वी होतो. यालाच परमेश्वर बुद्धि देतो, 'ददामि बुद्धियोगं तं' ( गी. अ. १० श्लो. १० ) असें म्हणतात. परमेश्वर भक्ताचें रक्षण करतो म्हणजे त्याला तशी बुद्धि देतो, असें भारतांतही सांगितलेलें आहे.

न देवा दंडमादाय रक्षंति पशुपालवत् ।
यं तु रक्षितुमिच्छंति बुद्धया संविभजन्ति तम् ॥

—म. भा. ५।३५।४०

(५८९) **भोळसटपणा व भक्तिः**—देवभोळेपणा म्हणजे भक्ति नव्हे. जगांत जी जी घटना घडते तिला कारण देवाची लहर, राग वा लोभ असें समजून देवाला प्रसन्न करून घेण्याकरितां भक्तीच्या नांवाखालीं लोक अनेक प्रकार करतात. पाऊस पडत नाहीं म्हणून ऋग्वेदांतील मंडुक-सूक्त म्हणून देवाची आराधना करतात, कोणी महादेवावर संततधार धरतात, कोणी त्याला सातसात दिवस बुडवून ठेवतात, त्यांना या कर्मांनीं पाऊस पडेल असें वाटतें. नौका व बोटी बुडूं लागल्या कीं कोणी वरुणसूक्त जपून, नारळ वाहून करुणा भाकतात ! प्लेग आला, महामारी आली कीं बोकड व कोंबडीं देण्याची प्रथा पुष्कळ ठिकाणीं आढळते.

एकदां नाना फडणिसांनीं काशीस कर्मनाशा नदीवर पूल बांधविण्याचें काम चालू केलें. पण वाळू नि पाणी यांमुळें पाया कांहीं टिकेना. नानांच्या हस्तकांनीं गंगामाईला प्रसन्न करून घेण्याकरितां अनुष्ठान चालू केलें. अनुष्टुप् श्लोकांची भर घालून ते ब्राह्मण थकले. कांहीं केल्या पाया धर धरेना, पाणी आटेना. ही बातमी नानांना कळतांच त्यांनीं टाकोटाक हस्तकाला लिहिलें कीं 'प्रथम अनुष्ठानें बंद करा. इंग्रजाकडून कलकत्त्याहून बेकर नामक इंजीनिअर नि यंत्रें आणवा. त्याप्रमाणें बंब व यंत्रें येतांच तीं लागू पडलीं व पाया उभारला ! गंगामाईच्या अनुष्ठानानें जें होऊं शकलें नाहीं, तें यंत्रानें म्हणजे योग्य यत्नानें झालें. विज्ञानप्रणीत शास्त्राधारें योग्य यत्न करणें हा नवभक्तीचाच प्रकार होय.

(५९०) **नवस व देवः**—देवाला मागून घेणें, नवस करणें त्या-करितां सायास करणें हाही भाबड्या भक्तीचाच एक प्रकार आहे. देव हा

कांहीं असा लाचखाऊ प्राणी नाहीं कीं त्याला कांहीं देतों म्हटलें कीं तो प्रसन्न होतो ! पैशाची खडीसाखर दिली कीं तो मुलाची परीक्षा पास करतो! तीन दिडक्यांचा नारळ फोडला कीं तो रोग बरा करतो नि नवस मागून घेतला कीं तो पुत्र देतो! हें सर्व यत्नानें म्हणजे कर्मानेंच मिळतें. वास्तव नाममहात्म्य, नवससायास, स्तोत्रें इत्यादि सर्वांच्या फलश्रुत्या अर्थवादात्मक आहेत, असें समजून वागावें.

(५९१) भडक फलश्रुत्या:—नामाचा महिमा जुन्या हिंदुधर्मांत इतका आक्रोश करून सांगितला आहे कीं त्याविषयीं अश्रद्धाच उत्पन्न होते. जशा भडक जाहिराती वाचून त्याबद्दल संशय उत्पन्न होतो, तसाच संशय या नाममहात्म्याबद्दल येतो. ‘ प्रणम्य शिरसा देवं ’ या स्तोत्रांत गणपतीचीं बारा नांवें सांगितलेलीं आहेत. सकाळ–संध्याकाळ हीं जो बारा नांवें म्हणेल, त्याला फल काय तर,

विद्यार्थी लभते विद्यां धनार्थी लभते धनं ।
पुत्रार्थी लभते पुत्रं ... ... ॥

केवळ बारा नांवांच्या उच्चारानें जर विद्या, धन आणि पुत्रप्राप्ति होत असेल तर अभ्यास, उद्योग व विवाहसंबंधही करण्याचें कारण उरणार नाहीं ! गणपतिअथर्वशीर्षाच्या पूर्वार्धांत गणपतीची स्तुति आहे आणि उत्तरार्धांत फलश्रुतीचें लांबलचक वर्णन आहे. तें इतकें कीं त्यावर कोणाचाही विश्वास बसणें शक्य नाहीं. सत्यनारायणासारख्या व्रतांचीही अशी अर्थवादात्मक भरमसाट स्तुतीच केलेली आहे. शनिमहात्म्य, शिवलीलामृतादि ग्रंथ श्रद्धेनें शनिवारीं व सोमवारीं वाचणारे पुष्कळ लोक आहेत. त्यांच्या शेवटींही अशाच भरमसाट फलश्रुत्या आहेत.

‘ रोचनार्था फलश्रुतिः । ’ रोचना म्हणजे बरें वाटणें हा अर्थ ज्यामध्यें असतो ती फलश्रुति होय ! लहान मूल काढा घेत नाहीं म्हणून तो घेतलास तर तुझें नाक सरळ होईल असें जें रोचक बोलणें, तसा हा अर्थवाद आहे. हा अर्थवाद सर्वत्र कसा भरलेला आहे व त्यांतील अदृष्टाच्या कल्पनेवर समाजाला कसा गुंगारा मिळाला आहे याची कल्पना व्यंकटेशस्तोत्र व गुरुचरित्र यांवरून येते. दक्षिण महाराष्ट्रांत भक्तिरसानें ओथंब-

लेलें व्यंकटेशस्तोत्र म्हणण्याचा जसा परिपाठ आहे तसाच सरस्वती गंगाधरानें लिहिलेला गुरुचरित्र हा ग्रंथ सोंवळ्यानें वाचण्याचा प्रघात आहे. त्यांतील फलश्रुत्या पहा—

इच्छा धरूनि करील पठण। त्याचें सांगतों मी प्रमाण। सर्व कामनेसीं साधन। पठण एकमंडळ ॥९२॥ पुत्रार्थी यानें तीन मास। धनार्थी यानें एकवीस दिवस। कन्यार्थी यानें षण्मास। ग्रंथ आदरें वाचावा ॥ ९३ ॥ क्षय, अपस्मार कुष्टादि रोग। इत्यादि साधनें प्रयोग। त्यासी एक मंडळ सांग। पठणें करूनि कार्यसिद्धि ॥ ९४ ॥

—व्यंकटेशस्तोत्र

ज्यास पुत्रपौत्रीं असे चाड। त्यासी कथा हे असे गोड। लक्ष्मी वसे अखंड। तया भुवनीं परियेसा ॥ ५४ ॥ ऐसी कथा जयाचे घरीं। वाचिती नित्य प्रेमभरीं। श्रियायुक्त निरंतरीं। नांदती पुत्रकलत्रयुक्त ॥५५॥ रोग नाहीं तया भुवनीं। सदा संतुष्ट गुरुकृपेंकरोनी। निःसंदेह सातां दिनीं। ऐकतां बंधन तुटे जाणा ॥५६॥ ऐसी पुण्यपावन कथा। सांगेन ऐक विस्तारता। सायासाविण होय साध्यता। सद्यः फल प्राप्त होय ॥५७॥

—गुरुचरित्र अ. १

(५९२) सूर्योपासनाः—षोडशोपचारांनीं देवपूजा करणें, नाममहात्म्याच्या अर्थवादांत घुटमळत पडणें, या दोहींपेक्षां अखिल हिंदूंना कोठेंही करण्यास सोयीस्कर असा सूर्योपासनेचा मार्ग आहे. सूर्यदेवतेला वैदिक परंपरेमध्यें फार महत्त्व आहे. ती परब्रह्माचें प्रतीक व तेजाचें अधिष्ठान आहे. गायत्रीमंत्र जपून प्रतिदिनीं सूर्योपासना करणें हें अखिल हिंदूंना शक्य, सुलभ आणि सुकर आहे. सकाळीं व सायंकाळीं सूर्योदय व सूर्यास्तसमयास हातपाय धुवून प्रसन्न मनानें अनुक्रमें पूर्वेस व पश्चिमेस तोंड करून उभ्यानें वा बसून प्रवासांतही गायत्रीमंत्राचा फक्त पांच वेळ जप करणें अत्यंत सुलभ आहे. यज्ञामध्यें जपयज्ञ श्रेष्ठ होय. सूर्य हें दैवत प्रत्यक्ष आहे. त्याचें दर्शन अखिल हिंदूंना केव्हांही व कोठेंही प्रतिबंधाविना होतें. ऋक्संहितेच्या

सर्वानुक्रमामध्यें 'सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च' हें प्रमाण देऊन सर्व देवतांचा अंतर्भाव सूर्य या एकाच देवतेंत होतो असें स्पष्ट म्हटलें आहे. सूर्य हा स्थावरजंगम जगताचा आत्मा आहे. तेज, उष्णता व गति यांचा आजच्या भौतिक शास्त्राच्या दृष्टीनें अत्यंत निकट संबंध आहे. यास्तव सूर्य हें विश्वाचें जीवन आहे.

**अग्नौ क्रियावतां देवो दिवि देवो मनीषिणाम् ।**
**प्रतिमा स्वल्पबुद्धीनां योगिनां हृदये हरिः ॥**

प्राचीन काळीं विचारवंतांचा देव द्युलोकांत असतो, असें म्हणून सूर्याचेंच महात्म्य वर्णिलेलें आहे. यास्तव अखिल हिंदूंनीं समष्टिधर्म म्हणून गायत्रीमंत्राचा जप करून सूर्योपासना करावी. सूर्य ही आरोग्याची देवता आहे. 'आरोग्यं भास्करादिच्छेत् ।' ज्या घरांत सूर्याचे किरण यथेच्छ विहार करतात तेथें रोगाचा प्रवेश होत नाहीं, हें अनुभवसिद्ध आहे. यास्तव द्वादश नमस्कारांच्या कांहीं आवृत्त्या श्रीसूर्यनारायणास समर्पण करून शारीर तपश्चर्या करावी. अखिल हिंदूंचा उपनयन हा जो प्रमुख संस्कार त्यांतही सूर्योपासना आहे. नित्यसंध्येंत आणि मुख्यतः गायत्री-मंत्रांतही सूर्योपासनाच आहे. नमस्कार हा सर्व दृष्टीनें आबालवृद्धांस उत्तम व्यायाम आहे, असें श्रीमंत राजे बाळासाहेब औंधकर आणि इतर तज्ञ स्वानुभवानें सांगत आहेत. जोर बैठका काढणें व सूर्यदर्शन घेऊन अर्घ्यें देणें ही व्यायामद्वारां सूर्योपासनाच होय! जुन्या पिढींतील मराठे अशी सूर्योपासना करीत असत. आज अखिल हिंदूंनीं व्यायामयुक्त सूर्योपासना करावी.

**(५९३) सामुदायिक प्रार्थनाः**-अखिल हिंदूंनीं समष्टिधर्म म्हणून जशी सूर्योपासना करावी, तशीच सामुदायिक प्रार्थनाही स्वच्छ, सुंदर व प्रसन्न अशा देवालयामध्यें जाऊन अवश्य करावी. जुन्या हिंदुधर्मांत अखिल हिंदूंची एक प्रार्थना, एक मंत्र, एक ग्रंथ अशी व्यवस्था नाहीं. प्रत्येकाचे सवते सवते सुभे व तुटक तुटक वागणें, यामुळें समाजसंघटनेला बाध येतो. आज वर्णनिरपेक्ष, जातिनिरपेक्ष अखिल हिंदूंची हिंदुत्वनिष्ठेवर संघटना व्हावयास हवी आहे. अखिल हिंदु बरोबरीच्या नात्यानें एका भूमिकेवर येण्यास सामुदायिक प्रार्थनेशिवाय दुसरा मार्ग नाहीं. सामुदायिक प्रार्थनेकरितां पुढारलेले, मागासलेले, शिक्षित, अशिक्षित, स्पृश्य, अस्पृश्य,

लहान, थोर, बाल, वृद्ध असे सर्व लोक एकत्र यावेत. आपण अखिल हिंदु एक आहों, आपले हितसंबंध एक आहेत, आपणां सर्वांचा देव एक आहे, हिंदु राष्ट्राचा उद्धार हें एकमेव ध्येय सर्वांचें आहे, अखिल हिंदूंचा विचार एक, स्फूर्ति एक, मति एक अशा भावनेनें अखिल हिंदूंनीं सामुदायिक प्रार्थना करावी.

**चत्वार एकस्य पितुः सुताश्च, तेषां सुतानां खलु जातिरेका ।**
**एवं प्रजानां हि पितैक एव पित्रैकभावान्न च जातिभेदः ॥**

—भविष्यपुराण ब्रा. अ. ४२ श्लो. ४५

एकाच पित्याचे चार पुत्र, त्या सर्वांची जात एकच. तद्वत् अखिल हिंदूंचा पिता एकच; त्यामुळें अखिल हिंदूंची एकजाति आहे, अशा भूमिकेवरून निःसंकोचपणें ही सामुदायिक प्रार्थना अखिल हिंदूंनीं कोणत्याही हिंदुत्वनिष्ठ संस्थेच्या वतीनें वा स्वातंत्र्यानें एखाद्या देवालयांत करावी. स्पृश्य हिंदूपुरती ही सोय भजन व कीर्तन यांचेद्वारां आहे. तेथेंच यापुढें पूर्वास्पृश्यासह ही प्रार्थना सर्वांनीं करणेची प्रथा पाडली पाहिजे. सामुदायिक प्रार्थना जमल्यास रोज सकाळीं व सायंकाळीं दोन वेळां करावी. हें न जमल्यास दर रविवारीं, दर एकादशीस, दर अमावास्येस अशी केव्हांही करावी. या सामुदायिक कार्यक्रमाची हिंदुसमाजाला संवय लावली पाहिजे. सामुदायिक प्रार्थना ही शक्य तो देवालयांतच व्हावी. अहिंदु जसे आपापल्या देवस्थानांत या निमित्तानें जमतात, तसें हिंदूंनीं आपल्या देवालयांत निदान देवालयाच्या आवारांत, मंडपांत जेथें सर्वांचा सहज प्रवेश असेल, अशा ठिकाणीं जमून प्रार्थना करण्याचा उपक्रम करावा. सामुदायिक प्रार्थना कोणती असावी, ती कशी करावी, हा आतां प्रश्न उरलेला नाहीं. धर्मनिर्णयमंडळानें अखिल हिंदूंकरितां सामुदायिक प्रार्थना वेदमंत्रयुक्त सिद्ध केली आहे. तिचा प्रचार ठिकठिकाणीं प्रार्थनामंडळें स्थापून कार्यवाह पं. तर्कतीर्थ कोकजेशास्त्री ( वास्तव्य लोणावळें ) यांनीं चालविला आहे. अनेक प्रार्थनामंडळांमध्यें जो हा उपक्रम चालू आहे, त्याचें . अनुकरण अखिल हिंदूंनीं ठिकठिकाणीं करावें. प्रार्थनेच्या शेवटीं पुढें दिलेलें ' हिंदूंच्या एकतेचें गान ' म्हणावें.

(५९४) हिंदूंच्या एकतेचें गानः—

तुम्ही आम्ही सकल हिंदु । बंधु–बंधु ॥
तो महादेवजी पिता आपुला चला तया वंदूं ॥ ध्रु० ॥
ब्राह्मण वा क्षत्रिय चांग । जरि झाला ॥
कसलेंहि रूप वा रंग । जरि त्याला ॥
तो महार अथवा मांग । सकलांला ॥
ही एकच आई ‘ हिंदुजाति ’ आम्हांस तिला वंदूं ॥१॥
एकचि देश हा आपुल्या । प्रेमाचा ॥
एकचि छंद जीवाच्या । कवनाचा ॥
एकचि धर्म हा आम्हां । सकलांचा ॥
ही हिंदु जातिची गंगा, आम्ही तिचे सकल बिंदु ॥२॥
रघुवीर रामचंद्राचा । जो भक्त ॥
गोविंदपदांबुजिं जो जो । अनुरक्त ॥
गीतेस गाउनी पूजी । भगवंत ॥
तो हिंदुधर्म–नौकेंत बसुनियां तरतो भवसिंधु ॥३॥
उभयांनि दोष उभयांचे । सोडावे ॥
द्वेषासि, दुष्ट रूढीसी । सोडावें ॥
सख्यासि आइच्यासाठीं । जोडावें ॥
आम्हि अपराधांसि विसरुनि, प्रेमा पुन्हां पुन्हां सांधूं ॥४॥
लेंकुरें हिंदु जातीचीं । हीं आम्हीं ॥
आमुच्या हिंदुधर्मासी । त्या कामीं ॥
प्राणहि देउनी रक्षूं । परिणामीं ॥
या झेंड्याखालीं पूर्वजांचिया एकाची नांदूं ॥५॥

—वि. दा. सावरकर.

(५९५) आदर्श मंदिरः—प्रथम हें लक्षांत ठेवलें पाहिजे की अहिंदूंच्या धर्मांत जेवढें देवस्थानांचें महत्त्व आहे तेवढें हिंदुधर्मांत नाहीं.

अहिंदूंचीं देवस्थानें प्रत्येक रस्त्यावर वाटेल तेथें उद्भूत होतील. हिरवें फडकें उभें केलें व दगडाला अगर भिंतीला चुना फासला कीं झालें देवस्थान! ही आपत्ति टाळण्याकरितां हिंदूंनीं जागृतपणानें सदण्ड, सायुध, सशक्तिक अशा सिद्धतेनें आपल्या देवांच्या मिरवणुकी काढून मूलभूत हक्काचें रक्षण व आनंदाचा उपभोग घेतलाच पाहिजे. सुशिक्षित, अशिक्षित, पुढारलेले, मागासलेले असा कोणताही भेदाभेद न ठेवतां अखिल हिंदूंनीं सावधानतेनें आपल्या देवांच्या मिरवणुकी काढून धर्मानंदाचा उपभोग घ्यावा.

—*—

# प्रकरण सदतिसावें

## हिंदुधर्माचें उज्ज्वल स्वरूप

गेल्या प्रकरणापर्यंत आचार, नीति व तत्त्वज्ञान या धर्माच्या तीन्ही अंगांचा व तदनुषंगिक विषयांचा उहापोह केला. प्रस्तुत प्रकरणांत, हिंदु-धर्माचें उज्ज्वल स्वरूप, आतांपर्यंत सांगितलेल्या सर्व विषयांचा साकल्यानें विचार करून प्रतिपादावयाचें आहे. त्यावरून आपण हिंदु जन्मलों, हिंदु राहिलों, आणि हिंदु म्हणूनच मरूं, आणि पुनश्च हिंदु म्हणूनच जन्मास येऊं असें प्रत्येक हिंदूला अभिमानानें वाटेल.

(६०७) **दोषांपेक्षां गुणच अधिकः**—इंग्रजी अंमल सुरू झाल्या-पासून इंग्रज ग्रंथकारांनीं, आपल्यांतील शिक्षितांनीं, खिस्ती मिशनऱ्यांनीं हिंदुधर्मावर वाटेल तशी टीका केलेली आहे. मूर्तिपूजा, जातिभेद, विटाळ-चंडाळ, अस्पृश्यता हे दोष हिंदुधर्मांत आहेत. व्यापक दृष्टि, समष्टिधर्म आणि प्रवृत्तिपर तत्त्वज्ञान इत्यादींचा अभाव आहे. अहिंसेचा अतिरेक, अवतारवेड, शब्दप्रामाण्याची रूढि, दैववाद, कलिवाद इत्यादि दोषांविषयीं

देवालय बांधतो. निपुत्रिकाला पुत्र झाला तरी तो प्रसंगीं देऊळ बांधतो, किंवा त्याचा नष्टांश झाला तरी भाऊबंदांच्या हातीं द्रव्य लागूं नये म्हणून एखादें देऊळ बांधून आपलें उत्पन्न तोडून देतो! बुवा, संत, महंत यांना देवालय ही एक उत्पन्नाची बाब असते. प्रत्येक गांवांत एखादा बुवा अथवा संत असतो. तो वर्षांतून एकदां पंढरीस पायीं अथवा आगगाडीनें वारी करून येतो. तेवढ्या पुण्याईवर त्याच्या हातीं असलेल्या विठोबाचे देवळांत तो वर्षभर जगतो किंवा नसल्यास नवें उत्पन्न करतो. एक हजार वस्तीच्या आमच्या उगार खुर्दसारख्या खेड्यामध्यें चारी दिशेस चार आणि मध्यें चारपांच अशीं देवालयें आढळतात, व नवें मंदिर चालूंच आहे. शहरांत तर एकाच आळींत एका फर्लो-गाच्या अंतरांत कुठें पांच, कुठें दहा अशी देवळांची गर्दी झालेली दिसते! मिरजेसारख्या सामान्य शहरांतही मारुतीचीं नि विठोबाचीं देवालयें प्रत्येकीं बारापंधरा आढळतात. कुठेंही रिकामी जागा दिसली, कुठेंही बेवारशी स्थान दिसलें कीं तेथें देवालय बांधलें जातें! या अतिरेकामुळें देवाचें विडंबन होत आहे. पुण्यासारख्या शहरांतील तुळशीबाग घेतली म्हणजे तें मंदिर नसून तो बाजार आहे असें अनुभवास येतें! मुंबईस ठाकुरद्वारीं गेल्यावर एकाच राममंदिराची निरनिराळ्या नांवानें पुनरावृत्ति झालेली आढळते! जवळ जवळ मंदिरें, मंदिरांत अनेक देवता, त्यांतच बाजार, भोंवतालीं दुकानें यांमुळें आजचीं हिंदु-मंदिरें अस्वच्छ, अप्रसन्न आणि मंदिराच्या मूळ हेतूपासून दुरावलेलीं दिसतात. कित्येक मंदिरांमध्यें इतका केरकचरा असतो कीं तो काढण्याकडे मालकाचें लक्षच असत नाहीं. त्याला वाटतें हीं कामें भक्तांनीं करावींत, आपण केवळ उत्पन्नाचे मालक! संस्थानिकांचीं देवालयेंही अस्वच्छ आढळतात. कांहीं देवालयांत पुजाऱ्यांचीं बिऱ्हाडें राहात असल्यामुळें त्यांच्या सर्व अस्ताव्यस्त संसाराचें चित्रच देवालयाच्या आवारांत जातांच दिसतें. गाय पवित्र म्हणून पवित्र देवालयांत गायीचे गोठे आणि मलमूत्रोत्सर्ग यांचेंही प्रदर्शन भरलेलें असतें. कित्येक देवालयांच्या गाभाऱ्यांमध्यें तर निर्माल्याचा कुबट वास व दिपुष्टतेलाची घाण इतकी असते कीं तेथून त्या देवाला काढून मोकळ्या हवेंत आणावा असें वाटतें! डाकोरसारख्या

देवस्थानांत जेथें अन्न हेंच परब्रह्म आणि देवाला सकाळपासून सायंकाळ-पर्यंत अन्नाचे भोग देणें, हीच जेथें पूजा असते, तेथें अन्नाच्या दर्पाची शिसारी येत असते. शंकराचें देवालय असलें तर भक्तगण देवाचें अंगा-वरच गूळ, खडीसाखर, पेढे अशा पदार्थांचें निवेदन करून मुंग्या आणि मुंगळे यांना निमंत्रण देतो ! स्वच्छ, प्रसन्न, रमणीय अशीं देवालयें फार क्वचित् असतात. आजचीं बहुतेक मोठीं मंदिरें म्हणजे भिकारी, रोगी, महारोग्यांनीं गराडा दिलेल्या जागा ! स्त्रियांनीं आणि पुरुषांनीं देवदर्शनाचें निमित्तानें येऊन चकाट्या पिटण्याचे अड्डे ! दुकानदारांनीं स्त्री गिऱ्हाईक बरेंच असतें म्हणून मोहक वस्तु मांडण्याचीं पेठ ! चोरांनीं गर्दींत शिरून मुलाबाळांच्या अंगावरील दागिने उपटण्याचें स्थान ! आणि टवाळ लोकांनीं भेदक नजरेनें स्त्रियांकडे पहात बसण्याची ती एक मिराशीची वतनवाडी अशी स्थिति झालेली आहे !! नवा हिंदुधर्म या सर्व प्रकाराचा निषेध करतो. अखिल हिंदूंनीं यापुढें कोणत्याही कारणानें पतितपावन मंदिराविना नवीं देवालयें बांधूच नयेत; पण जुन्यांचे जीर्णोद्धारही तारतम्यानेच करावेत. गांवो-गांवीं जे असे बेवारशी देव आढळतात त्यांचें विसर्जन '**गच्छ गच्छ सुरश्रेष्ठ**' असें म्हणून समाजानेंच करावें. म्हणजे अहिंदूंना या देवांचे द्वारें हिंदु समाजाचा अपमान करण्यास संधि मिळणार नाहीं. देवाविषयीं जळजळीत अभिमान वाटण्यास देवांची संख्या कमी केली पाहिजे. मूर्तीची स्थापना करण्यांत, तिची षोडशोपचारानें पूजा करण्यांत, नवीं देवालयें बांधण्यांत, जो द्रव्याचा व्यर्थ विनियोग होतो, तो आजच्या कालांत अगदीं अनाठायीं आहे. हा द्रव्याचा ओघ रुग्णालयें, अनाथालयें, सभालयें, विद्यालयें, शस्त्रालयें, शोधालयें, व्यायाममंदिरें, आखाडे, लक्ष्यवेधशाळा अशा संस्थांकडे आतां अवश्य वळवावा.

(५९७) **पुजारी व पंडे**:–देवालयांतील पुजारी आळसानें देवाच्या नांवावर जगत आहेत. त्या लोकांतून विद्वान् व कर्तृत्ववान् असे धर्म-उपदेशक क्वचितच निर्माण होतात. नवीं देवालयें बांधून हा असला वर्ग वाढविणें यांत हानि आहे. देव हा पंड्यांच्या श्रद्धेचा व आदराचा विषय नसून तो त्यांच्या पोटापाण्याचा विषय असतो. पूजा व भोग या निमित्तानें त्यांनीं देवाचा क्रयविक्रय चालविलेला असतो. सर्व दृष्टीनें

विचार केल्यास आजची हिंदु मंदिरसंस्था पुष्कळशी सदोष आहे. ती निर्दोष व्हावी, म्हणून येथें थोडें सूचनात्मक लिहिलें आहे.

(५९८) **अखिल हिंदूंना मंदिरें मोकळीं करा:**—आज जीं विद्यमान हिंदु मंदिरें आहेत तीं दर्शनार्थ अखिल हिंदूंना मोकळीं असावींत. जुन्या रूढी, जुन्या वहिवाटी यांमुळें जरी ही गोष्ट एकदम घडणें अशक्य असलें तरी हळुहळु ही निरगांठ उकललीच पाहिजे. अखिल हिंदुसमाजांत एकत्वाची भावना व आचारांची एकरूपता येण्यास अस्पृश्यतेचें उच्चाटण झालेंच पाहिजे.

पूर्वास्पृश्यांनीं मंदिरांत प्रवेश केला, त्यांचा दृष्टिक्षेप मूर्तींवर झाला, म्हणजे देवाचें देवत्व नष्ट होईल ही कल्पना भ्रामक आहे. देव अत्यंत पवित्र आहे, तो पावनांना पावन करतो. चंद्र, सूर्य, वायु, वरुण, गंगा इत्यादींनाही पावन करणारा परमेश्वर जो कधीं तुटत नाहीं, फुटत नाहीं, पळत नाहीं, झिजत नाहीं, जो सदैव अविनाशी असतो तो हिंदूंतील एक पूर्वास्पृश्य देवालयांत गेल्यामुळें भ्रष्ट होतो ही कल्पना चुकीची आहे. **जो विटाळतो तो देव नव्हे,** कारण देव विटाळातीत आहे. तो सदा पवित्र आहे. तो भाव पाहून, अंतःकरण पाहून प्रसन्न होतो. पूर्वास्पृश्य वगळून जे हिंदु मंदिरांत देवदर्शनार्थ जातात त्यांपैकीं जे अपवित्र, दुराचारी, शीलभ्रष्ट असतात, त्यांच्यामुळेंच देवालयाचें पावित्र्य बिघडलेलेंच असतें ! पूर्वास्पृश्य आल्यानें तें अधिक बिघडतें असें मुळींच नाहीं. जुनें धर्मशास्त्र हें या बाबतींत अपुरें आहे; म्हणून हिंदूंच्या सर्व देवालयामध्यें अखिल हिंदूंचा दर्शनार्थ प्रवेश व्हावा असें नवा हिंदुधर्म सांगतो.

(५९९) **नका करूं त्या चुका:**—श्रीराम, श्रीकृष्ण, श्रीशंकर, गणपति, मारुति, विठोबा इत्यादि अनेक देवतांच्या देवालयांत यापुढें जर असे प्रतिबंध ठेवले गेले तर त्याचा अनिष्ट परिणाम झाल्याविना राहाणार नाहीं. हिंदु समाजानें संकुचित विचारानें ज्या चुका पूर्वीं केल्या त्यांचें फळ तो आज भोगत आहे. हिंदूंच्या हिंदुस्थानांत अहिंदूंची संख्या जी वाढली, त्याचें एक कारण कोत्या व दुर्बल कल्पना हें होय! पूर्व बंगाल जो मुसलमानमय झाला त्याचें एक कारण कालीप्रसाद सेनाचा झालेला छळ

हें एक असावें! एका मुसलमान तरुणीचें त्या तरुणावर मन बसलें, ती त्याचें करितां जीव द्यावयास तयार झाली; त्यानें तिचें तें निर्व्याज प्रेम पाहून तिच्याशीं लग्न लावलें व हिंदुसमाजाकडे प्रायश्चित्ताची याचना केली. देहांत प्रायश्चित्त सांगणाऱ्या हिंदूंनीं त्याला परोपरीनें छळलें. जगन्नाथाच्या मंदिरांतही त्याला येऊं दिलें नाहीं, देवदर्शनही त्याला घडूं दिलें नाहीं, त्यामुळें त्याच्या सहनशीलतेची मर्यादा संपली. तो बाटून मुसलमान झाला व त्यानें पुढें पुष्कळ हिंदु बाटविले! या असल्या काळ्या पहाडांची पुनरावृत्ति निर्घू नये म्हणून मंदिरांतील दर्शनाचे निर्बंध शिथिल करावेत.

(६००) **देव तेहतीसच आहेत**:—हिंदूंचे देव तेहतीस कोटि आहेत, असा अहिंदूंनीं बोभाटा केलेला आहे. पण ही गोष्ट साफ खोटी आहे. येथें कोटि शब्दाचा अर्थ संख्या नसून प्रकार असा आहे. **अष्ट वसु, एकादश रुद्र, द्वादश आदित्य, इंद्र व प्रजापति** मिळून तेहतीस देवता आहेत. अष्ट वसूमध्यें पंचमहाभूतें, चंद्र, सूर्य व नक्षत्रें नि द्वादश आदित्यांमध्यें बारा महिने यांचा समावेश आहे. वेदमंत्रांत या देवता येतात. **"द्योतनात् देवाः' 'असुषु रमन्ते ते असुराः'** अशी देवासुरांची श्रीशंकराचार्यांनीं व्याख्या केली आहे. तेजस्वी, इंद्रियनिग्रही व सामर्थ्यवान् असे देव असतात. हें ज्यांना माहीत नाहीं, ते हिंदुधर्माची व देवतांची मूर्खपणें टवाळी करतात. वेदकालीन विष्णु तोच कृष्ण, तोच विठोबा, तोच व्यंकोबा होय. म्हणजे एकाच देवतेस निरनिराळीं नांवें आलेलीं आहेत. वेदांतील ब्रह्मणस्पती तोच गणेश होय! जोतीबा, खंडोबा, दंडोबा, हीं नांवें एकाच शंकराचीं होत. एवंच विष्णु, कृष्ण, राम, गणपती, मारुती, महालक्ष्मी इत्यादि हिंदूंतील प्रमुख देवता होत. हिंदुसमाजांत जे निरनिराळे थर आहेत त्यांनीं आपल्या रजतमात्मक स्वभावाप्रमाणें जरी देवतांची जोखाई, माखाई, सटवाई, संतुबाई, ताईबाई इत्यादि नांवें ठेवलीं असलीं तरी त्यांतील मूळ एकच देवी आहे.

(६०१) **चार उत्सव**:—श्रीगणेशोत्सव व श्रीशिवाजीउत्सव यांना आतां नव्या तऱ्हेचें व्यापक राष्ट्रिय स्वरूप येऊं लागलेलें आहे. हे उत्सव बहुजनसमाजांत आतां जागृति करीत आहेत हें ठीक आहे. गणेशोत्सव नि

शिवाजीउत्सवांप्रमाणेंच रामनवमी व जन्माष्टमी यांनाही नवें राष्ट्रिय व हिंदुत्वनिष्ठ वळण द्यावयास हवें. हे उत्सव केवळ जुन्या पद्धतीनें जन्मकाळ करून, उपास करून साजरे केले जातात तें ठीक नव्हे. राम व कृष्ण हे भारतीय वीर होत, आर्यसंस्कृतीचे प्रतिनिधि होत, आदर्श पुरुष होत. तत्कालीन इतिहासाची व त्यांच्या कर्तृत्वाची ओळख समाजाला या उत्सवांचे द्वारें पटविली पाहिजे.

देव व देवळें यांच्या अतिरेकाप्रमाणें उत्सवांचाही नि जयंत्यांचाही अतिरेक होऊं लागला आहे. त्यामुळें त्यांतील आनंद व स्वारस्य रहात नाहीं. अजीर्ण झालें कीं अन्नावरील वांछा नष्ट होते. तसें उत्सवाचेंही होत आहे. घरांत गणेशोत्सव, आळींत गणेशोत्सव आणि पुन्हां समाजाचा एक गणेशोत्सव ! प्रत्येक ठिकाणीं त्याच आरत्या, तोच मंत्रपुष्प व सर्व तेंच ! त्यामुळें शक्तीचा, कालाचा आणि द्रव्याचा अपव्यय होतो ! रामजयंति व कृष्णजयंतीच्या उत्सवाचेंही असेंच होतें. अलीकडील देशभक्तांच्या आणि कर्त्या पुरुषांच्या जयंत्या व पुण्यतिथ्या साजऱ्या करण्यांतही तोच प्रकार दिसतो. उत्सवच करीत बसल्यास दररोज एखादी जयंति व पुण्यतिथि साजरी करितां येईल, इतके थोर पुरुष व इतक्या स्त्रिया हिंदुसमाजानें उत्पन्न केल्या आहेत. पण त्यांचें दररोज गुणगान करण्यानें आपली प्रगति होणार नाहीं. सांगण्याचा उद्देश एवढाच कीं थोर व्यक्तींचें, विभूतींचें, रामकृष्णशंकरादि अवतारांचे वार्षिक उत्सव तारतम्यानें, संघटितपणें व व्यवस्थित पार पाडावेत. वर्षातून या उत्सवप्रसंगीं दोन तरी थाटाच्या प्रचंड अशा मिरवणुकी काढाव्यात. त्या मिरवणुकी सदंड, शक्य तर सशस्त्र आणि अखंड सवाद्य अशाच काढाव्या.

(६०२) उत्सव, पूजा व वाद्यें:—कोणत्याही समाजाच्या आयुष्यांत आनंद व उत्साह नसणें हें एक समाजनाशाचें कारण आहे. समाजांत आनंद व उत्साह उत्पन्न करण्याकरितां उत्सव, मिरवणुकी, समारंभ आणि वाद्यवादन हीं राष्ट्रवर्धनाचीं प्रमुख अंगें अवश्य आहेत. हिंदुसमाजामध्यें राम, कृष्ण, शंकर, पार्श्वनाथ, गणेशादि देवतांचे उत्सव आणि त्यांच्या मिरवणुकी हा प्रकार फार चांगला आहे. हिंदूंचे हे देव म्हणजे एका कालचे कर्तृत्ववान् व वीर पुरुष होत. त्यांच्या सवाद्य

हें एक असावें! एका मुसलमान तरुणीचें त्या तरुणावर मन बसलें, ती त्याचे-करितां जीव द्यावयास तयार झाली; त्यानें तिचें तें निर्व्याज प्रेम पाहून तिच्याशीं लग्न लावलें व हिंदुसमाजाकडे प्रायश्चित्ताची याचना केली. देहांत प्रायश्चित्त सांगणाऱ्या हिंदूंनीं त्याला परोपरीनें छळलें. जगन्नाथाच्या मंदिरांतही त्याला येऊं दिलें नाहीं, देवदर्शनही त्याला घडूं दिलें नाहीं, त्यामुळें त्याच्या सहनशीलतेची मर्यादा संपली. तो बाटून मुसलमान झाला व त्यानें पुढें पुष्कळ हिंदु बाटविले! या असल्या काळ्या पहाडांची पुनरावृत्ति निघूं नये म्हणून मंदिरांतील दर्शनाचे निर्बंध शिथिल करावेत.

(६००) **देव तेहतीसच आहेतः**—हिंदूंचे देव तेहतीस कोटि आहेत, असा अहिंदूंनीं बोभाटा केलेला आहे. पण ही गोष्ट साफ खोटी आहे. येथें कोटि शब्दाचा अर्थ संख्या नसून प्रकार असा आहे. **अष्ट वसु, एकादश रुद्र, द्वादश आदित्य, इंद्र व प्रजापति** मिळून तेहतीस देवता आहेत. अष्ट वसूमध्यें पंचमहाभूतें, चंद्र, सूर्य व नक्षत्रें नि द्वादश आदित्यां-मध्यें बारा महिने यांचा समावेश आहे. वेदमंत्रांत या देवता येतात. '**द्योतनात् देवाः**' '**असुषु रमन्ते ते असुराः**' अशी देवासुरांची श्रीशंकरा-चार्यांनीं व्याख्या केली आहे. तेजस्वी, इंद्रियनिग्रही व सामर्थ्यवान् असे देव असतात. हें ज्यांना माहीत नाहीं, ते हिंदुधर्माची व देवतांची मूर्खपणें टवाळी करतात. वेदकालीन विष्णु तोच कृष्ण, तोच विठोबा, तोच व्यंकोबा होय. म्हणजे एकाच देवतेस निरनिराळीं नांवें आलेलीं आहेत. वेदांतील ब्रह्मण-स्पती तोच गणेश होय! जोतीबा, खंडोबा, दंडोबा, हीं नांवें एकाच शंकराचीं होत. एवंच विष्णु, कृष्ण, राम, गणपती, मारुती, महालक्ष्मी इत्यादि हिंदूंतील प्रमुख देवता होत. हिंदुसमाजांत जे निरनिराळे थर आहेत त्यांनीं आपल्या रजतमात्मक स्वभावाप्रमाणें जरी देवतांची जोखाई, माखाई, सटवाई, संतुबाई, ताईबाई इत्यादि नांवें ठेवलीं असलीं तरी त्यांतील मूळ एकच देवी आहे.

(६०१) **चार उत्सवः**—श्रीगणेशोत्सव व श्रीशिवाजीउत्सव यांना आतां नव्या तऱ्हेचें व्यापक राष्ट्रिय स्वरूप येऊं लागलेलें आहे. हे उत्सव बहुजनसमाजांत आतां जागृति करीत आहेत हें ठीक आहे. गणेशोत्सव नि

शिवाजीउत्सवांप्रमाणेंच रामनवमी व जन्माष्टमी यांनाही नवें राष्ट्रिय व हिंदुत्वनिष्ठ वळण द्यावयास हवें. हे उत्सव केवळ जुन्या पद्धतीनें जन्मकाळ करून, उपास करून साजरे केले जातात तें ठीक नव्हे. राम व कृष्ण हे भारतीय वीर होत, आर्यसंस्कृतीचे प्रतिनिधि होत, आदर्श पुरुष होत. तत्कालीन इतिहासाची व त्यांच्या कर्तृत्वाची ओळख समाजाला या उत्सवांचे द्वारें पटविली पाहिजे.

देव व देवळें यांच्या अतिरेकाप्रमाणें उत्सवांचाही नि जयंत्यांचाही अतिरेक होऊं लागला आहे. त्यामुळें त्यांतील आनंद व स्वारस्य रहात नाहीं. अजीर्ण झालें कीं अन्नावरील वांछा नष्ट होते. तसें उत्सवाचेंही होत आहे. घरांत गणेशोत्सव, आळींत गणेशोत्सव आणि पुन्हां समाजाचा एक गणेशोत्सव ! प्रत्येक ठिकाणीं त्याच आरत्या, तोच मंत्रपुष्प व सर्व तेंच ! त्यामुळें शक्तीचा, कालाचा आणि द्रव्याचा अपव्यय होतो ! रामजयंति व कृष्णजयंतीच्या उत्सवाचेंही असेंच होतें. अलीकडील देशभक्तांच्या आणि कर्त्या पुरुषांच्या जयंत्या व पुण्यतिथ्या साजऱ्या करण्यांतही तोच प्रकार दिसतो. उत्सवच करीत बसल्यास दररोज एखादी जयंति व पुण्यतिथि साजरी करितां येईल, इतके थोर पुरुष व इतक्या स्त्रिया हिंदुसमाजानें उत्पन्न केल्या आहेत. पण त्यांचें दररोज गुणगान करण्यानें आपली प्रगति होणार नाहीं. सांगण्याचा उद्देश एवढाच कीं थोर व्यक्तींचें, विभूतींचें, रामकृष्णशंकरादि अवतारांचे वार्षिक उत्सव तारतम्यानें, संघटितपणें व व्यवस्थित पार पाडावेत. वर्षांतून या उत्सवप्रसंगीं दोन तरी थाटाच्या प्रचंड अशा मिरवणुकी काढाव्यात. त्या मिरवणुकी सदंड, शक्य तर सशस्त्र आणि अखंड सवाद्य अशाच काढाव्या.

**(६०२) उत्सव, पूजा व वाद्यें:**—कोणत्याही समाजाच्या आयुष्यांत आनंद व उत्साह नसणें हें एक समाजनाशाचें कारण आहे. समाजांत आनंद व उत्साह उत्पन्न करण्याकरितां उत्सव, मिरवणुकी, समारंभ आणि वाद्यवादन हीं राष्ट्रवर्धनाचीं प्रमुख अंगें अवश्य आहेत. हिंदुसमाजामध्यें राम, कृष्ण, शंकर, पार्श्वनाथ, गणेशादि देवतांचे उत्सव आणि त्यांच्या मिरवणुकी हा प्रकार फार चांगला आहे. हिंदूंचे हे देव म्हणजे एका कालचे कर्तृत्ववान् व वीर पुरुष होत. त्यांच्या सवाद्य

मिरवणुकी उत्साहानें काढणें, त्यांचें स्मरण करणें, पराक्रमाचें गुणगान करणें, हें उत्साहाच्या दृष्टीनें योग्यच आहे. वाद्यें व उत्सव यांचा निकट संबंध आहे. वाद्यांचा निनाद म्हणजे आनंदाचा स्फोट होय. हिंदुधर्मशास्त्रांत वाद्याचें विधान आहे. उत्सव, यात्रा, जत्रा प्रसंगींच काय पण रोजच्या पूजेमध्यें गायन, वादन, नर्तन यांचाही विधि असून मोठमोठाल्या देवालयांत हा उपक्रम चालू आहे. पहाटेस चौघडा, पूजेचे वेळीं सूरसनई, नंतर गायनवादन, असा क्रम पुष्कळ देवस्थानांत आहे आणि या सेवेकऱ्यांना सेवेकरितां वतनेंही आहेत.

(६०३) **पुराणांतील आधारः**–श्रीरामकृष्णादींचे जेव्हां जन्म झाले आणि त्यांनीं दुर्जनसंहाराचें उद्दिष्ट कार्य जेव्हां परिसमाप्त केलें, त्या दोन्ही प्रसंगीं त्यांजवर पुष्पवृष्टि झाली, दुंदुभी वाजूं लागल्या, देव जयघोष करूं लागले, गंधर्व, तुंबर, किन्नर गाऊं लागले, असें वर्णन भारतरामायणादि ग्रंथांत आढळतें. म्हणूनच आजही जन्मोत्सवाच्या निमित्तानें आणि इतर प्रसंगानें हिंदुसमाजांत सवाद्य मिरवणुकी काढण्याचा जो उपक्रम आहे, तो अनादिसिद्ध आहे.

(६०४) **आनंदाची खूण वाद्यः**–मानसशास्त्रदृष्ट्या सूक्ष्म विचार केला तर ध्वनि हें आनंदाचें प्रतीक आहे, असें दिसतें. मनुष्य आनंदांत असला कीं गुणगुणूं लागतो, अवघड गणित सुटलें कीं एकदम चुटकी किंवा टाळी वाजवितो, म्हणजे या साधनांनीं तो आपला आनंदच व्यक्त करतो. नादब्रह्म, शब्दब्रह्म व अन्नब्रह्म अशी त्रयी आहे. त्या दृष्टीनें वाद्यांचा अंतर्भाव नादब्रह्मांत होतो. गायन व वादन या कलांमध्यें मानवी बुद्धीचा विकास दृष्टीस पडतो. कंठांतून जो साधा आवाज निघतो, त्याला सप्तस्वरांच्या कोंदणांत बसवून विविध आलांपांनीं सुस्वर रागदारी गाणें हें जसें कलाविकासाचें द्योतक आहे; तसेंच चुटकी, टाळी, टिपऱ्या वाजवीत साध्या बांबूला भोंक पाडून वायूच्या सहाय्यानें त्यांतून सूर काढणें, काष्ठवाद्यें, धातुवाद्यें आणि चर्मवाद्यें शास्त्रोक्त पद्धतीनें वाजवून आनंद उत्पन्न करणें, हा एक कलेचा विकास आहे. मानवी स्वभाव, मानसशास्त्र, कलाविकास यांपैकीं कोणत्याही दृष्टीनें विचार केल्यास हिंदुसमाजांतील अशा अखंड सवाद्य मिरवणुकींना कोणीही समंजस अहिंदु अडथळा करणार नाहीं.

(६०५) हिंदूंचा अनादि हक्कः—पण हिंदूंच्या या हिंदुस्थानांत हिंदु मिरवणुकींना अहिंदूकडून सारखा उपद्रव होतो ही गोष्ट फार संतापजनक आहे. अहिंदूंच्या देवालयावरून हिंदूंनीं अखंड सवाद्य मिरवणुकी काढूं नयेत हें कोणतें तर्कशास्त्र ? व कोणतें धर्मशास्त्र ? प्रत्येक समाजाला सार्वजनिक रस्त्यावरून आपापाल्या देवतेची अखंड सवाद्य मिरवणूक काढण्याचा सदैव हक्क आहे. हा नागरिकत्वाचा मूलभूत हक्क आहे. असा निकाल प्रिव्ही कौन्सिलनें घोषित केलेला आहे. वाद्यवादनामुळें जर अहिंदूंच्या धर्मभावना दुखावत असतील तर तो बंद केल्यामुळें हिंदूंच्या धर्मभावना दुखावतात, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. अहिंदूंच्या धर्मग्रंथांत त्यांच्या देवालयांवरून त्यांनीं वाद्यें वाजवूं नयेत, असें जर क्वचित् विधान असेल, तर तें अहिंदूंना उद्देशून आहे व तें त्यांनीं अवश्य पाळावें; पण त्याची सक्ति हिंदूंवर करणें हें माणुसकीच्या दृष्टीनें चुकीचें आहे. कारण हिंदुधर्मशास्त्रदृष्ट्या सवाद्य मिरवणुकी काढल्या पाहिजेत असें आहे. प्रत्येकानें आपापलें धर्मशास्त्र अवश्य पाळावें. हिंदूंच्या हिंदुस्थानांत हिंदूंचा हा हक्क अनादिसिद्ध आहे. अहिंदूंनीं कांहीं वर्षें अपवादादाखल राज्य केलें म्हणून या मूलभूत हक्काला मुळींच बाध येत नाहीं. हिंदूंचीं देवालयें अनादि आहेत आणि अहिंदूंचीं देवस्थानें हीं मागाहून उपस्थित झालेलीं आहेत, याचा विचार करून सरकारनेंही हिंदूंना हा हक्क उपभोगूं दिलाच पाहिजे.

(६०६) अहिंदूंची दंडेलीः—आज जे अहिंदु हिंदूंना वाद्यबंदीबद्दल उपद्रव देतात, त्यांनीं अहिंदूंचा धर्म जेथें उत्पन्न झाला व जेथें त्यांचें राज्य आहे, तेथें कोणता दंडक आहे, त्याचा विचार केला पाहिजे. हिंदुस्थानांतसुद्धां अहिंदु देवस्थानांवरून गाड्याघोड्यांची वर्दळ, मोटारी, लॉऱ्या, स्टीमरोलर यांच्या कर्कश शिट्या, गाड्यांचा घडघडाट, यंत्रांचा गडगडाट, घोड्यांचें खेंकाळणें, गाढवांचें ओरडणें, गुरांचें हंबरणें, पक्ष्यांचा किलकिलाट, भोंवतालच्या दुकानांतील आरडाओरड इत्यादि सर्व चालतच असतें. त्यावेळीं मात्र त्यांचा समाधिभंग होत नाहीं आणि केवळ हिंदु देवतांच्या मिरवणुकींतील झांज, लेझीम, सूरसनई, हलगी, चौघडा इत्यादि वाद्यें वाजूं लागलीं, कीं अहिंदूंचा मस्तकशूळ उठतो, हा शुद्ध दुष्टावा आहे. हिंदूंनीं या दुष्टाव्याचा प्रतिकार अवश्य केलाच पाहिजे. नाहींतर

अहिंदूंचीं देवस्थानें प्रत्येक रस्त्यावर वाटेल तेथें उद्भूत होतील. हिरवें फडकें उभें केलें व दगडाला अगर भिंतीला चुना फासला कीं झालें देवस्थान ! ही आपत्ति टाळण्याकरितां हिंदूंनीं जागृतपणानें सदण्ड, सायुध, सशक्तिक अशा सिद्धतेनें आपल्या देवांच्या मिरवणुकी काढून मूलभूत हक्काचें रक्षण व आनंदाचा उपभोग घेतलाच पाहिजे. सुशिक्षित, अशिक्षित, पुढारलेले, मागासलेले असा कोणताही भेदाभेद न ठेवतां अखिल हिंदूंनीं सावधानतेनें आपल्या देवांच्या मिरवणुकी काढून धर्मानंदाचा उपभोग घ्यावा.



## प्रकरण सदतिसावें

## हिंदुधर्माचें उज्ज्वल स्वरूप

गेल्या प्रकरणापर्यंत आचार, नीति व तत्त्वज्ञान या धर्माच्या तीन्ही अंगांचा व तदनुषंगिक विषयांचा उहापोह केला. प्रस्तुत प्रकरणांत, हिंदुधर्माचें उज्ज्वल स्वरूप, आतांपर्यंत सांगितलेल्या सर्व विषयांचा साकल्यानें विचार करून प्रतिपादावयाचें आहे. त्यावरून आपण हिंदु जन्मलों, हिंदु राहिलों, आणि हिंदु म्हणूनच मरूं, आणि पुनश्च हिंदु म्हणूनच जन्मास येऊं असें प्रत्येक हिंदूला अभिमानानें वाटेल.

**(६०७) दोषांपेक्षां गुणच अधिकः**—इंग्रजी अंमल सुरू झाल्यापासून इंग्रज ग्रंथकारांनीं, आपल्यांतील शिक्षितांनीं, ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं हिंदुधर्मावर वाटेल तशी टीका केलेली आहे. मूर्तिपूजा, जातिभेद, विटाळचंडाळ, अस्पृश्यता हे दोष हिंदुधर्मांत आहेत. व्यापक दृष्टि, समष्टिधर्म आणि प्रवृत्तिपर तत्त्वज्ञान इत्यादींचा अभाव आहे. अहिंसेचा अतिरेक, अवतारवेड, शब्दप्रामाण्याची रूढि, दैववाद, कलिवाद इत्यादि दोषांविषयीं

खूप टीका करून हिंदुधर्म म्हणजे सगळा हा असलाच प्रकार आहे, म्हणून तो टाकाऊ आहे असें भासविण्याचा यत्न केलेला आहे. हिंदुधर्मांत घुसलेले कांहीं दोष आम्हालाही अमान्य नाहींत. या तऱ्हेचे दोष प्रत्येक धर्मांत आणि समाजांत आढळतात.

हिंदुधर्मांतील वर जे सामान्यतः दोष म्हणून सांगितले त्यापेक्षां हिंदु धर्मांत फार श्रेष्ठ असे गुण आहेत. त्या गुणांना उजाळा मिळाला म्हणजे हिंदुधर्मांतील उपरिनिर्दिष्ट दोष भराभर नष्ट होतील आणि हिंदुधर्माच्या उज्ज्वल सूर्याचा प्रकाश सर्व जगभर पडेल. जें महायुद्ध नुकतेंच संपलें व ज्यांत पडतांना अमेरिकेनें ( Freedom of worship and association, Freedom from fear and want ) ज्यांची घोषणा केली तीं सर्व तत्त्वें हिंदुधर्मामध्यें आहेत. हिंदुधर्माची व्याख्या व लक्षणें हीं अत्यंत व्यापक आणि उदार अशीं आहेत. हिंदुधर्मांत सर्वसामान्य मनुष्यधर्म आहे. मनुष्याला साक्षात् ईश्वर होण्याचा अधिकार हिंदुधर्मानेंच दिलेला आहे. बुद्धिस्वातंत्र्य, उपासनास्वातंत्र्य आणि कर्मस्वातंत्र्यही आहे. हिंदुधर्मांत पापाला तारण व पतिताला आश्वासन आहे. ऋणत्रयांचें अपाकरण आहे आणि दश आज्ञाही आहेत. हिंदुधर्मामध्यें प्रवृत्ति–निवृत्ति आणि तप, त्याग, भोग यांचा समन्वयही सांगितलेला आहे. हिंदुधर्मांत दुःखवादाचा तिरस्कार असून आनंदवादाचा स्वीकार आहे, दैवी संपत्तीचा गौरव केला असून आसुरी वृत्तीच्या प्रतिकाराचा आदेश आहे. अधिकारभेदाप्रमाणें ईश्वराचीं सगुण निर्गुण स्वरूपें हिंदुधर्मानेंच सांगितलीं आहेत. हिंदुधर्मांत शेजारधर्म आहे; मानव्याच्या विकासाला क्षेत्र आहे; सर्व जगांतील धर्मापेक्षां हिंदुधर्माचें अत्यंत उज्ज्वल तत्त्व म्हणजे सर्वभूतात्मैक्य; हें साध्य असून सर्वभूतहिततत्परता हें त्याचें साधन आहे. हिंदुधर्माचें हें एवंगुणविशिष्ट उज्ज्वल स्वरूप ध्यानीं घेतलें म्हणजे आक्षेपकांनीं दाखविलेले दोष ( अर्थात् ते गेलेच पाहिजेत, पण ते ) समुद्रांत बिंदुवत् आहेत हें ध्यानीं येईल. आतां हिंदुधर्मांतील उज्ज्वल तत्त्वांचें क्रमानें दर्शन घेऊं.

(६०८) **हिंदुधर्म म्हणजे मानवधर्मः**–हिंदुधर्म म्हणजे कर्मठपणा, जखडखड नियमांनीं बांधलेलें सर्व आयुष्य आणि उठल्या बसल्या विधि-

निषेधांचें बंड असें समजतात तें सर्वथैव चुकीचें आहे. हिंदुधर्म हा संप्रदाय नाहीं, तें एक मत नाहीं किंवा श्रद्धाविषयही नाहीं. मानवी जीविताचें उच्चतम कल्याण हें जें ध्येय, त्या ध्येयाप्रत क्रमानें उन्नत होत होत जाण्याकरितां व्यक्तीच्या वर्तनाला आणि सामाजिक स्वास्थ्याला आवश्यक असे जे नियम आणि बंधनें असतात, अशा सर्वांचा समुच्चय म्हणजे हिंदुधर्म होय!* हिंदुधर्माचें हें लक्षण हिंदुधर्माच्या पुढील व्याख्यांमध्यें दिसून येतें:—

धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा । —नारायणोपनिषद्

यतोऽभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः ॥—कणादसूत्र १—१—२

यः स्यात्प्रभवसंयुक्तः स धर्म इति निश्चयः ॥ —महाभारत

यः स्याद्धारणसंयुक्तः स धर्म इति निश्चयः ॥

म. भा. शां. प. अ. १०९ श्लो. ११

भावार्थः—धर्म हा अखिल विश्वाचा आधार आहे. कारण त्यापासून ऐहिक आणि पारलौकिक उत्कर्ष साध्य होतो. समाजधारणेकरितां आणि उत्कर्षाकरितां जीं तत्त्वें आवश्यक त्यांनाच धर्म म्हणावें. हिंदुधर्माचें हें उच्च आणि व्यापक स्वरूप आहे म्हणून धर्मग्रंथांत केवळ वर्णाश्रम धर्माचें विवेचन केलेलें नाहीं, तर गुणधर्म, निमित्तधर्म आणि विशेषतः सर्वांकरितां असणाऱ्या सामान्यधर्माचें विवेचन हिंदुधर्मात पुष्कळ ठिकाणीं केलेलें आहे.

(६०९) सामान्यधर्मः—

इज्याचारदमाहिंसादानस्वाध्यायकर्मणाम् ।

अयं तु परमो धर्मो यद्योगेनात्मदर्शनम् ॥८॥

—याज्ञवल्क्य अ. १ प्र. २

---

* The writers on Dharmashastra meant by **dharma** not a creed or religion but a mode of life or a code of conduct, which regulated a man's work and activities as a member of society and as an individual and was intended to bring about the gradual development of a man and to enable him to reach what was deemed to be the goal of human existence. ( History of Dharmashastra. Page 2 Vo. II )

अद्रोहश्चाप्यलोभश्च दमो भूतदया तपः ।
ब्रह्मचर्यं तथा सत्यमनुक्रोशः क्षमा धृतिः ।
सनातनस्य धर्मस्य मूलमेतदुदाहृतम् ॥ –वायुपुराण.
इज्याऽध्ययनदानानि तपः सत्यं क्षमा दमः ।
अलोभ इति मार्गोऽयं धर्मस्याष्टविधः स्मृतः ॥ –महाभारत

वरील वचनामध्यें सर्व मानवाकरितां सामान्यधर्म सांगितला आहे. शुद्धाचार, मनोनिग्रह, अहिंसा, दान, स्वाध्याय, अद्रोह, निर्लोभ, भूतदया, तप, ब्रह्मचर्य, सत्य, क्षमा, धैर्य हीं धर्ममूलें होत. यांच्यामुळेंच आत्मदर्शन होतें. मनूनें ( अ. १० श्लो. ६३ ) अहिंसा, सत्य, अस्तेय, शुचित्व आणि इंद्रियनिग्रह हा सर्वांचा सामान्यधर्म सांगितला आहे. महाभारतांत ठिकठिकाणीं या सामान्य धर्माचें प्रतिपादन व्यक्तिविकास आणि समाजस्वास्थ्याच्या दृष्टीनें केलेलें आहे.

अक्रोधः सत्यवचनं संविभागः क्षमा तथा ।
प्रजनः स्वेषु दारेषु शौचमद्रोह एव च ।
आर्जवं भृत्यभरणं नवैते सार्ववर्णिकाः ।

–शांतिपर्व अ ६० श्लो.७–८

क्षमा सत्यं दमः शौचं दानमिन्द्रियसंयमः ।
अहिंसा गुरुशुश्रूषा तीर्थानुसरणं दया ॥ –विष्णुधर्मसूत्र
स्वेषु दारेषु संतोषः शौचं नित्यानसूयता ।
आत्मज्ञानं तितिक्षा च धर्माः साधारणा नृप ॥ –महाभारत

भावार्थः–न रागावणें, खरें बोलणें, क्षमाशीलता, स्वदाररति, सरळपणा, कुटुंब व सेवक यांचें पोषण, विद्वानाविषयीं आदर, सहनशीलता वगैरे सर्व गुण सामान्यधर्म होत. म्हणजे हे सर्वांकरितां सांगितले आहेत. अनुशासन पर्व अ. १४१ श्लो. २५–२६ मध्यें मधुमांसवर्जन, स्त्रीपरिरक्षण, स्वस्त्रीसंतोष, यथाशक्ति दान, सर्वभूतानुकंपा, नित्य विद्याभ्यासंग, स्नानशीलता, दुष्ट संगतीचा त्याग वगैरे सामान्यधर्म सांगितलेला आहे. यामुळें मनुष्याच्या शरिराला एक तऱ्हेचें वळण लागतें; चांगल्या संवयी तो

स्वतःला लावून घेतो, आणि मनाच्या ठिकाणींही एक तऱ्हेचा निग्रह उत्पन्न होतो, कीं ज्यामुळें मनुष्य इष्टाचा स्वीकार व अनिष्टाचा परिहारच करूं शकतो. अखिल मानवांकरितां हा सामान्य मनुष्यधर्म आहे हें हिंदुधर्माचें पहिलें उज्ज्वल तत्त्व आहे.

**नराचा नारायण होतोः**–प्रत्येक मनुष्य हा साक्षात् ईश्वर, फार काय पण ब्रह्म आहे हें हिंदुधर्माचें मूर्धाभिषिक्त दुसरें उज्ज्वल तत्त्व आहे. ज्या तत्त्वानें जग उत्पन्न केलें, जें तत्त्व जगांत ओतप्रोत भरलेलें आहे, त्याच आदितत्त्वाचा अंश मनुष्यही आहे. आजच्या शोधांनींही जगाचें मूलतत्त्व एकच आहे असें मानलें आहे. यास्तव जें ब्रह्मांडांत आहे तेंच पिंडांतही आहे. अतएव मनुष्य हा ब्रह्मच आहे. जें कारणांत असतें तेंच कार्यांत येतें. कार्य आणि कारण यांच्यामध्यें अभेद असतो. जगाचें मूलतत्त्व सत्, चित्, आनंदरूप आहे, असें ऋषींनीं अनुभवानें उपनिषदांत प्रतिपादन केलें आहे. यास्तव मनुष्यही त्या स्वरूपाला जाऊं शकतो, असा हिंदुधर्माचा सिद्धांत आहे.

**आयुष्याच्या या साधने । सच्चिदानंद पदवी घेणें ।**
**ऐसा अधिकार नारायणें । कृपावलोकनें दीधला ।।** –एकनाथ

आयुष्याच्या या साधनानें सच्चिदानंद ही पदवी मिळवावयाची आहे, म्हणजे ईश्वर वा ब्रह्म व्हावयाचें आहे. त्याकरितांच मनुष्यजन्म आहे. हिंदुधर्म मनुष्याला असें सांगतो कीं, हे मनुष्या, तूं नर अथवा नारी जरी असलास तरी तुला आपल्या सामर्थ्यानें, कर्तृत्वानें, तपानें **नारायण होता** येतें. नारायण होणें म्हणजेच ईश्वर होणें, ब्रह्म होणें, बृहत् होणें, लघुत्व टाकून मोठें होणें होय. जडाच्या बुडाशीं चित् आहे. चेतनाच्या अधिष्ठानावर हे जग विलसत आहे. जीवाचें अधिष्ठानही तेंच आहे म्हणून तूं ईश्वर अथवा स्वामी आहेस. हिंदुधर्म असें म्हणतो कीं, तूं ब्रह्म आहेस; म्हणजे गुलाम नाहींस, दुबळा नाहींस, परतंत्र नाहींस; तूं परिस्थितीचा ईश्वर आहेस आणि तिला निर्माण करणाराही आहेस. म्हणून तूं स्वतःला ईश्वर, स्वामी, ज्येष्ठांत ज्येष्ठ आणि श्रेष्ठांत श्रेष्ठ असें समजून वागत जा. हिंदुधर्मानेंच ईश्वरभावाचा आणि स्वामिभावाचा हा उज्ज्वल संदेश सांगितलेला आहे. अन्य धर्मांच्या

मतें मनुष्य फार तर ईश्वराजवळ जातो; त्याच्या लोकांत जातो असा सिद्धांत आहे. कारण त्या धर्मतत्त्वांची इतकी उच्च आणि पल्लेदार झेंप नाहीं. पण उपनिषदांतील ब्रह्मवेत्ते असें स्पष्ट बजावतात कीं ब्रह्मवेत्ता ब्रह्मच होतो. अर्थात् नर हा नारायण होतो. लघुत्वादि वृत्तींचा तो त्याग करितो. मनुष्य ब्रह्म होतो म्हणजे दास भाव वा सेवक भाव टाकून तो स्वामिभावाला जातो. पराधीनता, पारतंत्र्य, परराज्य यांच्या शृंखला तोडून मनुष्य कर्तृत्वानें स्वतंत्र व स्वराज्य निर्माता होतो, असें व्यवहार दृष्ट्याहि हिंदुधर्म सांगतो. मनुष्य ब्रह्म होतो याचा पारमार्थिक दृष्ट्या अर्थही तो विजातीय मायेचा निरास करून स्वतंत्र होतो, पूर्ण होतो असाच आहे.

हिंदुधर्मांत एकेश्वरवाद, ब्रह्मवाद व तत्त्ववाद असे तीन्ही प्रकार आहेत. एकेश्वरवादापेक्षां ब्रह्मवाद म्हणजे ब्रह्मापासून जगत् उत्पन्न झालें ही प्रक्रिया विज्ञानाच्या अधिक सन्निध आहे. ब्रह्मवादापेक्षांही तत्त्ववाद हा उच्चतम असून मनुष्याचा आत्मा विश्वतत्त्वांचें ज्ञान करून घेऊन मुक्त होऊं शकतो असें त्याचें सार आहे. याचाच अर्थ मनुष्य नराचा नारायण होतो. त्यामुळें बौद्धिक संशोधनास व तार्किक चिकित्सेस प्रारंभ होतो आणि विज्ञानाचा पाया घातला जातो. मनुष्याच्या आत्म्यानें विश्वतत्त्वांत जाऊन मिसळणें, विश्वरूप होणें हीच खरी भक्ति होय ! ' शिवो भूत्वा शिवं यजेत् ' म्हणजे शिव होऊनच शिवाचें पूजन करावें. ईश्वर होऊन ईश्वराची पूजा करावी. शिवाहून निराळा राहाणारा हा त्याचा भक्तच होऊं शकत नाहीं. पित्याशीं भांडून विभक्त राहाणारा मुलगा जसा पितृभक्त नव्हे, तसा ईश्वराहून स्वतःला निराळें समजणारा, सेवकभावांत व द्वैतभावांत असणारा भक्तही ईश्वरभक्तच नव्हे. सेवावृत्ति, दासवृत्ति, भजकवृत्ति, पूजकवृत्ति या सर्व वृत्तींचा त्याग करून ईश्वरभावाच्या आणि स्वामिभावाच्या वृत्तीनें जो वागतो तोच ईश्वरभक्त होय !

ब्रह्मदेवानें कृमि, कीटक, मत्स्य, सरपटणारे प्राणी, पशुपक्षी इत्यादि सर्व निर्माण केले; पण त्याचें समाधान झालें नाहीं. पण जेव्हां त्यानें आपलें सामर्थ्य आणि कर्तृत्व जाणणारा व तें प्राप्त करून घेणारा स्वतुल्य मनुष्य निर्माण केला, तेव्हांच त्याला समाधान वाटलें, असें वर्णन भागवतांत आहे.

तैस्तैरतुष्टहृदयः पुरुषं विधाय । –भागवत
ब्रह्मावलोकधिषणंमुदमापदेवः ॥ ११।९।२८

विकास पावणें, उच्चत्वाप्रत जाणें हा जीवात्म्याचा स्वभाव आहे. दुर्गति, अधःपतन, अवनति, हा त्याचा स्वभाव नाहीं. वाईट कर्मांमुळें त्या प्रासंगिक अवस्था आल्या तरी, शिक्षा संपतांच मनुष्य जसा तुरुंगांतून बाहेर येतो, तसाच आत्माही पुनः उन्नतीकडेच वळतो. स्वल्पही सत्कर्माचरण कल्याणाप्रत नेतें, असें गीतेचें आश्वासन आहे.

स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् । –गी. अ. २।४०
नहि कल्याणकृत् कश्चित् दुर्गतिं तात गच्छति ॥ –गी.अ.६।४०

मनुष्य आपल्या वळणावर जातो. त्याचा स्वभाव त्याला अनुल्लंघनीय असतो. अर्जुनाला श्रीकृष्णानें अ. १८ मध्यें हेंच बजावलें आहे कीं मार देत, झुंजत, लढत राहाणें हा तुझा स्वभाव आहे. तुझे हातपाय रथाला बांधून जरी टाकले तरी वेळ आली कीं तूं लढाईच करणार. जीवात्माही त्याप्रमाणें आपल्या स्वभावधर्मानुसार स्वामी, धनी आणि ईश्वरभावाला पोंचल्याशिवाय कधींही राहाणार नाहीं. इंग्रज मनुष्य हिंदुस्थानांतही थंड ठिकाणें शोधीत असतो. मुलें बरोबरीच्या मुलांत जाऊन मिसळतात आणि स्त्रिया या स्वसदृश स्त्रियामध्येंच एकरूप होतात. तसाच मनुष्यही हिंदुधर्मांचे सिद्धांताप्रमाणें दास–सेवा–पूजकभावामध्यें समाधान न मानतां, स्वामी–ईश्वर आणि ब्रह्मभावांतच विलीन होण्याचा यत्न सतत करीत राहील.

यावरून हिंदु हा केवळ भेकड, दुबळा, दीन, गरीब, सेवक, भजक, पूजक या कल्पना हिंदुधर्माला सर्वस्वीं अग्राह्य व अमान्यच आहेत, हें दिसून येईल. हिंदुधर्म हिंदूला असें आश्वासन देतो कीं तूं धैर्यवान, निर्भय, पराक्रमी, स्वतंत्र अतएव सत्, चित्, आनंद ईश्वरच आहेस. अध्यात्मदृष्ट्या याचा विचार आजवर पुष्कळ झाला. व्यावहारिकदृष्ट्या हें उज्ज्वल तत्त्व आतां हिंदुसमाजानें खरें करून दाखविलें पाहिजे.

बुद्धिस्वातंत्र्यः–बुद्धिस्वातंत्र्य हें हिंदुधर्माचें तिसरें उज्ज्वल तत्त्व आहे. जगांतील कोणत्याही धर्मानें आपल्या अनुयायाला इतकें बुद्धिस्वातंत्र्य दिलेलें नाहीं. म्हणूनच धर्मप्रामाण्याचा विचार करतांना श्रुति,

श्रुतींचा आधार न मिळाल्यास स्मृति, स्मृतींच्या अभावीं सदाचार आणि शेवटीं सत्प्रवृत्त मनाला, श्रेयस्कर आणि योग्य असें जें शुद्धान्तःकरणानें नि आत्मस्फूर्तीनें ठरवितां येईल तेंही प्रमाण मानावें, इतकें अघळपघळ बुद्धिस्वातंत्र्य हिंदुधर्मानें दिलेलें आहे. मनुष्य व पशु यांमध्यें एका बुद्धीचेंच अंतर आहे. बाकीचे आहार, निद्रा, भय, मैथुनादि व्यवहार मानवांचे व पशूंचे सारखेच आहेत. 'मनुते इति मनुष्यः' विचार करतो तो मनुष्य. विचाराचें साधन जें बुद्धि तिची हत्या करणें हें फार मोठें पाप आहे. हिंदुधर्म मानवाच्या बुद्धीला, विचाराला, कोणताही प्रतिबंध घालत नाहीं. संपूर्ण गीता अर्जुनाला सांगितल्यावर श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणतो, "बाबा, मी सांगतों म्हणून तूं युद्ध करूं नकोस, तर तूं साकल्यानें सर्व गोष्टींचा विचार कर आणि शेवटीं तुला जें पटेल, तुझा अंतरात्मा तुला जो कौल देईल तें तूं कर." तात्पर्य श्रीकृष्णानें अर्जुनाला इतकें बुद्धिस्वातंत्र्य दिलें होतें. (गीता अ. १८ श्लोक ६३.)

हिंदुधर्म हा संप्रदाय नाहीं, म्हणून त्यामध्यें एक ग्रंथनिष्ठा आणि एक साधुनिष्ठा असा आग्रह नाहीं. अमुकच एक मानलें पाहिजे आणि अमक्याच पद्धतीनें विचार केला पाहिजे असा सांप्रदायिक संकुचितपणा हिंदुधर्मांत नाहीं. हिंदुधर्म हा उदार आणि संग्राहक आहे. बुद्धीला जें पटेल तेंच करावें असा सिद्धांत आहे. पद-वाक्य-प्रमाण पारावारीण, श्रुति-सिद्धांतप्रस्थापक श्रीमत् शंकराचार्यसुद्धां एके ठिकाणीं असें म्हणतात कीं अग्नि थंड आहे असें शेंकडों श्रुतींनीं जरी सांगितलें असलें तथापि प्रत्यक्षांशीं त्याचा विरोध असल्यामुळें त्या शेंकडों श्रुतींनाही अप्रमाण समजावें.

'अग्निरनुष्ण इति श्रुतिशतैरपि उक्तं प्रत्यक्ष विरोधात् न मंतव्यं'

जगांत काय तो आपला एकच पवित्र धर्मग्रंथ आणि त्या ग्रंथाचा अर्थ समजणारा ईश्वराचा प्रेषित असा एकच साधु असें ज्यांचें मत आहे, त्यांना सर्व ज्ञान काय तें आपल्याच धर्मपुस्तकांत आहे असें वाटतें. धर्म-पुस्तक ईश्वरानें दिलेलें अर्थात् त्यांतील ज्ञान हें परिपूर्ण असावयाचें, अपूर्णता त्यांत मुळीं नाहींच, अशा बुद्धीनें विचारस्वातंत्र्य नष्ट करतां येतें. बायबल हें ईश्वरानें दिलेलें पुस्तक, त्यांतील ज्ञान परिपूर्ण आहे अशा समजुतीनें

खिस्ताच्या अनुयायांनीं विज्ञानसिद्ध ज्ञान सांगणाऱ्यांचा, केवळ तें ज्ञान बायबलविरोधी म्हणून अनन्वित छळ केला. भौतिक शास्त्र आणि विज्ञान जसजसें युरोपांत वाढत गेलें, तसतसा या पाद्र्यांच्या सत्तेचा पाया ढासळूं लागला.

पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते, हा सिद्धांत बायबलविरोधी होता. सूर्य पृथ्वीभोंवतीं फिरतो असें बायबलांत आहे. पोपनें बायबलविरुध्द सिध्दांत सांगणाऱ्या कोपरनिकसच्या अनुयायांचा छळ केला. म्हणून त्यांनीं त्याच्या मरणसमयीं तो सिद्धांत पुस्तकरूपानें प्रसिद्ध केला. कोपरनिकसच्या मागून गॅलिलिओनें दुर्बिणीच्या सहाय्यानें पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते असें सप्रमाण मांडलें, म्हणून त्याजवर पाखंडीपणाचा आरोप ठेवून त्याचा अनन्वित छळ करून आपला नवा सिद्धांत खोटा आहे, असें वदवून घेण्याचा अट्टाहास केला. विषप्राशन करतां करतां गॅलिलिओनें "Still it revolves" म्हणजे पृथ्वीच सूर्याभोंवतीं फिरत आहे असें सांगण्यास कमी केलें नाहीं! पुढें ब्रूनोनें हा सिद्धांत पुढें मांडला. पोपनें त्याचाही छळ करून त्यास जाळून टाकण्याची शिक्षा दिली. आणि बायबलपेक्षां निराळें मत सांगितलें म्हणून हॅपेशिया नांवाच्या मुलीचे धर्मगुरूनीं तुकडे तुकडे करून टाकले. केवढी ही बुद्धीची हत्या आणि केवढा हा विचारस्वातंत्र्यावर आघात! युरोप खंडांत, या धर्मगुरूंनीं धर्ममतसंशोधनाच्या नांवाखालीं मध्ययुगांत साडेतीन लक्ष लोकांचा असा छळ करून त्यांचा संहार केला! ही बुद्धि-द्वेषाची आणि विज्ञानद्वेषाची परमावधि नव्हे काय ? पण धर्माचा एकमेव ग्रंथ आणि तो ईश्वरदत्त अशी समजूत असल्यावर हें क्रमप्राप्तच आहे.

बायबलाप्रमाणेंच कुराण हा ज्यांचा एकमेव धर्मग्रंथ आहे त्यांना असेंच वाटतें कीं या ग्रंथांत सर्व जगांतील पूर्ण ज्ञान आहे. या जगांत या ग्रंथाबाहेर सर्व अज्ञानच आहे. गिबन नामक ग्रंथकारानें 'Decline and fall of the Roman Empire' या आपल्या सुप्रसिद्ध ग्रंथाच्या पांचव्या भागांत एक गंमतीदार उदाहरण दिलें आहे तें असें:—

उमर नामक खलिफाचे कारकीर्दीत इजिप्त देश जिंकण्यास अमरु या सरदारास पाठविलें होतें. अमरूनें मोठ्या युक्तीनें रोमन लोकांशीं दीर्घकाल संग्राम चालवून अलेक्झँड्रिया शहर हस्तगत केलें. रोमन लोकांचा अमरूनें

पराभव केल्यावर त्यानें खलिफाला असें लिहिलें कीं येथें एक भव्य व पुरातन पुस्तकसंग्रह आहे, त्याचें काय करावें ? उमरनें उत्तर पाठविलें कीं जर ते ग्रंथ कुराणाविरूद्ध असतील तर ते सुरक्षित ठेवणें इष्ट नाहीं. आतां कुराणाविद्रद्ध हें सर्व ग्रंथ आहेत किंवा नाहींत हें पहाणें मोठ्या कष्टाचें, बुद्धीचें आणि दीर्घकालचें काम होतें. म्हणून त्यानें खलिफाला ही अडचण कळविली. खलिफानें लिहिलें कीं जर हे इतके ग्रंथ कुराणाशीं मिळते असतील तर इतकी अडगळ ठेवण्याचें कारण नाहीं. तात्पर्य **विरुद्ध असतील तर नाश केलाच पाहिजे आणि अनुकूल असतील तर अडगळ नको.** अशा आशयाचें उत्तर आल्यावर अमरूनें तीं पुस्तकें अंघोळीचें पाणी तापविण्यासाठीं जाळून टाकलीं. त्या शहरांतील स्नानगृहामध्यें या पुस्तकांवर सहा महिनेपर्यंत पाणी तापत होतें ! ! ( मु. रि. भा.१ पृ. २२. )

वरील दोन उदाहरणांवरून बुद्धिहत्या म्हणजे काय, याची कल्पना येईल. विशिष्ट पद्धतीनें विचार करणें, त्याबाहेर बुद्धीला इकडे तिकडे जाऊं न देणें म्हणजे जवळ जवळ मनुष्याचें मनुष्यत्वच नाहींसें करणें आहे ! पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं हेंच मत आपल्या आत्मचरित्रांत प्रगट केलेलें आहे. कुराणाच्या अनुयायांविषयीं ते म्हणतातः—

" धर्मासंबंधीं चर्चा करणें बहुतेक मुसलमानांच्या बाबतींत अधिकच बिकट होते. कारण धर्मानें त्यांना यत्किंचितही विचारस्वातंत्र्य दिलेलें नाहीं. वैचारिक दृष्ट्या मुसलमान धर्मानें आंखून दिलेला मार्ग घोपट पण अरुंद आहे. तो सोडून कोणाही सच्चा मुसलमानानें जातां कामा नये किंवा त्या विषयाची शंकाही घेतां कामा नये. " ( जवाहरलाल नेहरु—मराठी अनुवाद पृ. १२०—१२१ )

हिंदुधर्माचें अगदीं या उलट आहे. हिंदूंतील कांहीं माणसें कर्मठ, प्रतिगामी व रूढिप्रिय असलीं तरी विचाराच्या बाबतींत तीं अत्यंत पाखंडी मताची चर्चा करूं शकतात. याचें कारण बुद्धिस्वातंत्र्याची आवड हेंच होय ! हिंदुधर्मात अनेक पंथ, अनेक संप्रदाय व अनेक मतें हीं सर्व बुद्धिस्वातंत्र्यामुळेंच अस्तित्वांत आहेत. हिंदुसमाजांत वेदविरोधी, वेदाला न मानणारे असे अनेक संप्रदाय आहेत. निरीश्वरवादी आणि वेद व यज्ञ

यांवर बेजबाबदार टीका करणारा जो चार्वाक त्यालासुद्धां हिंदुधर्मांत स्थान आहे. आस्तिक दर्शनाबरोबर चार्वाकाच्या नास्तिक दर्शनाचाही सर्वदर्शन-संग्रहनामक ग्रंथांत समावेश आहे. यावरून हिंदुधर्मांतील बुद्धिस्वातंत्र्याची कल्पना येईल.

अखिल हिंदूंचा मुख्य जो गायत्री मंत्र त्यामध्यें 'तो श्री सविता देव आमच्या बुद्धीचा प्रेरक होवो, आमची बुद्धि तेजस्वी करो, तिच्या ठिकाणीं मालिन्य न आणो' असें म्हटलेलें आहे. हिंदुधर्मांत बुद्धीला, तिच्या विकासाला, ज्ञानाला मर्यादा घातलेली नाहीं. नवे विचार, नवें ज्ञान, नवे शोध हे बुद्धीच्या तेजानें जगांत येत असतात. परमश्रेष्ठ सूर्याच्या तेजाची उपासना करून श्रेष्ठ ज्ञानानें संपन्न व्हावें, असा हिंदुधर्माचा सिद्धांत असल्यामुळें हिंदुधर्म हा मनुष्याला संपूर्ण बुद्धिस्वातंत्र्य देतो.

**उपासनास्वातंत्र्यः**—उपासना स्वातंत्र्य हें बुद्धिस्वातंत्र्याइतकेंच चौथें उज्वल तत्त्व हिंदुधर्मानें प्रतिपादन केलेलें आहे. जगांत ईश्वर आहे असें अनुमानानेंच सिद्ध होतें. ईश्वराचें प्रत्यक्ष दर्शन जोंवर कोणीही घडवूं शकत नाहीं, तोंवर उपासना संप्रदायाचा आग्रह धरणें अनुचित आहे. एकाच मार्गानें ईश्वर भेटतो, एकाच रस्त्यानें गांवाला जातां येतें, एकाच औषधानें सर्व रोग बरे होतात असें म्हणणें अत्यंत हास्यास्पद आहे. अतिसारावरही सोनामुखी आणि बद्धकोष्ठतेवरही सोनामुखी ही योजना जशी चुकीची, तशीच एकाच तऱ्हेच्या उपासनेनें ईश्वर भेटतो ही समजूत चुकीची आहे. माझाच मार्ग बरोबर, मलाच काय तो देव कळला, असें समजणाऱ्या प्रेषितास कांहींच कळलें नाहीं. जो स्वतः तसा बहाणा करतो तो लबाड होय, असा हिंदुधर्माचा सिद्धांत आहे.

**यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः ।**

**अविज्ञातं विजानतां विज्ञातम विजानताम् ।** —केनोपनिषद् २-११

**भावार्थः**—जो म्हणतो मला कळलें, त्याला तें समजत नसतें. व जो म्हणतो मला कांहीं कळलें नाहीं त्याला तें थोडें तरी कळतें. असा हा विरोधाभास आहे. तुकाराम म्हणतो, 'तोचि लटक्यामाजी भला । म्हणे म्यां देव ओळखला' मला देव भेटला असें जो सांगतो तो

खरोखर लुच्चा समजावा. ज्ञानेश्वरही ' एथ जाणीव करी तोचि नेणें । आथिलेपण मिरवी तेंचि उणें । आम्ही झालों ऐसें जो म्हणे । तो कांहींच नव्हे ॥ (ज्ञानेश्वरी अ. ९ ओवी ३६८) असेंच सांगतात. ईश्वरासारख्या मनुष्यबुद्धीला अगम्य अशा विषयाचा आग्रह धरून, उपासना संप्रदायाचा दुराग्रह धरणें हें हिंदुधर्माला संमत नाहीं. जगांत एक शक्ति आहे तिची उपासना कोणत्याही पद्धतीनें केली, तरी ती त्या शक्तीला—ईश्वराला—पोंचतें, असें हिंदुधर्म सांगतो.

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।**
**तस्य तस्याऽचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥** —गी. अ. ७।२१
**यजंते सात्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ।**
**प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजंते तामसा जनाः ॥** —गी. अ. १७।४

भावार्थः—जो जो ज्या ज्या देवतेची श्रद्धेनें उपासना करूं इच्छितो त्याची ती श्रद्धा मी स्थिर करतों. माणसें आपल्या सत्त्व, रज, तमादि प्रवृत्तीप्रमाणें यक्षराक्षस आणि भूतगणादींना भजत असतात. हिंदुधर्म हा मनुष्याला गीतेच्या मुखानें असें उपासनास्वातंत्र्य देत आहे कीं मनुष्यानें वाटेल त्या पद्धतीनें इष्ट त्या देवतेची उपासना करावी. मात्र भक्तीमध्यें अहेतुकता आणि निर्व्याजता पाहिजे. कोणत्याही माणसाला तो भला, सज्जन आणि सदाचारी असला म्हणजे ज्ञानानें ईश्वरप्राप्ति होते. अमुक एक मनुष्य अमक्या संप्रदायाचा आहे, तो अमुक एका पद्धतीनें ईश्वराला भजतो म्हणून तो नरकांत जाईल, असली तर्कदुष्ट विचारसणी हिंदुधर्मांत नाहीं. म्हणूनच हिंदुधर्मानें अनेक पंथ, अनेक संप्रदाय पचनीं पाडलेले आहेत. या उपासनास्वातंत्र्यामुळेंच निरनिराळ्या मतांना आणि निरनिराळ्या आचारांना हिंदुसमाजांत स्थान आहे. हिंदुधर्माचें तत्त्व उच्च आणि व्यापक आहे. तें सांप्रदायिक दुराग्रहानें क्षुद्र झालेलें नाहीं. स्वसंप्रदायविषयक दुराग्रह सुटला कीं खरें मनुष्यत्व माणसांत दिसूं लागतें. कारण 'बुद्धेः फलमनाग्रहः' असें तत्त्व आहे.

खिस्त म्हणतो कीं जे ईश्वरावर आणि ईश्वराचा कोंकरा जो मीं त्या मजवर विश्वास ठेवणार नाहींत, ते नरकाला जातील.' कुराणाचे अनुयायी

असेंच समजतात. व्हीलर नामक इतिहासकार इस्लामच्या अनुयायांचें मत पुढीलप्रमाणें मांडतो. ' There is but one God and Mohamad is His Prophet. Believers were to be rewarded..............and unbelievers were the enemies of God and to be punished hereafter. ' ( History of India. Vol. IV Part I Page 8 )

जगांत ईश्वर एक आहे आणि पैगंबर हा त्याचा प्रेषित आहे, असें जे मानतात ते आस्तिक आणि न मानतात ते नास्तिक होत. आस्तिकांना ऐहिक सुखोपभोगाचें बक्षिस ईश्वर देतो आणि नास्तिकांना शत्रू समजून ईश्वर शिक्षा देतो; याच भावनेनें सुशिक्षित मुसलमान पुढारीसुद्धां कसें बोलतात तें ध्यानांत घेण्याजोगें आहे. महंमद अल्लीसारखा दिवंगत पुढारी म्हणतोः

" However pure Mr. Gandhi's character may be, he must appear to me from religious point inferior to a Musalman even though he be without character......yes, according to my religion and creed, J do hold that adulterous and fallen Musalman be better than Gandhi. "

उपासनाविषयक ही विचारसरणी किती अनिष्ट आहे ! मनुष्याला बुद्धि आहे तर त्याला आपल्या आवडीप्रमाणें उपासनेचें स्वातंत्र्य नसावें काय ? हिंदुधर्म हा उदार असल्यामुळें तो हें उपासनास्वातंत्र्य देतो आणि ईश्वरप्राप्तीस म्हणजे आत्मोन्नतीस मध्यस्थ आणि गुरु इत्यादींची आवश्यकता नाहीं असेंही सांगतो. दिशा दाखविणारा, अनुभव सांगणारा आणि तज्ज्ञ म्हणून कोणाचेंही साह्य घ्यावें, पण शेवटीं स्वप्रयत्नानेंच मनुष्यांना निर्विषय आनंदाची प्राप्ति होते असा हिंदुधर्माचा सिद्धांत आहे.

**कर्मस्वातंत्र्यः**—कर्मस्वातंत्र्य हें हिंदुधर्माचें पांचवें उज्ज्वल तत्त्व आहे. मनुष्याला बुद्धीप्रमाणें कर्मेंद्रियेंही दिलेलीं आहेत. माणसानें कर्मेंद्रियांनीं बुद्धिपूर्वक शरीरपोषणार्थ, कुटुंबधारणार्थ आणि समाजधारणार्थ सदैव कर्म करीत असलें पाहिजे. बापाचा धंदा मुलाला लौकर येतो, जातींतील उद्योग जातींतच मुरत मुरत परिणत होत असतात, आनुवंशिक संस्कारही उपयोगी पडतात म्हणून वर्णधर्माप्रमाणें आणि जातिधर्माप्रमाणें ज्यांनीं त्यांनीं आपापले धार्मिक आणि लौकिक व्यवहार करावेत, असें

सर्वसाधारण हिंदुधर्माचें धोरण आहे. तथापि हिंदुधर्मानें मनुष्याला आपली प्रकृति, स्वभाव आणि परिस्थिति याला अनुसरून समाजाच्या धारणेकरितां आणि पुरुषार्थ साध्य करून घेण्याकरितां जें कर्म उत्तम करतां येईल तें करावें असें स्वातंत्र्य दिलेलें आहे. गीतेमध्यें या दृष्टीनें सहजकर्म, स्वभावजकर्म आणि स्वभावनियतकर्म असे तीन पर्याय सांगितले आहेत. सहजप्राप्त झालेलें कर्म सदोष असलें तरी खाटकानें तें स्वकर्म करण्यांत दोष नाहीं. ब्राह्मणपुत्रांनीं स्वभावाला अनुरूप असें क्षत्रिय कर्म स्वीकारलें तर युद्धप्रसंगीं शत्रुपक्षाच्या माना चराचरा चिरण्यांत मुळींच पातक नाहीं. ब्राह्मणांच्या सर्व मुलांच्या ठिकाणीं ब्राह्मण्योचित संस्कार असतीलच असें नाहीं. चांभाराच्या मुलालासुद्धां संस्कृत विद्येची अभिरुचि असूं शकेल; आणि भंग्याच्या मुलाचे संस्कारही साहित्यसंगीतादि कलांना पोषक असे असतील. यास्तव मनुष्यानें सहजसंस्कारानुरूप व स्वाभाविक प्रवृत्तीला अनुरूप असें कर्म करावें, असें हिंदुधर्म सांगतो. स्वभावानुरूप कर्म म्हणजे स्वेच्छाचार नव्हे. कोणतेंही कर्म करीत असतांना तें सदोष वाटलें तरी निर्दोष करण्याचा यत्न धिमेपणानें करावा; व्यष्टिहितापेक्षां समष्टिहिताकडे आणि राष्ट्रहिताकडे अधिक लक्ष द्यावें. स्वकर्तव्यपालन हीच परमेश्वराची आज्ञा आणि हीच त्या सर्वात्मक ईश्वराची पूजा असें समजून अंगचोरपणा न करतां अनासक्तीनें, निरहंकारानें, धैर्यानें, उत्साहानें कर्म करीत राहावें, कर्तव्यरूपी कामधेनूचा अव्हेर कधीं करूं नये असें हिंदुधर्मांतील गीताप्रोक्त कर्मयोगशास्त्र आहे.

हें सृष्टिचक्र यज्ञमूलक आहे. तें चालण्याकरितां प्रत्येकानें आपापलें कर्म करावें. शरीरयात्रा ही कर्माशिवाय चालत नाहीं. अंगचोरपणा करून स्वकर्म टाळलें तर तें कोणाला तरी करावें लागतेंच. पण त्यामुळें समाजधारणेस वैगुण्य येतें. ईश्वर स्वतः क्षणभरही न थांबतां सारखें कर्म करीत असतो, तसेंच माणसांनींही कर्म करीत राहावें, समष्टि हा निधि आणि व्यष्टि हा प्रतिनिधि अशा नात्यानें निमित्तमात्र आहोंत ही जाणीव ठेवून, कर्तृत्वाचा मद आणि फलाचा आस्वाद याविरहित कर्म करीत गेल्यानें कर्मबंधाच्या कचाटींतून मनुष्य मुक्त होतो. ज्ञानेश्वरांनीं पुढील मार्मिक दृष्टांतामध्यें हें कर्मयोगशास्त्र सांगितलेलें आहे:—

पैं अवज्ञा आणि कामना । मातेच्या ठायीं अर्जुना ।
केलिया दोनी पतना । कारण होती ॥२०२॥
तरी दोनी यें त्यजावीं । मग माताचि ते भजावी ।
आवडतियेहि फळीं । असारें साली आंठोळी ।
त्यासाठीं अवगळी । फळातें कोण्ही ॥२०४॥
तैसा कर्तृत्वाचा मद । आणि कर्मफळाचा आस्वाद ।
या दोहींचें नांव बंध । कर्माचा कीं ॥२०५॥ज्ञानेश्वरी अ. १८

मातेची अवज्ञाही करूं नये आणि तिजविषयीं कामनाही धरूं नये. त्याप्रमाणेंच स्वकर्तव्याची अवज्ञा करूं नये आणि फलाची आसक्तिही धरूं नये. उत्तम कलमीं आंबा असला तरी त्यांतील कोय व साल ही जशी टाकून तो खावा लागतो. तद्वतच कर्तृत्वमद आणि फलास्वादविरहित कर्मे केल्यानें तें बंधक होत नाहीं. ईश्वराला वाहण्याचें फूल जसें ताजें, स्वच्छ, निर्मळ, टवटवीत असें असावें लागतें तद्वतच कर्मही आसक्त्यादि दोष-विरहित झाल्यानेंच तें उत्तम होतें व ईश्वराला पोंचतें. भक्तीमध्यें जशी अहेतुकता आणि निर्व्याजता असावी, तद्वतच कर्मामध्येंही निष्कामता असावी. हिंदुधर्मानें बुद्धिस्वातंत्र्य, उपासनास्वातंत्र्य आणि कर्मस्वातंत्र्य हें अध्यात्मांतील सिद्धांताला अनुसरूनच दिलें आहे. वेदांतशास्त्रदृष्ट्या जीवाला इच्छास्वातंत्र्य, प्रवृत्तिस्वातंत्र्य आहे. त्यालाच आत्मस्वातंत्र्य म्हणतात. या सिद्धांताशीं सुसंगतच असें हें कर्मस्वातंत्र्य आहे.

**पाप्याला आश्वासन:**—अत्यंत दुराचारीसुद्धां उध्दरतो म्हणजे तोही सुधारूं शकतो, असें हिंदुधर्माचें सहावें उज्वल तत्त्व आहे. हिंदु-धर्मांत अनेक विधिनिषेध, अनेक कर्मबंधनें आणि तीं न पाळल्यास जेथें तेथें पापोत्पत्ति असा जो समज आहे तो सर्वथैव निर्मूल आहे. हिंदुधर्मांत पापाला तारण नाहीं, पतिताला आश्वासन नाहीं, असें ख्रिस्ति मिशनरी भासवीत असतात; परंतु पतितांना, पाप्यांना, दुराचाऱ्यांना प्रायश्चित्ताच्या द्वारें सुधारण्याची संधि देऊन पतितांचा उध्दार करणारा असा पतितपावन धर्म हिंदुधर्मच आहे. अत्यंत दुराचारी वाल्या कोळी हा वाल्मिकी ऋषि झाला; पिंगलानामक वेश्या रत होतां होतां परात्पर पुरुषरूप झाली, ही

उदाहरणें पतितपावनत्वाचीं द्योतक नाहींत काय ? गीतेंमध्यें अत्यंत दुराचारीहि उद्धरतो असें म्हटलें आहे.

अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् । गी.
साधुरेव स मन्तव्यः सम्यग् व्यवसितो हि सः ॥–अ.९।३०

मनुष्य हा स्खलनशील आहे, विवेक व संयम हे सदैव जागृत असत नाहींत, त्यामुळें त्याचेकडून दुराचार होतो. पण मागाहून त्याला वाईट वाटतें. हिंदुधर्मांत प्रत्येक लहानमोठ्या पापाला म्हणजे चुकीला प्रायश्चित्त म्हणजे शिक्षा सांगितलेली आहे. शिक्षा ही सुधारण्याकरितांच द्यावयाची असते. असें कोणतेंही भयंकर पातक नाहीं कीं ज्याला हिंदुधर्मानें प्रायश्चित्त सांगितलेलें नाहीं. प्रत्येक पातकाला प्रायश्चित्त आहे, म्हणजे प्रत्येक चुकी मनुष्य सुधारूं शकतो असा त्याचा आशय आहे. प्रायश्चित्त देऊन मनुष्याचा तिरस्कार करणें, त्याला वरचेवर हांगविणें, त्याला दूर लोटणें हे प्रकार अलीकडचे आहेत. त्यामुळें हिंदुधर्म हा पाप्यांना बहिष्कृत करून दूरदूर लोटतो, म्हणून ते समाजांतून बाहेर पडतात असा चुकीचा समज झालेला आहे.

मनुष्याच्या शरीराकडून मनाच्या प्रेरणेनें दुराचार घडतो. पण त्या मनाचें अधिष्ठान आत्मा आहे. तो परम पवित्र आणि परमात्म्याचा अंश आहे. यास्तव मनांतील क्षुद्र आणि अपवित्र विचार टाकून दिले कीं मनुष्य शुध्द होतो. पावित्र्याचें अधिष्ठान शरीर नाहीं तर मन आहे. आणि मनाचेंही अधिष्ठान आत्मा आहे. अपवित्र मन शुद्ध होऊं शकतें आणि मग शरीराकडूनही सदाचार घडूं लागला म्हणजे तो सुधारतो व सद्गतीस जातो. अत्यंत दुराचाऱ्याच्या आयुष्यांतसुद्धां एक पश्चात्तापाचा क्षण येत असतो. अनुताप, पश्चात्ताप, चुकीबद्दल वाईट वाटणें आणि पुन्हां ती न होईल अशी दक्षता घेणें हाच सुधारण्याचा मार्ग आहे. या दृष्टीनें पतित स्त्रिया, धर्मभ्रष्ट माणसें, विवाहबाह्य संतति अशा सर्वांना हिंदुधर्मानें सुधारण्याची संधि देऊन उद्धाराचा मार्ग सांगितलेला आहे.

गंगेला नद्या मिळतात, ओढे मिळतात आणि गटारगंगाही जाऊन मिळते. गांवाच्या आसपासचे घाणेरडे नाले जोंपर्यंत तें गंगेला मिळत

नाहींत तोंपर्यंतच ते अपवित्र असतात. त्यांनीं गंगाजळांत एकदां उडी घेतली आणि तें गंगारूप झाले म्हणजे मग जसे ते पवित्र होतात. तद्वतच माणसांचेंही आहे. ज्ञानेश्वर म्हणतात, 'हा गा गांवरसें भरलें । पाणी पाठीं पाय देत आलें । तें गंगा काय म्हणितलें । परते सर ॥ तैसें तंवच वहाळ वोहळ । जंव पवति गंगाजळ । मग होऊनि ठाकति केवळ । गंगारूप ॥' तात्पर्य हिंदुधर्मामध्यें पतिताला पूर्ण आश्वासन आणि अत्यंत दुराचाऱ्याला-सुद्धां उद्धरून जाण्याचा म्हणजे सुधारण्याचा मार्ग सांगितला आहे. नीच, पतित असे सर्व परिस्थितींतील मानव शुद्ध होऊन परम पदवीस पोंचूं शकतात असें तत्त्वज्ञान हिंदुधर्मानेंच उत्पन्न केलें.

**दशलक्षणी धर्मः**—खिस्तिधर्मामध्यें खिस्तानें सांगितलेल्या दहा आज्ञांचें मोठें महत्त्व आहे. तशा दहा आज्ञा हिंदुधर्मात नाहींत, असें अज्ञानानें म्हटलें जातें. वास्तविक सामान्यधर्मामध्येंच खिस्तप्रोक्त दहा आज्ञांचा समावेश होतो. परंतु दहा या शब्दाचा उच्चार करूनच जर त्या आज्ञा हव्या असतील तर खिस्तापूर्वींच भगवान् मनूनें त्या दहा आज्ञा सांगितलेल्या आहेत. चार वर्ण व चार आश्रमांतील सर्व लोकांनीं हा दश-लक्षणीधर्म प्रयत्नानें आचरण करावा अशी प्रस्तावना करून मनु म्हणतोः—

धृतिः क्षमा दमोऽस्तेयं शौचमिन्द्रिय निग्रहः ।
धीर्विद्या सत्यमक्रोधो दशकं धर्मलक्षणम् ॥९२॥ अ. ६

धैर्य, क्षमा, संयम, अस्तेय, पावित्र्य, मनोनिग्रह, बुद्धिमत्ता, विद्वत्ता, सत्य, अक्रोध एवंगुण विशिष्ट या दहा आज्ञांचें जे प्रतिपादन करतील त्यांना परमगति मिळेल. यांतील धैर्य, बुद्धिमत्ता आणि विद्वत्ता यांकडे वाचकांचें विशेष लक्ष वेधूं इच्छितों. सर्वसामान्य नीतितत्त्वाची अहिंसा, सत्य, अस्तेय, अपरिग्रहादि जी जंत्री संन्याशाकरितां सांगितली असते, त्यापेक्षां येथें धैर्य, बुद्धिमत्ता व विद्वत्ता हे विशेष गुण सांगितले आहेत. गीतेमध्यें दैवी संपत्तीच्या वर्णनांत निर्भयता, अभय हा पहिला गुण सांगितला आहे. त्याचाही अंतर्भाव यांत करून प्रत्येक हिंदूनें धैर्य, निर्भयता, बुद्धिमत्ता आणि विद्वत्ता यांनीं युक्त होऊन मनुप्रोक्त दश आज्ञा पालन करून, तेजस्वी आणि जयस्वी व्हावें असें हें हिंदुधर्माचें सातवें उज्ज्वल तत्त्व आहे.

**आनंदवादः-जगत् दुःखमय नसून आनंदमय** आहे असें हिंदुधर्माचें आठवें उज्ज्वल तत्त्व आहे. दुःखवादाची प्रक्रिया ही गौतम-बुध्दाची आहे. दुःखं, शून्यं, क्षणिकं हें बौध्द तत्त्वज्ञान आहे. जग हें दुःख-मय आहे, तें क्षणिक आहे, तें मिथ्या आहे, संसार असार आहे, प्रपंच त्रासदायक आहे. याकरितां त्याचा सर्वथैव त्याग करून संन्यास स्वीकारावा अशी शिकवण बौद्ध धर्माची आहे. जगाचें मूल आनंदमय, मनुष्याचा आत्मा आनंदमय आहे; म्हणून हें आनंदमय जगत् चैतन्याचा विकास आहे आणि तें गतिमान असल्यामुळें परिवर्तनशील आहे; जगांत मुळींच दुःख नाहीं असें नाहीं; जगांतील दुःख मानवकृत आहे; ईशसृष्टींत दुःख नाहीं; मानवानें मनुष्यकृत, समाजकृत, राजदंडप्रयुक्त जें दुःख असेल तें नष्ट करण्याचा यत्न केला पाहिजे; त्याकरितांच त्याचा जन्म आहे. जगांतील दुःख घालवून, निदान आपल्या राष्ट्रांतील दुःख घालवून त्याचा स्वर्ग बनविणें हें माणसाचें कर्तव्य आहे. ज्या देशांत भौगोलिक परिस्थितीमुळें आणि भूगर्भांतील संततेमुळें वरचेवर धरणीकंपाचे धक्के बसतात आणि ज्वाला-मुखीचे स्फोटही होत असतात, अशा देशांतील लोक निसर्गाशीं झगडून दुःखं, शून्यं, क्षणिकं या तत्त्वत्रयींचा अवलंब न करतां ‘ सुखं, चिरकालिकं, आणि सद्रूपं ’ या स्थितीला आपलें राष्ट्र कसें येईल या उद्योगांत आहेत, व यशस्वी होत आहेत. हिंदुधर्मही प्रत्येक हिंदूला हिंदुराष्ट्राच्या उद्धारा-करितां जगत् हें आनंदमय आहे असें समजून राष्ट्रांतील दुःख, दैन्य, त्रास नष्ट करण्याचा यत्न करा असें सांगतो.

**प्रवृत्ति-निवृत्तींचा समन्वयः**-प्रवृत्ति-निवृत्तीचा समन्वय हें हिंदुधर्माचें नववें उज्ज्वल तत्त्व आहे. जगत् हें आनंदमय आहे. तेथें आपण कर्तव्याकरितां उत्पन्न झालों आहोंत हा सिध्दांत गृहीत धरला म्हणजे प्रवृत्ति आणि निवृत्तिशास्त्र हीं सुफलित होतात. हिंदुधर्म केवळ निवृत्तिप्रधान नाहीं आणि प्रवृत्तिप्रधानही नाहीं. कांहीं धर्म केवळ निवृत्ति-परायण तर कांहीं प्रवृत्तिपरायण आहेत. हीं दोन्हीं टोकें एकांगींच होत. मनुष्यस्वभावाचा विचार केला तर त्याच्या ठिकाणीं प्रपंचाची ऊर्मि नैसर्गिक आहे. उत्तम विद्वान व्हावें, चांगली बायको मिळावी, आपल्या बुद्धीला चांगलें कार्यक्षेत्र मिळावें, पैसा मिळावा अशी माणसाला स्वाभाविक इच्छा असते.

"अथ जाया मे स्यात्, वित्तं मे स्यात्, कर्म कुर्वीय, एतावान् वै कामः (बृ.आ.) हा काम ) म्हणजेच प्रपंच होय! प्रपंच आणि परमार्थ, प्रवृत्ति आणि निवृत्ति अभ्युदय आणि निःश्रेयस, आधि–भौतिक प्रगति आणि आध्यात्मिक शांति या दोन्हीही मानवी जीवनाला अवश्य आहेत, आणि त्या मानवी वृत्तीला धरून आहेत. जगांत मानवाच्या प्रवृत्ति आणि निवृत्तिपर वृत्तींचा विकास म्हणजेच भौतिक सुधारणा आणि तत्त्वज्ञानाची वाढ हा होय! संन्यास-मार्गीय प्रवृत्तीनें जग चालणार नाहीं आणि प्रवृत्तीच्या अतिरेकानें जगांत स्वास्थ्य लाभणार नाहीं. यास्तव ज्या प्रवृत्तीचें पर्यवसान शेवटीं आध्यात्मिक निवृत्तीमध्यें होईल अशी योजना हिंदुधर्मानें केलेली आहे. तीन आश्रम हे प्रवृत्तीकरितां आहेत. विषय, वित्त आणि लौकिक या तीन "एषणा" योग्य मार्गानें भोगणें हा प्रवृत्तिधर्म आहे. प्रवृत्तिधर्माचें अनुष्ठान झाल्यावर वयाच्या शेवटच्या भागांत मनुष्यानें निवृत्तिपर होणें हें स्वाभाविक, इष्ट, अनुकूल आणि योग्य असतें. प्रपंच आहे म्हणूनच परमार्थाला महत्त्व आहे. ज्याला प्रपंच नाहीं तो परमार्थ कसा साधणार? प्रपंचांत जो सावध आणि दक्ष असेल तोच परमार्थ साधतो. प्रपंच सांडून परमार्थ केल्यास अन्नाची भ्रांत पडते; मग त्या करंट्याला विचारतो कोण? समाधानाकरितां परमार्थ आणि निवृत्ति, जीवनाकरितां प्रपंच आणि प्रवृत्तिपरता असा हा मधुर संगम हिंदुधर्मामध्यें आहे.

**चार ऋणें फेडणें:**—अनृणी होणें हें हिंदुधर्मातील दहावें उज्ज्वल तत्त्व आहे. तें प्रवृत्तिशास्त्राला आणि आनंदमय प्रक्रियेला धरून आहे. जगत् दुःखमय मानलें तर ऋणें कसलीं आणि तीं कोणीं व कां फेडावयाचीं? असा प्रश्न येतो. जगत् क्षणिक मानलें कीं प्रवृत्तिशास्त्रही व्यर्थ ठरतें. जगत् हें अनादिकालापासून अनंतकालापर्यंत चालणारें आहे. त्या जगांतील एक राष्ट्र आपल्या कर्तृत्वाकरितां ईश्वरानें दिलेलें आहे. त्यांत जन्म घेतल्या-प्रमाणें देवांचें, ऋषींचें आणि पितरांचें ऋण फेडणें हें मनुष्यमात्राचें कर्तव्य आहे. हिंदुधर्मातील हीं ऋणें फेडण्याची कल्पना फार उदात्त, व्यापक आणि मूलग्राही आहे. मनुष्य उगाच जन्माला आलेला नाहीं. आपल्याला कोणीतरी उत्पन्न केलेलें आहे; आणि आपणही कोणाला तरी उत्पन्न करून जाऊं, चार दिवस मजा करूं, असली उथळ वृत्ति हिंदुधर्मांत नाहीं. आज जीं

हिंदु माणसें जन्माला आलीं आहेत, तीं या जगांत जीं सुखदुःखें भोगत आहेत, त्याचा संबंध मागील पिढीशींही आहे. प्रकाशमान देव, ज्ञानवान ऋषि आणि कर्तव्यनिष्ठ पितर या तिघांच्यामुळें आपण या जगांत आहों. मागच्या पिढीचें ऋण फेडून पुढच्या पिढीकरितां कर्तव्याचा बराचसा ठेवा जतन करून ठेवणें हें काम माणसांचें आहे. स्वकर्तव्य उत्तम पार पाडून देवांचें ऋणांतून मुक्त व्हावें. ऋषि ज्ञानवान होते, तसें आपण ज्ञानवान व्हावें—आजच्या जगांतील सर्व ज्ञानशाखा आत्मसात करून आपल्या राष्ट्राचें सुख आणि ऐश्वर्य वाढवावें म्हणजे ऋषींचें ऋण फिटतें. पितरांनीं आपल्याला जन्म दिला, आपणही राष्ट्रामध्यें सुप्रजा निर्माण करून तिला सुसंस्कृत करून तिचें जीवन सर्व तऱ्हेनें सुखी करण्याचा यत्न केल्यानें पितरांचें ऋणांतून मनुष्य मुक्त होतो. देव, ऋषि, पितर हे तीन शब्द लहान असले तरी त्यामुळें धर्मसंबद्ध, समाजसंबद्ध आणि राष्ट्रसंबद्ध अशा सर्व कर्तव्यांचा बोध होतो. अवश्य तर स्पष्टीकरणार्थ देवऋण, ऋषिऋण, पितृऋण यांच्या जोडीला राष्ट्रऋण असा शब्द घालणेंही योग्य आहे. चार ऋणें फेडण्याची कल्पना महाभारतांत आहे.

> ऋणैश्चतुर्भिः संयुक्ता जायन्ते मानवा भुवि । —महाभारत
> पितृ–देवर्षिमनुजैर्देयं त्वेभ्यश्च धर्मतः । —आदि. १२०।१७
> यज्ञैस्तु देवान् प्रीणाति स्वाध्यायतपसा मुनीन् । —महाभारत
> पुत्रैः श्राद्धैः पितृंश्चापि आनृशंस्येन मानवान् ॥—आदि. १२०।२०

हीं सर्व ऋणें फेडण्याकरितां मनुष्य जन्मास येतो आणि हीं सर्व व्यवस्थित फेडल्याशिवाय तो मोक्षमार्गाचा अधिकारी होत नाहीं, असें हिंदुधर्माचें तत्त्व आहे. मनुष्यानें विद्यासंपन्न व्हावें, पुत्रसंपन्न व्हावें, यथाशक्ति धर्म व समाजसंबद्ध कर्तव्यें करावींत आणि शेवटीं मोक्षमार्गाकडे वळावें. 'जायमानो वै ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणैऋणवाञ्जायते यज्ञेन देवेभ्यः प्रजया पितृभ्यः स्वाध्यायेन ऋषिभ्यः' यांतील ब्राह्मण या शब्दाऐवजीं आम्ही मनुष्य असा शब्द योजतों. प्रत्येक माणसानें तीन ऋणें फेडलींच पाहिजेत, असा दंडक आहे.

> ऋणानि त्रीण्यपाकृत्य मनो मोक्षे निवेशयेत् ।
> अनपाकृत्य मोक्षं तु सेवमानो व्रजत्यधः ॥३५॥ —मनु. अ. ६

देव, ऋषि, पितर आणि राष्ट्र यासंबंधाचीं कर्तव्यें करण्याकरितां म्हणजे ऋणें फेडण्याकरितां मनुष्य या जगांत आलेला आहे म्हणून त्यानें मागच्या पिढीनें केलेल्या कार्याच्या पायावर उभें राहून पुढच्या पिढीकरितां ज्ञान, क्रिया यांचा सांठा ठेवला पाहिजे. ज्ञानसातत्य, क्रियासातत्य आणि प्रजासातत्य म्हणजेच राष्ट्र होय ! राष्ट्राला तेजस्विता ज्ञान व क्रियेमुळेंच येते. देशभक्ति, राष्ट्रवाद, Nationalism हे शब्द अर्वाचीन आहेत. परंतु हिंदुधर्मातील अत्यंत प्राचीन अशा वैदिक वाङ्मयांत हीं ऋणें फेडण्याची म्हणजे देशभक्ति करण्याची, देशाच्या स्वातंत्र्यांत त्याग करण्याची केवढी उदात्त भावना सांगितलेली आहे, याचा प्रत्येक हिंदूनें विचार करावा.

या ऋणत्रय कल्पनेशींच चार पुरुषार्थही संबद्ध आहेत. धर्म, अर्थ, काम नि मोक्ष हेच ते पुरुषार्थ होत. समाजाची धारणा, अर्थप्राप्ति, सत्ता, नि उपभोग ही सर्व मानवी जीवनाला आवश्यक आहेत. तीन पुरुषार्थ हे प्रवृत्तीला अनुरूपच आहेत. तीन पुरुषार्थ, तीन ऋणें, तीन आश्रम, तीन एषणा या प्रवृत्तिधर्माकरितां आहेत. आणि निवृत्तिपरता, वैराग्य व चतुर्थाश्रम हीं चौथा पुरुषार्थ जो मोक्ष त्याकरितां आहेत. मोक्ष हा परम पुरुषार्थ आहे, पण तो तीन पुरुषार्थांच्या पायावरच तीन ऋणें फेडल्यानंतर, तीन एषणा पूर्ण करून घेतल्यानंतर उभा राहूं शकतो. पायाविहीन मोक्ष हा पुरुषार्थ अधांत्री स्थितीमध्यें असाध्यच आहे. तात्पर्य ऋणत्रयें फेडणें म्हणजे एका दृष्टीनें तीन पुरुषार्थ साध्य करणें आणि चौथ्या पुरुषार्थाच्या साधनास तत्पर असणें असें आहे. आजच्या हिंदुसमाजांत हीं ऋणें फेडण्याची कल्पना म्हणजे कर्तव्यतत्पर होण्याची कल्पना जितकी अधिकाधिक मुरत जाईल तितकी इष्ट आहे.

**तप, त्याग आणि भोगः**–तप, त्याग आणि भोग यांचें सातत्य हें हिंदुधर्मांचें अकरावें उज्ज्वल तत्त्व आहे. तप, त्याग आणि भोग हीं तीन्हीं कर्में माणसाच्या स्वाभाविक वृत्तीला अनुसरूनच आहेत. शास्त्र हें नेहमीं ज्याची शक्यता, आणि संयमपूर्वक जें माणसाला आचरतां येईल तेंच सांगत असतें. अशक्य व अव्यवहार्य अशी शास्त्राज्ञा नसते. तप म्हणजे स्नानसंध्या, उपासतापास, ध्यानधारणा, जप व अनुष्ठान करणें होय.

मनुष्याच्या मनाला आणि शरिराला वळण लावण्याच्या दृष्टीनें यांची आवश्यकता आहे. पण तप या शब्दाचा अर्थ तापणें, श्रम करणें, विचार करणें, बुद्धीला प्रखर करणें इतका व्यापक आहे. मनुष्य हा नेहमीं श्रम करतो, विचार करतो, पण एका विशिष्ट ध्येयाकरितां स्वतःला विसरून तन्मयतेनें सारखा विचार व सारखे श्रम करीत राहाणें म्हणजेच तप होय. शास्त्र, इतिहास, कला, साहित्य अशा क्षेत्रांतसुद्धां जे लोक बौद्धिक आणि शारीरिक श्रम करतात, ते त्या क्षेत्रांतील तपस्वीच होत. ब्रह्मदेवानें तप करून सृष्टि निर्माण केली; म्हणजे कष्ट केले, विचार केला आणि सृष्टि उत्पन्न केली. तैत्तिरीय उपनिषदांतील भृगुवल्लीमध्यें तपाची गोष्ट आहे. भृगु हा आपल्या वरुण नामक पित्याकडे गेला, आणि मला ब्रह्म शिकवा असें म्हणाला. त्यानें त्याला अन्न, प्राण, डोळे, कान, मन हेंच ब्रह्म आहे काय, असें विचारलें. भृगूला वरुण म्हणाला, 'ज्यापासून हें सर्व जग उत्पन्न होतें तें मूलतत्त्व ब्रह्म होय!' भृगूच्या ध्यानांत एकदम ही गोष्ट आली नाहीं. त्यानें पुष्कळ विचार केला, अभ्यास केला. मग त्याला प्रथम अन्न हेंच ब्रह्म, प्राण हेंच ब्रह्म मन हेंच ब्रह्म आहे, बुद्धि हेंच ब्रह्म आहे, असें कळलें. तेथें ठिकठिकाणीं "स तपोऽतप्यत स तपस्तप्त्वा" असा वाक्यप्रयोग आहे. म्हणजे भृगूनें सारखा विचार केला, ध्यास घरला आणि विचार करतां करतां त्याला एकेक गोष्ट सुचूं लागली, असा त्याचा आशय आहे. यावरून तप करणें म्हणजे घरदार सोडून अंगाला राख फासून अरण्यांत जाणें असें नव्हें. इतिहासाचार्य कै. वा. राजवाडे यांनीं इतिहासाच्या क्षेत्रांत मोठें तप केलें. श्री. शंकरराव देव धुळें यांनीं समर्थ वाङ्मय संशोधन आणि त्याचा प्रचार एतदर्थ देह झिजविला. श्री. आण्णासाहेब कर्वे यांनीं स्त्री-शिक्षणाच्या क्षेत्रांत मोठी तपश्चर्या केली. प्रा. रामभाऊ रानडे यांनीं तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत, श्रीकेवलानंद स्वामीमहाराज यांनीं षट्शास्त्राच्या अध्ययन अध्यापनांत, कै. वा. सर जगदीश्चंद्र बोस यांनीं वनस्पतीशास्त्राच्या संशोधनांत, सर सी. व्ही. रामन यांनीं प्रकाश आणि किरण यांच्या संशोध-नांत फार मोठी तपश्चर्या केलेली आहे. त्यांच्या तपःश्चर्येचीं फळें आज राष्ट्राला मिळत आहेत. यास्तव आजच्या पिढीनें राष्ट्रोद्धारपोषक अशा ज्ञानाच्या निरनिराळ्या शाखांमध्यें तपःश्चर्या केली पाहिजे.

स्नान हें शरीरशुद्धतेकरितां, ध्यान हें चित्ताच्या एकाग्रतेकरितां आणि मनन हें तन्मयतेकरितां आहे. आधीं मनन, नंतर प्रवचन व नंतर कर्म असा क्रम आहे, ज्या कुटुंबांत, समाजांत आणि राष्ट्रांत तपाचें सातत्य असतें, तेंच कुटुंब, तोच समाज आणि तेंच राष्ट्र अभ्युदय पावतें. इंग्लंडमध्यें तीन तीनशें वर्षांची किराणा माल विकणारीं जुनीं दुकानें आहेत, असें सांगतात. त्यांनीं आपलें सातत्य इतकीं वर्षें टिकविलें आहे, तर आपल्या इकडे त्याच्या उलट स्थिति आहे!

दिवसेंदिवस तर ही तपाची, अभ्यासाची, दीर्घ परिश्रमाची आणि ज्ञानशाखेच्या मुळाशीं जाऊन अवलोकन करण्याची प्रवृत्तीच कमी कमी होत आहे. त्यामुळें प्रत्येक क्षेत्रांत उथळपणा मात्र भरपूर आलेला आहे. कायदा, आयुर्वेद, शस्त्रक्रिया, पाश्चात्य आयुर्वेद, राजकारण, इतिहास, अर्थशास्त्र अशा सर्व क्षेत्रांत अभ्यासी, अत एव तपस्वी आणि अधिकारी अशीं माणसेंच दिसत नाहींत. राजकारणाच्या क्षेत्रांत तर त्या विषयाचा कसून अभ्यास हा शब्दच नाहींसा झालेला आहे. कोणीकडून तरी असतें, त्यापेक्षां नसलेलें पुष्कळ भासवून फड मारण्याचा प्रकार चालू आहे. हें हिंदुधर्मपरंपरेला विरुद्ध आहे. तपाशिवाय, कष्टाशिवाय राष्ट्र जगूं शकत नाहीं. तपाशिवाय कांहीं मिळत नाहीं. तपोबलानें मिळविलेलेंच टिकतें आणि भोगण्यांतही आनंद असतो. यास्तव प्रत्येक हिंदूनें आपापल्या क्षेत्रांत तप करण्याचा यत्न करावा.

तप करून जें मिळतें तें भोगण्याचा एकट्याचाच अधिकार आहे असें समजूं नये. भोगप्रधानता ही माणसांत स्वाभाविक आहे. परंतु भोग त्यागामुळेंच खुलतो आणि शोभाही देतो. त्याग ही मनुष्यस्वभावांत स्वाभाविक वृत्ति आहे. ती अगदीं कृत्रिम आणि अळेबळें आणली पाहिजे असें नाहीं. तपानें मिळविलेलें जें असेल, त्यांतील कांहीं भागाचा त्याग समाज आणि राष्ट्राकरितां केला पाहिजे. तीन धर्मस्कंधांमध्यें दान हा एक धर्मस्कंध छांदोग्यांत सांगितलेला आहे. दान, दमन, दया अशीं तीन 'द' या अक्षरानें दिल्याची गोष्ट उपनिषदांत आहे. माणसांना दान, देवांना दमन, आणि असुरांना दया करण्याचा उपदेश केला. त्यांतील रहस्यही प्रत्येकानें कांहींतरी त्याग करावा हेंच आहे.

मनुष्याला आनंद झाला कीं तो पुष्कळांना सांगावासा वाटतो. खूप पैसा मिळाला म्हणजे तो निरनिराळ्या कार्याला देऊन लौकिक संपादन करावासा वाटतो. कांहीं कारणानें अनुताप झाल्यास अन्नदान करावेसें वाटतें. कोणी निरनिराळ्या संस्थांना देणग्या देतात. याच्या बुडाशीं त्यागवृत्तीच आहे. शुद्ध सात्त्विक त्याग हा अभ्यासानेंच साध्य होत असतो. तशा तऱ्हेच्या त्यागानेंच अमृतत्त्वाची प्राप्ति होते. 'त्यागेनैकेऽमृतत्त्वमानशुः' ॥ ( महानारायण. १०–५ ) 'त्यागात् शांतिरनंतरम्' ॥ ( गीता १२–१२ )

हिंदुधर्मामध्यें तपाइतकेंच त्यागाचें महत्त्वही सांगितलेलें आहे. जो मनुष्य तप व त्यागाशिवाय दुसऱ्याच्या श्रमावर जगतो तो चोर होय, असें गीतेमध्यें अ. ३ श्लो. १२ मध्यें एका निराळ्या अर्थानें सांगितलेलें आहे. तपानें जें मिळेल त्यापैकीं स्वतःच्या निर्वाहाला अवश्य तेवढ्यावर आपला हक्क असतो. बाकीचा जो भाग असेल तो समाजाचा आणि राष्ट्राचा आहे असें हिंदुधर्म सांगतो.

यावत् भ्रियेत जठरं तावत् स्वत्वं हि देहिनाम् ।
अधिकं योऽभिमन्येत स स्तेनो दंड्यमर्हति ॥ भागवत

भागवतांतील या श्लोकांत कोणाला समाजसत्तावादाचीं बीजेंही दिसतील. तीं तशीं दिसल्यास तप, त्याग आणि भोग यांच्या समन्वयांत समाजसत्तावाद आहे असें ठरेल. 'ददामीत्येव ब्रूयात् ॥' ( अथर्व. १२।४।१ ) मी देतों असें म्हणत असावें. कारण द्रव्य हें द्रव्याकरितां नसून दानाकरितां आणि भोगाकरितां असतें. धनाला धारण करणारा व मुक्त हस्तानें बुद्धिमानांना देणारा, हाच विद्वानांचा आश्रयदाता व रक्षक असतो. द्रव्याचा उपयोग देव, धर्म, देश, समाज यांच्याकरितां न करतां जो स्वतःकरितां करतो, तो पापी चंडाल होय, असे विचार पुढील मंत्रांत सांगितलेले आहेत.

मोघमन्नं विन्दते अप्रचेताः सत्यं ब्रवीमि वध इत्स तस्य ।
नार्यमणं पुष्यति नो सखायं केवलाघो भवति केवलादी ॥

ऋ. १०।११७।५

'जो अप्रबुद्ध मनुष्य परिश्रम न करतां बापजाद्यांची कमाई खात बसतो किंवा दुसऱ्याचा अपहार करून जगतो अशा मनुष्याचें अन्न खाणें व जगणें म्हणजेच साक्षात् मृत्यु होय. जो श्रेष्ठ कार्यकर्त्यांना त्याचप्रमाणें हितकारक मित्रांना आश्रय देत नाहीं; असा जो आप्पलपोट्या असतो, तो केवळ पापी होय.'

मनुष्याला भोग पाहिजे, सुख पाहिजे, विलास पाहिजे आणि चैनही पाहिजे. परंतु या भोगाचेंसुद्धां शास्त्रीय ज्ञान अवश्य आहे. उत्तम व्यायाम करणें, व्यवस्थित वागणें आणि जठराग्नि प्रदीप्त झाल्यावर सुग्रास भोजन करणें हा भोजनाचा खरा भोग होय. पण ना व्यायाम, ना सुयंत्रता, ना पोटांत भूक, अशा वेळीं जिव्हालौल्यामुळें सारखें खात बसणें हा भोग नसून कर्मभोग होय! चोवीस वर्षेंपर्यंत कडकडीत ब्रह्मचर्य पाळून, शील व विद्या-संपन्न होऊन अनुरूप, निरोगी, सुसंस्कृत अशा कुमारिकेशीं विवाहबद्ध होऊन गृहस्थधर्म चालविण्यांत जो भोग आणि आनंद आहे तो गद्धे-पंचविशींत वाईट संवयीमुळें हतवीर्य झाल्यानंतर, तो आणि तीचें स्त्रैण आणि कामुक वाङ्मय वाचल्यानंतर तिशीच्या पुढच्या—जिचें कौमार्य कोमेजलें आहे अशा—स्त्रीशीं विवाहबद्ध होऊन संसार करण्यांत मुळींच नाहीं. उत्तम घर बांधून, त्यांत सर्व सोयी करून घेऊन गजबजलेल्या मुलानातवंडांसह राहाण्यांत जो आनंद आहे, तो वाटेल तितकें भाडें देऊन एखाद्या बंगल्यांत नुसत्या जोडप्यानें राहाण्यांत नाहीं. तात्पर्य खाणें पिणें, पहाणें, वाचणें, गाणें, वस्त्रें वापरणें अशा ज्या ज्या कांहीं भोगाच्या बाबी असतील त्या सर्वांमध्यें एक-तऱ्हेचा शास्त्रीयपणा असेल तरच तो भोग आनंद देतो. म्हणून भोगांत शास्त्रीयता, त्यागांत परोपकारता आणि तपामध्यें तद्रूपता आणण्याचा उपदेश हिंदुधर्म करतो. यामुळें तप, त्याग आणि भोग यांचें सातत्य राहातें आणि तें राष्ट्र उत्कर्षाप्रत जातें.

**सर्वभूतात्मैक्यः**—सर्वभूतात्मैक्य हें हिंदुधर्माचें बारावें उज्ज्वल तत्त्व आहे. जगांतील सर्व माणसें हीं एकाच मूलभूत तत्त्वाचीं बनलेलीं असल्यामुळें हिंदुधर्म त्या सर्वांकडे समदृष्टीनें पहातो. सर्वभूतांमध्यें, मनुष्यांमध्यें, पशुपक्ष्यांमध्यें एकच आत्मा आहे, सर्वांतर्यामीं एकच तत्त्व

आहे, अशा समदृष्टीनें सर्वांचें हित करावें, सर्वांशीं बंधुत्वानें वागावें, असें विश्वबंधुत्व हिंदुधर्म प्रतिपादन करतो; मनुष्य कोणत्याही धर्माचा, जातीचा, कुलाचा असला तरी त्याच्याशीं आत्मौपम्यानें वागावें.

जें जें दृष्टि दिसें भूत । तें तें मानिजें भगवंत ।
हा भक्तियोग निश्चित । जाण माझा ॥ –ज्ञानेश्वरी अ. १०

सर्वभूतात्मैक्य हें हिंदुधर्माचें साध्य असून सर्वभूतहिततत्परता हें त्याचें साधन आहे. 'सर्वभूतहितेरताः' (गीता अ. १२ श्लो. ४) असें परमभक्ताचें लक्षणच केलेलें आहे. सर्वभूतहित साधत साधत सर्व-भूतात्मैक्याच्या ध्येयाप्रत जातां येतें, असें हिंदुधर्मानें चार हजार वर्षांपूर्वी महाभारताच्या द्वारें घोषित करून वैचारिक विचाराचें थोर शिखर गांठलें. याचें कारण हिंदुस्थानांतच धर्मविकास सर्वांच्या अगोदर झाला, आणि अन्य संस्कृतीपेक्षां भारतीय संस्कृतींतच धर्माची मूलगामी समीक्षा सर्वांच्या आधीं सुरू झाली, हें होय.

हिंदुसमाजाच्या प्रत्येक व्यवहारांत वैयक्तिक सुखापेक्षां सबंध त्रैलोक्याला, जगाला, सर्व प्राण्यांना सुख व्हावें अशा भावना व्यक्त केलेल्या आहेत. सकाळीं उठून जे प्रातःस्मरण करतात, त्यांत 'हे परमेश्वरा, "त्रैलोक्यं मंगलं कुरु" या त्रैलोक्याचें मंगल म्हणजे कल्याण कर अशी प्रार्थना आहे. पुराणादींच्या समाप्तीचे वेळीं सर्व सुखी असोत, कोणालाही दुःख न व्हावें अशा आशयाचा श्लोक म्हणतात. त्यावरून हिंदूंच्या सर्व जीवनामध्यें सर्वांशीं आत्मीयत्वानें, बंधुभावानें, शेजारधर्मानें वागण्याचा उपदेश आहे हें उघड होतें.

आपणावरून जग पाहावें, स्वतःला जें प्रतिकूल व अप्रिय, तसेंच तें दुसऱ्यालाही प्रतिकूल व अप्रिय असें समजून वागावें आणि मानवी प्रगतीला विरोधक अशी जगांत जी असहिष्णुता, विषमता, अनुदारता आणि अस्पृश्यता असेल, ती नष्ट करण्याचा उद्योग अवश्य करावा.

आत्मौपम्य आणि सर्वभूतात्मैक्य या परमोच्च ध्येयाकडे जात अस-तांना जगांतील व्यवहार, (जग हें त्रिगुणात्मक आहे असें जाणून) सापेक्षतेनें आणि औचित्यानेंच केले पाहिजेत. सर्वांशीं सारखे, सर्वांभूतीं समदृष्टि म्हणजे

सज्जन दुर्जन, विद्वान अविद्वान, सुगंध दुर्गंध, स्व आणि पर, देव आणि असुर, पशु व मनुष्य, सच्चा आणि लुच्चा हा भेदही लक्षांत घ्यावयाचा नाहीं असें नव्हे. तर हें सर्व ध्यानीं घेऊन ज्याच्याशीं ज्या प्रकारानें वागणें अवश्य त्याशीं तसेंच वागावें, असें हिंदुधर्माचें सांगणें आहे. श्रीएकनाथ म्हणतात —

नवल श्रद्धेचें लक्षण । ब्रह्मा मुंगी समसमान ।
तरी यथोचित विधान । सर्वथा जाण चुकेना ॥३७०॥
एका अन्न आच्छादान । एकासी ते कोरडे कण ।
एका तृण आणि जीवन । एका पयपान यथोचित ॥३७२॥
जेणें ज्यासी सुख संपूर्ण । तें तें करी उचित श्रद्धें जाण ।
अनुचित श्रद्धेचें विंदाण । दुःखकारी संपूर्ण सर्वार्थीं ॥३७३॥
जेवीं ब्राह्मणा वाढिलें तृण । गाईस वाढिलें मिष्टान्न ।
श्वानासी बैसणें सिंहासन । साधूसि आसन थारोळा ॥३७४॥
व्याघ्रासी पडिल्या लंघन । त्यासी अर्पूं नये गोदान ।
गाय गादल्या संपूर्ण । तैलाभ्यंजन करूं नये ॥३७५॥
हो कां देहइंद्रियें जरी एकें । तरी जिव्हाकर्म नव्हे नाकें ।
तेवीं एक भूतात्मा भूतवेखें । उचितोन्मुखें यजावा ॥३७६॥
करितां यथोचित अर्पण । जरी क्रिया दिसे भिन्नभिन्न ।
तरी अंतरश्रद्धा अभिन्न । हें मुख्य लक्षण भागवतधर्मीं ॥३७७॥

—एकनाथी भागवत अ. ३

श्रीएकनाथांप्रमाणें श्रीसमर्थांनींही सर्वांभूतीं समदृष्टि म्हणजे काय हें दासबोध दशक १३ समास १० ओवी ११ ते १५ मध्यें सांगितलेलें आहे. साखर आणि माती हीं दोन्हीं पार्थिव असलीं तरी माती खावयाची नसते. विष आणि पाणी या दोन्हीमध्यें जलाचा भाग असला तरी विष पिणें इष्ट नाहीं. मोरीचें आणि भागीरथीचें जरी पाणीच असलें तरी मोरीचें पाणी पिणें जसें मूर्खपणाचें ठरतें, तद्वतच सर्वांशीं सारखें म्हणजे कांहींतरी वागणें हा आचरटपणा ठरतो! अर्थात् त्यामुळें व्यवहार उत्सन्न होतो.

विश्वबंधुत्वाची भावना ठेवून आत्मौपम्य बुद्धीनें वागणें हें ध्येय आहे. परंतु हें ध्येय साध्य होण्याकरितांच व्यवहार संभाळावा लागतो. विश्वबंधुत्वाच्या कल्पनेनें मनुष्य घराचें दार आणि तिजोरीही उघडी टाकून बाहेर जाऊं शकेल, जर भोंवतालच्या लोकांची तशी भावना असेल तर ! ! इंग्रजींत एक म्हण आहे आणि इंग्रज तिचा उपयोग नेहमीं व्यवहारांत करतो. 'Let us be brothers, but I am the eldest.' आपण सर्व बंधु आहों खरें, तरी मी वडील म्हणून मला अधिक भाग मिळावा. अशा तत्त्वावर जोंवर जग चाललें आहे आणि आत्मौपम्य दृष्टीनें आशीर्वादार्थ दोन्ही हात वर केल्यावर दोहोंबाजूचे शेजारीं जोंवर खिशांत हात घालण्याकरितां टपलेले आहेत तोंवर व्यवहार सोडतां कामा नये.

**दैवी संपत्तीचा स्वीकार व आसुरीचा प्रतिकारः**—दैवी संपत्तीचा स्वीकार आणि पुरस्कार आणि आसुरी संपत्तीचा तिरस्कार आणि प्रतिकार हें हिंदुधर्माचें तेरावें उज्ज्वल तत्त्व आहे. निर्भयता, पावित्र्य, ज्ञान, संयम, स्वाध्याय ही इष्टपर साधून देणारी दैवी संपत्ति आहे आणि दंभ, दर्प, अभिमान ही आसुरी अत एव बंधनकारक संपत्ति आहे. जगांत या दोन वृत्तींचीं माणसें होतीं, आहेत व असणार. केवळ एखादा मनुष्य दैवी संपत्तीनें युक्त असून भागत नाहीं. कारण त्याचेही जगांत निष्कारण वैरी असतात ! त्यांचा केवळ तिरस्कार करून भागत नाहीं तर प्रतिकारही समर्थ होऊन केला पाहिजे. अमुक एक मनुष्य परदेशांतील आहे, परधर्मीय आहे म्हणून त्याचा मत्सर करावा असें नाहीं. तर तो दुष्ट, दुर्जन, खल, आसुर, आततायी, समाजकंटक असा आहे म्हणूनच त्याचा प्रतिकार केला पाहिजे. श्रीसमर्थांनीं 'म्लेंच्छ दुर्जन उदंड' म्लेंच्छांच्या दुर्जनत्वाचा प्रतिकार करा, त्यांचें बंड मोडा असें सांगितलें. म्लेंच्छ म्हणून ते आपले दुस्मन आहेत असें नसून त्यांचें दुर्जनत्व हें जेथें तेथें ताप देतें म्हणूनच त्याचा प्रतिकार केला पाहिजे, असा त्यांनीं आदेश दिला.

**खलानां कंटकानां च द्विविधैव प्रतिक्रिया ।**
**उपानन् मुखभंगो वा दूरतो वा विसर्जनम् ॥** —सुभाषित

वाटेंत काटे दिसले कीं ते बाजूला तरी सारले पाहिजेत किंवा त्यावर खेटराची लाथ मारून मुखभंग तरी केला पाहिजे. तसें न केल्यास त्याचा

उपद्रव होतो. शेताच्या रक्षणार्थ जसें तण काढावें लागतें, तद्वतच समाज-स्वास्थ्याकरितां आसुरीवृत्तीचा प्रतिकार अवश्य आहे.

साधूशीं साधुत्वानें आणि शठाशीं शाठ्यानें वागावें लागतें. 'शठं प्रति सत्यं' हें तत्त्व सदैव उपयोगीं पडेल असें नाहीं. तर प्रसंगीं 'शठं प्रति शाठ्यं, काठ्यं, लाठ्यं' असाही प्रयोग करावा लागतो. महाभारतांत यासंबंधीं पुष्कळ विवेचन केलेलें आहे.

यो यथा वर्तते यस्मिन् तस्मिन्नेवं प्रवर्तयन् ।
नाधर्मं समवाप्नोति न चाश्रेयश्च विंदति ॥

—महाभारत उ. प. अ. १७९—३०

यस्मिन् यथा वर्तते यो मनुष्यः तस्मिंस्तथा वर्तितव्यं स धर्मः ।
मायाचारो मायया बाधितव्यः साध्वाचारः साधुना प्रत्युपेयः ॥

—महाभारत शां. प. अ. १०९—२९

आपल्याशीं जो जसा वागतो, त्याच्याशीं तसें वर्तन केल्यानें अधर्म तर घडत नाहींच पण अकल्याणही होत नाहीं. मायावीशीं मायावीपणानें, आणि साधूशीं साधुत्वानेंच वागणें युक्त आहे. शठ कोण, दुर्जन कसा ओळखावा, आततायीचें लक्षण कोणतें हें सर्व समजण्याजोगें आहे. यासंबंधाचें विवेचन प्रकरण ३२ मध्यें केलें असल्यामुळें त्याची पुनरुक्ति येथें करीत नाहीं. आसुरवृत्तीचा प्रतिकार हें दैवी संपत्तीचें एक अंगच आहे एवढें ध्यानांत ठेवलें म्हणजे पुरें.

'सबको जीव प्यारा' प्राणाइतकें जगांत मनुष्याला कांहीं प्रिय नाहीं. स्वतःला जसें जगावेसें वाटतें, मान, अपमान, सुखदुःख, प्रिय-अप्रिय, या भावना जशा स्वतःला, तशाच त्या इतरांनाही आहेत, असें समजून वागणें हें योग्य आहे.

न हि प्राणात्प्रियतरं लोके किंचन विद्यते ।
तस्माद्दयां नरः कुर्याद्यथात्मनि तथा परे ॥

—महाभारत १३—११६—१२

प्राणाइतकें जगांत मनुष्याला कांहीं प्रिय नाहीं. म्हणून माणसानें आपल्या प्राणाप्रमाणेंच इतरांच्या प्राणावर दया करावी.

जो स्वतः जिवंत राहाण्याची इच्छा करतो तो दुसऱ्याला ठार करण्याची इच्छा कशी करील, असा प्रश्न आत्मौपम्याच्या भावनेनें महाभारतांत केलेला आहे. परंतु दैवी संपत्तीचें फल जें आत्मौपम्य तें ज्याला माहीतच नाहीं, त्याच्याशीं गांठ पडली असतांना प्रतिकाराशिवाय मार्गच नाहीं. सहिष्णुता, उदारता, संग्राहकता हीं मानव्याच्या विकासाला पोषक आहेत. पण त्या उलट जर समाजामध्यें आसुरी लोक असतील तर त्यांचा प्रतिकार करावयास नको काय ?

जीवितुं यः स्वयं चेच्छेत् कथं सोऽन्यं प्रघातयेत् ।
यद्यदात्मनि चेच्छेत तत्परस्यापि चिंतयेत् ॥

—महाभारत शां. प. अ. २५८—२१

आपल्याप्रमाणेंच दुसरा म्हणून त्याच्याशीं शेजारधर्मानें वागावें, मग त्याच्या जातीचा वा धर्माचा विचार करूं नये, असें येथें सांगितलें आहे. तर त्या उलट केवळ अन्यधर्मीय म्हणून त्याला ठार करण्यांत गुन्हा नाहीं, अशी जर धर्माज्ञा आणि समजूत असेल तर तिचा प्रतिकार करावयास नको काय ? 'That according to Islam, it is no crime for a Muslim to slay an unbeliever.' ( History of Aorangjeb, by Sarkar, Page 257 ) तसेंच अबदुल कायूमनें पं. नथुरामलचा जो मुडदा पाडला त्याचें समर्थन 'His act ( Killing a Kaffir ) was justifiable by the law of Quran.' ( Thoughts on Pakistan] Page 152–153 ) जर अशा प्रकारें होऊं लागेल तर त्याचा प्रतिकार करणें हें दैवी संपत्तिवानाचें कर्तव्यच आहे असें हिंदुधर्म सांगतो.

**ईश्वराचीं सगुणनिर्गुण रूपें**:—ईश्वर कसाही मानावा हें हिंदुधर्माचें चौदावें उज्ज्वल तत्त्व आहे. बहुतेक धर्मांत ईश्वर मानलेलाच आहे. कांहीं धर्मांत ईश्वर मानलेला नसला तरी पूर्ण आत्मा म्हणजे ईश्वर असें समजतात. धर्म म्हटला कीं त्यांत ईश्वर, कर्म आणि पुनर्जन्म हीं क्रमप्राप्त येतात; पण हीं तत्त्वें हिंदुधर्मांत जितकीं स्पष्ट, सयुक्तिक व तर्कशुद्ध मांडलीं आहेत तितकीं अन्यत्र नाहींत. चराचराचें नियंत्रण करणारी, निर्गुण, निराकार, जगाला अधिष्ठानभूत एक शक्ति आहे, तिलाच ईश्वर म्हणतात. त्या ईश्वराला मनुष्य आपल्या अधिकाराप्रमाणें सगुण अथवा

निर्गुण मानून भक्ति करतो. अधिकार भेदाप्रमाणें ईश्वराला सगुण वा निर्गुण मानण्याचें स्वातंत्र्य हें हिंदुधर्मांतच आहे. ईश्वर जगांत एकच आहे, पण त्याला लोक निरनिराळीं नांवें देतात आणि एकाच ईश्वराची भक्ति निरनिराळ्या प्रकारानें करतात.

' एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति ( ऋ. १, १६४, ४६ )

स्थूल बुध्दीच्या लोकांना निर्गुण, निराकार तत्त्वांचें आकलन अशक्य आहे. यास्तव कांहीं तरी मूर्त, सगुण, प्रतीक, प्रतिमा, चित्र कल्पनेकरितां कल्पावेंच लागतें. त्यांतूनच मूर्तीपूजेचा उदय झालेला आहे. ' उपासकानां कार्यार्थं ब्रह्मणो रूपकल्पना ' उपासनेकरितां ब्रह्माच्या ठिकाणीं सगुणत्व मानावें लागतें. एवढा जगत्प्रभु पण त्याला भक्त आपल्या संपुष्टांत आणून बसवितो. कारण तो लहानांत लहान आणि मोठ्यांत मोठा आहे. ' सगुण निर्गुण हीं ज्याचीं अंगें । तोचि आम्हां संगें क्रीडा करी ' असें तुकाराम म्हणतो, त्यांतील रहस्य हेंच आहे.

मनुष्य जोंवर अल्पज्ञ व अल्पशक्तिमान आहे, तोंवर त्याला सर्वज्ञ आणि सर्वशक्तिमान अशी शक्ति मानावीच लागते. मनुष्य पूर्वीपेक्षां अधिक ज्ञानवान् आहे पण अजूनही सर्वज्ञ नाहीं. शास्त्रीय शोधांमुळें त्याचें सामर्थ्य वाढलें असलें तरी तो सर्वशक्तिमान् नाहीं. माणसाची बुद्धि आणि शक्ति जेथें कुंठित होते, तेथूनच ईश्वरकल्पनेचा उगम होतो. ज्यांचें जन्मसिद्ध हाडवैर आहे अशीं पंचमहाभूतें हीं त्याच्या दराऱ्यानेंच पंचीकरणांत येऊन सृष्टिरूपानें जगाला सुख देत आहेत. त्याच्या दराऱ्यानेंच सूर्य प्रकाश देतो, वायु वाहातो, वरूण पाऊस पाडतो, तारांगणें प्रकाशतात आणि लता, वेली इत्यादि ऋतुकालीं पुष्पें आणि फळें यांनीं समृद्ध होतात. जें अक्षरपरमतत्त्व आहे, त्याच्या दराऱ्यानेंच हें जग चाललें आहे. पर्वतांनीं आपलें स्थान सोडूं नये, समुद्रानें मर्यादा ओलांडूं नये, पृथ्वीनें भूतांचा भार सहन करावा, वायूनें क्षणभरही विश्रांति घेऊं नये, आकाशानें सर्वत्र व्यापून राहावें, मृत्यूनें योग्य वेळीं संहार करावा, अशी त्या तत्त्वाची आज्ञा आहे, ईश्वराच्या सिद्धीकरितां उपनिषदें, भागवत, ज्ञानेश्वरी वगैरे ग्रंथांत वरील-प्रमाणें युक्तिवाद केलेला आहे. एखाद्या सर्कशींत जशी रिंगणवाल्याच्या

दराऱ्यानें हिंस्रश्वापदें नैसर्गिक वैमनस्य टाकून आश्चर्यकारक कामें करून दाखवितात, त्याप्रमाणेंच जगच्चालकाच्या प्रेरणेनें हें आश्चर्ययुक्त जगत् चाललेलें आहे.

हें जगत् म्हणजे एक अवाढव्य कर्मच होय! कर्म व कर्माचा परिपाक याशिवाय जगांत काय आहे? मनुष्य रोज कर्में करतो, पण त्याला आपल्या सर्व कर्मांचें स्मरण असत नाहीं. कर्मांचें स्मरणच ज्याला नाहीं त्याला माझ्या अमक्या कर्माचें हें अमकें फल असें ज्ञान कसें असणार? अहंकारयुक्त सर्व कर्में फल देतात. कर्मफल कर्त्याला व समष्टीलाही भोगावें लागतें. अमुक कर्म अमुकानें केलें व त्याचें फल अमुक आहे असें गणिताप्रमाणें ठरविणें कठीण आहे. हें कोडें अद्याप मानवी बुद्धीला उलगडलेलें नाहीं. म्हणूनच जगन्नियामक, सर्वाध्यक्ष, सर्व-शक्तिमान, देश व काल यांचा नियामक असा परमेश्वर जीवांना कर्मानुरूप फल देतो, हा सिद्धांत मानावा लागतो. कर्मांचें फल हें कर्मसापेक्ष ईश्वर देतो. तो सर्व जीवांना त्यांच्या त्यांच्या संस्काराप्रमाणें म्हणजे कर्मबीजा-प्रमाणें प्रेरणा करतो व तदनुरूप कर्में घडून येतात. म्हणून तोच प्रेरक व फलदाता होय! प्राणिमात्रांना आपल्या कर्मानुरूप फळें भोगतां यावींत म्हणून ईश्वर या विचित्र सृष्टीला उत्पन्न करीत असतो. ईश्वर हा उगाच ही वैषम्ययुक्त सृष्टि निर्माण करीत नाहीं. तो ती तशी करील तर मोठा अन्याय होईल.

कर्म म्हटलें कीं त्याला फल आहे. निष्फल कर्म जगांत नाहीं. तें फल निसर्गनियमाप्रमाणें, कर्त्याच्या साधनसामुग्रीप्रमाणें यथावकाश मिळतें. मग ईश्वर मानण्याचें तरी कारण काय? असे पूर्वपक्ष वेदांतशास्त्रांत आले असून **शेवटीं ईश्वरच हा कर्मफलदाता** मानावा लागतो, त्यामुळें नैतिक जीवन व धर्माच्या आज्ञा सुफल होतात असें ठरविलें आहे.

**कर्मफलप्रक्रियाः**—कर्मफलप्रक्रिया हें हिंदुधर्माचें पंधरावें उज्ज्वल तत्त्व आहे. कर्माचें फल भोगल्याशिवाय सुटत नाहीं. जसें करावें तसें भरावें, जगांत जें वैषम्य दिसतें त्याचें कारण पूर्वींचीं बरीं वाईट कर्में होत! "आस्तंब-ब्रह्म" पर्यंत सर्व जगांतील ही विषमता या कर्मतत्त्वावरच अवलंबून आहे. पुण्यकर्मानें सद्गति, पापकर्मानें अधोगति प्राप्त होते. जगांत जें कांहीं

बरें वाईट भोगावें लागतें, त्याचा संबंध स्वतःच्या, समाजाच्या आणि जगताच्या कर्माशीं आहे. कर्म व संसार हीं एकरूपच आहेत, व अनादि आहेत. कर्माशिवाय सृष्टि नाहीं, सृष्टीशिवाय कर्म नाहीं. कर्माशिवाय शरीर नाहीं, शरीराशिवाय कर्म नाहीं. पहिलें कर्म कोठून आलें ? तर तें अनादि आहे, म्हणजे दुर्ज्ञेयारंभ आहे.

"धाता यथा पूर्वमकल्पयत् ॥"

पूर्वकर्मसापेक्ष ब्रह्मदेव उत्तरोत्तर सृष्टि निर्माण करतो. त्या सृष्टीला प्राणिमात्रांचीं कर्में व अकर्में, धर्म आणि अधर्म कारणीभूत होतात. एक देह सोडून दुसरा देह घेण्याचें कारण कर्मच होय! अभिमानानें कर्म केलें तर तें बंधक होतें. आसक्ति व अहंकारविरहित केलेलें कर्म बंधक होत नाहीं. असा हा कर्मविपाकाचा सिद्धांत हिंदुधर्मामध्यें तर्कशुद्ध रीतीनें मांडलेला आहे.

येणेंप्रमाणें हिंदुधर्माचीं हीं पंधरा उज्ज्वल तत्त्वें थोर, उच्च, उदात्त आणि मानव्याच्या विकासाला पोषक अशीं आहेत. जगांत शांतता, समता आणि बंधुत्व नांदण्यास हींच तत्त्वें उपयोगीं पडणार आहेत. अखिल जगताचा जागतिक धर्म होण्यास या तत्त्वामुळें हिंदुधर्म हाच सदैव पात्र आहे. जातिभेद, अस्पृश्यता, मूर्तिपूजा हीं हिंदुधर्माचीं प्रधान अंगें नसतांना विनाकारण त्यांजवर भर देऊन, हिंदुधर्माचा जे उपहास करतात आणि जे हीनगंड हिंदु त्यांना माना डोलावतात, तशांनीं या तत्त्वांचें काळजीपूर्वक मनन करावें. प्रत्येक समंजस हिंदूनें या उज्वल तत्त्वांचा अभिमान बाळगून अत्यंत अभिनिवेशानें यांच्या प्रचाराकरितां झटलें पाहिजे. आणि अखिल हिंदूंच्या ठिकाणीं हीं तत्त्वें चांगलीं मुरण्यास सहाय्य केलें पाहिजे.

--*--

# प्रकरण अडतिसावें

## नवहिंदुधर्म–सूत्रावली

(६१०) (१) आसिंधुसिंधुपर्यंता यस्य भारतभूमिका ।
पितृभूः पुण्यभूश्चैव स वै हिंदुरिति स्मृतः ।

ही हिंदु शब्दाची व्याख्या प्रत्येक हिंदु स्त्रीपुरुषानें नीट समजून घेऊन रूढ करावी.

(२) हिंदु आईबापाच्या पोटीं जी व्यक्ति जन्माला येते ती हिंदु, शुद्धि नि व्रात्यस्तोमसंस्कारानें जिला हिंदुत्व दिलें जातें, ती व्यक्ति हिंदूच होय. हिंदु मनुष्य कोणत्याही कारणानें बाटत नाहीं, म्हणजे अहिंदु होत नाहीं. जो बाटतो तो हिंदु नव्हे. धर्माचें स्थान पोट नसून बुद्धि हें आहे.

(३) आजच्या हिंदुसमाजाचें भविष्यकालीन **अखंड एकजिनसी हिंदुसमाज** हें ध्येय आहे. म्हणून अखिल हिंदूंमध्यें सांस्कृतिक एकरूपता उत्पन्न करण्याचा यत्न प्रत्येक हिंदूनें करावा.

(४) प्रत्येक हिंदूनें जन्मावलंबी, जन्मपुरस्कृत, जन्मजात अशी अस्पृश्यता व उच्चनीचता यापुढें मुळींच मानूं नये. हिंदुसमाजांतील सर्व जाति धार्मिक व सामाजिक दृष्ट्या सारख्या आहेत. म्हणजे जन्मानें कोणतीही व्यक्ति स्पृश्य नाहीं, अस्पृश्य नाहीं, श्रेष्ठ नाहीं व कनिष्ठ नाहीं. वाईट रोग, दुर्वर्तन, समाजद्रोह व स्वदेशद्रोह यांमुळें व्यक्तीला नीचता येते. विद्या, सदाचरण, कर्तृत्व, त्याग व सेवा यांमुळें व्यक्तीला श्रेष्ठपणा येतो.

(५) आजच्या हिंदुसमाजांत अनेक कारणांनीं पुष्कळ जाति झालेल्या आहेत. सुधारणेची पहिली पायरी असें समजून प्रत्येक जातीनें प्रथम आपल्यांतील पोटजाति अन्न व लग्नव्यवहारानें भराभर मोडाव्यात. ज्यांचें वित्त, श्रुत, शील व संस्कार समान आहेत, अशांचे विवाह होणें प्रशस्त होय. अपवाद म्हणून विषम संस्कृतीच्या हिंदु स्त्रीपुरुषांमध्यें विवाह झाल्यास ते निंद्य समजूं नयेत. अहिंदु स्त्रीपुरुषांना व्रात्यस्तोमसंस्कारपूर्वक प्रथम हिंदु करून नंतर त्यांच्याशीं शरीरसंबंध करण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं.

(६) हिंदु स्त्रीपुरुषांना वेदाधिकार आहे. हिंदुत्व हें संस्कारांकित आहे, म्हणून प्रत्येक हिंदु स्त्रीपुरुषाचें उपनयन, विवाह व अंत्येष्टि हे संस्कार वेदमंत्रांनीं व्हावेत. शीख व जैन यांनीं आपापल्या तंत्रानें हे संस्कार करावे. शास्त्रोक्त संस्कार करण्यास कोणताही तज्ज्ञ हिंदु पुरोहित म्हणून बोलवावा. प्रत्येक हिंदूनें मरणोत्तर मातापितरादिकांचें श्राद्ध करावें.

(७) अखिल हिंदूंचा मानबिंदु भगवा ध्वज हा आहे. त्याची मिरवणूक मोठ्या थाटानें सदंड व सशस्त्र अशा सज्जतेनें वर्षप्रतिपदा व विजयादशमी या दिवशीं काढावी.

(८) अखिल हिंदूंनीं सण, समारंभ, उत्सव व पर्वकाल अशा नैमित्तिक प्रसंगीं सामुदायिक प्रार्थना करावी, आणि प्रत्येक महिन्याच्या पहिल्या रविवारीं ती नित्य करावी.

(९) राम, कृष्ण, शंकर, गणेश, जगदंबा, पार्श्वनाथ हनुमानादि देव म्हणजे प्राचीन काळच्या हिंदु संस्कृतीचे प्रवर्तक, रक्षक व प्रचारक श्रेष्ठ विभूति होत. त्या थोर विभूतींच्या स्मरणार्थ त्यांच्या प्रतिमा देवालयांत स्थापन केलेल्या आहेत. यास्तव त्यांचे महोत्सव मोठ्या थाटानें करावेत. अखंड, सवाद्य, सदंड व सुसज्ज अशा मिरवणुकी उत्साहानें काढाव्या. हिंदु देवालयांमध्यें अखिल हिंदूंना प्रवेश असावा. हिंदूंचा देव कधीं विटाळत नाहीं.

(१०) सर्व हिंदूंनीं पाडवा, गणेशचतुर्थी, दसरा, दिवाळी, मकरसंक्रमण, होळी हे सण सामुदायिक पद्धतीनें पाळावेत. हिंदु स्त्रियांनीं नागपंचमी व किंक्रांत या दिवशीं अखिल हिंदु स्त्रियांचें सामुदायिक हळदकुंकूं करावें.

(११) प्रत्येक हिंदु स्त्रीपुरुषानें आषाढी, कार्तिकी, रामनवमी, जन्माष्टमी व महाशिवरात्र हे पांच दिवस पर्वकाल समजून पवित्र अन्तःकरणानें उपवास करून व व्रतस्थ राहून पाळावेत.

(१२) अखिल हिंदूंनीं हिंदुधर्म, हिंदुराष्ट्र व हिंदुसंस्कृति यांना हितकारक तें कर्म पुण्यप्रद नि स्वर्ग्य समजावें व यांना अहितकारक तें पापप्रद नि नरकाला नेणारें कर्म असें समजावें.

(१३) हिंदूंनीं वर्षांतून एखादें तरी सामुदायिक सहभोजन करावें.

(१४) हिंदूंनीं शकुन, भुतेंखेतें, कलिवाद, देववाद, दैववाद, अवतारवाद असल्या कल्पनांनीं आपलीं मनें दुर्बळ करूं नयेत.

(१५) श्रीमत् भगवद्गीता हा अखिल हिंदूंचा कर्मयोगपर असा तत्त्वज्ञानाचा ग्रंथ आहे. म्हणून त्याचें वाचन व मनन अखिल हिंदूंनीं करावें.

(१६) अखिल हिंदूंनीं विश्वबंधुत्वाची अवजड कल्पना यथातथ्य समजून घेऊन तिच्याशीं सुसंगत अशी स्वसमाजबंधुत्वाची सवगड कल्पना मनांत बिंबवावी आणि हिंदुत्वनिष्ठेनें व समाजबंधुत्वाच्या नात्यानें शक्य तों सर्व व्यवहार हिंदूंशींच करावेत.

(१७) अखिल हिंदूंनीं बुद्धोत्तरकालीन मुमूर्षु वृत्तीचें तत्त्वज्ञान डावलून वैदिक आर्यांच्या विजिगीषु तत्त्वज्ञानाचा नि गीताप्रोक्त कर्मयोगाचा अंगिकार करावा.

(१८) आत्मा अमर व देह नश्वर हें ध्यानांत ठेवून धैर्य नि निर्भयतादि दैवी संपत्तीचे गुण अंगीं बाणवून अखिल हिंदूंनीं जगांत आक्रमणशील व विजिगीषु वृत्तीनें वागावें. स्वधर्म, स्वसमाज, स्वराष्ट्र, स्वाभिमान व स्त्रियांचें पातिव्रत्य एतदर्थ मारीत मारीत मरण्यांत स्वर्गप्राप्ति आहे असें अखिल हिंदूंनीं समजावें.

(१९) हिंदुराष्ट्राच्या अभ्युदयार्थ कोणताही धंदा अखिल हिंदूंनीं करावा. हिंदुराष्ट्राच्या धारणेकरितां व पोषणेकरितां सर्व धंद्यांची आवश्यकता आहे. धंद्यांत पाप वा पुण्य, धर्म्य किंवा अधर्म्य असें कांहीं नाहीं.

(२०) हिंदु स्त्री-पुरुषांनीं हिंदुधर्म, हिंदुसमाज व हिंदुराष्ट्र यांच्या हिताला पोषक अशींच व्रतें करावींत व हिंदुहितपोषक अशाच सत्पात्र ठिकाणीं दानधर्म करावा.

(२१) स्त्री व पुरुष हे एकमेकांना पूरक असे घटक आहेत. दोघांची योग्यता सारखी आहे, स्त्रियांची योग्यता माता, गृहिणी या दृष्टीनें फार मोठी आहे. यास्तव स्त्रीवर्गाविषयीं ज्या अनुदार कल्पना अहिंदुसंसर्गानें आल्या आहेत, त्यांचा त्याग करावा.

(२२) वेद, गंगा नि गाय हे अखिल हिंदूंचे पूज्य व पवित्र मानबिंदु होत.

(२३) प्रत्येक हिंदु स्त्रीपुरुषानें सकाळीं उठतांच व रात्रीं निजण्याचे पूर्वीं हिंदुधर्म, हिंदुराष्ट्र व हिंदु संस्कृति यांचें स्मरण करून त्या-

प्रीत्यर्थ 'तनमनधन अर्पण करण्याची बुद्धि दे' अशी परमेश्वराजवळ प्रार्थना करावी. त्याप्रमाणेंच शौच, मुखमार्जन, स्नान, स्वच्छतादि शरीरधारणेचा धर्म अवश्य पाळावा.

(२४) सूर्य हें अखिल हिंदूंचें अनादि दैवत आहे. म्हणून त्याची उपासना सकाळीं व सायंकाळीं निदान पांच पांच वेळां गायत्री मंत्राचा जप करून करावी. नित्य सूर्यनमस्कारही घालावे.

(२५) प्रत्येक हिंदु स्त्रीपुरुषानें हिंदुत्वनिष्ठेनें धर्मकृत्य समजून व्यायाम अवश्य घ्यावा. लाठीकाठी, निशाणबाजी इत्यादि सर्व शारीरिक शिक्षण आपल्या मुलामुलींना द्यावें.

(२६) प्रत्येक हिंदु स्त्रीपुरुषानें हिंदुधर्म व हिंदुसंस्कृति यांचे आपण रक्षक व प्रचारक आहों, अशा अभिनिवेशानें प्रत्येक व्यवहारांत वागावें. हिंदुत्वरक्षणार्थ निघालेल्यां संस्थांशीं संबद्ध राहून हिंदुत्वनिष्ठा जेवढी वाढवितां येईल तेवढी वाढवावी.

(२७) प्रत्येक हिंदूनें सज्ञान हिंदु स्त्रीपुरुषाशीं बोलतांना 'अहो जाहो' अशा शिष्ट भाषेनें बोलावें.

(२८) प्रत्येक हिंदु पुरुषानें कोणाही हिंदूच्या प्रेतयात्रेबरोबर समष्टिधर्म म्हणून चार पावलें अवश्य जावें. सपिंड, सगोत्र व सकुल अशांनींच प्रेतस्पर्शानिमित्त स्नान करावें.

(२९) हिंदुत्व हेंच राष्ट्रियत्व होय. म्हणून प्रत्येक हिंदूनें राष्ट्रियत्वाच्या विकासाकरितां आटोकाट यत्न करावा.

(३०) हिंदूंनीं धार्मिक, सामाजिक व घरगुती व्यवहारांत अहिंदूंचा संबंध सर्वस्वीं टाळावा. भोजनसाहित्य अहिंदूकडून घेऊं नये. स्त्रियांनीं अहिंदूकडून बांगड्या भरून घेऊं नयेत. विशेषतः पूजासाहित्य, कुंकू, इत्यादि अहिंदूकडून विकत घेऊच नये.

(३१) हिंदूच्या घरांत अहिंदु फेरीवाला, अवलिया, फकीर यांना प्रवेशही मिळतां कामा नये. उरूस, संदोल वा ताबूत इत्यादिकींत हिंदूंनीं मुळींच भाग घेऊं नये. अहिंदूंच्या उत्सवप्रसंगीं असावध न राहातां सामष्टिक पद्धतीनें प्रतिकारसिद्ध असावें.

(३२) औपनिषद्तत्त्वज्ञान हें मनःसमाधानाचें साधन आहे, असें समजून त्याचा लाभ प्रत्येक हिंदूनें अवश्य मिळवावा व आपली संसारयात्रा सुखानें करावी.



## प्रकरण एकोणचाळिसावें

## संघटनेचा संदेश

(६११) जीवनाचा उपायः–ग्रंथाचे शेवटीं अखिल हिंदूंना आतांपर्यंत जो नवा हिंदुधर्म सांगितला तो संघटितपणें व्यवहारांत आणण्याकरितां संघटनेचा संदेश द्यावयाचा आहे. हिंदुसमाजाचें चित्र डोळ्यांपुढें उभें केलें कीं हिंदुसमाज हा अन्योन्यउपकारक नाहीं असें दिसतें. हिंदुसमाजांत अन्योन्यउपकारकता व उपयोगिता ही आल्याविना त्याचें बल वाढणार नाहीं. जुन्या हिंदुधर्मांतील जीं वैगुण्यें, ज्या उणीवा, ज्या बोचा व खोचा येथवर दाखविल्या व त्या नष्ट करण्याचे उपाय जे सांगितले, त्यांचा अवलंब केल्याविना हिंदुसमाज संघटित, समर्थ, बलशाली, ओजस्वी, तेजस्वी आणि मनस्वी असा होणार नाहीं व तसें झाल्याशिवाय तो जगणारही नाहीं. आज हिंदुजगत् आणि अहिंदुजगत् असें वर्गीकरण करून हिंद्वेतरांचे, अहिंदूंचे, विधर्मीयांचे चाललेले खटाटोप नि दीर्घोद्योग डोळ्यांपुढें ठेवून अत्यंत जागरूकपणें हिंदुसमाजानें संघटित होऊन वागलें पाहिजे.

(६१२) ऋग्वेदांतील संदेशः–संघटना हा आजच्या काळचा महामंत्र आहे. ‘ संहतिः कार्यसाधिका. ’ संघटनेमुळेंच कार्य होतें. जुन्या वळणाचे लोकसुद्धां ‘संघशक्तिः कलौ युगे’ असें म्हणतात. अध्ययनाला प्रारंभ

झाला कीं 'सहनाववतु,' 'सहनौ भुनक्तु,' 'सहवीर्यं करवावहै' असा संघटनेचा मंत्र म्हणतात. 'संगच्छध्वं, संवदध्वं, सं वो मनांसि जानताम्' एकमेकांकडे चला, बोला, संभाषण करा, एकमेकांचें मनोगत ओळखा म्हणजे परस्परांच्या भावना ध्यानांत घेऊन वागा, असा ऋग्वेदसंदेश आहे. ज्या समाजाला व राष्ट्राला जगून कांहीं विशेष करावयाचें आहे, त्यानें संघटित झालेंच पाहिजे.

(६१३) **संघटना हेंच बळः**–तीस कोटि हिंदु जर संघटित झाले तर काय न करतील ? क्षुद्र, निर्जीव जें तृण तें संघटित म्हणजे दोरखंड-रूपानें एकत्र झालें तर मदोन्मत्त गजांनाही बांधून ठेवतें.

बहूनामप्यसाराणां समवायो हि दुर्जयः
तृणैरावेष्ट्यते रज्जुर्यया नागोऽपि बध्यते ॥ –सुभाषित.

क्षुद्र प्राणि जी पिपीलिका तिच्या बिळांत नागोबा शिरला तर मुंग्याही संघटित होऊन नागोबाला क्षत होतांच डसतात व त्याचा जीव घेतात. चित्रग्रीव नामक कपोतानें संघटनेच्या जोरावरच जाळ्यांतून स्वतःची व स्वजातिबांधवांची सुटका केली, ही पंचतंत्रांतील कथा विदितच आहे. पशु, पक्षी, कृमि, कीटक जर संघटितपणानें अशा अद्भुत गोष्टी करतात तर जागा झालेला हिंदु–समाज हा संघटित होऊन स्वराज्य, साम्राज्य, वैराज्य, पारमेष्ठ्य यांच्या गोष्टी बोलल्याविना आतां कसा राहील ! हिंदुसमाज हा सिंहाचा छावा आहे. दुर्दैवानें पारतंत्र्यरूपी मेंढीच्या कळ-पांत बराच काल राहिल्यामुळें या छाव्याला आत्मस्वरूपाची विस्मृति झालेली आहे. पण परिस्थितीनें, कालानें त्याला आत्मस्वरूपाचा आतां चेव आला असून तो नव्या कालाला अनुसरून नव्या कार्यक्षेत्रांत पदार्पण करणार हें सुनिश्चित आहे. हिंदुराष्ट्राच्या भावी उज्ज्वल ध्येयाच्या दृष्टीनें महाराष्ट्रिय हिंदुसमाजांतील विविध घटकांशीं ग्रंथाच्या शेवटीं थोडे हितगुज करून त्यांना संघटनेचें महत्त्व सांगतों.

## हिंदु राजांना नम्र विनंति

(६१४) **समाजबंधुत्वः**–सत्ता व संपदा, स्वाभिमान व कर्तृत्व ज्यांच्या ठिकाणीं आहे, जे हिंदुसंस्कृतीचे मानबिंदु आहेत, ज्यांची पूर्व-

जांनीं हिंदुत्वाचें हिताकरितांच ऐश्वर्य व सत्ता मिळविली, जे हिंदुत्वाचे व हिंदुसमाजाचे खरेखुरे प्रतिनिधि आहेत, ज्यांनीं मनांत आणलें कीं हिंदुत्वाचें भवितव्य उज्ज्वल होणार आहे, असे हिंदुसमाजाचे प्रमुख घटक म्हणजे हिंदुसंस्थानिक होत. हाताच्या बोटावर मोजण्याजोगीं अहिंदु संस्थानें सोडल्यास सबंध हिंदुस्थानांत हिंदु संस्थानिक जवळजवळ सहाशें आहेत. हा हिंदुस्थान त्यांचाच आहे. उद्यां आणीबाणीचा प्रसंग आला तर राष्ट्रक्षणाचें कार्य या हिंदु राजांनाच करावयाचें आहे. त्यांत पाकिस्थान उत्पन्न करण्याच्या कटाला संस्थानिकांनीं हाणून पाडलें पाहिजे. हिंदुत्व हें आपलें ब्रीद, तेंच आपलें ध्येय व त्याकरितांच आपलें संस्थान ही जाणीव त्यांनीं अवश्य ठेवावी. हिंदु संस्थानिक व त्यांची हिंदु अधिकाऱ्यांची प्रभावळ यांनीं आतां **विश्वबंधुत्वाचा पायघोळ अंगरखा फेकून देऊन हिंदुसमाजबंधुत्वाचा व हिंदुराष्ट्रबंधुत्वाचा अगदीं अंगापुरेसा सुटसुटीत कोटच अंगामध्यें धारण करावा.** हिंदु संस्थानिकांत ना हिंदु, ना मुसलमान, ना जात ना धर्म, हा जो एक रोग दिसतो तो आतां हिंदुत्वाचें औषध घेऊन त्यांनीं घालविलाच पाहिजे. हिंदु संस्थानिक ज्या परंपरेचे, ज्या इतिहासाचे व ज्या संस्कृतीचे प्रतिनिधी आहेत, ती परंपरा भगवान् श्रीकृष्ण, भगवान् व्यास, भगवान् मनु, जनक, याज्ञवल्क्य, आर्य चाणक्य, चंद्रगुप्त, गुरु नानक, गुरु गोविंदसिंग, राणा प्रताप, श्रीशिवाजी महाराज वगैरे थोरथोर पुरुषांनीं स्वीकृत व पुरस्कृत केलेली आहे. त्या परंपरेच्या तत्त्वज्ञानानेंच हिंदु संस्थानिकांनीं वागलें पाहिजे. त्यांतच त्यांचें व हिंदुराष्ट्राचें कल्याण आहे.

**(६१२) अहिंदूंचें राजकारणः**–संस्थानिकांनो, अहिंदु सत्ताधीश, अहिंदु संस्थानिक, अहिंदु राजे कोणत्या वृत्तीनें, कशा कडव्या निष्ठेनें, कशा अभिनिवेशानें वागत आहेत तें पहा. अहिंदु राज्यकर्ते जेथें तेथें आपल्या भांडवलवाल्यांच्या, आपल्या शिक्षितांच्या, कंत्राटदारांच्या, व्यापाऱ्यांच्या, कंपन्यांच्या वर्णी लावण्याकरितां सारखे टपलेले असतात. एखाद्या परधार्जिण्या हिंदु संस्थानिकानें अहिंदूला दिवाण नेमलें कीं तो आपल्या अहिंदु संस्थाकरितां राजाकडून देणग्या लाटतो, भरवस्तींत आपल्या जातभाईंना चांगली जागा वसाहतीस देववतो. कलेक्टर, कमिशनर, घोडदळ, पोलीस, सैनिक

अशा खात्यांत वरिष्ठ जागीं अहिंदु घुसविण्याचा यत्न करतो. धर्मप्रचार करून हिंदु प्रजेला बाटविण्यास उत्तेजनही देतो. हिंदु राजांनीं देवडीवाल्यापासून दिवाणापर्यंत लायख हिंदु माणसेंच नेमावींत. आपली बहुसंख्य प्रजा हिंदु, तिचे आपण प्रतिनिधि, तिच्याकडूनच पैसा हातीं येतो, हें ध्यानांत घेऊन आपापल्या राज्यांत हिंदु प्रजेलाच पुढें येण्यास व कर्तृत्व दाखविण्यास संस्थानिकांनीं अवसर द्यावा.

हिंदु राजांच्या राज्यांत अहिंदूंची दंडेली, हिंदूंच्या न्याय्य हक्कांवर आक्रमण मुळींच होतां कामा नये. अहिंदूंची आक्रमक वृत्ति दिसतांच तिचा नायनाट हिंदु राजांनीं करणें अवश्य आहे.

**(६१६) जसा देव तसा नंदीः**–हिंदुराजांनीं हिंदुसमाजांतील विस्कळितपणाचा लाभ घेऊन पैशाच्या व सत्तेच्या जोरावर आपल्या राज्यांत नसतीं खेकटीं मुळींच उत्पन्न करूं नयेत. फोडझोडीचें हें राजकारण खेळत न बसतां हिंदुसमाजांतील विस्कळितपणा नाहींसा करण्यास जे जे उपाय व युक्त्या करतां येतील ते सर्व करावेत. हिंदुसमाजाला नांवें ठेवून तो नालायख आहे असें म्हणून स्वतः त्याच वर्गात मोडत असतांना नामानिराळें राहाण्यांत शहाणपण नाहीं. जसा समाज तसे त्यांचे राजे. नंदीही पाषाणाचा व देवहि पाषाणाचाच, हें काय सांगावयास हवें!

**(६१७) नवे कायदे कराः**–हिंदु राजे आणि हिंदु संस्थानिक यांनीं नव्या हिंदुधर्मातील सर्व तत्त्वांचा पुरस्कार कायदे करून करावा. लोक तयार नाहींत हें म्हणणें दांभिकपणाचें आहे. लोक तयार नसतांना बडोदा नरेशांनीं आणि कोल्हापूरच्या छत्रपतींनीं अस्पृश्यतानिवारणाचा निर्बंध केलाच कीं नाहीं? अस्पृश्यता कायद्यानें नष्ट करावी, या लोकांच्या हजेऱ्या बंद कराव्या, त्यांच्याकरितां हिंदु राजांनीं आपलें स्वतःचें निदान एखादें मंदिर खुलें करावें आणि इतरांना तसें करण्यास सांगावें. शुद्धिकार्याला प्रोत्साहन देणें, प्रत्येक शुद्धि नोंदण्याचा कायदा करणें, स्त्रियांवर आक्रमण करणाऱ्या गुंडांना कायद्यानें नेस्तनाबूत करणें, कायदा करून पठाणाची सावकारी बंद पाडणें, पोटजातींतील विवाहांना उत्तेजन देणें, विधवाविवाहाचा पुरस्कार करणें, लग्नविच्छेद, विवाहनोंदणी हे कायदे हिंदुत्वनिष्ठेनें हिंदुसमाजाला पोषक

होतील असे करणें, हिंदु राजांच्या हातांत आहे. हिंदु राजांनीं हिंदुत्वाचा अभिमान धरून पंचवार्षिक, दशवार्षिक योजना ठरवून धर्म व समाज-सुधारणेच्या गोष्टी आपल्या राज्यांत घडाडीनें केल्या कीं हिंदूंची संघटना वाढेल.

(६१८) **मिथ्याचार नको:**–कांहीं हिंदु राजे स्वार्थापुरते समाज-सुधारक असतात. स्वार्थापुरेसा सगोत्रविवाह, अहिंदु स्त्रीचें शुद्धीकरण, विधवा-पुनर्विवाह, रजिस्टर विवाह त्यांना मान्य असतो. पण तेवढी स्वार्थाची बाब सोडल्यास इतर क्षेत्रांत ते धर्ममार्तंडाप्रमाणें वागण्याचा आव आणून दांभिकतेनें स्वपरवंचना करतात! संस्थानिकांची जी अधिकारी प्रभावळ असते, तीहि त्याचें अनुकरण करते आणि एकंदरींत अनिष्ट असा हा मिथ्याचार माजतो! त्यामुळें सुधारणेचें पाऊल पुढें पडत नाहीं.

(६१९) **उपयुक्त कार्यक्रम:**–अखिल हिंदूंनीं एकत्र येणें, एका भूमिकेवर येणें व सामुदायिक प्रार्थना करणें हा समष्टिधर्मांतील एक प्रमुख भाग आहे. आतां तो व्यवहारांत आलाच पाहिजे. हिंदु राजांनीं ( त्यांना दुसरें कांहीं न जमलें तरी.) निदान राजधानींत एक 'पतित–पावन मंदिर' उभारणें किंवा जुनें स्वत:चें देवालय असल्यास तेथें अखिल हिंदूंना प्रवेश देणें आणि त्या देवालयांत सामुदायिक प्रार्थनेकरितां दर आठवड्यास स्वतः जाणें, एवढें तरी करावेंच. संस्थानिक नि राजे सामुदायिक प्रार्थनेस येऊं लागले कीं अधिकारी येतील, अधिकारी आले कीं त्यांच्या भोंवतालची प्रभावळ येईल आणि अखिल हिंदुसमाज त्यामुळें प्रार्थनेस येऊन हिंदु-समाजांत दळणवळण अधिक वाढेल! अगदीं साधी निरुपद्रवी पण महत्त्वाची अशी ही बाब आहे. पतितपावन मंदिरांतील उत्सवांत संस्थानिकांनीं भाग घेणें, सहभोजनास व समारंभास येणें या गोष्टी दुधांत साखर पडल्याप्रमाणेंच होतील.

(६२०) **प्रचारक नेमा:**–हिंदु राजांनीं नव्या हिंदुधर्माचा प्रचार करण्याकरितां आपल्या राज्यांत विद्वान प्रचारक नेमावेत. हिंदुत्वनिष्ठ नव्या हिंदुधर्माचे प्रचारक अखिल हिंदूंमध्यें जाऊन जागृति करतील तर तें संघटनेस फार उपयुक्त होईल. हिंदु संस्थानिकांनीं हिंदुत्वनिष्ठेनेंच राज्य-

कारभार करावा, हिंदुत्वनिष्ठेनें व्यवहारांत वागावें नि विशेष म्हणजे आपल्या हिंदु प्रजेला लक्षावधि रुपये खर्च करून सैनिक शिक्षण उत्तम प्रकारें द्यावें.

**(६२१) आदर्श रुग्णालयें काढाः**–दक्षिण महाराष्ट्रांतील राजांना चारदोन शस्त्रक्रियाविशारद व वैद्यशास्त्रविशारद चांगले डॉक्टर यांचें मंडळ आज नेमून उत्तम रुग्णालय चालविणें अशक्य आहे काय? महाराष्ट्रांत ज्या अहिंदूंच्या संस्था आहेत, त्या हिंदुसमाजाचें रक्त सारखें शोषित आहेत, व संख्या घटवीत आहेत. अहिंदूंची एक नामवंत संस्था असली कीं भोंवतालच्चीं गांवेंच्या गांवें हळुहळु धर्मांतर करतात. कित्येकांना उद्योग मिळतो, कित्येकांना आमिर्ष असतें व कित्येक गोरगरीब मोफत औषधामुळें मिंधे होतात नि धर्मांतर करितात. महाराष्ट्रांत शस्त्रक्रियाविशारद, क्षयरोगविशारद, पाश्चात्य व देशी वैद्यशास्त्रविशारद असे उत्तम उत्तम डॉक्टर नाहींत असें नाहीं. त्यांना व हिंदु राजांना या अहिंदूंच्या संस्था आपल्या छातीवर स्थिर झालेल्या पाहून लाजच वाटली पाहिजे. अहिंदु संस्थांना संस्थानिकांनीं उत्तेजन देणें, हें खरोखरीच पाप आहे.

**(६२२) महाराष्ट्रांत मराठ्यांचेंच राज्यः**–हिंदु संस्थानिक व त्यांची प्रभावळ हा जसा एक कर्तृत्ववान् घटक आहे तसाच महाराष्ट्राचा मुख्य घटक म्हणजे मराठा आहे. हिंदुसमाजाचें केंद्र, महाराष्ट्राचा गुरुत्वमध्य म्हणजे बहुसंख्य मराठावर्ग होय. अखिल हिंदुसमाज सांस्कृतिक दृष्ट्या या केंद्राभोंवतींच भ्रमण करीत आहे. मराठ्यांचें अनुकरण सर्व बाबतींत इतर जाति करितात. मराठा या नांवाची पोटजात हिंदूंतील प्रत्येक जातींत आहे. मराठा वर्ग ही महाराष्ट्राची अब्रु आहे. महाराष्ट्राचा मोठेपणा, महाराष्ट्राचें भविष्य मराठ्यांचे हातीं आहे. महाराष्ट्राची लाज व महाराष्ट्राचा बोज मराठ्यांनींच राखला पाहिजे. मराठा 'बांधील तें तोरण व ठरवील तें धोरण' महाराष्ट्राला मान्य आहे. जातिवंत, स्वाभिमानी, इतिहास व परंपरा यांचा अभिमान बाळगणारे मराठे महाराष्ट्रांत पुष्कळ आहेत. या मराठ्यांतून धार्मिक, सामाजिक, राजकीय, औद्योगिक अशा विविध चळवळी त्यागपूर्वक निर्भयतेनें करणारे बुद्धिवान् तरुण पुढें आले पाहिजेत. स्वातंत्र्याच्या उर्मीनें, निर्भयपणानें सत्तेशीं झुंजणारा, अहिंदूंच्या

आक्रमणाचा ताठपणें प्रतिकार करणारा, धार्मिक व सामाजिक क्षेत्रांत समता प्रतिपादन करणारा, मागसलेल्या गटांना पुढें येण्यास वाव देणारा नि पुढारलेल्या गटांचें व आजवरच्या कार्यकर्त्यांचें साह्य घेणारा असा हा मराठा पुढारी आतां महाराष्ट्राला हवा आहे. अखिल महाराष्ट्र त्याचा अनुयायी म्हणून त्याच्या मागोमाग येईल. तीनशें वर्षांपूर्वींचा उज्ज्वल इतिहास मराठ्यांचाच आहे. त्या उज्ज्वलत्वाच्या तेजानें प्रदीप्त होऊन राजकीय स्वातंत्र्याच्या तापलेल्या भट्टीपुढें छातीठोकपणें उभे राहून परकीय सत्तेशीं सतत लढत राहणारे मराठे वीर महाराष्ट्राला हवे आहेत. मराठे तरुण प्रत्येक क्षेत्रांत पुढें आले कीं इतर वर्गांचें साह्य सिद्ध आहे. स्त्रिया, देवता, मिरवणुकी, नैसर्गिक हक्क, व्यापार, सावकारी इत्यादिवर जे अहिंदूंचें आक्रमण चाललें आहे, त्यांचा प्रतिकार करण्याकरितां मराठा तरुणांनींच पुढें येणें अत्यावश्य आहे. हिंदुसमाजाचें बल वाढवून त्याला संघटित करणें, प्रतिकारक्षम करणें व स्वातंत्र्याच्या ध्येयाकडे नेणें हें सर्व मराठ्यांच्याच हातीं आहे. मराठ्यांनो, हिंदुसमाजाच्या केंद्रीभूत मराठ्यांनो, ही आलेली सुवर्ण-संधि तुम्ही दवडणार काय ?

(६२३) पूर्वास्पृश्यांनो, नवा हिंदुधर्म मुळींच अस्पृश्यता मानीत नाहीं. अखंड एकजिनसी हिंदुसमाज हें हिंदुसमाजाचें भवितव्य आहे. यास्तव तुम्ही स्वतःला अस्पृश्य न समजतां हिंदुसमाजाचे एक महत्त्वाचे घटक असें समजून हिंदुराष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या लढ्यामध्यें समाविष्ट व्हा. हिंदूंच्या खांद्यास खांदा लावून पूर्वींचीं वैगुण्यें न काढतां स्पृश्यांशीं मत्सर न करतां आपली उन्नति करून घ्या. अस्पृश्यतेचें पिशाच्च जर क्वचित् थैमान घालील तर निकरानें त्याला गाडून टाका. अन्यायाचा प्रतिकार करा. आजपर्यंत दुष्ट रूढीमुळें तुम्हास पुढें येण्यास अवसर मिळाला नाहीं. तुमचेवर अन्याय झाला हें जसें सर्व खरें आहे, तसेंच अन्याय करणारा व तो करून घेणारा हे दोघेही दोषी आहेत; हेंही तितकेंच खरें आहे. नव्या हिंदुधर्मानें सत्ता, संपदा व संस्कृति यांचीं द्वारें आतां अखिल हिंदूंना मोकळीं ठेवलीं आहेत. हीं केंद्रें हस्तगत करण्याकरितां कष्ट केले पाहिजेत, श्रम केले पाहिजेत, व गुणही दाखविले पाहिजेत. हिंदुसमाजांत जें जें मानाचें, वैभवाचें नि महत्त्वाचें

उच्चस्थान असेल तें कर्तृत्वानें व योग्यतेनें तुम्ही अवश्य मिळवावें. हिंदुत्व-निष्ठेनें हिंदुत्वाकरितां सर्वश्रेष्ठ पद मिळविण्यास तुम्हास नव्या हिंदुधर्माची पूर्ण संमति आहे. पूर्वास्पृश्यांनो, तुम्ही हिंदु आहां, हा हिंदूंचा हिंदुस्थान आहे आणि हिंदूंतच तुम्हांला स्थान आहे, मान आहे, कर्तृत्वाला जागा आहे. धार्मिक, सामाजिक, राजकीय, व्यावसायिक अशा सर्व बाबतींत तुम्हाला बरोबरीचे हक्क आहेत. तुमच्या सामाजिक दुःखाशीं अखिल हिंदु-समाज सहमत आहे. पण लक्षांत ठेवा कीं आपल्या हातीं कोणी कांहीं आयतें आणून देणार नाहीं आणि आणून दिलें तर टिकणारही नाहीं. कर्तृत्वानें मिळवावें, मिळेल तें साह्य घेऊन पुढें चालावें. अहिंदूंना सामील न होतां, हिंदुत्वनिष्ठेनें जीं जीं क्षेत्रें तुम्हांला व्यापतां येतील तीं अवश्य व्यापा. महार हा पूर्वास्पृश्यांतील एक बहुसंख्य क्षात्रवृत्तीचा आणि लढाऊ असा गट आहे. या गटानें यावेळीं हिंदुत्वनिष्ठेनें सैनिक शिक्षण घ्यावें, सैन्यांत शिरावें नि हिंदुराष्ट्राच्या स्वातंत्र्यार्थ अभिमानानें बद्धपरिकर व्हावें. हिंदु-राष्ट्राचें ध्येय जेव्हां हस्तगत होईल तेव्हां पूर्वास्पृष्टांना सत्ता, अधिकार व संपदा यांची प्राप्ति अखिल हिंदुसमाजाबरोबर होईलच होईल.

(६२४) **जुनीं मढीं कां उकरतां ?**:—ब्राह्मणेतर या नांवाचा एक प्रमुख वर्ग महाराष्ट्रांत आहे. नांवावरूनच त्याची कल्पना येते. हा वर्ग ब्राह्मणी जुलूम, ब्राह्मणी सावकारी, ब्राह्मणी अत्याचार व ब्राह्मणी भिक्षुकी यांच्या प्रतिकारार्थ उत्पन्न झाला आहे हें सिद्ध आहे. या गटांत मुसलमान, खिश्चन इत्यादिकांना तोंडीं लावण्यापुरतें घेण्यांत येत असलें तरी हा गट प्रामुख्यानें हिंदूंतीलच आहे. ब्राह्मणेतर वर्गांत लिंगायत व जैन सोयीपुरते समाविष्ट होतात. पण लिंगायतांना आणि जैनांना ब्राह्मण मुळींच बोचत नाहीं. कारण त्यांचे भटजी, त्यांचे पुरोहित सर्व स्वतंत्र आहेत. उलट ब्राह्मणांची हिंदुसमाजांतील भिक्षुकी अलीकडे बरीचशी जंगमांनीं बळकाविली आहे, असें दिसतें. ब्राह्मण हा हिंदूंतील ब्राह्मणेतरांना धार्मिक व सामाजिक क्षेत्रांत बोचत होता हें कांहीं खोटें नव्हे. त्याचें बीज जन्मजात उच्चता, नीचता व अस्पृश्यता यांत होतें. नवा हिंदुधर्म अखिल हिंदूंना उपनयनाचा, पौरोहित्याचा आणि वेदाचाही अधिकार देतो, अस्पृश्यतेचें समूळ उच्चाटन करतो, आणि सर्वांनीं समतेनें, बरोबरीच्या नात्यानें, अहो जाहो, अशी शिष्ट भाषा वापरून

वागावें, असें सांगतो. हें आतां ब्राह्मणांना आणि अखिल हिंदूंना पटत असतांना जुन्या वादाचीं मढीं उकरणें हें शहाणपण नव्हे. ब्राह्मणाची बोच आतां गेली. जोशीबिलानें पौरोहित्य गेलें, तलाठीपद्धतीनें कुलकरण गेलें, शेटजी व पठाण यांच्या आक्रमणानें ब्राह्मणाचें सावकारपणही गेलें. शिक्षण, व्यवसाय, सत्ता, संस्कृति अशा सर्व क्षेत्रांत अखिल हिंदूंतील सर्व जाती ब्राह्मणाबरोबरीनें आतां पुढें येत असतांना आणि त्याचें सर्व क्षेत्रांतील महत्त्व संपुष्टांत आलें असतांना व काळ्या बाजाऱ्यांचें प्रस्थ वाढलें असतांना आतां या जुन्या वादाचा कोळसा उगाळून हात काळे करण्यांत काय अर्थ ?

ब्राह्मणेतरांनो, या वादाचा कोळसा आतां देशाभिमानाच्या धगधगीत अग्नींत फेंकून त्याचें भस्म कपाळाला लावून हिंदुत्वनिष्ठेनें आतां पुढें या. हिंदूंचा हिंदुस्थान आतां राहिलाच पाहिजे. हा पाकस्थान वा पापस्थान होऊं पहात आहे; याची तुम्हाला लाज वाटली पाहिजे. ब्राह्मणांना ब्राह्मण म्हणवून घेण्यांत मोठा अभिमान वाटत नाहीं, तर हिंदुसमाजाचा एक घटक म्हणून हिंदुत्वनिष्ठेनें जगण्यांतच त्यांना अभिमान वाटतो. ब्राह्मणांतील विचारी वर्ग आज अखिल हिंदूंमध्यें समानता प्रतिपादीत आहे. वेदाधिकार, पौरोहित्य, सहभोजन, सहभजन, फार काय पण अखिल हिंदूंमध्यें समसंस्कृतीच्या जोडप्यांत हिंदुत्वनिष्ठेनें क्वचित् विवाह झाल्यास आतां कोणी बहिष्कार घालीत नाहीं. हिंदुसमाजांतील प्रत्येक मागसलेला गट पुढारलेल्या गटाला स्वोन्नतिकरितां आतां धडक देत आहे. मागसलेल्या गटांत स्वच्छता, टापटीप, स्वाभिमान, सुसंस्कृतपणा, व्यवस्थितपणा, हिशेबीपणा हे गुण आज नाहींत म्हणूनच पुढारलेला वर्ग थोडा डोळ्यांत भरणारा असा दिसतो. हे गुण स्वीकारण्यास कोणाची आडकाठी नाहीं. मत्सर न करतां, जुने वाद न काढतां अखिल हिंदूंनीं आतां एकवटलेंच पाहिजे. ब्राह्मणेतर पक्षांतील पुढारी, पत्रपंडित, डॉक्टर, लेखक, वकील, वक्ते, शिक्षक व व्यापारी या सर्वांचें लक्ष आतां धर्म व समाजसुधारणेच्या पलीकडे गेलें पाहिजे. ब्राह्मणवर्ग हा आतां सर्वांच्या बरोबरीचा झालेला आहे. आतां सर्वांच्या लेखण्या पारतंत्र्याविरुद्ध, अहिंदूंच्या आक्रमणाविरुद्ध सरसावल्या पाहिजेत. आजवर शेटजी व भटजी हींच टीकेचीं केंद्रें होतीं; आतां तीं बदललींच पाहिजेत.

(६२५) **लढ्यास सज्ज व्हा**:–स्वातंत्र्याचे अपहारक व संस्कृतीचे आक्रमक अशा उभयतांविरुद्ध निकराची लढाई आतां चालविली पाहिजे. ब्राह्मणांना मागें टाकून ब्राह्मणेतरांनीं या जळत्या भट्टीपुढें उभे राहून सतीचा दिव्य वसा घेतला पाहिजे. ब्राह्मण व ब्राह्मणेतर अशा सर्वांनीं संघटित होऊन हिंदुत्वनिष्ठेनें अहिंदूंच्या वर्चस्वाला, आक्रमणाला, सावकारीला सत्तेला आणि जुलुमाला तोंड देणें अवश्य नाहीं काय ? या परिस्थितीकडे दुर्लक्ष्य केल्यास ना तुला ना मला, घाल कुत्र्याला असें होऊन पुढील पिढीचे शापच सोसावे लागतील. ब्राह्मणेतरांनो, सांप्रतची जागतिक परिस्थिति लक्षांत घ्या, परधार्जिणी वृत्ति सोडा, अहिंदूपेक्षां हिंदू हा केव्हांही तुम्हांला जवळचा आहे आणि ब्राह्मणेतरांना इतर सर्वांपेक्षां ब्राह्मण हा धर्म व संस्कृतिदृष्ट्या आणि राष्ट्रदृष्ट्या अधिक जवळचा आहे. ब्राह्मणांबरोबर जेवणें व त्यांच्या मुलीशीं लग्न लावणें यांत आतां कांहीं पुरुषार्थ नाहीं. या गोष्टी चुरशीनें व इरेनें करण्याचे दिवस गेले. या आतां स्वेच्छेनें, क्रमप्राप्त व अवश्य म्हणून कालपरिपक्वतेप्रमाणें आपोआप होतील. अखिल हिंदूंतील समसंस्कृतीचीं वधुवरें यापुढें हळुहळु विवाहबद्ध होतील. पण त्या सुधारणा झाल्या म्हणजे स्वातंत्र्य जवळ येतें किंवा अहिंदूंचें आक्रमण बंद होतें असें नव्हे. त्याकरितां प्रबल संघटना, निकराची नि त्यागाची लढत केली पाहिजे. ब्राह्मणेतरांनो, ज्या निकरानें, ज्या आगीनें व ज्या त्वेषानें एकाकाळीं ब्राह्मणी जुलुमाविरुद्ध तुम्ही लढलां, त्याच्यापेक्षां शतपट निकरानें आणि त्वेषानें अखिल हिंदु आपण एक आहों अशा भावनेनें आणि हिंदुत्वनिष्ठेनें स्वातंत्र्याच्या अपहारकाशीं व संस्कृतीच्या आक्रमकाशीं लढण्यास बद्धपरिकर व्हा, एवढेंच तुम्हांस सांगावेसें वाटतें.

ब्राह्मणांनो, महाराष्ट्रिय हिंदुसमाजांत पंचद्रविड व पंचगौड असे दशविध ब्राह्मण आहेत. हिंदुसमाजांतील हा एक बुद्धिमान्, कर्तृत्ववान्, त्यागी आणि धडाडीचा असा गट आहे. या वर्गाला महाराष्ट्रांत महत्त्व अधिक आहे. आजवरच्या विविध चळवळी राष्ट्रिय दृष्टीनें याच वर्गानें केल्या. धर्मसुधारणा, समाजसुधारणा, उद्योग, राजकारण अशा सर्व क्षेत्रांत या वर्गानें बरीच कामगिरी केली आहे. ब्राह्मणाच्या या कामगिरीला

ब्राह्मणसदृश अशा अन्य जातींचें मुख्यतः प्रभु, पंचाळ आणि इतर जातींचें पुष्कळच साह्य झालेलें आहे हें विसरतां कामा नये.

(६२६) **प्रभावी संघटना कराः**—महाराष्ट्रिय ब्राह्मणांत जसे अनेक गुण आहेत, तसे अनेक दोषही आहेत. मत्सर, अनुदारता व भांडखोर-पणा या दोषांमुळें महाराष्ट्रिय ब्राह्मण निस्तेज होऊं लागलेला आहे. 'ब्राह्मणानां अनेकत्वं' म्हणजे भांडणें, मतभिन्नता, पक्ष आणि विपक्ष यांमुळें महाराष्ट्राला दुहीचा शापच आहे असेंही कित्येक म्हणतात. पण हिंदुधर्म, हिंदुराष्ट्र, हिंदुसंस्कृति यांच्याकरितां यापुढें या गटानें व ब्राह्मणसदृश जातींनीं आजवर जसा त्याग केला तसा आतां यापुढेंही केला पाहिजे. महाराष्ट्रिय दशविध ब्राह्मण सर्व एक आहेत. अन्नलग्नव्यवहार, सहासन, सहाध्ययन, सहधर्मानुष्ठान इत्यादि सर्व बाबतींत आपण सर्व एक आहों, अशी भावना दशविध ब्राह्मणांनीं ठेवावी. दशविध ब्राह्मणांत सांस्कृतिक दृष्ट्या अंतर नाहीं. सर्व समसंस्कृतीचे आहेत म्हणून यांनीं एकवटून आपल्यांतील पोटजाति मोडून हिंदुत्वनिष्ठेनें हिंदुराष्ट्राच्या कार्याकडे लक्ष देणें अत्यावश्य आहे.

(६२७) **वर्णगुरुत्व विसराः**—यास्तव दशविध ब्राह्मणांना आमची अगत्याची सूचना अशी आहे कीं त्यांनीं जन्मतः श्रेष्ठत्व व वर्णगुरुत्व हें आतां विसरावें. इतरांच्या बरोबरीचे हिंदुसमाजांतील आपण एक घटक आहोंत, या वृत्तीनेंच ब्राह्मणांनीं वागावें. अखिल हिंदूंतील जे जे कर्तृत्व-वान्, घडाडीचे, बुद्धिवान् व त्यागी पुढारी विविध क्षेत्रांत पुढें येतील, त्यांच्या सहकार्यानें हिंदुत्वनिष्ठेनें हिंदुराष्ट्राचें कार्य पुढें चालवावें. मनाची उदारता ठेवावी व पक्ष असले तरी न भांडतां अविरोधानें कार्य करण्याची वृत्ति ठेवावी. ब्राह्मणांनीं आतां आपल्यापुरतेंच पहावें, पारश्यांसारखें वागावें, असले संकुचित विचार अलीकडे ऐकावयाला येतात ते चुकीचे आहेत.

(६२८) **निराश होऊं नकाः**—हे विचार निराशेचे, वैतागाचे आणि प्रतिक्रियात्मक आहेत. गेल्या पाव शतकांत महाराष्ट्रांतील ब्राह्मणांपैकीं राज-कारण, समाजकारण, धर्मकारण इत्यादि कार्याकरितां कांहींनीं सर्वस्व घाल-विलें, स्वार्थाचा होम केला, फांसाखालीं मानाही दिल्या, चळवळ कर-

णाऱ्यांनीं द्रव्याकडे वा प्रपंचाकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. त्यामुळें आज
त्यांना द्रव्याभावीं निवडणूक जिंकतां येत नाहीं, चार माणसांचें पाठबळ
मिळत नाहीं. कारण नुसता त्याग व बुद्धि यांना कोणी विचारीत नाहीं !
हें पुष्कळ अंशीं खरें असलें तरी ही परिस्थिति अशीच राहाणार नाहीं.
बुद्धिमान् वर्ग जर केवळ स्वार्थ आणि चैन यांतच गुरफटला गेला तर
मग राष्ट्रहिताच्या चळवळी करावयाच्या कोणी ? आणे पैच्या हिशेबानें
राष्ट्रांत कोणतेंच कार्य होत नाहीं. आजवरचे देशभक्त जर या आणे पैच्या
हिशेबानें वागले असते तर त्यांच्यापुरेसा खूप पैसा त्यांनीं मिळविला
असता नि पुढील दोन तीन पिढ्यांची त्यांनीं व्यवस्था केली असती !
सुविख्यात देशभक्तांच्या शिकवणुकीला अनुसरून ज्यांनीं आजवर विविध
क्षेत्रांत कार्यें केलीं, त्या सामान्य माणसांनासुद्धां छत्र्यांच्या काड्या व खिळे-
मोळे विकून चाळी उठवितां आल्या असत्या !! पण त्यांनीं केलेली जागृति
आणि तज्जन्य फळ दिसलें असतें काय ? जे सामान्यबुद्धीचे आणि सामान्य
कर्तृत्वाचे आहेत, त्यांनीं प्रपंचापलीकडे फारसें पाहूं नये हें ठीक आहे. पण
ज्या ब्राह्मणाच्या ठिकाणीं बुद्धिमत्ता, कर्तृत्व, धडाडी, राष्ट्रकार्याची तळ-
मळ आणि स्वराज्याची लालसा आहे; त्यांनीं संकुचित वृत्तीनें आपल्या-
पुरतें नि आपल्या पोटजातीपुरतें पहाणें हा फार संकुचितपणा आहे.

प्रत्येक हिंदूनें ज्ञान, प्रतिकार, वाणिज्य व सेवा अशा चारी
प्रकारच्या वृत्तीनें वागण्याचे दिवस आतां आले आहेत. ब्राह्मणांनीं
आजवर व्यापाराकडे आणि इतर उद्योगधंद्यांकडे लक्ष दिलें नसलें तर तें
यापुढें दिलेंच पाहिजे. कारण अर्थ हा एक पुरुषार्थ आहे आणि त्याला
आजच्या कालांत तर फार महत्त्व आलें आहे. वैश्यवृत्तीचा अंगिकार
करून द्रव्यार्जन करून राष्ट्रकार्याच्या उलाढाली हिंदुत्वदृष्टीनें ब्राह्मणांनीं
अवश्य कराव्या. ' दोन ब्राह्मण जमले म्हणजे भांडून तीन राजकीय पक्ष
काढतात आणि चार गुजराथी जमले म्हणजे सर्व मिळून एक गिरणी
काढतात व तींत आपलींच माणसें नेमतात ' यांत जें ब्राह्मणांच्या
स्वभावाचें चित्र रेखाटलें आहे, त्यावर कुंचला फिरवावयास नको काय ?

(६२९) **नवें केंद्र बनवाः**—दशविध ब्राह्मणांनीं प्रज्ञा, पराक्रम,
पैसा, संस्कृति नि हिंदुत्व या पंच अंगांनीं युक्त व्हावें. इतकेंच नव्हे तर

अखिल हिंदुसमाजांतील जे जे घटक पंच साधनांनीं संपन्न असतील त्यांना आपल्यांत मिसळून घ्यावें. आजच्या हिंदुसमाजांत मोठा दोष हा आहे कीं एखाद्याच्या ठिकाणीं योग्यता असली तरी त्याला वर सरकतां येत नाहीं. ज्या व्यक्तींत गुण आहे, पात्रता आहे, संस्कृति आहे, त्याला स्वसदृश गटामध्यें समाविष्ट होण्यास क्षेत्र मिळत नाहीं. वरील पंच अंगांनीं युक्त अशीं अखिल हिंदूंतील हजारों कुटुंबें एकवटलीं व तीं अन्नलग्नव्यवहारानें एकरूप झालीं म्हणजे एक मोठें सामाजिक केंद्र निर्माण होईल, नि त्याचें अनुकरण अखिल हिंदुसमाज करूं लागेल. आज समाजाचें केंद्र विचलित झालेलें आहे. पूर्वीं ब्राह्मण हें हिंदुसमाजाचें केंद्र होतें. पण यापुढें तें राहाणार नसून अखिल हिंदुसमाजांतील प्रज्ञा, पराक्रम, पैसा, संस्कृति व हिंदुत्व या पांच अंगांनीं युक्त असलेल्या व्यक्तींचीं कुटुंबें हेंच हिंदुसमाजाचें केंद्र राहील. म्हणून ब्राह्मणांनीं या केंद्रांत समाविष्ट व्हावें. ब्राह्मण या कार्यांत पुढें झाले तर प्रभु, पंचाल आणि इतर ब्राह्मणसदृश गट या व इतर कार्यांत ब्राह्मणाशीं हार्दिक सहकार्य करतील. कारण इतर गटांनाही असें केंद्र हवें आहे.

(६३०) वर्णाश्रमाभिमान्यांनो, हिंदुसमाजांत वर्णाश्रमाचे अभिमानी, जुन्या वळणाचे, व सनातनी वृत्तीचे लोक सर्व गटांत आहेत. ब्राह्मणांमध्यें जसे अस्पृश्यतानिवारणाला विरोध करणारे सनातनी आहेत त्याप्रमाणेंच महारांतही 'आहे तें ठीक आहे, अस्पृश्यता काढूं नये,' असें म्हणणारे लोक आहेत. महाराष्ट्रांत व अन्यत्र असलेला जैनसमाज हाही अस्पृश्यतानिवारणाला विरोध करितो. कारण जैनधर्मांत हिंदूप्रमाणें जातिसंस्था आहे. ( कौसंबीकृत भगवान् बुद्ध भाग २ पहा. ) प्रत्येक जातींत ही सनातनी वृत्ति आहे. प्रत्येक गटाला पुढें यावयास हवें आहे, पण तो मागच्यांना पुढें येऊं देण्यास सिद्ध नाहीं. सहभोजनप्रसंगीं ब्राह्मण, मराठा, प्रभु यांच्या दोन्ही बाजूस महार व भंगी बसतील. पण महाराजवळ मांग बसत नाहीं, मांगाजवळ भंगी बसत नाहीं! ही स्थिति पालटलीच पाहिजे. हिंदुसमाजांतील सर्व गटांत जे सनातनी आणि वर्णाश्रमाभिमानी आहेत त्यांनीं आतां लक्षांत ठेवावें कीं या नव्या यांत्रिक युगांत जुनी जन्मप्रधान समाजव्यवस्था टिकणार नाहीं. ब्राह्मणप्रधान, राजन्यप्रधान, वैश्यप्रधान अशीं सामाजिक स्थित्यंतरें आजवर झालीं; यापुढें

कामकरी व शेतकरीप्रधान अशी समाजरचना–निदान या वर्गांचे हितसंबंध लक्षांत घेऊन–व्हावयाची आहे. यास्तव जुनें टिकविण्याचा दुराग्रह धरूं नये. आजोबाचा अंगरखा घालून आतां निर्वाह होत नाहीं. तद्वतच वर्णाश्रमसंस्थेनें आजचे सामाजिक प्रश्न सुटत नाहींत.

(६३१) **संपत्तीचा योग्य विनियोग करा**:–केवळ पैशाशिवाय इतरत्र न पाहाणारा, प्रसंगीं चमडी देईल पण दमडी न देणारा असा एक वैभवसंपन्न वर्ग आहे. या वर्गानें हिंदुत्वनिष्ठेनें द्रव्य मिळवावें, तें रक्षण करावें आणि हिंदुसमाजाच्या कार्यास उदारपणानें द्यावें. संपत्ति ही समाजां-तून मिळते. तिजवर मालकी हिंदुसमाजाची आहे असें लक्षांत ठेवून आपण फक्त वहिवाटदार या नात्यानें हिंदुसमाजाच्या अभ्युदयाकडे संप-त्तीचा व्यय करावा. संपत्ति हें साध्य नसून साधन आहे. ती हिंदुत्वाकरितां आहे, हिंदुराष्ट्राकरितां आहे, संपत्तीचा विनियोग हिंदुसंघटनेकडे व हिंदु-बलवर्धनाकडे न करतां ती नुसती संग्रहीं ठेवली तर प्रसंगीं अहिंदु येऊन ती सगळी लुबाडून घेऊन जातील! अहिंदूंची या तऱ्हेनें धन करण्यापेक्षां हिंदुसमाजाला बलवान् करण्याकडे संपत्तीचा व्यय करणें योग्य नव्हे काय? आजवर इतिहासकालापासून हिंदूंची संपत्ति अहिंदूंनीं छलबलानें नेल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. पूर्वीं ज्या चुका झाल्या त्या झाल्या. यापुढें तरी शहाणपणा शिकावें.

(६३२) **कारागिरांनो व कलावंतांनो !**:–तुमचें कौशल्य, कला-भिज्ञता हीं सर्व हिंदुत्वाला उजाळा आणण्याकरितां हिंदुत्वनिष्ठेनेंच दृग्गोचर झालीं पाहिजेत. धर्म, समाज, संस्कृति आणि राष्ट्र यांना कला व कौशल्य यांमुळें वैशिष्ट्य येत असतें. तें वैशिष्ट्य टिकविण्यास व जगाला देण्यास स्वधर्माचा व स्वसंस्कृतीचा अभिमान लागतो. अत्युत्तम कौशल्याचीं कामें केलीं, कलावंतांनीं उत्कृष्ट साहित्य निर्माण केलें, पण त्याच्यामागें हिंदुत्वनिष्ठेचा नि संघटनेचा जोर नसेल तर हीं सर्व एका दिवसांत भस्म होतात. अहिंदूंनीं आजवर अनेक उत्कृष्ट ग्रंथ जाळले, कलाकौशल्याचा नाश केला आणि जगांतील उत्कृष्ट कार्यें नष्ट केल्याची साक्ष इतिहास देत आहे. तो प्रसंग पुन्हां न यावा म्हणून तुमच्यामध्यें जाज्वल्य हिंदुत्वनिष्ठा नि संघटना यावयास हवी.

(६३३) **स्त्रिया व उच्च कार्यें**:—पूर्वीपेक्षां आजचें जग निराळें झालें आहे. नवे विचार, नव्या कल्पना तुम्ही ग्रहण करीत आहां. स्त्रीवर्गा-वर पुरुषांकडून आजवर झालेल्या अन्यायाचा प्रतिकार तुम्ही करूं इच्छितां. स्त्रियांचे हक्क, स्त्रियांचा स्वाभिमान व स्त्रियांचें कर्तृत्व यांसंबंधीं तुम्हीं चालविलेलीं आंदोलनें अभिनंदनीय आहेत. पण हें सर्व हिंदुत्वाकरितां, हिंदु-समाजाचे अभ्युदयाकरितां आहे व असलें पाहिजे हें विसरूं नका. तुम्ही हिंदु म्हणून हिंदुत्वाभिमानानें संघटितपणें जर वागाल तरच जगाल! गृहिणी नि माता या दृष्टीनें स्त्रियांचें कार्य मोठें आहे. हीं मुख्य कार्यें करून ज्यांना शक्य असेल, त्यांनीं इतर हिंदुसमाजसंबद्ध अनेक कार्यें करावींत. दुकानें, खानावळी, हॉटेलें, यात्रा, प्रवास इत्यादि ठिकाणीं अहिंदूंच्या वाग्जालांत सांपडण्याचा मोह शिक्षित स्त्रियांनाही होत असतो, तो त्यांनीं अवश्य टाळावा. अर्थोत्पादनाकरितां स्त्रिया आज विविधकार्यांत पडत आहेत. पण तें कर-तांना कुलीनत्वाला बट्टा लागतो कीं काय हें त्यांनीं ध्यानांत ठेवावें. शील, चारित्र्य, कुलीनत्व, सत्प्रवृत्ति, पातिव्रत्य यांना जगाच्या अंतापर्यंत फार मूल्य आहे. हिंदुसंस्कृतीचीं हीं अभिमानस्थानें आहेत. त्याचा हिशेब आणे पैनें होत नाहीं. नाटकें व सिनेमा यांतील स्त्रियांचीं कामें हीं वेश्यांनीं करावींत असें तज्ज्ञ सांगतात. सिनेमा, नाटकें यांत कामें करण्यांत कुलीनत्वाला धोका पोंचण्याचा संभव आहे, असें आतां नटीही म्हणत आहेत, हें ध्यानीं घेऊन हिंदु स्त्रियांनो, धार्मिक, शैक्षणिक, सामाजिक अशीं अनेक कार्यें तुमची मार्गप्रतीक्षा करीत आहेत, तिकडे तुम्ही लक्ष द्या; असें सांगावेसें वाटतें.

(६३४) **तरुण व तरुणींना दोन शब्द**:—तारुण्य हा एक आयुष्यां-तील मोठा आनंदाचा काळ असतो. तारुण्यसुलभ दुर्दम्य अशा आकांक्ष त्यावेळीं उत्पन्न होत असतात. तरुणांनीं व तरुणींनीं हौशी, उत्साही व महत्त्वाकांक्षी असावें यांत वाद नाहीं. पण ही हौस, ही आकांक्षा, हा उत्साह हिंदुत्वाचा, हिंदुराष्ट्राचा आणि हिंदुसंस्कृतीचा नको काय? तरुण-तरुणीमध्यें केवळ चार दिवस गंमतीनें घालविण्याची वृत्ति वाढत आहे. विवाहपूर्व संभोगस्वातंत्र्य असावें कीं नसावें, स्त्रीला मातृपदांतून कसें मुक्त करावें, संततिनियमनाचीं साधनें कशीं वाढवावींत, विवाहसंस्था कां असावी

